

Neptune

## व्हॉएजर-२ ची नीलग्रह नेपच्यूनची यात्रा

सूर्याच्या चोहो बाजूंना पृथ्वीसकट बुध, गुरु, शुक्र, मंगळ, शनि, युरेनस, नेपच्यून, प्लूटो हे ग्रह आणि इतर अनेक उपग्रह परिभ्रमण करीत असतात. यालाच 'सौर-कुटुम्ब' किंवा 'सौर-परिवार' असे म्हणतात. आपणा सर्वांना हेही चांगल्या प्रकारे माहीत आहे की या सौर-परिवाराचे केन्द्र 'सूर्यगोल' हे आहे.

आपल्या चारी बाजूंना असणारे वातावरण व ग्रहांच्या आतली स्थिति जाणण्याच्या जिज्ञासे-मुळे माणूस निरंतर प्रयत्नशील राहिलेला आहे.

त्यासाठी त्याने अंतरिक्षात अनेक रॉकेट्स सोडली. नेपच्यून ग्रहाची वैशिष्ट्ये जाणून घेण्यासाठी अमेरिकेने व्हॉएजर-२ चा उपयोग केला. त्याने नेपच्यूनबद्दल खूपच महत्त्वपूर्ण अशी माहिती पाठवली आहे.

२० ऑगस्ट, १९७७ ला अमेरिकेने व्हॉएजर-२ अंतरिक्षात सोडले. व बारा वर्षे निरन्तर ४.४३ लाख करोड (बिलियन) मैलांचा प्रवास करून ते नेपच्यून ग्रहाच्या सीमेपर्यंत पोचले. सूर्यापासून २८० कोटी मैल दूर असणारा नेपच्यून हा ग्रह आपल्या निळ्या रंगामुळे फारच सुन्दर दिसतो. व्हॉएजर-२ ने पाठवलेल्या फोटोंवरून आपल्याला असे ज्ञान होते की नेपच्यून ग्रहाला घेरणारी ५ वृत्ते आहेत व त्यातली तीन अगदी अरुंद आहेत. या ग्रहाच्या वरच्या थरात ताशी ४०० मैलांच्या वेगाने तुफानी वारे वहात असतात.

नेपच्यूनच्या चारी बाजूंना चन्द्रासारखे ५ उपग्रह भ्रमण करत आहेत. त्यातला 'ट्रिटास' नावाचा चन्द्र आपल्या चन्द्राच्या मानाने फारच लहान असून दिसावयास तो अत्यन्त मनोहारी असा आहे. त्याच्या आत बर्फच बर्फ भरलेला असावा असे मानले जाते.

व्हॉएजर-२ ने पाठवलेल्या माहितीच्या आधारे 'नेपच्यून' ग्रह व सौर-परिवारातील त्याचे महत्त्व याबाबत आणखी काही नवीन माहिती प्रकाशात आणण्यासाठी वैज्ञानिक प्रयत्नशील आहेत.


Earth


Saturn


Mercury


Sun



# धूर्त व्यापारी

शाहाबाद नावाच्या एका जमीनदारी गावात भूपति नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याला गजपति नावाचा एक मुलगा होता. तो शेतीवाडीच्या कामात मुळीच लक्ष घालत नसे. त्यामुळे भूपतीने आपल्या मृत्युसमयी आपला मुलगा व त्याचा मामा नागराज यांना जवळ बोलावून आपल्या मृत्युपत्रातील एक खोच सांगितली.

ती खोच अशी होती—गजपति आपल्या पित्याची स्थावर जंगम इस्टेट भोगू शकतो, पण ती विकण्याचा मात्र अधिकार त्याला नाही.

भूपतीच्या मृत्यूनंतर लागोपाठ दोन वर्षे शेतात पीक आलेच नाही. नंतरच्या वर्षी बादळवारा व मुसळधार पावसामुळे त्याचा गुरांचा गोठा मोडून पडला व सारी जनावरे वाहून गेली. जनावरे खरीदणे, त्याचप्रमाणे बी-बियाणे, खत व मजुरांची मजुरी यासाठी लागणारे पैसेही गजपतीकडे नव्हते. म्हणून तो शेजारच्या गावी आपल्या मामाकडे गेला व त्याच्याजवळ त्याने थोडे पैसे मागितले.

यावर नागराजने त्याला सल्ला दिला—"अरे भाचोबा, आजकाल शेतीत काही फायदा नाही बघ! वेळेवर पाऊस पडत नाही अन् पीकही हाती लागत नाही. मला विचारशील तर, माझं मत असं आहे की, यापेक्षा व्यापार करणं कितीतरी पट उत्तम! तू एकादा व्यापार सुरू कर बघ, कित्येक लाख मिळवू शकशील!"

"मला व्यापाराचा तसा काही अनुभव नाही; अन् दुर्दैवाने नुकसान झालं तर? आपलाच पैसा असेल तर हरकत नाही एक वेळ, पण कर्जाऊ घेतलेली रक्कम अशी नाहीशी झाली तर परत कशी करायची ती?" भाच्याने मामाला विचारले.

मीनाक्षी सप्रे



"त्याची काळजी कशाला? सावकार तुझं काय करणार? तुला इस्टेट विकायचा अधिकार कुठे आहे?" मामाने समजावले.

यानंतर महिनाभरातच गजपतीने गावच्या सावकारांकडून जवळ जवळ लाख रुपये कर्जाऊ घेतले अन् आपला व्यापार सुरू केला. तो घर, शेतं व बऱ्याच मोठ्या इस्टेटीचा मालक असल्याने सावकारांनी मोठ्या निःशंक मनाने त्याला पैसे दिले होते.

गजपती शेतकऱ्यांकडून धान्य विकत घेई आणि ते गाड्यांवर लादून नेऊन तो शहरांतल्या व्यापाऱ्यांना विकी. नंतर त्या पैशांनी तो चिंच, तेल वगैरे खेड्यात न मिळणाऱ्या वस्तु आणून आपल्या गावात विकी. व्यापाराचा विशेष अनुभव नसला तरी यावेळी परिस्थिती त्याला चांगलीच अनुकूल होती, म्हणून या वर्षी खूपच फायदा झाला अन् व्याज चुकवूनही त्याच्याजवळ दहा हजार रुपये रोख वाचले.

पण गजपती एवढ्याने संतुष्ट नव्हता. एकाच वेळी इतके धन पाहून त्याच्या मनात लोभ उत्पन्न झाला. त्याच्या मनात आले—"या व्यापारात दरवर्षी दहा-दहा हजार रुपयांचा फायदा झाला तरीही मुद्दल परत करायला कमीत कमी दहा वर्षं तर लागतीलच. यानंतरच्या दहा वर्षातच तो एक लाख रुपये मिळवू शकला असता, म्हणजे याचाच अर्थ असा की, त्याला लखपती बनायला अजून वीस वर्षं तरी हवीत!"

असा एकूण हिशोब करत गजपति मनात असंतुष्टच राहू लागला. 'व्यापारात नुकसान झालं' असं सांगून सावकारांशी लबाडी करून काही क्षणातच लखपति बनायचा निर्णय त्याने घेतला. त्याच्या मनात हा पक्का विश्वास होता कि इस्टेट विकायचा आपल्याला अधिकार नाही, तेव्हा आपलं कोणीही काही वाकडं करू शकणार नाही.

नंतर गजपतीने ते एक लाख रुपये मामाच्या घरात लपवून ठेवले. आणि सगळीकडे सांगत सुटला की व्यापारात आपलं फारच नुकसान झालेलं आहे. ही वार्ता सावकारांच्या कानी पोचली आणि त्यांनी चौकशी केली तेव्हा त्यांना समजले की आपली इस्टेट विकायचा अधिकार गजपतीला नाही. मग मात्र त्यांचं धाबं दणाणलं! नाइलाजाने त्यांनी जमीनदाराकडे याबाबत तक्रार केली.

जमीनदार रामनारायण नीट रीतीने न्याय करून निर्णय देण्यात चांगलाच प्रसिद्ध होता. त्याने आपल्या नोकरांना पाठवून गजपतीच्या व्यापाराबद्दल चौकशी करवली. नोकरांनी दिलेल्या माहिती प्रमाणे पाहता गजपतीला व्यापारात नुकसान येणे शक्य नाही हे त्याच्या लक्षात आले; कारण शहरातल्या कोणाही व्यापाऱ्याने त्याच्याशी कोणत्याही प्रकारे लबाडी वगैरे केलेली नव्हती; व्यवहार सरळ होता.

मग एके दिवशी जमीनदाराने गजपती व त्याच्या सावकारांना बोलावून गजपतीला विचारले—"काय रे, हे खरं का, की तू या सावकारांकडून एक लाख रुपये कर्जाऊ घेतलेस?"

"हां हुजूर, खरंच आहे हे, तसे कागदही आहेत त्यांच्याकडे!" गजपतीने कज घेतल्याचे कबूल केले.

"तुला व्यापारात नुकसान झालं म्हणे?" पुन्हा जमीनदाराने विचारले.



"होय, व्यापाराचा मला काही अनुभव नाही ना; म्हणून नुकसान झालं माझं?" तो म्हणाला.

"तुझ्याजवळ भरपूर जमीन वगैरे इस्टेट आहे, हे पाहूनच सावकारांनी तुला कर्ज दिलं हे ही खरं?" जमीनदाराने विचारले.

"हां, ही गोष्टही खरीच की माझ्याजवळ जमीन आणि इतर ही भरपूर इस्टेट आहे." गजपतीने कबुली दिली.

"मग अडचण काय? तू आपली जमीन अन् इस्टेट विकून यांचं कर्ज परत कर!" जमीनदाराने सुचवले.

यावर घाबरून कापत-कापत गजपती म्हणाला—"पण महाराज, माझ्या वडिलांनी

तर असं मृत्युपत्र लिहिलय की–आपली जमीन व कोणतीही इस्टेट विकायचा मला अधिकार नाही; त्याचा केवळ उपभोग घेऊ शकतो मी." हे बोलतानाच त्याने मृत्युपत्राचा कागद जमीनदारापुढे केला.

कागद पाहून पुन्हा परत देत जमीनदाराने त्याला आपला निर्णय सुनावला–"तुझं म्हणणं बरोबर आहे, हे मी मान्य करतो. पण तुला आपली शेतं व घर भाड्याने देण्याचा हक्क आहे. तेव्हा हे सर्व तू या सावकारांना शंभर वर्षांसाठी दे. नंतर ही संपत्ति तुझ्या वारसदारांना परत मिळेल!"

हा निर्णय ऐकून गजपती घाबरून म्हणाला–"माझी सारी इस्टेट मिळून कमीत कमी दहा लाखांची तरी आहे. एक लाखाच्या कर्जासाठी इतकी सारी इस्टेट यांच्या हाती देणं न्यायसंगत कसं होईल?"

यावर हसत-हसत जमीनदार म्हणाला–"लाख रुपये घेऊन कर्जदारांना ते परत न करणंही अन्यायच नाही का? तुला इस्टेट विकायचा अधिकार नाही, त्यामुळे तुझं कोणी काही वाकडं करू शकणार नाही हे जाणूनच तू हे तिरकं वळण घेतलंस. सल्ला कोणी दिला तुला हा?"

आता डोळ्यात पाणी आणत गजपती म्हणाला–"मी आपल्या मामाच्या सल्ल्याने वागून ही चूक केलेली आहे." आणि पुढे त्याने आपला सर्व पाढा जमीनदारापुढे वाचला.

जमीनदाराने आता त्याच्या मामाला-नागराजला-बोलावून तंबी दिली–"तू तर वयाने मोठा आहेस, अन् तरीही आपल्या भाच्याला मोहात पाडून लबाडी करायला शिकवलीस. या सावकारांचं कर्ज आत्ता परत करून टाक. हा तुम्हा दोघांचा पहिलाच अपराध आहे म्हणूनच तुला अन् तुझ्या भाच्याला शिक्षा न देता सोडून देत आहे मी."

यानन्तर मामाकडे लपवून ठेवलेलं धन आणून गजपतीने सावकारांचे पैसे परत केले. पण गजपती अन् त्याच्या मामाची लोकांत एकदा बदनामी झाली ती झालीच.






[ ३ ]

[ राजा शान्तिदेव, त्याची पत्नी व दोन वर्षांचा राजपुत्र यांचा अंत करण्याचे कारस्थान सेनापती वीरसिंहाने आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीने रचले. ही खबर मिळताच राजाने आपली राणी व राजकुमार यांना गुप्त भुयारी मार्गाने राजवाड्याबाहेर काढले व स्वतःने एकटेच वीरसिंहाच्या सिपायांशी लढत लढत अखेर नदीत उडी मारली. पुढे वाचा…]

राणी पायऱ्यांवरून खाली उतरली आणि साश्रु नयनांनी तिने वर पाहिले. पण त्याच वेळी राजाने वरचा दरवाजा बन्द केला. कदाचित् हीच आपली व राजाची शेवटची भेट असावी या विचाराने तिच्या हृदयात दुःखावेग उसळून आला. थोड्याच वेळापूर्वीपर्यंत तर आपण राजासमवेत सुखाने कालक्रमणा केली. त्यावेळी आता थोड्याच वेळात आपणावर हा प्रसंग गुदरेल याची कल्पना कोण कशी करू शकणार?

राणीच्या मागे दरवाजा बन्द झाला, तेव्हा तिला एकदा वाटले की आता आपल्याला कदाचित साऱ्या जगाचेच दरवाजे बन्द झालेत! आपल्या आयुष्यात तिने कधी एकटीने प्रवास केला नव्हता. राजकुमारी म्हणूनच तिचा जन्म झाला होता. पुढे शान्तिदेवशी विवाह करून ती



राणी बनून शान्तिपुरला आली. त्यामुळे केव्हाही, कुठेही गेली तरी तिच्या सख्या नेहमीच तिच्या आसपास असत.

बिचारी मुक्यानेच अश्रु ढाळत राहिली ती! तिच्या कडेवर छोटा बाळ गाढ झोपला होता. तो जागा होणार नाही, अशी काळजी घेत अन् दुसऱ्या हातातली मशाल संभाळत मोठ्या सावधपणे पायऱ्या उतरून राणीने भुयारी मार्गात प्रवेश केला. मशालीच्या उजेडात तिला केवळ तीन-चार हातावरचाच मार्ग दिसू शकत होता; अन् पुढे अगदी काजळकाळा अंधार होता! भुयारी मार्ग दगडात खोदलेला होता. राणीला हे माहीत होते की मुद्दाम वरून सपाट केलेल्या एका पहाडावरच राजवाडा बांधलेला होता. आता ती त्या पहाडाच्या पोटातल्या भुयारी मार्गातून चालत होती. अजून किती चालायचंय? हा मार्ग कुठे नेऊन सोडील आपल्याला?

भुयारी मार्ग आतून ओला होता; वारा अजिबात नव्हता तिथे! राणीचा पाय कशावर तरी ठेचकाळला, पडणारच होती खाली ती; पण मोठ्या प्रयत्नानेच तिने स्वतःला सावरले! पण त्या धक्क्याने मशालीवरची तिची पकड सैल होऊन ती खाली पडली, अन् आता सर्वत्र काळा-काळा अंधारच अंधार पसरला! काय करावं हे न उमजून जागच्या जागी उभीच राहिली ती!

थोड्या वेळाने अंधाराला तिचे डोळे सरावले. दूरवरच्या एका विचित्रशा प्रकाशाने तिचे लक्ष वेधून घेतले अन् पुन्हा ती हळूहळू चालू लागली. रस्त्याच्या एका बाजूला जडवलेल्या रत्नातून तो प्रकाश येत होता! साऱ्या वाटेवरच अधून-मधून तशी रत्ने जडवलेली होती, अन् ती राणीला पुढे जाण्याचा रस्ता दाखवत होती!

इतक्यात कुमार जागा झाला अन् रडू लागला. राणीने त्याला छातीशी घट्ट धरले अन् त्याला झोपवायचा प्रयत्न करत ती वेगाने चालू लागली. पण सर्व ताणामुळे



अन् चालायची सवय नसल्याने ती जास्त थकत गेली. एक एक पाऊल उचलणे आता तिला जड जाऊ लागले. तरीही भुयारातून बाहेर पडण्याच्या ओढीने श्वास रोखून ती पुढे चालत राहिली. राजाने सांगितल्याप्रमाणे वाटेवरची रत्नं मोजण्याचंही भान तिला राहिलं नव्हतं.

शेवटी ती भुयारी रस्त्याच्या दुसऱ्या टोकाशी पोचली, पण बाहेर पडण्याचा मार्ग कुठंय? समोर तर एक आडवी भिंत होती अन् तिच्या मधोमध एक मोठा चमकदार असा पत्थर होता. जवळचं भिंतीतलं रत्न तिने दोन-तीनदा फिरवलं अन् समोरचा तो पत्थर बाजूला सरकला. त्या दारातून राणी बाहेर पडली, तो तिथे एक आणखी एक रुन्द भुयार लागले. त्या भुयारातून थोडे पुढे गेल्यावर राणी एका मोठ्या जंगलात पोचली.

झाडांतून चांदणे झिरपत होते; सारे जंगल अगदी शान्त, गंभीर होते. राणीने त्या थंड मोकळ्या हवेत जोरदार श्वास घेतला. बाळ पुन्हा झोपला; राणीला त्यामुळे आनन्दच वाटला, कारण त्याच्या रडण्याच्या आवाजाने एकादे जंगली जनावर जवळ येण्याची शक्यता होती. तिला खूप तहान लागली होती, पण या मध्यरात्रीच्या वेळी जंगलात पाणी कुठे शोधणार ती?



दूरवरून तिला कोल्हेकुई ऐकू येत होती. तिला वाटले की बहुधा लवकरच सकाळ होणार असावी. बाळाला मांडीवर घेऊन ती एका मोठ्या दगडावर बसली. थोड्या वेळातच कुठूनसा वाहत्या पाण्याचा आवाज तिला ऐकू आला. बाळाला खाली गवतावर ठेवून ती पाणी पिऊन आली अन् जाग्या झालेल्या बाळालाही थोडं पाणी पाजलं तिनं.

मुलगा हसत हसत कधी आपल्या आईकडे तर कधी भोवतालच्या नवीन वातावरणाकडे मजेने पहात होता. पूर्व दिशेला तांबडं फुटू लागलं होतं, अन् सर्वत्र पक्षी जागे होऊन किलबिल करू लागले होते. आपल्या आईच्या मांडीवरून उतरून



बाळ भोवतालच्या वातावरणावर खूश होऊन दुडदुड चालत पुढे पुढे जाऊ लागला.

"पुढे जाऊ नको बाळा!" थकलेल्या राणीने त्याला आवाज दिला.

आईकडे एकदा वळून पाहून हसून बाळ पुन्हा पुढेच जाऊ लागला. हे पाऊन त्याला धरून आणण्यासाठी उठून उभे राहून एक पाऊल पुढे टाकणार, तोच अशक्तपणामुळे तोल जाऊन खाली पडून राणी बेशुद्ध झाली!

"पुढे नको जाऊ रे बाळा!" बास, इतकंत ती पडता-पडता बोलू शकली; पुढे तिच्या तोंडून शब्दच फुटला नाही!

* * * *

जंगलात रहाणारा जयानन्द नावाचा तपस्वी नेहमी प्रमाणे सूर्योदयापूर्वीच स्नान करण्यासाठी जवळच्या नाल्याकडे निघाला. एका बालकाच्या हसण्या-खिदळण्याचा आवाज ऐकून चकितच झाला तो! सभोवार चौकस दृष्टी फिरवताच समोरच एक सुंदर बाळ प्रसन्नपणे हसत असलेले दिसले त्याला. कोणी दिव्य बालकच स्वर्गातून अवतरलंय असे वाटून मुनि त्याच्या जवळ गेला.

त्या सुन्दर बाळाने जणु आपल्याला उचलून घ्यावे असा संकेत करत आपले हात उचलेले पाहून मुनीने त्याला उचलून कडेवर घेतले. बाळाच्या गळ्यात सुवर्णहार चमकत होता. हारातल्या पदकावर आपल्या सोंडेत कमळ उचलून धरलेल्या हत्तीचे चित्र अंकित केलेले होते. राज-परिवाराशी संबंधित ते राजचिन्ह मुनीने ताबडतोब ओळखले.

बाळाने पश्चिमेकडे हाताने संकेत केला अन् तिकडेच झुकत तो उतरायचा प्रयत्न करू लागला; म्हणून त्याला घेऊन मुनि त्याच दिशेने चालू लागला.

हिरव्यागार, दाट अशा हिरवळीवर राणी बेशुद्ध पडलेली होती. मुनीने झऱ्याचे पाणी आणून तिच्या चेहऱ्यावर शिंपडताच तिने हळूहळू आपले डोळे उघडले व उठून

बसायचा प्रयत्न केला; पण तिला ते जमेना.

"कोण आहेस मुली तू?" मुनीने तिच्या तोंडाजवळ आपला कान नेत विचारले.

"आपण मला मुलगी म्हटलेत! खरंच आपलीच मुलगी माना मला. साक्षात् देवानेच पाठवले आपल्याला! मी या राज्याची अभागी राणी आहे. रात्री शत्रूने राजवाड्याला वेढा दिला. पतीने आज्ञा दिल्याने मी बाळाला घेऊन बाहेर पडले." अडखळत राणीने माहिती दिली.

"काल तर युवराजाचा वाढदिवस होता ना?" मुनीने आश्चर्याने विचारले.

"होय महात्मन्! बाळाच्या जन्म-दिवसाच्या उत्सवाचा फायदा घेतला घरच्याच शत्रूने." विषादाने राणी बोलली. तिला आता श्वास घेणेही जड जात होते.

"ओह! असं झालं होय? समजलं सर्व मला! आता कांही बोलू नकोस बाळ, तुला फारच अशक्तपणा आलेला दिसतोय!" मुनि म्हणाला.

राणी एकवार विषादाने हसली–"मला तर भीती पडलीय की मला पुन्हा कधी बोलण्याची संधीच मिळणार नाही. मी तर असाच विचार करते आहे की बाळाच्या रक्षणासाठी देवानेच पाठवले आपणाला. आता कसलीही शंका किंवा चिन्ता न बाळगता डोळे मिटून घेते मी. महाराजांच्या कुशलतेची वार्ता मिळाली तर आनन्दाने कायमचे डोळे मिटेन मी!" राणी म्हणाली.

"बाळ, अग देवाचा अनुग्रह नसता तर काय मी असा वेळेवर पोचलो असतो का? आपण त्या करुणामय परमेश्वराची प्रार्थना करू या की महाराजांचं रक्षण व्हावं! यावेळी आपण जास्त काय करू शकणार? सर्व देवाचीच कृपा!" मुनि म्हणाला.

अशक्तपणे राणी हसली. ओठावरचे हसे मिटण्यापूर्वीच तिचे डोळे कायमचे बन्द झाले! तिची नाडी पाहून मुनीने ओळखले की हे डोळे आता मिटलेलेच रहाणार! (क्रमशः)



# स्वावलंबन

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाकडे परत आला. फान्दीवरून प्रेत उतरवून त्याने आपल्या खांद्यावर घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाचा मार्ग आक्रमू लागला. तेव्हा शवात वास करणारा वेताळ त्याला विचारू लागला–"राजा, तू एका विशाल अशा देशाचा महाराजा असूनही, या मध्य-रात्रीच्या वेळी या भेसूर जंगलात तुला असे कष्ट करताना पाहून मला तुझी फार दया येत आहे. हा प्रश्न मुळीच महत्त्वाचा नाही कि, हे काम करायला तुला प्रवृत्त करणारा इसम कोणी साधारण माणूस आहे, कोणी मोठा बुद्धिमान व्यक्ती आहे, की सर्वस्वाचा त्याग करून वनात तपाचरण करणारा कोणी महामुनी आहे. पण जो कोणी आपल्याला एकादे कार्य साधण्यासाठी प्रवृत्त करीत असतो, तोच माणूस ते कार्य

## वेताळाच्या गोष्टी



साधण्याच्या बाबतीत आपण जसजसे एकेका पायरीने यशाच्या जवळ पोचू लागतो तसतसा आपला हेवा करू लागतो. माझ्या या विधानाच्या पुष्टयर्थ, प्राचीन काळी सदानन्द नावाच्या एका मुनीने विक्रम नावाच्या एका माणसाशी कशी वर्तणुक केली हे दाखवणारी एक गोष्ट मी तुला सांगतो. आपले श्रम विसरण्यासाठी ही गोष्ट तू ऐक.

वेताळ गोष्ट सांगू लागला—

मयूरी नावाच्या राज्यात कान्तिपुर हे एक छोटेसे गाव होते. त्या गावात धर्मदास नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्या एकुलत्या एका मुलाचे नाव होते विक्रम. लिहिण्या-वाचण्यात विक्रमला फारशी रुचि नसे. पण त्याची आई त्याला ज्या गोष्टी सांगे, त्या मात्र त्याला फार आवडत. त्या ऐकून ऐकून विक्रमला असा विश्वास वाटू लागला होता की जंगलात तप करणाऱ्या मुनींजवळ काही असामान्य अशा शक्ति असतात; अन् त्यांच्याजवळ राहून मन्त्र शिकून घेतले तर कोणतेही कार्य आपण साधू शकतो.

एक दिवस विक्रमला जवळ बोलावून धर्मदास म्हणाला—"बेटा, तुझं वय तर वाढत चाललं आहे, पण शिकण्यात मुळीच लक्ष नाही तुझं! तेव्हा आजपासून तू आपला मला आपल्या शेतीवाडीच्या कामात मदत करू लाग. आज तू आपल्या शेळ्या चरायला घेऊन जा."

विक्रम शेळ्यांना हाकून जंगलातल्या गवताळ मैदाना पर्यंत घेऊन गेला, अन् शेळ्यांना चरायला सोडून तो एका झाडाच्या खोडाला टेकून झोपून गेला. काही वेळाने जागा झाल्यावर पहातो तो शेळ्या सगळ्या गायब! शेळ्या शोधत तो जंगलात आणखी थोडा पुढे गेला. एका जागी एक मुनि झाडाखाली बसलेला त्याला दिसला. त्या मुनीचे नाव होते सदानन्द.

सदानन्द डोळे मिटून ध्यानमग्न बसलेला होता. विक्रम त्याच्या समोर बसून राहिला.



मुनीने डोळे उघडले तेव्हा विक्रमने नम्रपणे त्याला नमस्कार केला.

मुनीने हसून विक्रमला विचारले—"बेटा, रानटी जनावरांनी भरलेल्या या जंगलात तू कशासाठी आला आहेस?"

"महात्मन्, मैदानात चरणाऱ्या माझ्या शेळ्या हरवून गेल्या आहेत. त्यांना शोधत मी इथवर आलो आहे." विक्रम उत्तरला.

मुनीने क्षणभर डोळे मिटून घेतले अन् ते उघडून तो म्हणाला—"तू जेव्हा झोपला होतास ना, तेव्हाच त्या साऱ्या तुझ्या घरी सुरक्षित पोचून गेल्या आहेत. आता अंधार होईल. जनावरांपासून तुला काही त्रास न व्हावा, म्हणून ही रुद्राक्षांची माळ तू गळ्यात घाल, अन् खुशाल निर्भय होऊन घरी जा." असे म्हणून त्याने विक्रमच्या हाती एक रुद्राक्षमाळ दिली.

विक्रमने माळ घेत म्हटले—"स्वामीजी, माझ्या आईने मला सांगितलं आहे की आपल्यासारख्या मुनींजवळ अनेक प्रकारच्या सिद्धि असतात. आपण मला काही मन्त्र दिलात, तर त्याच्या साह्याने मी ही एक महान् व्यक्ति बनायचा प्रयत्न करीन."

"बाळा, माणूस आपल्या जीवनात महान बनू इच्छित असेल, तर मन्त्र-तन्त्रावर



अवलंबून रहाण्या ऐवजी त्याने स्वावलम्बी बनणं चांगलं! जंगलात इतक्या दूर एकटा आलेला तुझ्यासारखा साहसी मुलगा आपल्या जीवनात नक्कीच यशस्वी होऊ शकेल. यात कठीण असे काहीच नाही." मुनीने त्याला सांगितले.

मुनीचे प्रोत्साहन मिळाल्याने विक्रमने दुसऱ्याच दिवसापासून शिक्षणात मन घातले. रात्रंदिवस अभ्यास करून त्याने आपल्या गुरुजींचा विश्वास संपादन केला. पंधरा वर्षांचा होता होता त्याने सर्व शास्त्रांचे ज्ञान मिळवले.

एके दिवशी अरण्यात जाऊन विक्रमने सदानन्द मुनींना म्हटले—"स्वामी, आपल्या

प्रोत्साहनाने मी शिक्षणात मन घालून वेद व शास्त्रे यांचा अभ्यास केला. तरीही अजून पूर्ण संतुष्ट नाही झालो मी! मला वाटतं की जीवनात सफलता मिळवण्या-साठी केवळ शिक्षणच पुरेसं नाही."

यावर मुनि डोके हलवून म्हणाले–"तुझा विचार अगदी बरोबरच आहे. आत्मरक्षा व शत्रुदमन करण्यासाठी तुझ्या या विद्या पुरेशा नाहीत. तुला क्षत्रियोचित विद्या शिकायला हव्यात. आम्रपाली नगरात ज्वालामुखी नावाचा एक वीर रहातो. त्याच्या कडे जाऊन माझा निरोप सांग, म्हणजे तो तुला क्षत्रियोचित सर्व विद्या शिकवील." मुनीचा आशिर्वाद घेऊन विक्रम तेथून निघाला.

आम्रपालीला पोचून त्याने मुनीचा संदेश ज्वालामुखीला सांगितला व त्याचा शिष्य बनून अल्पकाळातच सर्व क्षत्रियविद्यात तो प्रवीण बनला. त्याच वेळी रत्नभूषण नावाच्या जमीनदाराने विक्रमला बोलावणे पाठवले. विक्रम त्याला जाऊन भेटला.

जमीनदार म्हणाला–"विक्रम, मी ज्वालामुखी कडून तुझ्याबाबत ऐकलं. तुला माझा अंगरक्षक म्हणून नेमायची माझी इच्छा आहे."

विक्रमने त्याला आपली संमति दिली, पण त्याच दिवशी सदानन्द मुनिला भेटून त्याने त्याला सर्व वृत्तान्त कथन केला.

मयूर नगरीच्या मन्त्र्याचे नाव होते सुमन्त. तो रत्नभूषणचा जिवलग मित्र होता. एकदा तो रत्नभूषणला भेटायला आला असता बोलता बोलता त्याला म्हणाला–"आपल्या राज्याची आर्थिक परिस्थिति आजकाल ठीक नाही. खजिन्यात पुरेसं धन नाहीय. ही परिस्थिति सुधारायची असेल, तर जनतेवर अधिक कर लादायला हवा. पण महाराज याला मान्यता देत नाहीत. काय करावं हेच समजेनासं झालंय मला!"

जवळच असलेल्या विक्रमनेही मन्त्र्याचे हे बोलणे ऐकले व ताबडतोब तो म्हणाला–"मन्त्रीवर, आपण गैरसमज करून घेणार नसाल, तर जनतेवर अधिक कर न लादता खजिना भरण्याचा उपाय मी आपणाला सांगू शकेन."

"काय बरं उपाय तो?" सुमन्तने कुतूहलाने विचारले.

"आपल्या राज्यात असे अनेक व्यापारी आहेत की जे पूर्व-समुद्रातल्या बेटांशी आणि आपल्या शेजारच्या राज्यांशी मोठा व्यापार करतात. ते यासाठी न्यायोचित कर आपणाला देतात की नाही याची आपण कृपया चौकशी करावी. आपली अडचण आपोआपच दूर होईल." विक्रमने सुचवले.

मन्त्री सुमन्त यावर विक्रमची तारीफ करत म्हणाला–"माझ्या डोक्यात तर हे आलंच नाही! तुझा सल्ला तर अद्भुतच आहे!"

नन्तर तो रत्नभूषणला म्हणाला–"मित्रा, हा तुझा अंगरक्षक मला देऊन







टाक बाबा! हा माणूस आजपासून माझा सल्लागार म्हणून राहील माझ्याजवळ!"

रत्नभूषणने त्याला आपली सम्मति दिली.

नन्तर ही बातमी कळल्यावर सदानन्द मुनि विक्रमला म्हणाला–"तू आपल्या बुद्धिबळाच्या जोरावर आणखी थोड्या उच्च पदावर पोचलास बघ! स्वावलंबनाचा अर्थ हाच आहे."

एक दिवस दुष्टमुख नांवाचा एक मान्त्रिक महाराजा मंजीरनाथच्या राजसभेत येऊन म्हणू लागला–"राजा, मुकाट्याने तुझ्या सुंदर मुलीशी माझे लग्न लावून दे. नाही तर भयंकर परिणाम होईल बघ!"

त्याच्या या वल्गना ऐकून राजा मंजीरनाथने रागाने तलवार उपसली व तो सिंहासनावरून उठला. त्याबरोबर विकट हास्य करून मान्त्रिकाने आपला मन्त्र-दण्ड हवेत फिरवला; अन् दुसऱ्याच क्षणी राजा मंजीरनाथच्या डाव्या हाताची व पायाची संवेदना नाहीशी होऊन तो कोसळून सिंहासनावर पडला.

सभाभवनातल्या लोकांकडे आपल्या डोळ्यांनी पहात दुष्टमुखने आव्हान दिले–"तुमच्यापैकी कोणी मला अडवायचा प्रयत्न केला तर त्यांचीही या राजासारखीच अवस्था होईल!" लोकांना ही धमकी देऊन तो राजकुमारी स्वयंप्रभा हिच्यासह अदृश्य झाला!

राजाने ताबडतोब जाहीर केले की–"जो वीर या मांत्रिकाचा वध करून राजकुमारीला सुखरूप परत आणील, त्याच्याशी तिचा विवाह करून देऊन, त्याला राज्याभिषेक केला जाईल."

विक्रमने अरण्यात जाऊन हा ही समाचार सदानन्द मुनीला सांगून म्हटले–"मला ही एक अपूर्व संधी मिळत आहे. कृपा करून 'मी या प्रयत्नात सफल होईन' असा अशिर्वाद द्या मला!"





क्षणभर डोळे बन्द करून नन्तर मुनि म्हणाला–"विक्रम, ही तर तुझ्या शक्ति व युक्तीची एक कठोर परीक्षाच होणार आहे. दुष्टमुख हा अतिशय मायावी आहे. समोरून प्रवेश करून कोणीही वीर त्याला पराजित करणे अशक्य! दंडकारण्यात एका झऱ्याच्या काठावरील एका गुहेत तो राहतो. तू तिथे जाऊन विजय प्राप्त करून ये. माझा आशिर्वाद आहे तुला."

विक्रम नन्तर त्या मान्त्रिकाला शोधायला निघाला. कित्येक दिवसांच्या प्रवासानंतर त्या गुहेजवळ पोचला. तो विचार करू लागला - याच्या दृष्टीस न पडता कसा बरं वध करावा याचा! बराच वेळ विचार केल्यानन्तर तो धनुष्यबाण घेऊन गुहेजवळच्याच एका महावृक्षामागे लपून राहिला.

थोड्या वेळाने गुहेतून बाहेर पडून दुष्टमुख त्या झऱ्याकडे जाऊ लागला. त्याच वेळी तीक्ष्ण धारेचा एक बाण धनुष्याला लावून, विक्रमने त्याचा नेम धरून मान्त्रिकावर सोडला. दुसऱ्याच क्षणी हाहा:कार करीत मान्त्रिक जमिनीवर मरून पडला.

त्याच्या मृत्युबरोबरच मन्त्रप्रभाव नाहीसा होऊन राजा मंजीरनाथचे हातपाय पूर्ववत् सचेत झाले. विक्रमने युवराजीला सुखरूप अंत:पुरात पोचवले. राजाने म्हटल्याप्रमाणे तिचा विवाह विक्रमबरोबर लावून दिला व त्याचा राज्याभिषेकही करून टाकला.

गादीवर बसल्याबरोबर विक्रमने आसपासच्या राजांचा पराभव करून चक्रवर्ती बनायचा संकल्प केला व तो सदानन्दमुनीला ऐकवण्यासाठी त्याच्याकडे जंगलात गेला. भक्तिपूर्वक प्रणाम करून विक्रम मुनीला म्हणाला–"स्वामीजी आपण पूर्वीच मला सल्ला दिला होता की, प्राप्त सफलतेवरच संतुष्ट न रहाता मी एक एक पायरी चढत नेहमीच आपली उन्नति करत रहावी. आता मी शेजारची राज्ये जिंकून 'चक्रवर्ती' बनू इच्छितो."

त्याचे बोलणे ऐकून मुनि क्रोधाने म्हणाला–"विक्रम, तू कधीही असला मूर्खपणाचा विचार मनात आणू नकोस. तू आतापर्यंत जे काही मिळवलं आहेस त्यावरच यापुढे संतुष्ट रहा."

इतकी गोष्ट सांगून वेताळने राजाला सावध करत म्हटले–"राजा, मुनीनेच राजाला एक एक पायरी चढत उन्नतीचे शिखर गाठायला प्रोत्साहन दिले. त्याच मुनीने विक्रमला चक्रवर्ती बनण्यापासून परावृत्त का केले. याचं कारण ईर्ष्या अन् असहनशीलताच नव्हे का? एका देशाचा राजा बनल्यानन्तर, मुनि रागावल्याबरोबर विक्रमने चक्रवर्ती बनण्याचा आपला संकल्प सोडून का दिला? त्याला काय अशी भीती वाटली, की मुनि मन्त्रशक्तीचा वापर करून आपले काही नुकसान करील? माझ्या या प्रश्नाचे उत्तर माहीत असूनही देण्याचे टाळलेस तर, हे विक्रमराजा, तुझ्या मस्तकाचे तुकडे होऊन पडतील."

यावर विक्रमादित्य उत्तरला–"प्रत्येक व्यक्तीच्या उन्नतीचीही एक सीमा असते. ती सीमा ओलांडून कोणी उन्नति करायचा प्रयत्न केला तर ती उन्नति दुसऱ्यांना हानि-कारक बनण्याच्या अवस्थेला पोचते; म्हणूनच अशा वेळी प्राप्त उन्नतीनेच संतुष्ट होणं श्रेयस्कर असते. विक्रमच्या चक्रवर्ती बनण्याच्या संकल्पामुळे अनेक युद्धे होऊन जनतेची व मालमत्तेची अपार हानि झाली असती - हाच विचार करून मुनीने त्याला तिथेच थांबवले; त्याच्या मनात विक्रम-बद्दल कसलीही असूया वा असहनशीलता वगैरे मुळीच नव्हती. मुनीच्या सांगण्यातला उद्देश विक्रमनेही बरोबर ओळखला आणि आपला संकल्प सोडून दिला. हे काही त्याने मुनीच्या मन्त्रशक्तीला भिऊन केले नाही."

हे उत्तर देऊन राजा पुन्हा गप्प होताच प्रेतातला वेताळ प्रेतासह पुन्हा अदृश्य होऊन झाडाच्या फांदीला लटकू लागला.

(कल्पित)






रामवर्माचा एकुलता एक मुलगा होता नागवर्मा. तसा तो स्वभावाने चांगला होता. पण जरा जास्त लाड केले गेल्या-मुळे तो भारीच उद्धट झाला होता. आपल्या जिभेवर त्याचा खूपदा ताबा रहात नसे.

नागवर्माशी आपल्या मुलीचा विवाह करून द्यावा, या उद्देशाने त्याचा एक दूरचा नातेवाईक शूरवर्मा एकदा त्याच्या घरी आला. नागवर्माला जेव्हा हे कळले तेव्हा तो चेष्टेने शूरवर्माला म्हणाला–"अहो महाराज, मला भीती पडलीय की तुमची मुलगी दिसायला तुमच्यासारखी तर नाही ना?"

यावर शूरवर्मा पटकन् बोलला–"भिऊ नको बाबा! मी तर तुझा दूरचा नातेवाईक आहे, जवळचा नाही. त्यामुळे माझी मुलगी तुझ्यासारखी नाहीय! तुझ्यासारखी नसून आणखी कुणासारखी असेल, तर सुन्दरच असेल नं?"

शूरवर्माच्या बोलण्यातली मख्खी ओळखून नागवर्मा रागाने म्हणाला–"तुम्हाला जर माझ्या सौन्दर्याबद्दल माहीत होतं, तर माझ्या शोधात इथे आलातच कशाला? तुमच्या मुलीला आणखी कुठलं दुसरं स्थळ नाही मिळत का?"

नागवर्माचे चिडणे पाहून शूरवर्मा हसत हसत म्हणाला–"तू माझा दूरचा का होईना पण नातेवाईक आहेस ना, मग तुला एवढी सुद्धा मदत न केली तर कसं बरं चालेल? मी हे सर्व समजूनच इतक्या लांब तुझ्या घरी आलो आहे, की मी तुला आपली मुलगी दिली नाही, तर कदाचित तुझं लग्नच होणं कठीण होईल न?"

मग काय! नागवर्मा भारीच चिडला. नागवर्माजवळ जाऊन शूरवर्माने विचारले–

"वसुंधरा"

"तू माझ्या मुलीशी लग्न करायला तयार नाहीस? याचं कारण सांगशील मला?"

"तुम्ही माझा अपमान केलेला आहे; बास, हेच एक कारण आहे." नागवर्मा उत्तरला.

"मी तुझा अपमान नाही केला; केवळ चेष्टा केली तुझी इतकंच! खरोखरी तू मला आवडला नसतास, तर तुला मुलगी द्यावी म्हणून तुझ्या घरी कशाला आलो असतो मी?" शूरवर्मा आपलं समर्थन करत म्हणाला.

"काहीही असो! चेष्टा म्हणूनही काही कोणी कुणाचा अपमान करत नसतं!" नागवर्मा हट्टाला पेटला होता.

"तू जर असाच विचार करत असशील तर बोल, प्रथम तू माझा अपमान का केलास? तूही माझी चेष्टा केली होतीस न?" शूरवर्माने विचारले.

"मी कधी अपमान केला तुमचा?" आश्चर्याने नागवर्माने विचारले.

"तू नाही म्हणलास, की माझी मुलगी दिसायला माझ्यासारखीच असेल अशी तुला भीती वाटते? मी तर वयाने तुझ्या-पेक्षा मोठा आहे. तू माझी चेष्टा करू करू शकतोस, अन् मीही तुझी चेष्टा केली तर ती माझी चूक कशी?" शूरवर्माने बरोबर बाण सोडला.

"ओहो, असं होय? मी तर ते तेव्हाच विसरून गेलो. मी कधी कुणाची चेष्टा-मस्करी केली, तर लगेच ती विसरूनही जातो, कारण मनात एकाद्याबद्दल अढी ठेवणं माझ्या स्वभावात नाही." नागवर्माने स्पष्टीकरण दिले.

"तू मजेने माझी चेष्टा करून विसरूनही गेलास. मग, मीही मजेनेच तुझी चेष्टा केली. तेव्हा हेही तू विसरूनच जा." शूरवर्माने त्याची समजावणी करीत म्हटले.

"एक शब्दही कधी कोणी मला लागेल असं बोलल, तर मी आयुष्यातही ते कधी विसरू शकत नाही. तेव्हा तुमचं-माझं मुळीच पटायचं नाही, माझा नाद सोडून द्या अन् जा आता परत!" नागवर्मा आपला हट्ट सोडायला तयार नव्हता.

यावर शूरवर्मा पुन्हा त्याला समजावत म्हणाला—"हे बघ, चक्रधरपुरात संयम नावाचा एक ज्ञानी तरुण आहे. या भागात असा कोणीही नसेल की जो त्याला ओळखत नाही. त्याची अन् तुझी सारी लक्षणं सारखीच वाटतात मला. पण मला हे नाही समजत की तुझ्याचसारखा असून संयम महामानव कसा झाला आणि तू मात्र कुणालाही माहीत नाही असा सामान्य-माणूस कसा काय झालास? तू एकदा जाऊन त्याला भेटच. त्याचं रहस्य ओळखून तूही महामानव बनू शकशील." इतके बोलून शूरवर्मा तिथून निघून गेला.

नागवर्माने संयमचे नाव अनेकदा ऐकले होते. त्याला जेव्हा कळले की आपल्या-





सारखेच गुण असलेला माणूस महामानव बनला आहे, तेव्हा त्याचे कुतूहल जागृत झाले. अन् ताबडतोब तो घरून निघून चक्रधरपुरला पोचला. त्याने आपली हकिकत संयमला सांगितली.

संयम अपार संपत्तीचा वारस होता. त्याला बायको व मुलेही होती, नोकरचाकरही भरपूर होते त्याच्याकडे. त्याला स्वतःला जे काही माहीत होते, ते तो इतरांनाही सांगत असे. अनेक लोक आपल्या अडचणी सोडवून घेण्यासाठी त्याच्याकडे जात. त्याच्यामुळे फायदा मिळवणारे श्रीमन्त लोक त्याला तऱ्हेतऱ्हेच्या भेटवस्तु देत असत.

नागवर्माने जेव्हा आपली हकिकत संयमला सांगितली, आणि तो त्याला म्हणाला– "महाराज, आपण तर एक महान् ज्ञानी आहात. आपली ज्ञान-संपदा व धन-संपदा लोकांना वाटून आपण महामानव बनलेले आहात. माझ्या एका दूरच्या नातेवाईकाने मला खोटंच सांगितलं की आपल्या दोघांच्यात एकाच प्रकारचे गुण आहेत; म्हणून मी आपल्या दर्शनासाठी इतक्या दूर निघून आलो आहे."

संयम हसत त्याला म्हणाला–"वत्सा, तुझ्या नातेवाइकाने तुला खोटं नाही सांगितलं! ही गोष्ट खरीच आहे की आपल्या दोघांच्यात सारखेच गुण आहेत. पण त्यात थोडासा फरक आहे. तुझी कोणी थोडीशी चेष्टा केली, तरी तुला सहन होत नाही; पण केवळ गंमत म्हणूनही कधी दुसऱ्याची चेष्टा करणं, मला आवडत नाही. समोरच्या व्यक्तीची चेष्टा करून तू ती लगेच विसरूनही जातोस; पण समोरच्या माणसाने माझी कधी निन्दा केली, तरी मी ती लगेच विसरून जातो."

आता कुठे सामान्य माणूस व महामानव यांच्यातला फरक नागवर्माच्या लक्षात आला. नंतर नागवर्मा चक्रधरपुरहून सरळ शूरवर्माच्या गावी गेला, अन् त्याने त्याची क्षमा मागितली. त्याच्या मुलीशी त्याने विवाह केला व अनेक वर्षे सुखाने कालक्रमणा केली.



चांदोबा पुरवणी–१३

# ज्ञानाचा खजिना

## तो कोण ?

प्राचीन काळी डेल्फी नगरातले पुजारी भविष्यात घडणाऱ्या घटनांबद्दल माहिती सांगत असत. त्याला ते 'भविष्यवाणी' असे म्हणत. एकदा लिडियाहून एक दूत डेल्फीला येण्यासाठी निघाला. स्वतःच्या भविष्याची माहिती विचारण्यासाठी लिडियाच्या राजाने हा दूत पाठवला होता.

काही कारणाने दूतावर रागावून डेल्फीच्या पुजाऱ्यांनी त्याचा अपमान केला. यावर तो दूत म्हणाला–"आलेल्या अतिथीचा आदर करणे हे तुमचे कर्तव्य आहे, त्याचा अपमान करणे चुकीचे आहे." याचे उदाहरण म्हणून त्याने 'गरुड व किडा' ही गोष्ट त्यांना सांगितली–

कोणे एके काळी एका गरुडाने एका सशाला पकडण्यासाठी त्याचा पाठलाग केला. गरुडापासून आपला बचाव करून घेण्यासाठी सशाने एका किड्याचा आश्रय घेतला. तेव्हा बिचाऱ्या सशाला सोडून देण्याबद्दल किड्याने गरुडाल विनवले. पण त्याची काहीही पर्वा न करता गरुड सशाला उचलून घेऊन गेला आणि त्याने सशाला खाऊन टाकले. यानंतर गरुडाचा सूड घ्यावा म्हणून गरुड जिथे-जिथे अंडी घाली, तिथे-तिथे जाऊन किडा ती अंडी खाली ढकलून देई. शेवटी गरुडाने बुधाच्या मांडीवरच अंडी घातली. पण तरीही गप्प न बसता किड्याने वरून बुधाच्या मांडीवर कचरा पाडला. बुध जेव्हा आपल्या मांडीवरली ती धूळ झटकू लागला, तेव्हा अंडी खाली पडून फुटून गेली. नन्तर आपला अतिथि ससा याला गरुडाने कसे मारले याबद्दल किड्याने बुधाला सांगून दुःख प्रकट केले. बुधाने निर्णय जाहीर केला कि, गरुडाची कृति चुकीची असून त्याबद्दल किड्याने त्याचा घेतलेला सूड न्याय्य आहे.

दूताने सांगितलेली ही गोष्ट ऐकून पुजाऱ्यांचे आणखीच पित्त खवळले व त्यांनी दूताला कड्यावरून खाली लोटून देऊन मारून टाकले. हा दूत कोण ? [पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे ?

१. गोव्यावर राज्य करणारे विदेशी सरकार कोणते ?
२. त्यावर कब्जा करणाऱ्या सेनापतीचे नाव काय ?
३. हस्तिनापुरची स्थापना कोणी केली ?
४. इतिहासात नोंदलेला आजपर्यंतचा सर्वात मोठा भूकंप केव्हा व कोठे झाला ?
५. 'हजार कबरी असणारे' शहर कोणते ?
६. एकाच वेळी सील मासा किती दूरपर्यंत पोहू शकतो ?

[पान ३६ पहा]

# मगध

आपल्या देशातील प्राचीन राज्यांपैकी मगध एक होय. नावात थोडा फरक असला तरी मगधचा उल्लेख आपल्या वेदातही आहे.

पुराणांच्या म्हणण्यानुसार जरासन्धाचा पिता बृहद्रथ याने या राज्याची स्थापना केली. असे म्हटले जाते की जरासन्धाने आपल्या आराध्य-देवताला बळी देण्यासाठी अनेक राजांना पकडून कैदेत ठेवले होते. परन्तु या दुष्टाचा भीमाने मल्लयुद्धात वध करून त्या सर्व राजांना मुक्त केले होते. जरासन्धानन्तर गादीवर आलेल्या त्याच्या मुलाने महाभारत युद्धात पाण्डवांचा पक्ष स्वीकारला होता.

ऐतिहासिक दृष्टीने विचार केला तर-बिम्बिसार नावाच्या एका महाराजाने मगधवर राज्य केले होते. त्याच्याच शासनकाळात महावीराने जैनमताचे आणि गौतम बुद्धाने बुद्धमताचे प्रबोधन केले. या दोघांबद्दलही बिम्बिसारने अपार आदर दाखवलेला आहे.

बिम्बिसारचे मगध राज्य आज पाटणा व गया जिल्ह्यांच्या नावाने प्रसिद्ध आहे. बिम्बिसारचा पुत्र अजातशत्रु याने गंगा व सोन या नद्यांच्या संगमाजवळ पाटलीग्राम नावाचा दुर्ग बांधला होता. या दुर्गाला घेरून असणारे नगर त्या काळात 'पाटलीपुत्र' किंवा 'कुसुमपुर' या नावाने प्रसिद्ध आहे.

मगध एक शक्तिशाली राज्य म्हणून विख्यात होते. त्यामुळेच त्या भूभागावर अधिकार प्रस्थापित करण्यासाठी ग्रीक सम्राट सिकंदर आपल्या देशात आला; पण मगधवर हल्ला करायचे साहस त्याला झाले नाही. पाटलीपुत्र आपली राजधानी बनवून अनेक राजांनी आपल्या देशावर राज्य केले होते. त्यात चन्द्रगुप्त व त्याचा

### लिंबू खाण्यात जागतिक विक्रम

गिनीज् बुक मधे आपले नाव यावे म्हणून कोईमतूरच्या ३७ वर्षाच्या एन्. पार्थसारथीने तीन लिंबांचे १२ तुकडे करून ते ११.२ सेकन्दात खाऊन दाखवून नवा उच्चांक स्थापित केला. पार्थसारथीच्या म्हणण्यानुसार या क्रियेत यापूर्वी जागतिक उच्चांक स्थापित करणाऱ्या वाबीकेंपला त्याने हरवले आहे.



नातू चक्रवर्ती अशोक हे अत्यंत प्रसिद्ध आहेत. आज पाटणा ही बिहार राज्याची राजधानी आहे. गया जिल्ह्यातील गया व बुद्ध गया अत्यंत पवित्र मानली जातात. गया शहरातच 'मगध विश्व-विद्यालय' वसलेले आहे.






## थोडक्यात वाचला

स्वित्झर्लण्डमधील पाच वर्षांचा एक मुलगा अपघाताने थेग्यार सरोवरात पडून बुडाला. त्याच वेळी तेथे पाणबुड्याचे प्रशिक्षण घेणाऱ्या लोकांनी प्रयत्न करून ३० मिटर खोल बुडलेल्या त्या मुलाला, त्याने शेवटचा श्वास घेण्यापूर्वी किनाऱ्यावर आणले. जवळच असणाऱ्या एका डॉक्टरने त्याच्यावर उपचार केला. परिणामतः मुलगा अगदी थोडक्यात वाचला.

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. शेक्सपियर जन्मला, त्याच वर्षी जन्मलेला विख्यात इंग्रजी नाटककार कोण ?

२. त्याचा मृत्यु केव्हा व कसा झाला ?

३. आत्महत्या करायला भाग पाडला गेलेला रोमन कवि कोण ?

४. त्याला कोणी कैद केले व का ?

५. भारताबाहेरचा, आपल्या शैलीतली रामायण कथा असणारा देश कोणता ?

६. 'सागा' काय आहे ?

## उत्तरावली

**तो कोण ?**

इसाप.

**तुम्हाला माहीत आहे ?**

१. पोर्तुगाल (पोर्तुगीज).

२. अल्फान्सो द अल्बुकर्क.

३. भरताच्या पाचव्या पिढीतला हस्तिन.

४. १३३३ मध्ये चीन मध्ये, निरनिराळ्या स्वरूपात दहा वर्षे हा चालूच होता.

५. अल्जीरियातील एलकूड शहर.

६. अलास्कातील सील पाच हजार मैल पोहू शकतात.

**साहित्य**

१. क्रिस्टोफर मार्लोन, १५६४ मध्ये.

२. २९ वर्षांचा असताना, एका घरात सुरा भोसकून त्याला मारून टाकले गेले.

३. ल्यूकन.

४. नीरो चक्रवर्ती, त्याच्या विरुद्ध कारस्थान केल्याबद्दल.

५. इंडोनेशिया.

६. आइसलण्डमधील मध्ययुगान ग्रन्थ.



## नेहरूंची गोष्ट-११

हिंदुस्तानचे गव्हर्नर जनरल लॉर्ड आयर्विन व महात्मा गांधी यांच्यात बोलणी होणार होती. याच संदर्भात चन्द्रशेखर आजाद गुप्तपणे पं. नेहरूंना भेटला. त्याने पंडितजींना विचारले– "या दोघां मधील बोलणी संपल्यावर भगतसिंहा सारखे तुरुंगात डांबलेले क्रांतिकारी बंदीशाळेतून मुक्त होतील का ?"

या घटने नंतर दोन-तीन आठवड्यांतील गोष्ट आहे. गांधी आयर्विन यांच्यात चर्चा चालू होती. त्यावेळी पोलिसांनी अलाहाबादच्या उद्यानात चन्द्रशेखर आजादला घेरून बंदी बनविण्याचा प्रयत्न केला. यावर आजादने आपल्या बंदुकीच्या गोळ्यांनी दोन शिपायांना जखमी केले. म्हणून या वीर तरुणाला पोलिसांनी तेथेच गोळ्या घालून ठार मारले.





गांधीजी व आयर्विन यांच्यात एक करार झाला आणि त्याला अनुसरून कांग्रेसने आपली असहयोगाची चळवळ स्थगित केली. ब्रिटिश सरकारने तुरुंगात डांबलेल्या हजारो कांग्रेस कार्यकर्त्यांना मुक्त केले.



तुरुंगातून सुटलेल्या काँग्रेसच्या पुढाऱ्यांचे व कार्यकर्त्यांचे जनतेने उत्स्फूर्तपणे भव्य स्वागत केले. काही ठिकाणी त्यांचे अभिनन्दन करण्यासाठी विशेष सभा योजण्यात आल्या. या सभांतून काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी जोरदारपणे सांगितले की गांधी-आर्यावन करार म्हणजे काँग्रेसचा जय व ब्रिटिश सरकारचा पराजय होय ! हे राज्य-कर्त्यांना मोठे अडचणीचे झाले नि त्यांचा पारा चढला.

काँग्रेसचे वार्षिक अधिवेशन कराची येथे सरदार वल्लभभाई पटेल यांच्या अध्यक्षते खाली झाले. गुजरात मधे जन्मलेले हे देशभक्त एका थोर राष्ट्रीय नेत्याच्या रूपात जनतेपुढे आहे. कराचीचे काँग्रेसचे अधिवेशन मोठ्या उत्साहपूर्ण वातावरणांत सुरू झाले.





सरहद्द प्रांतातून आलेले पठाण नेता खान अब्दुल गफार खान यांनी कराचीच्या अधिवेशनात चांगलीच छाप पाडली. त्यांची शिष्य-मंडळी तांबडे सदरे घालीत. म्हणून त्यांना 'लाल सदरेवाले' म्हणून संबोधण्यात येऊ लागले. त्या सर्वांनी काँग्रेसपक्षाचा स्वीकार केला.

गोलमेज परिषदेत भाग घेण्यासाठी गांधीजी लंडनला गेले. भारताच्या समस्या सोडविण्यासाठी ही परिषद आयोजित करण्यात आलेली होती. पण या परिषदेतून म्हणावे तसे संतोषजनक काही निष्पन्न झाले नाही.





ब्रिटिश सरकारच्या जेव्हा हे लक्षात आलं की भारतातील पुढारी त्यांचे म्हणणे मानीत नाहीत, तेव्हा सरकारने दमन-नीति सुरू केली. पं. जवाहरलाल नेहरू मुंबईत रेल्वेने प्रवास करीत असताना गाडी अचानकपणे थांबवून त्यांना कद करण्यात आले.

४ जानेवारी १९४२ रोजी म. गांधीजी लंडनहून परत आले. त्यावेळी सरदार पटेलांच्या बरोबर गांधींना ही अटक केली गेली. सरकारने जनतेचे नागरिक अधिकार अमान्य केले आणि त्यामुळे सरकार व स्वातंत्र्य-सेनानी यांच्या-मधील चर्चेच्या मार्गात अडथळा निर्माण झाला.





काही दिवसांनी अलाहाबाद मध्ये एक मिरवणूक निघाली. तिचे नेतृत्व पंडितजींच्या आईने केले. पोलिसांनी मिरवणूक मध्येच अडवली. नेहरूंची आई म्हातारी नि दुबळी होती. म्हणून एका स्वयंसेवकाने खुर्ची आणली आणि नेहरूंची आई त्या खुर्चीवर बसली.

एकाएकी पोलिसांनी लाठीमार सुरू केला. नेहरूंच्या आईचे संरक्षण करण्यासाठी नेमलेले सचिव व काही अन्य काँग्रेस पुढाऱ्यांना पोलिसांनी पकडून नेले, मिरवणूक उध्वस्त करण्यात आली. नेहरूंच्या आईला खुर्चीवरून खाली पाडण्यात आले.





एवढ्यावर पोलिसांना संतोष वाटला नाही. त्यांनी वर लाठीचा मारा केला. आईच्या डोक्यांतून रक्त वाहू लागलं नि ती बेशुद्ध झाली. यानंतर एका अधिकाऱ्याने तिला घरी पोचवलं. तुरुंगात बन्द असलेल्या नेहरूंना जेव्हा ही बातमी समजली. तेव्हा ते विचार करू लागले—दुबल्या व म्हाताऱ्या आईला यांनी रक्तबंबाळ केलं, अशा स्थितीत अजून ही अहिंसा-मार्गावर चालणं योग्य आहे का ? (क्रमशः)



# तीन प्रश्न

अनुपम देशावर राजा विक्रमसेन राज्य करत असे. त्याला दोन राण्या होत्या—मोठीचं नाव वासंती आणि छोटीचं मांडवी. दोघी निरनिराळ्या महालात रहात असल्या तरी त्या नेहमी एकमेकींना भेटत असत. कोणत्याही प्रकारचा गैरसमज किंवा हेवा-दावा नव्हता दोघीत. एकमेकींशी अगदी सख्या बहिणी प्रमाणे त्या प्रेमाने वागत. दोघीही चांगल्या सुशिक्षित अन् दिसायला सुन्दर होत्या. पण दोघींच्यात मांडवी बोलण्यात अधिक चतुर अन् चमत्कारांची आवड असणारी होती.

राजा विक्रमसेन स्वतः उत्तम कवि होता. त्याबरोबरच तो विनोदप्रिय आणि चतुरोक्तिप्रिय ही होता. त्यामुळे दरबारात पुष्कळदा तो सभासदांना चतुरोक्तिपूर्ण कोडी विचारून त्यांची उत्तरे ऐकण्यात आनन्द मानी. कधी कधी दरबारातल्या हकिकती तो मांडवीलाही सांगत असे. एकदा दरबारात घडलेला एक चमत्कार-पूर्ण प्रसंग तो मांडवीला सांगत होता. तेव्हा जरासं हसून मांडवी राजाला म्हणाली—"महाराज, तुम्ही तर मोठे विनोदप्रिय आहात, कविराज आहात. मी आपणाला तीन प्रश्न विचारते, त्यांची उत्तरे द्यावी."

मांडवीचे बोलणे ऐकून राजाला मोठे कुतूहल वाटले. तो म्हणाला—"तीन प्रश्न विचारायचेत? विचार बरं, ऐकू देत तर खरं!"

"ठीक आहे; ऐका तर! माझा पहिला प्रश्न आहे. आपल्या सौन्दर्याची पतीने कशा प्रकारे स्तुति केली तर पत्नीला अधिक आनन्द वाटेल? दुसरा प्रश्न-स्त्री कितीही सुशिक्षित अन् सहनशील असो, तिला आपला पति कोणत्या परिस्थितीत

विजया आठवले



आपल्याला रागावून बोलल्यास तो असह्य असा अपमान वाटतो? तिसरा प्रश्न - अशी कोणती गोष्ट आहे की जी कोणतीही स्त्री कधीही सहन करू शकत नाही?" मांडवीने आपले तीन्ही प्रश्न विचारून टाकले.

आपल्या पत्नीचे प्रश्न राजाने लक्षपूर्वक ऐकले. पण विचार करूनही तो त्यांची उत्तरे देऊ शकला नाही. निरनिराळी उत्तरे त्याच्या मनात आली, पण नंतर त्याला ती निरर्थक वाटली.

जरा विचार केल्यावर आपली दाढी कुरवाळत विक्रमसेन म्हणाला–"प्रश्न फारच अवघड विचारलेस बुवा?"

मांडवी हसत म्हणाली–"मग, आपल्याला काय वाटलं! ठीक आहे. उद्या राजसभेत हेच प्रश्न विचारा आपण!"

मांडवीचे हे बोलणे 'ती आपणावर आरोप करत आहे' असे वाटले राजाला. तिथून उठून जात तो म्हणाला–"ठीक आहे; पाहीन."

तेथून निघून जाणाऱ्या आपल्या पतीकडे मांडवी जरा वेळ पहात राहिली; अन् मग स्वतःशीच हसून गप्प झाली. विक्रमसेन तिथून निघून थेट वासन्तीच्या महालात गेला.

पतीचा गंभीर चेहरा पाहून घाबरून वासन्तीने विचारले–"प्रभु, आपण त्रासलेले दिसता. राजकारभारात तर काही..."

"हां हां. तुझ्या बहिणीने मोठा कारभार उपस्थित केलाय न!" जरा रुष्टतेने राजा म्हणाला.

हे उत्तर ऐकून वासंतीने हळूच एक निश्वास टाकला आणि हसतच तिने विचारले–"महाराज, काय केलं मांडवीने आज?"

विक्रमसेनने वासन्तीला सर्व हकिकत सांगितली.

ती ऐकून वासन्तीने विचारले–"आपली ही अडचण मी सोडवू?"

आश्चर्याने राजाने विचारले–"तू उत्तरं देशील? नको, नको. हे बरोबर नाही होणार."





"काही हरकत नाही. स्त्रीचं मन स्त्रीच ओळखू शकते. मी उत्तरं सांगेन; आपण मांडवीला सांगावं, की आपणच विचार करून उत्तरं सांगितली आहेत." असे समजावून वासन्तीने मांडवीच्या तीनही प्रश्नांची उत्तरे राजाला सांगितली.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी राजा विक्रमसेन पुन्हा मांडवीच्या अंतःपुरात गेला. तो मांडवीला म्हणाला–"तू विचारलेल्या कठीण प्रश्नांची उत्तरं सांगू तुला?"

"प्रश्नांची उत्तरं आपण स्वतःच शोधून काढलीत?" आपले हसणे दाबून धरत मांडवीने विचारले.

"हो, हो." विक्रमसेन गर्वाने उत्तरला.

"ठीक आहे. सांगा बरं!" मांडवी म्हणाली.

"ऐकच तर! तुझ्या पहिल्या प्रश्नाचं उत्तर असं–एकाद्या स्त्रीला रंभा, उर्वशी म्हणून तिची स्तुति करण्यापेक्षा, दुसऱ्या एकाद्या रूपवती स्त्रीशी तिची तुलना करून, तिच्यापेक्षा तू सुन्दर आहेस असं म्हटलं तर ती जास्त आनन्दित होईल!" विक्रमसेनने पहिले उत्तर दिले.

"बरोबर आहे. आता दुसऱ्या प्रश्नाचं उत्तर?" मांडवीने विचारले.

"पतीने कधी कितीही निन्दा केली तरी ती सहन करणाऱ्या स्त्रीला, त्याने जर तिच्या सवती किंवा जावा यांच्यासमोर एक शब्द जरी निन्देचा काढला तरी तिला तो आपला असह्य असा अपमान वाटतो– हे तुझ्या दुसऱ्या प्रश्नाचं उत्तर." असे म्हणून विक्रमसेनने जरा अभिमानाने मान उचलली.

"बरोबर, ठीक आहे. आता माझ्या तिसऱ्या प्रश्नाचेही उत्तर सांगून टाका बरं?" मांडवीने म्हटले.

"स्त्री सर्व काही सहन करील; पण तिच्यासमोर पतीने जर परनारीची प्रशंसा केली तर ती सहन नाही करू शकत. हे झालं तुझ्या तिसऱ्या प्रश्नाचं उत्तर. झालं समाधान?" असे म्हणत विक्रमसेनने

विजयगर्वाने पहात आपली उत्तरे समाप्त केली.

"हे ही उत्तर अगदी बरोबर आहे. याचाच अर्थ असा की ताईने आपणाला बरोबर उत्तरं सांगून इकडे पाठवले." हळूच हसत मांडवी म्हणाली.

तिचे हे बोलणे ऐकून विक्रमसेन आश्चर्यचकित झाला–"नाही, नाही. असं काही नाही." आपलं समर्थन करीत तो खरी गोष्ट लपवण्याचा प्रयत्न करू लागला.

"सत्य कशाला लपविता महाराज? ही सारी उत्तरे आपल्याला ताईने सांगितलेली आहेत!" मांडवी म्हणाली. राजा विक्रमसेनने ओळखले की आता लपवाछपवी करण्यात काहीच हशील नाही. त्याने हसत मांडवीला विचारलं–"तुझं म्हणणं अगदी शंभर टक्के बरोबर. पण आता सांग, तू हे कसं ओळखलंस?"

"माझ्या प्रश्नांची उत्तरं आपल्याला स्वतःच समजली असती तर माझ्या बुद्धिमत्तेची तारीफ करत उत्तरंही तेव्हाच सांगून टाकली असतीत. पण आपण इथे पोचल्याबरोबर-तू विचारलेल्या कठीण प्रश्नांची उत्तरं-असं म्हणून मला चिड-वायचा प्रयत्न केलात. आपण स्वतः उत्तरं शोधून काढू शकलो नाही, या दुःखामुळेच आपण मला चिडवलंत. माझ्या जेव्हा हे लक्षांत आलं की ही उत्तरं आपण स्वतः शोधलेली नाहीत, तेव्हा ती कोणी सांगितली असावी याची कल्पना करणं मुळीच कठीण नव्हतं!" मांडवी म्हणाली.

आपल्या पत्नीच्या बुद्धिमत्तेवर मनातल्या मनात राजा प्रसन्न झाला.

"हो, हो! त्या दुःखाने प्रेरित होऊनच मी तुझी अवहेलना केली. पण आता मात्र मी तुझ्या तर्कशक्तीची मनापासून दाद देतो आहे." असे म्हणत आपल्या गळ्यातला मोत्यांचा हार काढून राजाने मांडवीच्या गळ्यात घातला.






श्रीकृष्ण बाणासुराच्या नगरीचे अवलोकन करू लागले. त्याच वेळी नारदाने तेथे प्रवेश केला आणि सांगितलं– "श्रीकृष्णा, पाहतो आहेस ना? पार्वती सह शिवजी स्वतः या नगरीचे संरक्षण करीत आहेत. म्हणून तुला आपले काम करताना खूपच सावधान राहिले पाहिजे."

मंदस्मित करीत श्रीकृष्ण म्हणाले– "माझ्या कामात विघ्न आणण्याचा ईश्वराने स्वतः जरी प्रयत्न केला, तरी मी यथाशक्ति प्रयत्न करणारच. अयशस्वी होऊन परत कधी ही जाणार नाही."

असं म्हणून श्रीकृष्णाने नगराच्या प्रमुख प्रवेश-द्वाराजवळ जाऊन आपला पांचजन्य फुंकला. शंखध्वनि ऐकून बाणासुराचे सैन्य एकाद्या महासागराप्रमाणे जमा झालं. श्रीकृष्ण, बलराम, प्रद्युम्न आणि गरुड यांनी अतिशय उत्साहाने राक्षस-सेनेचा संहार करायला सुरुवात केली. राक्षसांच्या सैन्यातील बरेच सैनिक मेले नि बाकीचे रण-भूमि सोडून पळून गेले.

अशा प्रकारे आपला भक्त बाण याचा अपमान होत असलेला पाहून शिवजींच्या रागाचा पारा चढला. ते स्वतः युद्धासाठी तयार होऊन सिंह जुंपलेल्या रथा वर आरूढ होऊन निघाले, त्यांच्या रथा वर वृषभध्वज फडकत होता. त्यांचा सारथी होता नंदि, बरोबर कुमारस्वामी आणि अनेक पट्टीचे वीर होते.

२७. बाणाचा पराभव



आता शिवजी व श्रीकृष्ण यांच्यात युद्ध सुरु झाले. प्रारंभीच शिवजींनी श्रीकृष्णावर शंभर बाणांचा वर्षाव केला. उत्तरादाखल श्रीकृष्णाने आपले इन्द्रास्त्र फेकले. त्यातून हजारो बाण बाहेर पडले आणि त्या बाणांनी शिवजींच्या रथाला घेरलं. मग शिवजींनी आग्नेयास्त्र बाहेर काढलं. त्याच्या प्रभावाने चारी बाजूंना अग्नि-ज्वाळांचा डोंब उठला आणि त्यांनी सर्व बाण भस्मसात करून टाकले. यानंतर या ज्वाळा श्रीकृष्ण, बलराम, प्रद्युम्न नि गरूड यांना घेरू लागल्या. श्रीकृष्णाने वारुणास्त्राने त्या ज्वाळांना विझवून टाकले. यानंतर शिवजींनी पाच-सहा भयंकर अस्त्रें काढली, या सर्व अस्त्रांना कुछ-कामी बनविणाऱ्या अस्त्रांचा उपयोग करून शेवटी श्रीकृष्णांनी मंत्राने भारलेले वैष्णवास्त्र काढले. या महा अस्त्राला कसे तोंड द्यावे हे शिवजींना समजेना, तेव्हा त्यांनी अतिशय रागावून युगांतकारी भयंकर पाशुपतास्त्र बाहेर काढले.

शिवजींच्या रागाचा उद्रेक पाहून श्रीकृष्णांनी वेगाने आपले जृंभकास्त्र काढले. या अस्त्राचा उपयोग करताच शिवजी निर्बल झाले आणि जांभया देऊ लागले. त्यांच्या हातांतील धनुष्य-बाण खाली गळून पडले.

याच वेळी बाणासुर ही युद्ध-भूमी वर येऊन पोचला. त्याने शिवजींना शुद्धी वर आणण्याचा प्रयत्न केला. पण त्याचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले. श्रीकृष्णाने दाही दिशा दुमदुमून सोडणारा आपला पांचजन्य फुंकला.

हे पाहून बाणासुराचे प्रथम श्रेणीचे वीर संतापले. त्यांनी प्रद्युम्नाला घेरून आपल्या शस्त्रांनी जणू झाकून टाकलं. तसेच राक्षसांनी त्याच्या बरोबर माया-युद्ध सुरु केले. प्रद्युम्नाने आपल्या सम्मोहनास्त्राचा उपयोग करून त्या सर्वांना निद्राधीन करून टाकले आणि मग अनेक राक्षसांचा संहार केला.



दरम्यान कुमारस्वामीच्या लक्षात आले की आपले वडील युद्धापासून विमुख होत आहेत. म्हणून त्याने स्वतः युद्ध करायला सुरुवात केली. एका बाजूस श्रीकृष्ण, बलराम व प्रद्युम्न यांच्याशी लढून त्यांना घायाळ केले आणि दुसऱ्या बाजूस तो स्वतः घायाळ झाला. यानंतर कुमारस्वामीने रागाच्या भरात श्रीकृष्णावर ब्रह्मशिरो-नामास्त्र फेकले, पण श्रीकृष्णाने आपल्या सुदर्शन-चक्राने ते मोडून टाकले. मग त्यांनी कुमार-स्वामीवर सुदर्शन चक्र फेकले. ते कुमारस्वामीला जाऊन लागणार इतक्यात लम्बादेवी नावाच्या एका देवता-स्त्रीने युद्धभूमीत प्रवेश केला नि ती कुमारस्वामीला घेऊन गेली.

मोर्च्या वरील आपले संरक्षण करणाऱ्या वीरांना युद्ध-भूमि सोडून जाताना पाहून बाणाने विचार केला की आता स्वतःच संग्रामात उडी घेण्याची नामी संधि आपल्या हाती आली आहे. प्रसन्न अंतःकरणाने तो श्रीकृष्णाशी युद्ध करायला तयार झाला. दोघात जे भयंकर युद्ध झाले, त्यात बाणाचे रथ व आयुधे यांचा धुव्वा उडाला. त्याची ध्वजा मोडून खाली पडली. नंतर श्रीकृष्णाने सोडलेला बाण बाणासुराच्या छातीत आरपार घुसून निघून गेला आणि बाणासुर बेशुद्ध होऊन पडला.



श्रीकृष्णाच्या सुदर्शन चक्रापुढे बाणासुर नामोहरम होत आहे असे पाहून शिव-पार्वतीने पुन्हा लंबादेवीलाच पाठविले. ती येऊन बाणासुराच्या पुढे उभी राहिली. अदृश्य स्वरूपात पार्वती पण तेथे येऊन येऊन उभी राहिली.

यावर श्रीकृष्ण पार्वतीला उद्देशून म्हणाले–" देवी, आपण कशासाठी या सर्व कारवाया करीत आहात? आपण स्वतः जरी बाणासुराच्या संरक्षणासाठी येऊन उभ्या राहिलात, तरी मी त्याचे प्राण घेतल्या शिवाय राहणार नाही."

श्रीकृष्णाचं बोलणं ऐकून पार्वती म्हणाली-" तुम्ही तर सर्व-समर्थ आहात. तुम्ही जे काही



श्रीकृष्णाचं म्हणणं ऐकून पार्वतीने लंबा देवीला जायला सांगितलं. पार्वती सह लंबा देवी अदृश्य होताच श्रीकृष्णाने आपल्या सुदर्शन चक्राचा उपयोग केला. बाणासुराचे दोन हात सोडून बाकीचे सर्व हात सुदर्शन चक्राने कापून टाकले आणि ते पुन्हा श्रीकृष्णाच्या हाती आले.

तरी ही बाणासुराचे पौरुष कमी झाले नाही. त्याने आपल्या राहिलेल्या दोन हातात धनुष्य घेऊन श्रीकृष्णावर बाणांचा वर्षाव केला. यावर अतिशय रागाने श्रीकृष्ण त्याच्यावर पुन्हा सुदर्शन चक्र सोडण्याचा विचार करीत होते, इतक्यात स्वत: शिवजी सपरिवार तेथे आले नि म्हणाले–"श्रीकृष्णा, हा बाणासुर माझ्या आश्रयाला आलेला आहे. याचा वध करून मी याला दिलेले अभय-दान तू व्यर्थ करणार का? पुन्हा सुदर्शन चक्राचा वापर न करावास हे बरं!"

शिवजींची विनंती श्रीकृष्णाने मान्य केली आणि बाणासुराचा वध करण्याचा आपला विचार सोडून दिला. श्रीकृष्ण गरुडावर स्वार होऊन अनिरुद्धाला पहायला निघाले. नन्दिकेश्वराने बाणासुराला शिवजीच्या कडे पोचविले. शिवजींनी बाणासुराच्या कापल्या गेलेल्या हातांचे दुःख कमी व्हावे यासाठी उपचार केल

कराल, मी त्यात कसा अडथळा आणू शकणार? मी बाणासुराला आपला मुलगा मानलं आहे. मला पुत्रशोकात बुडविणं आपणास खचितच योग्य वाटणार नाही. म्हणून म्हणते याचं संरक्षण आपण करावे."

"देवी, आपल्या हजार हातांच्या बळा वर हा अलीकडे फार उन्मत्त झाला आहे. याचे फक्त दोन हात ठेवून बाकीचे कापून टाकले, तरच याचा गर्व अमळ कमी होईल! तसं केलं तरच याच्यातील राक्षसीपणा कमी होऊन तो आपला पुत्र म्हणविण्यास योग्य होईल. आपण माझ्या कार्यात अडथळा आणू नये." श्रीकृष्णाने पार्वतीला समजाऊन सांगितलं.



आणि आपल्या उच्च श्रेणीच्या वीरात त्याला स्थान दिले. बाणासुराला नन्दीच्या बरोबरीचे पद देण्यात आले. आता बाणासुर महाकाल नावाने ओळखला जाऊ लागला. शिवजी अंतर्धान पावले.

इकडे गरुडाला पाहताच सर्पांच्या रूपाने अनिरुद्धाला डांबून ठेवणारे सर्व सर्प पुन्हा बाणांचे रूप धारण करून खाली गळून पडले. त्याच वेळी नारद तेथे आले. चित्ररेखा पण आली. श्रीकृष्ण, बलराम आणि प्रद्युम्न यांनी अनिरुद्धाला आलिंगन दिले. त्याने भक्तिपूर्वक सर्वांना नमस्कार केला.

नारद श्रीकृष्णाला म्हणाले–"हे श्रीकृष्ण, आता उशीर कशाला? अनिरुद्धाचा विवाह शक्य तितक्या लवकर उरकून घ्यावा." मुहूर्त जवळचाच होता. म्हणून कुंभांडने त्वरित लग्नाची सर्व तयारी केली. श्रीकृष्णा जवळ येऊन त्याने प्रार्थना केली–"आपण कृपा करून माझे संरक्षण करावे."

श्रीकृष्ण त्याला म्हणाले–"तू मोठा योग्य माणूस आहेस असं मी ऐकलं आहे. बाणासुराच्या नगरी वर आता तूच राज्य कर. निश्चिन्तपणे राजसुखाचा अनुभव घे."

यानंतर उषा नि अनिरुद्ध यांचा विवाह मोठ्या थाटामाटात संपन्न झाला. श्रीकृष्ण नवीन दंपतीला घेऊन शिव-पार्वतीकडे गेले. वधू-वरांनी त्यांना प्रेमपूर्वक अभिवादन केले. शिव-पार्वतीने त्यांना शुभाशीर्वाद





दिले. पार्वतीने बाणासुराचा मयूर अनिरुद्धाला वाहन म्हणून भेट दिला.

आता जेव्हा श्रीकृष्ण परत यायला निघाले तेव्हा कुंभांडने त्यांना विनंती केली—"बाणासुराच्या गायी हल्ली वरुणाजवळ असतात. त्यांचे दूध प्याल्याने शक्ति व बळ वाढते. म्हणून आपण त्यांना आपल्या ताब्यात घ्यावे."

श्रीकृष्णाने ही विनंती मान्य केली. ते गरुडावर बसले, बरोबर बलराम आणि प्रद्युम्न होतेच. गरुडाने पश्चिमी समुद्राच्या किनाऱ्याकडे भरारी मारली. समुद्र किनाऱ्यावर लाखो गायी चरत होत्या. गायींना वश करण्याची कला श्रीकृष्णांना लहानपणा पासूनच अवगत होती. म्हणून किनाऱ्यावर उतरताच ते गायींच्या कळपात शिरले. पण काय आश्चर्य, सर्व गायी धावत समुद्राकडे गेल्या नि अदृश्य झाल्या.

निराश होऊन श्रीकृष्ण गरुडाला म्हणाले—"काय चमत्कार आहे? मी या प्रयत्नात असफल होणार की काय?"

गरुडाने सुचवलं—"आता दुसरं काही नाही, वरुणा बरोबर युद्ध करण्याशिवाय गत्यंतर नाही."

असं म्हणून गरुडाने जोरात आपले पंख फडफडवले. समुद्राचं सारं पाणी दूर हटलं आणि तळाशी असलेला नागलोक स्पष्ट दिसू लागला. श्रीकृष्णाने आपला पांचजन्य फुंकला आणि वरुणाच्या महालावर आक्रमण केले.

दुसऱ्याच क्षणी शंखनाद करीत सदुसष्ट रथां वर स्वार होऊन वरुणाची सेना कृष्णावर चालून आली. श्रीकृष्णाने त्यांच्याशी दारूण युद्ध केले. बलराम व प्रद्युम्नाने ही हिरिरीने या युद्धात भाग घेतला. गरुडाने त्यांना मदत केली. या सर्वांचा पराक्रम पाहून वरुणाची सेना युद्धभूमि सोडून पळून गेली.

श्रीकृष्णाच्या आक्रमणावर क्रुद्ध होऊन स्वत: वरुण लढण्यासाठी रणांगणावर आला. या महासंग्रामात श्रीकृष्णाने आपल्या

वैष्णवास्त्राचा उययोग केला. भयभीत होऊन वरुण तह करायला तयार झाला.

श्रीकृष्णाने आपली अट सांगितली–"तु मला शरण आलास, एवढयावर मी संतुष्ट नाही. बाणासुराच्या गायी तुझ्याजवळ आहेत, त्यांना माझ्या ताब्यात देऊन टाक."

"आपण कृपा करून गायींची मागणी करू नका. बाणासुराने या गायी जेव्हा मला दिल्या, तेव्हा मी त्यांना वचन दिलं होतं की जिवात जीव असेपर्यंत मी लढत राहीन, पण आपल्या गायी दुसऱ्या कोणाला देणार नाही. मी खरी गोष्ट आपणास सांगितली. आपण योग्य वाटेल ते करावे." वरुणाने आपली अडचण सांगितली.

मग श्रीकृष्णांनी गायींची आशा सोडली आणि आपले दिव्य अस्त्र मागे घेतले. यानंतर वरुणाने श्रीकृष्णाचे यथायोग्य स्वागत केले आणि त्यांना आपल्या लोकाकडे रवाना केले.

वरुणाचा निरोप घेऊन श्रीकृष्ण, बलराम, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध गरुडावर आरूढ होऊन आपल्या नगरात पोचले व विजय-सूचक पांचजन्य फुंकला. हा नाद ऐकून सर्व प्रमुख यादव मंडळी आपल्या विशाल दलांसह श्रीकृष्णाचे स्वागत करण्यासाठी आले. तोपर्यंत श्रीकृष्ण नगराच्या बाहेरील उद्यानांत विहार करीत राहिले. त्यांच्या बरोबर इंद्र वगैरे देव पण होते. यादवांनी श्रीकृष्णाला रथा वर बसवून मोठ्या वैभवपूर्वक नगरात आणले. विजयी होऊन आलेल्या श्रीकृष्णाबाबतची वार्ता ऐकून सर्व नागरिक राजमार्गाच्या दुतर्फा उभे राहिले. शोणपुरात अग्नीवर श्रीकृष्णाने मिळविलेला विजय, शिवजींना निर्बळ बनविणे, बाणासुराचे हात कापून त्याला जिवदान देऊन सोडून देणे इत्यादींची ते चर्चा करीत होते. त्यांची ही चर्चा ऐकून श्रीकृष्णांना खूप आनंद झाला.

सारे नगर विविध प्रकारे सुशोभित करण्यात आले होते. नगरात प्रवेश करताच श्रीकृष्ण आपल्या महालात गेले. उषा नि अनिरुद्ध पण आपल्या भवनाकडे गेले.





# वल्लभ आणि वनदेवी

एका गावात एक वल्लभ नावाचा लाकुड-तोड्या रहात असे. एक दिवशी भल्या पहाटे खांद्यावर कुऱ्हाड टाकून तो जंगलात जायला निघाला. त्याची बायको त्याला म्हणाली–"बरं का हो, उद्या आपल्या आपल्या मुलीचा वाढदिवस आहे. रोजच्या पेक्षा थोडी जास्त लाकडं तोडा आणि ती विकून थोडे जास्त पैसे गाठीला बांधून या."

वल्लभने होकारार्थी मान हलवली आणि जंगलाचा रस्ता धरला. दुर्दैव, दुपार पर्यंत जंगलात खूप भटकून ही रोजच्या सारखी वाळलेली लाकडं काही त्याला मिळू शकली नाहीत. संध्याकाळ व्हायला आली. तो मनातल्या मनात चिडला आणि जवळच्या एका हिरव्या गार झाडावर आपली कुऱ्हाड चालवायला तयार झाला.

त्याच वेळी एकाएकी वनदेवी तिथे येऊन उभी राहिली आणि तिने वल्लभला विचारले–"बेटा, थोडा थांब. या जंगला-तल्या एकुलत्या एक चन्दनाच्या झाडाला तू तोडायला निघाला आहेस! दुसरं एकादं शुष्क झाड नाही का दिसत तुला तोडायला?"

वल्लभने वनदेवीला आपली अडचण सांगितली. आपल्या मुलीच्या वाढदिवसा-साठी पोपट खरेदी करण्याची योजना ही सांगितली. वनदेवीने त्याला एक बोलणारा पोपट दिला.

वल्लभनं शंकेखोरपणे पोपटाकडे पहात वनदेवीला विचारलं–"तर काय हा पोपट खरंच बोलतो काय?"

पोपट बोलू लागला–"वनदेवीने सांगि-तल्या वर ही शंका घेतलीस तर तुझे डोळे फुटून जातील, समजलं?"

खरोखरीच बोलणाऱ्या पोपटाला पाहून वल्लभला खूपच आनंद झाला. त्याला

संगीता बाळ




घेऊन तो घरी आला. त्यावेळी मुलगी खेळण्यातल्या पोपटासाटी आईजवळ हट्ट करीत बसली होती.

"चांगली मुलं असा हट्ट करीत नाहीत. आता मी आलो आहे न? आता आपण दोघं मिळून खेळू हं!" वल्लभच्या हातातील पोपट मुलीला समजाऊ लागला.

बोलणारा पोपट पाहून वल्लभची बायको आणि मुलगी यांना खूपच आश्चर्य वाटलं. थोड्याच वेळात वल्लभची बायको नि पोपटाने मुलीला छान छान गोष्टी ऐकवल्या, रात्री झोपताना वल्लभच्या मुलीने पोपटाला आपल्या कुशीत घेतलं.

सारी हकीगत ऐकून वल्लभची बायको आपल्या नवऱ्याला म्हणाली–"वनदेवीच्या कृपेमुळे आता तुम्हाला लाकडं तोडण्याचं कष्टाचं काम करायची जरूर नाही. या पोपटाला घेऊन तुम्ही एकाद्या चौकात जाऊन उभे रहा. ज्यांना पोपटाशी बोलायची इच्छा असेल, त्यांच्याकडून एकेक रूपया वसूल करा. बस, पैसाच पैसा येईल आपल्या हाती!"

वनदेवीने दिलेल्या पोपटाच्या मदतीने पैसे मिळवणं वल्लभला बिलकुल पसंत नव्हतं. तरी पण भांडखोर बायकोच्या भीतीने त्याने ते मान्य केले.

दुसऱ्या दिवशी वल्लभच्या मुलीने पोपटा बरोबर खेळायचा हट्ट धरला. पण वल्लभच्या बायकोने तिला एका खोलीत कोंडून ठेवलं आणि पोपट वल्लभच्या हाती दिला.

थोड्याच वेळात बोलणाऱ्या पोपटाची वार्ता गावभर पसरली. लोक वल्लभच्या भवती-भवती जमा झाले. त्याच वेळी शिकारीला गेलेला राजा राजधानीच्या मार्गावर तिथं येऊन पोचला.

गर्दी झालेली पाहून राजाने आपल्या शिपायांना पाहून यायला सांगितलं की एवढी गर्दी जमण्याचं कारण काय आहे? शिपायांनी येऊन राजाला बोलणाऱ्या पोपटाची वार्ता सांगितली.



ही बातमी कळल्यावर राजाला राग आला. त्याने आपल्या सेवकांना आज्ञा दिली–"असल्या अद्‌भुत पोपटाला मला भेट म्हणून न देता, स्वत: जवळ ठेवण्याची हिम्मत करणारा हा दुष्ट कोण आहे? त्याला सहा चाबकाचे फटकारे मारा नि पोपटाला माझ्याकडे घेऊन या!"

राजाच्या आज्ञेनुसार सेवकांनी वल्लभला सहा चाबकाचे फटकारे मारले आणि ते पोपटाला राजाकडे घेऊन गेले.

वल्लभ कसा तरी रडत-खडत आपल्या घरी पोचला. त्याची तब्येत बरी व्हायला चांगले दोन आठवडे लागले. त्यानंतर एक दिवशी बायकोने नवऱ्याच्या हाती कुऱ्हाड दिली, आणि त्याची हिम्मत वाढवीत म्हणाली–"आहो, भिण्याचं काय कारण आहे? तुम्ही जंगलात जा आणि चंदनाचं झाड तोडायचं नाटक करा. त्या वनदेवीची भरपूर कृपा आपल्यावर आहेच. वनदेवी तुमच्या पुढे प्रत्यक्ष हजर झाली की तिला सांगा–आज माझ्या बायकोचा वाढदिवस आहे. सात लड्यांचा चन्द्रहार मला पाहिजे."

वल्लभ आपल्या बायकोला फार भीत असे. म्हणून तिच्या सूचनेला विरोध करणे त्याला शक्य नव्हते. अनिच्छेने जंगलात गेला आणि चंदनाच्या झाडावर मारण्यासाठी त्याने आपली कुऱ्हाड उचलली. त्याच क्षणी वनदेवी तेथे अवतीर्ण झाली. बायकोने सांगितल्या प्रमाणे वल्लभ वनदेवीशी बोलला.





वनदेवीने हवेत हात फिरवला आणि चम-चम चमकणारा एक सात लड्यांचा चन्द्रहार मागवून वल्लभच्या हाती दिला. वल्लभच्या बायकोला हार पाहून फार आनन्द झाला. तिने लगेच तो गळ्यात घातला आणि शेजार-पाजारच्या घरी जाऊन त्याचे प्रदर्शन करून आली.

एका चोराला ही बातमी समजली. मध्य-रात्रीच्या वेळी तो वल्लभच्या घरात घुसला, त्याने वल्लभच्या बायकोच्या गळ्यातला हार हिसकावून घेतला आणि तो पळून गेला. बायकोच्या गळ्याला जखम झाली. बिचारी रात्रभर रडत-कण्हत राहिली.

सकाळ होताच वल्लभची बायको आपल्या नवऱ्याला म्हणाली–"बरं का? बोलणारा पोपट नि चन्द्रहार आपल्याला धार्जिणे दिसत नाहीत. जर थोड्याच काळात आपल्याला श्रीमंत व्हायचं असेल, तर एक उपाय आहे. तुम्ही आज वनदेवी-कडे जाऊन तिला सांगा कीं आज तुमचाच वाढदिवस आहे. तिला म्हणा–"आज पासून मी एक नवा व्यापार करणार आहे, मला त्यासाठी एक पोतं भर सुवर्ण-मुद्रा पाहिजेत!" हे धन घेऊन आपण-शहरात जाऊ. एक छान घर बांधू आणि व्यापार करू, आता मी या झोपडीत एक दिवस भर सुद्धा राहू शकणार नाही."

वल्लभ जंगलात गेला आणि बायकोने सांगितल्या प्रमाणे वनदेवीला विनंती केली. वनदेवीने झाडाच्या दिशेने हात हलवला आणि झाडाच्या फांद्या गदगदा हलू लागल्या, नि सुवर्णमुद्रांनी भरलेलं एक पोतं खाली पडलं. मोठ्या मुश्किलीने हे पोतं पाठीवर टाकून वल्लभ घराकडे निघाला. रस्त्यात राजाचे दोन सेवक त्याला भेटले. त्यांना पाहून तो घाबरलाच.

त्याला घाबरलेला पाहून राजसेवकांना जबरदस्त शंका आली, नि दरडाऊन त्यांनी विचारले–"अरे, सांग या पोत्यात काय भरलेलं आहे ते?"

वल्लभचा थरकाप झाला. म्हणाला–"पोत्यात रिठे भरलेले आहेत, रिठ!"

राजाच्या सेवकांनी पोतं उघडून पाहिलं तर त्यांत चम-चम चमकणाऱ्या सुवर्ण-मुद्रा! त्यांना वाटलं हा कोणी भयंकर डाकू आहे. खेचतच ते त्याला राजांकडे घेऊन गेले.

राजाने वल्लभचं म्हणणं मुळीच न ऐकता आपला विचार सांगितला–"एका डाकूच्या म्हणण्यावर विश्वास ठेवण्या इतका मी काय मूर्ख आहे? एका तडाक्यांत तू पोतं भर स्वर्ण-मुद्रा लुटल्यास, कुशल डाकू दिसतो आहेस की! काही असो, तुझ्यामुळे माझा खजिना तर भरला! तुला फार कडक शिक्षा देत नाही. असं म्हणून राजाने त्याला चाबकाचे दहा फटकारे आणि दोन महिन्यांच्या तुरुंगवासाची शिक्षा सुनावली.

आपली शिक्षा भोगून झाल्यावर वल्लभ घरी परत आला. त्याच्या बायकोने गंजलेली कुऱ्हाड त्याच्या हातात देऊन सांगितलं–"ऐका, मी काय सांगते ते नीट कान उघडे ठेऊन ऐका. समजलं?"

आता वल्लभ जंगलात तर गेला, पण चन्दनाच्या झाडा जवळ सुद्धा गेला नाही. दुसऱ्याच बाजूला जाऊन चांगली वाळलेली लाकडं कापली आणि बाजारात जाऊन विकली. ते पैसे खर्च करून त्याने घरासाठी आवश्यक सामान नि खेळातला पोपट खरेदी केला.

वल्लभची बायको घरी त्याची चातका-सारखी वाट पहात होती. वल्लभला पाहून नाराजीने तिने विचारले–"हा खेळण्या-तला पोपट कशाला घेऊन आलात? वनदेवी यावेळी काय म्हणाली?"

वल्लभने शांतिपूर्वक उत्तर दिले–"दोन दिवसांपूर्वीच्या वादळात चन्दनाचा वृक्ष समूळ उपटून पडला. मला वनदेवी कुठं दिसलीच नाही! जाऊ दे झालं, त्या देवीने आपल्यासाठी जंगलात एवढी वन-संपदा भरून ठेवली आहे, तिच्या मदतीने मेहनत करून आपण जीवन जगू या.





# औदार्य

दोन हजार वर्षांपूर्वी चीनमधे सो-पो-तावू नावाचा एक म्हातारा रहात असे. तो मोठा प्रसिद्ध पंडित होता. परन्तु त्याच्या पांडित्यावर प्रसन्न होऊन त्याला मदत देणारा दाता कोणीही नसल्यामुळे तो दारिद्र्यात पिचत राहिला होता.

तेथून दूर असणाऱ्या चू राज्याचा राजाही चांगला विख्यात पंडित होता. लोकांमधे असा समज होता, की हा राजा पंडितांबद्दल आदर बाळगतो आणि त्यांना आश्रय देऊन वाहन, वस्तु व धन या रूपात खूप मदत करतो. तावू आपल्याजवळची थोडी लोकरीची वस्त्रे आणि धन घेऊन पायी-पायीच चू राज्याकडे निघाला.

चू राज्य शेकडो मैल दूर होते; त्यातून रस्ता डोंगराळ भागातून होता. वाटेतच थंडीचा मोसम सुरू झाला. थोडे दिवस कोठे तरी विश्रान्ती घेऊन, मग पुढे निघण्याच्या विचाराने एका गावात जाऊन तावू तेथील यांग-चियावू-आयीं नावाच्या माणसाच्या घरी गेला.

आयीने तावूचे मनापासून स्वागत केले, खूप पाहुणचार केला त्याचा. तावू एक विद्वान माणूस आहे हे कळल्यावर तर आयी आणखीच खूष झाला. परंतु स्वतः आयीही कोणी सामान्य माणूस नव्हता. त्याच्याजवळ असणारे ग्रन्थ पाहून तावूही समजून चुकला, कि हा तर आपल्यापेक्षाही अनेक पटींनी श्रेष्ठ विद्वान आहे.

"मी ऐकलंय की चू देशचा राजा विद्वानांचा खूप सत्कार वगैरे करतो. मी त्याच्याच दर्शनासाठी जात आहे. तू पण का नाही येत माझ्या बरोबर?" तावूने आयीला विचारले. आयीने त्याला संमति दिली आणि थंडीचे कपडे व धन बरोबर घेऊन निघाला.

थोड्या दिवसांच्या प्रवासानंतर एका-एकी बर्फाचे वादळ सुरु झाले. ते दोघेही लियांग पर्वतातील त्या वादळात अडकले. आणखी चार दिवसातच ते चू राज्यात पोचू शकले असते; पण आता त्या भयंकर वादळातून एक पाऊलही पुढे जाणे अशक्य झाले. विशेषतः वृद्ध तावूची परिस्थिती फारच दयनीय झाली होती. तो आयीला म्हणाला–"बेटा, माझा शेवट जवळ आला आहे. काही ही केलं तरी मी काही आता 'चू'ला पोचू शकणार नाही. पण माझेही लोकरीचे कपडे तू घेतलेस तर तू तरी निदान आपला प्रवास पुढे चालू ठेवून चू राजाला भेटू शकशील. मी माझे लोकरीचे कपडे तुला देऊन टाकत आहे; ते तू घे."

पण आयी तावूचं म्हणणं कबूल करायला मुळीच तयार नव्हता. त्याने स्पष्ट सांगितले– "जायचं तर दोघं बरोबरच जाऊ; नाहीतर थंडीत कुडकुडून दोघंही मरून जाऊ. पण तुमचे कपडे घेऊन तुमच्या मृत्यूचं कारण बनायला मी कधीही तयार होणार नाही."

"अरे तू अजून तरुण आहेस बेटा; मी तर मरायला टेकलेला म्हातारा आहे. चू देशचा राजा माझा सत्कार करो, न करो; मला दोन्हीही सारखंच. आणि याशिवाय तू तर माझ्याहूनही अगदी पोचलेला असा प्रगाढ पंडित आहेस." अशा प्रकारे तावूने कितीही समजावले तरी आयीने त्याची सूचना मानलीच नाही.



शेवटी बर्फापासून आपलं रक्षण करण्यासाठी दोघं एका गुहेत शिरले.

तावूने सुचवले–"कुठे थोडी सुकी लाकडं मिळाली तर शेकोटी तरी करू या." आयी तावडतोब लाकडं शोधायला गुहेबाहेर पडला.

पण आयी परत येण्यापूर्वीच आपले लोकरीचे कपडे गुहेतच सोडून तावू बाहेर पडला; अन् एका बर्फाच्या खड्डयात त्याने उडी मारली.

आयीने थोड्या वेळाने परत येऊन पाहिले, तो तावू कुठे? त्याचे गरम कपडे मात्र तिथे पडलेले होते. बाहेर येऊन आयीने शोधले, तेव्हा बर्फाच्या खड्डयात पडलेले तावूचे शरीर त्याला सापडले!

आपल्यासाठी प्राण देणाऱ्या तावूचे औदार्य पाहून आयीला रडू कोसळले. नन्तर तावूचे प्रेत गुहेत नीट सुरक्षित ठेवून, त्याचेही गरम कपडे आपल्या कपड्यांवरून घालून आयी चू देशात पोचला.

'चू' चा राजा आयीच्या पांडित्यावर अतिशय प्रसन्न झाला. त्याला आपला 'दरबारी कवि' म्हणून मान्यता देऊन राजाने खूपशा वस्तु, वाहन व धन दिले.

पण राजाकडून हे सर्व मानमरातब ग्रहण करताना आयीच्या डोळ्यातले अश्रू पाहून राजाने कारण विचारले. "प्रभु, आपण माझ्या पांडित्याचा अशा प्रकारे सत्कार करत आहात, पण तावूच्या औदार्यापुढे माझ्या या पांडित्याचा काय पाड?" आयी बोलला.

तावूच्या त्यागाची हकीकत आयीच्या तोंडून ऐकून राजा आश्चर्यचकित झाला. नन्तर राजा स्वतःच आयीला बरोबर घेऊन त्या गुहेपर्यंत गेला. तावूच्या शवाचे त्याने वैभवपूर्वक दफन केले; त्याची अंत्येष्टिक्रिया पूर्ण करून तेथे समाधी ही बांधली.

दरवर्षी आयी तेथे जाऊन समाधीला आपल्या अश्रूंनी स्नान घालीत असे. यानन्तर चीनच्या कवि व पंडितांना 'तावूची समाधी' हे एक मोठे तीर्थस्थान बनून राहिले.





# कष्टांचे फळ

रामनगर नावाच्या गावातील रहिवासी कृष्णचन्द आणि दिलीपचन्द या दोघांनी मिळून एक मळा खरीदला.

कृष्णचन्दला मळ्याचे काम बिलकुल येत नसे. तो नेहमी देवाची ध्यान-धारणा, भजन-पूजन वगैरेत मग्न असे.

दिलीपचन्द मात्र बागकामात चांगलाच तरबेज होता. गवत काढणे, रोपांना आळी करणे, पाणी देणे–अशाच कामात त्याचा दिवसाचा सारा वेळ निघून जात असे.

त्या वर्षी मळ्यात खूप फळे आली; अन् ती विकून चांगली भली मोठी रक्कमही हाती आली. आता या पैशांची वाटणी कशी करावी हा त्यांच्यासमोर मोठा प्रश्न उभा राहिला. पैसे सारखे-सारखे वाटून घ्यायला दोघेही तयार नव्हते.

"मी रात्रंदिवस कडक मेहनत केली, त्यामुळे चांगली फळे आली. तेव्हा मला यातला अधिक वाटा मिळायला पाहिजे." दिलीपचन्दने आपली कैफियत मांडली.

पण उलट "मी अगदी निश्चल भावाने ईश्वराची आराधना केली. त्याची पुण्याई म्हणूनच भरपूर पैसा हाती आला; तेव्हा मोठा वाटा मलाच मिळाला पाहिजे." असा आग्रह कृष्णचन्दने धरला.

दोघांच्यात काही वेळ वाद-विवाद झाला अन् अखेर भांडणाचा निवाडा करून घेण्यासाठी दोघे गावपाटलाकडे गेले.

पाटलाने दोघांचे म्हणणे ऐकून घेऊन त्यांना म्हटले–"ऐका, मी तुम्हा दोघांना एक लहानसं काम सांगतो. आज रात्रीच दोघांनीही ते काम पूर्ण करून उद्या सकाळी येऊन मला भेटा. तेव्हांच मी आपला निर्णय तुम्हाला सांगीन."

नंतर पाटलाने दोघांना दोन-दोन पोती भात दिले आणि म्हटले–"हे

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट

सडून त्याचे तांदूळ करून माझ्याकडे घेऊन या."

भाताची पोती घेऊन कृष्णचन्द व दिलीपचन्द आपल्या घरी निघून गेले.

पण कृष्णचन्दने भात सडायचा जराही प्रयत्न केला नाही. ती जबाबदारी देवावर सोपवून थोडा वेळ ध्यान वगैरे करून तो झोपून गेला.

दिलीपचन्द मात्र रात्रभर जागून तांदूळ सडत राहिला अन् एका पोत्याचे तो तांदूळ करू शकला.

मध्यरात्रीच्या वेळी पाटलाने दोघांच्याही घरावरून फेरी मारली होती. कृष्णचन्दच्या घरातून कसला ही आवाज आला नाही, पण दिलीपचन्दच्या घरातून मात्र भात सडत असल्याचा आवाज त्याला ऐकू आला.

दुसऱ्या दिवशी कृष्णचन्द व दिलीपचन्द दोघेही आपापली पोती घेऊन पाटलाकडे पोचले. पाटलाने कृष्णचन्दची दोन्ही पोती उघडून पाहिली, त्यात तादुळाचा एक सुद्धा दाणा नव्हता. त्याला वाटले होते की ईश्वरकृपेने आपोआपच भाताचे तांदुळात रूपान्तर झाले असेल; पण तसे न झालेले पाहून त्याला चांगलेच आश्चर्य वाटले!

दिलीपचन्दच्या दोनापैकी एका पोत्यात तांदूळ होते अन् दुसऱ्यात भात.

"पाहिलंस ना कृष्णचन्द! मेहनत केल्यावाचून फळ मिळत नसतं. तू कष्ट न करता केवळ देवावर विसंबलास! कष्ट न करता नुसतंच बसून राहिलं तर असाच परिणाम होतो! बगीचात जी प्राप्ती झाली, ती दिलीपचन्दच्या मेहनतीमुळेच झाली. तूही जर त्याच्याबरोबर मेहनत केली असतीस तर प्राप्ती आणखी जास्त झाली असती. यापुढे दोघं मिळून कष्ट करा आणि प्राप्ती अर्धी अर्धी वाटून घ्या; समजलं?" पाटील म्हणाला.

यानन्तर कृष्णचन्दही दिलीपचन्दच्या बरोबरीने सारी कामें करू लागला अन् मग प्राप्ती वाटून घेताना त्यांचे कधीही भांडण झाले नाही.



## निसर्गातील आश्चर्ये :



### सर्वात मोठे बियाणे

जगातले सर्वात मोठे बी 'कोको डी मेर' हे आहे. ते केवळ सेचल्ली द्वीपात सापडते. त्याचे वजन ४० पौंड (१८ किलो) असते.



### विचित्र मांजर

चित्ता हा जरी मांजराच्याच परिवारातला असला तरी तो मांजरासारखी आपली नखे आत ओढून घेऊ शकत नाही; आणि मांजराप्रमाणे लपून राहून व एकदम झडप घालून शिकारही करू शकत नाही. त्याला पाठलाग करूनच आपले सावज पकडावे लागते.



### स्नेहिल पक्षी

आफ्रिकेतील एक प्रकारचा वीव्हर बर्ड वाळक्या गवताच्या काड्यांनी सामूहिक-घराप्रमाणे आपले घरटे बनवतो. प्रथम घरचे छत बनवून नंतर खालून प्रवेश करता येईल असे अनेक कप्पे असलेले घरटे तो बनवतो.

# जशी मेहनत, तसे फळ

**गो**वर्धनपुरचा जमीनदार भूपति अचानक एका रोगाने आजारी पडला. उत्तम ज्ञानी वैद्याने रात्रंदिवस कष्ट करून त्याला पुन्हा बरे केले, पण त्याचबरोबर त्याने सल्ला दिला कि भूपतीने आता हवापालट करावा, म्हणजे तो पूर्ण बरा होऊ शकेल. त्यासाठी अनुकूल गाव म्हणून श्रीपुरचे नाव वैद्याने सुचवले.

श्रीपुरला भूपतीची एक दूरची गरीब नातेवाईक बाई आपल्या मुलीसह रहात असे. तिच्याकडे जाऊन रहाण्याचा भूपतीने निश्चय केला.

भूपतीला रोज स्वादिष्ट, मसालेदार पदार्थ खायची सवय होती. श्रीपुरला आपल्याला चांगलं जेवण मिळणार नाही अशी त्याला भीती वाटली; म्हणून छोट्या बरण्यांतून तो निरनिराळ्या प्रकारच्या चटण्या व लोणची बरोबर घेऊन गेला.

त्या बिचाऱ्या गरीब स्त्रीला हा भूपति आपल्याकडे का आला आहे अन् किती दिवस रहाणार आहे हेही माहीत नव्हते! तिने इतकेच ऐकले होते की भूपति हा एक मोठा जमीनदार आहे, म्हणून प्रथम तिने कुठून तरी थोडी फार भाजी वगैरे आणून छानसा स्वयंपाक केला अन् त्याला जेवण वाढले. कदाचित् तब्येत बरी नसल्यामुळे किंवा रुचिपालटामुळे त्याला ते जेवण फारच रुचकर वाटले.

त्याने त्या नातेवाईक बाईची खूप स्तुति केली अन् तिला आपल्या आजाराबद्दल सांगून म्हणाला–"मला तर इथे एक महिना कसा जाईल याची काळजीच पडली होती, पण तुझा स्वयंपाक तर फारच छान वाटला मला!"

भूपतीचे बोलणे ऐकून बाईचा जीव घाबराच झाला! या जमीनदाराला आपण

"वसुंधरा"



महिनाभर जेवायला घातले तर तो त्याचे पैसे नक्की देईलच हे ओळखूनही त्याच्या लायकीचे जेवण रोज करून घालायचे म्हटले तर पैशाचा प्रश्न नसला तरी इतके कष्ट कोण करणार? मग तिने या सर्व कामासाठी मदत करायला आपल्या मुलीला सुचवले.

यावर तिची मुलगी उमा हिने साफ सांगून टाकले की–"आईग, इतकी मेहनत करून स्वयंपाक करणे काही आपल्याला शक्य नाही. एकाद्या दिवसाची गोष्ट निराळी, पण रोज असा स्वयंपाक करणे कठीण जाईल आपल्याला! तू असं कर, रोज तू आपल्यासाठी जसा स्वयंपाक करतेस तसाच करत चल. त्यांनी स्वतः-साठी जी लोणची, चटण्या आणल्या आहेत, त्याच वाढत जाऊ आपण जेवणात!"

त्या बाईने मुलीचे म्हणणे मान्य केले आणि दुसऱ्या दिवशी साधेच जेवण बनवले तिने. ती म्हणाली–"रावसाहेब, आपली तब्येत बरी नाही. काल पहिलाच दिवस म्हणून मी मसालेदार, स्वादिष्ट स्वयंपाक केला. आजपासून मात्र आपण बरोबर आणलेले पदार्थच मी आपणाला वाढत जाईन. आपल्या प्रकृतिस्वास्थ्यासाठी तेच लाभदायक असतील."

तिचे बोलणे न मानता भूपति म्हणाला–"माझ्या तब्येतीसाठी केवळ हवामानाच्या फरकाचीच आवश्यकता नाही; त्याच-बरोबर भोजनातही परिवर्तन हवं. मी यापूर्वी जी लोणची व चटण्या खात असे, त्या खायला मनाई आहे मला!"

तरीही त्या बाईने जमीनदाराच्या बोलण्याकडे मुळिच लक्ष दिले नाही.

गावातून फिरून येण्यासाठी भूपति-बरोबर दररोज उमाही जात असे. चालताना ते अनेक विषयांवर गप्पा मारत असत. उमाच्या हुशारीवर खूप होऊन भूपति म्हणे–"एकादा चांगला मुलगा पाहून मी तुझे लग्न करून देईन. लग्नाचा सारा खर्चही मीच करीन."

उमाने ही गोष्ट आपल्या आईला सांगून टाकली. आई आनन्दाने म्हणाली–"राव-साहेब फारच चांगले गृहस्थ आहेत. आपल्या गावी आले ही आपल्या भाग्याचीच गोष्ट आहे."

दोन आठवडे निघून गेले. नंतर एकदा भूपति उमाला म्हणाला–"उमा, मी आपल्याबरोबर जी चटण्या–लोणची आणली आहेत, ती तर रोज मी आमच्या घरी खातोच. तेच पदार्थ इथेही खायचा मला कंटाळा आला आहे. ते पाहिले की मला कससंच होऊ लागतं. तुझ्या आईला जरा सांग ना, तुम्ही दोघी रोज जे जेवता, तेच जेवण मलाही देत जा." उमा यावर समजावणीच्या स्वरात त्याला म्हणाली–"काकासाहेब, आई जे करते ते तुमच्या भल्यासाठीच करते. तुम्ही स्वतःच पहाना, इथे आल्यापासून तुमची तब्येत किती सुधारली आहे ती!"

गावातल्या लोकांना लवकरच समजून आले की उमाच्या घरात येऊन राहिलेला पाहुणा भूपति हा एक मोठा जमीनदार आहे. त्यामुळे काही लोक त्याला भेटायला आले, त्यांच्यातल्या काहींना भूपतीने जेवणाचे आमन्त्रण दिले. ती गरीब बाई इतर कोणते पदार्थ बनवू शकली नाही, पण तिने भूपतीने आणलेली लोणची-चटण्या वगैरे पदार्थ त्यांना जेवणात वाढले.

जेवणानन्तर आलेले चार लोक बाईला म्हणाले–"आज तू जे पदार्थ वाढले होते ते



फारच छान होते. त्यांची चव कधी विसरता नाही येणार, तू मागशील तेवढे पैसे देऊ आम्ही; पण आम्हालाही दे ना करून असे पदार्थ!"

"ते पदार्थ तर जमीनदार साहेबांनी आपल्याबरोबर आणले होते. ते मला नाही येत बनवायला." असे म्हणून तिने त्या लोकांचा निरोप घेतला.

श्रीपुरमधे राहून भूपतीची प्रकृति छानच सुधारली. मग तो आणखी दोन आठवडे तेथेच राहिला. त्याला घेऊन जाण्यासाठी नंतर एक दिवस त्याची गाडी आली. निघताना त्या मायलेकी जमीन-दाराच्या उरलेल्या चटणी-लोणच्यांच्या बरण्याही गाडीत ठेवू लागल्या; तेव्हां त्यांना थांबवत तो म्हणाला–"आता याची काय जरूर? इथे जरूर पडेल म्हणूनच मी हे सर्व आणले की! उगीच ओझं कशाला नेऊ बरोबर? राहू दे इथेच सर्व."

भूपति निघून गेल्यावर मायलेकींनी बरण्या उघडून पाहिल्या, तेव्हा चटण्या-लोणची जवळ जवळ संपतच आली होती.

ती बिचारी बाई दुःखाने म्हणाली–"जमीनदार हे सर्व इथेच ठेवून जाणार हे आधी माहीत असतं तर काय छान झालं असतं! एकतर या सर्व वस्तु खायला मोठ्या चविष्ट आहेत अन् दुसरं म्हणजे या विकून आपण पैसेही मिळवू शकलो असतो! आपण हे सर्व असेच ठेवून रावसाहेबांना आपले स्वस्त पदार्थ करून घातले असते!"

"आई, म्हणच आहे ना! जशी मेहनत, तसे फळ! आता काळजी करून काय उपयोग?" श्वास घेत उमा म्हणाली.

पण जमीनदार मात्र श्रीपुरच्या या मायलेकींना विसरला नाही. त्याने म्हटले होते की–'लग्नाची व्यवस्था मीच करीन'. म्हटल्याप्रमाणे एक महिन्याच्या आतच एक दिवस भूपतीने आपल्या नोकरा हाती त्यांच्याकडे उंची कपडे वगैरे पाठवून निरोप दिला की–"दुसऱ्याच दिवशी मुलीचा साखरपुडा केला जाईल. तिला नीट सजवून तयार ठेवा."





# दक्षता

सौपर्ण नावाचा एक मुनि मलयवती नगरात जाण्यासाठी आपल्या एका शिष्याला बरोबर घेऊन निघाला. वाटेत एक जंगल लागले. त्यातून चालताना एका ठिकाणी दोन रस्ते फुटलेले होते. त्यापैकी कोणत्या रस्त्याने गेले असता मलयवतीला पोचता येईल हे दोघांनाही माहीत नव्हते. तेथेच थबकून ते याबद्दल विचार करू लागले. जवळच वडाच्या झाडाखाली दोन तरूण पट खेळण्यात रंगून गेले होते. त्यांनी गुरु-शिष्य कोणाकडे ही लक्ष दिले नाही. गुरुने त्यांना विचारले–"मलयवतीचा रस्ता कोणता?"

दोघांपैकी एक त्यांना म्हणाला–"महा-राज, आपण उजव्या बाजूच्या रस्त्याने चालत रहा म्हणजे मलयवतीला बरोबर पोचाल."

इतक्यात दुसरा त्याला थांबवत म्हणाला–"थांबा, त्याने तुम्हाला बरोबर नाही सांगितलं. आपण डाव्या बाजूचा रस्ता पकडा, म्हणजे बरोबर पोचाल."

त्यांचं हे विचित्र वागणं सौपर्णाला आश्चर्यकारक वाटलं. दोघाही तरुणांनी दोन भिन्न रस्ते सांगितल्यामुळे त्यांची समस्या अजून जशीच्या तशीच होती.

थोडा वेळ विचार करून सौपर्णने विचारले–"बरं मला असं सांगा, की मलयवतीचा राजा कोण आहे?"

त्यांच्यातला एक पटकन उत्तरला–"मलयवतीचा राजा आहे विष्णुगुप्त."

पण दुसरा तरुण म्हणाला–"मलय-वतीच्या राजाचं नाव आहे सर्वोत्तम."

अशा प्रकारे दोन निरनिराळी नावे सांगून पुन्हा दोघांनी आपल्याच खेळात लक्ष घातले.

यानन्तर मात्र सौपर्णने त्यांना आणखी एकही प्रश्न विचारला नाही. आपल्या

शांता गायकवाड

शिष्याला घेऊन तो डाव्या बाजूच्या रस्त्याने चालू लागला. चार कोसांचे अंतर कापल्यानंतर त्यांना मृणालिनी नदी, तिच्या तीरावरील शक्ति देवीचे मन्दिर अन् नदीच्या पलीकडील थोड्या अंतरावरचे मलयवत्ती नगर हे सर्व दिसू लागले.

गुरु-शिष्यांनी नदीत स्नान करून आदि-शक्तिचे दर्शन घेतले आणि दोघेही एका शिरीष वृक्षाच्या छायेत जाऊन बसले.

शिष्याच्या मनात आतापर्यंत एकाच शंकेचा किडा वळवळत होता कि, पट खेळणाऱ्या तरुणांनी दोघांनीही मलया-वतीला जाण्याचे दोन अगदी भिन्न रस्ते सांगितल्यावरही आपल्या गुरुंना बरोबर रस्त्याच्याचा पत्ता कसा कळला? आपली ही शंका आता त्याने गुरुसमोर प्रकट केली.

सौपर्ण हसून उत्तरला—"सुरुवातीला दोघांनी जेव्हा दोन भिन्न रस्ते सांगितले तेव्हा माझ्या सहजच लक्षात आलं की दोघांपैकी एक जण खोटं बोलणारा आहे. म्हणूनच मी त्यांना आणखी एक असा प्रश्न विचारला की ज्याचं खरं उत्तर मला बरोबर माहित होतं. पहिल्या तरुणाने मलयवतीच्या राजाचे नाव 'विष्णुगुप्त' असे सांगितले अन् दुसऱ्याने सांगितले 'सर्वोत्तम.' आपल्याला राजाचं 'सर्वोत्तम' हे नाव माहीतच होतं, त्याच्याच निमन्त्रणा-वरून आपण त्याच्याकडे आता जात आहोत नं? तेव्हा याच आधाराने मला कळून चुकलं की, दुसरा तरुणच सत्यवचनी आहे; म्हणूनच त्याने सांगितलेला मार्ग धरून आपण इथे पोचू शकलो."

नगरात पोचल्यावर सौपर्णाने शिष्याला उपदेश केला—"समाजात नेहमीच निर-निराळ्या मानसिक प्रवृत्तीची माणसं रहात असतात. त्यांच्या मनाला कोणत्याही प्रकारचं दुःख न देता, आपल्या आवश्यकता त्यांच्याकडून पुऱ्या करवून घेणं हे मोठं बुद्धीचं काम आहे. त्यासाठी माणसाने नेहमी दक्ष असावे. 'दक्षता' हाच मोठा गुण आहे."





# डाकू युवराज

[ ४ ]

[ सुमेध राजाचा सेनापती वीरसिंह याने राजपरिवार नष्ट करण्याचे कारस्थान रचले. राजा शान्तिदेवने राणी आणि आपल्या दोन वर्षांच्या राजकुमाराला गुप्त भुयारी-मार्गाने बाहेर काढून लावले आणि एकट्याने मोठ्या धैर्याने शत्रूशी झुंजत झुंजत नदीत उडी मारली. राणीने राजकुमाराला मुनि जयानन्दच्या स्वाधीन केले व तिने प्राण सोडले. पुढे वाचा– ]

मुनि जयानन्द राणीच्या मृतदेहासमोर स्तब्ध बसून राहिला. त्यावेळी त्या वडाच्या झाडावर एक माकड येऊन बसले व कीचकीच आवाज करू लागले.

आपले मस्तक उचलून मुनिने वर पाहिले व म्हटले–"ये मारुती! खाली ये उतरून! तुझ्यासाठी एक नवा मित्र आलाय बघ! खेळ याच्याशी."

एकाच उडीत ते माकड खाली आले अन् मुनीजवळ जाऊन बसले.

"मारुती, तू लगेच जाऊन भल्लूकि-नीला बोलावून आण. तुझ्या या मित्राला तिच्या हाती सोपवायचंय मला." हसून मुनी त्याला म्हणाला.

माकड मोठ्या आनन्दाने या झाडावरुन त्या झाडावर उड्या मारत तेथून निघून गेले.



युवराजाला आपल्या आईच्या मृत्यूबद्दल काय कळणार? हसत हसत तो एकदा आपल्या आईच्या तोंडाकडे तर एकदा मुनीच्या तोंडाकडे पहात राहिला!

यावर मुनि त्याला उद्देशून म्हणाला– "तू मोठा धैर्यवान आहेस! भविष्यात तुला खूपच काही मिळवायचं आहे. आई-बापांच्या आधारावाचूनच आता तुला मोठं व्हायचं आहे. अन् आईचा मृत्यु ओढवायला कारणीभूत झालेल्या त्या दुष्टांना चांगलं शासन द्यायचं आहे."

युवराजाचे मुनीच्या बोलण्याकडे मुळीच लक्ष नव्हते; तो आपला हसतहसत त्याच्या दाढीशी खेळत होता! त्याला उचलून घेत मुनि म्हणाला–"मी तुझ्या गळ्यातला हा कंठहार काढून घेत आहे. हारातलं हे पदकच दर्शवीत आहे, की तू राजकुमार आहेस. आणि आत्ताच्या परिस्थितीत तुला यापासून धोका आहे." मुनीने युवराजाचा तो हार काढून घेतला.

इतक्यात मोठ्या उत्साहाने ओरडा-आरडा करीत करीत मारुती तेथे येऊन पोचला. आपली शेपटी एका फांदीला लपेटून उलटा लोंबकळत तो बाळ युव-राजाला हसवायच्या प्रयत्नाला लागला. मारुतीबरोबरच भल्लूकिनीही तेथे येऊन पोचली.

मुनि तिला म्हणाला–"भल्लूकिनी, या बाळाला मोठ्या सावधगिरीने संभाळा-यची जबाबदारी मी तुझ्यावर टाकत आहे." असे म्हणत त्याने युवराजाकडे बोट दाखवले.

भल्लूकिनीने युवराजाकडे वळून आपले हात पसरले, पण युवराज तिच्याजवळ जायला भिऊ लागला. ते पाहून मुनि त्याला म्हणाला–"भिऊ नको बाळा! ही भवानी-भल्लूकिनी फार चांगली आहे बघ! आई सारखाच ती तुझा सांभाळ करील. तुला हवं ते आणून देईल ती! ही रोज आंघोळ करते, अन् अगदी स्वच्छ रहाते. अगदी निःशंकपणे जा तिच्याजवळ."

त्या भल्लूकिनी अस्वलीने आपले डोके हलवून युवराजाला आपल्याजवळ येण्याचा संकेत केला. मुनीच्या सांत्वनपर बोलण्याचा परिणाम होऊन युवराजही हळूहळू पावले टाकत तिच्याकडे जाऊ लागला.

केवळ अस्वलच नव्हे, तर कोणत्याही जनावराला मुनि अगदी सहज पाळीव बनवू शके. भयानक हींस्र अशा वाघ-सिंहानाही थोड्याच क्षणात तो आपल्याला वश करून घेई. इतकेच नव्हे, तर जंगला-तल्या सर्वच प्राण्यांवर आपली हुकुमत चालवण्याची अजब शक्ति त्याच्यात होती; परंतु जाणूनबुजून आपली ही शक्ति त्याने कोणासमोर कधीही प्रकट न करता गुप्त ठेवली होती.

मुनीबरोबरच आश्रमात त्याचे शेखर व गोविन्द नावाचे दोन शिष्यही रहात असत. योगाभ्यास व ध्यानधारणेच्या निरनिराळ्या पद्धति मुनिजवळ शिकता शिकता ते तेथे राहून मुनीची सेवा करीत आपले दिवस व्यतीत करत असत. खरे तर, मुनीला कोणत्याही माणसाकडून कसल्याही मदतीची आवश्यकता नव्हती. कारण त्यांच्याकडून होणाऱ्या प्रत्येक आज्ञेचे पालन करायला तिथली जनावरे नेहमीच सज्ज असत.

सध्या त्याचे दोन्ही शिष्य युवराजाच्या वाढदिवसाचा उत्सव पहाण्यासाठी राज-धानीला गेलेले होते.

मोठ्या प्रेमाने आपले हात पसरून उभ्या असलेल्या भल्लूकिनीला पाहून





युवराज खुश होऊन हसत हसत तिच्या जवळ गेला. तिने ताबडतोब त्या बाळाला उचलून कडेवर घेतलं अन् ती तेथून चालू लागली. मारुतीही आनन्दाने नाचत तिच्या बरोबर मागे निघून गेला.

मुनि मोठ्या हर्षाने ते दृश्य पहात थोडा वेळ तिथेच स्तब्ध उभा राहिला. ते तिघेही जेव्हा त्याच्या दृष्टीसमोरून नाहीसे झाले, तेव्हा त्याची दृष्टि राणीच्या शवावर केन्द्रित झाली. आणि पुन्हा तो चिन्तामग्न झाला.

सूर्योदयाबरोबरच चारी दिशा उजळू लागल्या अन् पक्ष्यांच्या चिवचिवाटाने तो वनप्रदेश निनादून उठला.

इतक्यात मुनीचे दोन्ही शिष्य मोठ्या आतुरतेने मुनीजवळ येऊन पोचले.

मुनीने दृष्टींनेच त्यांना आतुरतेचे कारण विचारले.

"गुरुदेव आम्ही एक अतिशय दुःखाची बातमी आणली आहे. राजपरिवार संकटात सापडला आहे. सर्वत्र वार्ता पसरली आहे की आपले महाराज मृत्यु पावले आहेत." शेखरने भडाभडा आपले मन मोकळे केले!

"राणीचा तर काही पत्ताच नाही! कुणास ठाऊक त्या कोणत्या परिस्थितीत असतील!" गोविन्दही घाईघाईत म्हणाला.

खोलवर श्वास घेत मुनीने राणीच्या शवाकडे मान वळवली. त्याबरोबर शिष्यांनीही तिकडे पाहिले अन् चकित होऊन धक्का बसल्यासारखे ते झटकन एक पाऊल मागे सरकले! थोड्या वेळाने स्वतःला सावरून ते राणीजवळ गेले अन् त्यांनी विचारले—"महाराणी मृत्यु पावल्या?"

"होय! महाराणीने स्वतःला शत्रूच्या तलवारीपासून तर वाचवले, पण आपले पंचप्राणच असणाऱ्या महाराजांपासून अचानक घडलेल्या विरहाचा आघात तीं सहन करू शकली नाही. तिने आपला पुत्र माझ्या हाती सोपवला व आपले डोळे कायमचे मिटून घेतले. युवराजाला आत्ताच थोड्या वेळापूर्वी भल्लूकिनी आपल्या-



बरोबर घेऊन गेली." मुनीने त्यांना सांगितले.

एक निश्वास सोडत दुःखाने शेखर म्हणाला–"मी महाराणींना त्यांच्या विवाह-प्रसंगी प्रथमच पाहिले होते. आता तीन-चार वर्षांच्या काळानंतरही त्यांच्या चेहऱ्यात यत्किंचितही फरक नाही पडलेला दिसत!"

"सर्व प्रजा तर म्हणत होती की महाराजांप्रमाणेच महाराणीही प्रजेवर पुत्रवत् प्रेम करीत असत! अशा पुण्यशील जीवांची काय ही दुर्दशा!" गोविन्दनेही शोक प्रदर्शित केला.

"महाराणीने आपल्यावर जो विश्वास दाखवला आहे, तो आपण व्यर्थ होऊ द्यायचा नाही. मोठ्या जबाबदारीने अन् सावधगिरीने त्याला आपण वाढवू या." मुनि म्हणाला.

"या बाबतीत तुमची प्रत्येक आज्ञा कसोशीने पाळू आम्ही!" दोघाही शिष्यांनी गुरूला आश्वासन दिले.

"आता आपल्याला महाराणीच्या या पार्थिव शरीराबद्दल विचार करायला हवा. महाराज कुठे आहेत अन् त्यांचं काय झालं आहे याबद्दल आपल्याला काहीच ठाऊक नाही. शत्रूची शक्ति व सामर्थ्य यांचीही आपल्याला काही कल्पना नाही. पण काहीही असो, महाराणीच्या मृत्युची खबर गुप्त ठेवणंच श्रेयस्कर?" मुनि म्हणाला.

"पण मृत्युबद्दल कळलं तरी आता शत्रु काय करू शकेल? महाराणी तर आता जिवन्त नाहीत न?" शेखरने विचारले.

"तुझं म्हणणं खरं आहे कि शत्रु आता राणीचं काही वाकडं करू शकणार नाही. पण तिचा मृत्यु या भागात झाला आहे, असं जेव्हा शत्रूला कळेल तेव्हा ते युवराजाचा शोध करायला इथेच येतील न? युवराजाला धोका पोचू शकतो ना त्यामुळे?" मुनीने बरोबर तर्क केला.

"तुमचं म्हणणं बरोबर आहे गुरुदेव! पण आता सांगा, महाराणीच्या शरीराला आता अग्नि द्यायचा की ते पुरायचं?" शिष्यांनी विचारले.

"ते काम राणीच्या इच्छेप्रमाणे करायला हवे, अन् त्यासाठी तिची इच्छा जाणून घ्यायला हवी." असे म्हणून मुकाट्याने जाऊन मुनीने झऱ्यावर स्नान केले आणि राणीच्या देहाजवळ येऊन तो ध्यानस्थ होऊन बसला. थोड्या वेळाने डोळे उघडून तो म्हणाला–"महाराणीच्या आत्म्याची इच्छा आहे की पुरण्यापूर्वी त्यावर युवराजाच्या हातून एकादे फूल ठेवले जावे. तुम्ही दोघंही यांच्या रक्षणासाठी इथेच थांबा." मुनीने शिष्यांना आज्ञा दिली.

"गुरुजी, पण कोणी लाकूडतोड्या इकडे आला तर हे गुपित बाहेर फुटायची शक्यता आहे ना?" शिष्यांनी शंका प्रदर्शित केली.

"होय. तुमचं म्हणणंही बरोबरच आहे. लाकुडतोडे किती चांगले असले तरी आपण सावधगिरी बाळगणं केव्हाही चांगलेच!" असे म्हणून मुनीने डोळे मिटून कसलासा मन्त्र जपला. दुसऱ्याच क्षणी दूरवर वाघांच्या डरकाळ्या ऐकू आल्या. थोड्या वेळात ते आवाज जवळ आले आणि एकाएकी एक अक्राळविक्राळ वाघ, एक मादी अन् त्यांचे तीन बच्चे तेथे उपस्थित झाले. मोठ्या वाघांनी मुनिच्या पायावर आपले डोके टेकले. तीनही बच्चे उड्या मारत मुनीजवळ आले. दोघांना मुनीने आपल्या हातात उचलून घेतले अन् तिसरा उडी मारून त्याच्या खांद्यावर चढून बसला.

मुनीने वाघांना सांगितले–"सूर्यास्त होईपर्यंत कोणी इकडे फिरकता कामा नये. इथे हे जे शव आहे, ते कोणाच्या नजरेला पडायला नको आहे. कळलं?"

स्वीकारसूचक हळूच डरकाळत वाघांनी आपल्या माना हलवल्या.

नन्तर आपल्या शिष्याकडे वळत मुनि म्हणाला–"आता आपण एक चांगलीशी जागा पाहून खड्डा तयार करू या. मधल्या वेळात राणीच्या देहावर फूल वहाण्यासाठी युवराजालाही इथे आणले पाहिजे."

(क्रमशः)





# महाकंजूस

प्राचीन काळी रशियात मार्का नावाचा एक श्रीमन्त रहात असे. तो एक नंबरचा कंजूष माणूस होता. एके दिवशी मार्का शहरातल्या एका रस्त्याने जात असताना एका वृद्ध भिकाऱ्याने त्याला विचारले– “महाराज, पैसे द्या न गरीबाला!”

भिकाऱ्याची मागणी मार्काने ऐकली न ऐकलीशी केली अन् तो पुढे निघाला. पण त्याच्यामागून जाणाऱ्या एका गरीब शेतकऱ्याने मात्र आपल्या खिशातून दहा पैशांचे एक नाणे काढून भिकाऱ्याच्या हातावर ठेवले; अन् ही गोष्ट मार्काने पाहिली.

मार्काला स्वतःचीच लाज वाटली आणि तो थांबला. त्या शेतकऱ्याकडे वळून तो म्हणाला–“बघ बाबा, माझ्याजवळ पैसे सुट्टे नाहीयेत. तुझ्याजवळ आणखी एक नाणं असेल तर मला उसने दे, मी ते भिकाऱ्याला देईन. मी कोण आहे ओळखतोस ना तू?”

बिचाऱ्या शेतकऱ्याने आणखी एक नाणे खिशातून काढून मार्काच्या हाती दिले अन् विचारले–“सांगा बरं, आपण कधी द्याल मला पैसे? केव्हा येऊ मी आपणाकडे?”

“उद्या ये.” मार्का उत्तरला.

दुसऱ्या दिवशी शेतकरी मार्काच्या घरी दत्त म्हणून हजर झाला. त्याला पाहताच मार्का म्हणाला–“अरे, एवढ्याश्या एका नाण्यासाठी आलास इथवर? पण मजजवळ तर सुट्टे नाहीत. उद्या ये न!”

दुसऱ्या दिवशी पुन्हा शेतकरी मार्काकडे आला. मार्का म्हणाला–“बिचारा, आलास खरा आज तू; तू दोन आठवड्यांनी ये माझ्याकडे.”

शेतकरीही पक्का चिवट निघाला! दोन आठवड्यांनी तो पुन्हा हजर झाला.



दुरूनच त्याला येताना पाहून मार्का आपल्या बायकोला म्हणाला–“अग, ऐक जरा. मी इथे एका चटईवर झोपतो. तू माझ्या अंगावर एक वस्त्र झाक अन् डोक्याशी एक दिवा लावून ठेव झटपट! मला भेटायला तो शेतकरी येत आहे; त्याला सांग की आजच सकाळी मी मरून गेलो.”



मार्काच्या बायकोने बरोबर त्याने सुचवल्याप्रमाणे केले. नंतर आपल्या पती-जवळ बसून ती हुंदके देऊन रडू लागली. शेतकरी तिथे पोचताच गदगदून रडत ती त्याला म्हणाली–“भाईसाहेब, तुमच्याबद्दल बोलता बोलताच ह्यांना मृत्यु आला हो!”

“अरेरे! माझं कर्ज चुकवण्यापूर्वी हा दुष्ट मरून गेला की! पण आता काय करायचं? याची सर्व उत्तरक्रिया मीच आणखी थोडा खर्च झाला असं समजून करीन. प्रेताला आंघोळ घालायला हवी अगोदर.” असे म्हणून शेतकरी घराच्या मागील बाजूस गेला. तेथे हंड्यात उकळत असलेलं थोडं पाणी बादलीत काढून तो घेऊन आला अन् ते पाणी त्याने मार्काच्या अंगावर ओतले! अंग भाजल्यामुळे दुःखाने मार्काचे पाय हलले.

“असे पाय झाडून काय होणार? तरी माझं नाणं देतोस की नाही बोल!” शेतकऱ्याने रागाने विचारले. पण त्याला या प्रश्नाचे काहीही उत्तर मिळाले नाही.

“आता प्रेत ठेवायला खोकं मागवून घ्या बरं! त्यात याला ठेवून पेटी मंदिरा-पर्यंत नेऊन त्यावर अभिषेक करून घेईन मी! अन् मग स्मशानात नेऊन पुरून टाकीन.” शेतकरी म्हणाला. मार्काच्या बायकोने मुकाट्याने पेटी मागवून घेतली. शेतकऱ्याने मार्काला पेटीत ठेवले व तो ती पेटी मंदिरात घेऊन गेला. संध्याकाळपर्यंत त्याने पेटीवर अभिषेक केला. नंतर तो तिथेच थांबला.

मध्यरात्रीच्या वेळी चार चोर मंदिरात आले. त्यांची चाहूल लागून शेतकरी देवळा-

तल्या मूर्तीमागे दडून राहिला. चोरांनी कुठूनसे खूपसे धन आणि दागिने चोरून आणले होते. अन् त्याची वाटणी करायला ते तेथे आले होते.

पैसे व दागिने वाटून झाल्यावर त्यांच्याजवळ सोन्याची मूठ बसवलेली एक सुरी शिल्लक राहिली. ती कुणाला मिळावी याचा निर्णय काही त्यांना करता येईना, अन् त्यासाठी ते आपसात भांडू लागले.

"तुम्ही लोक सुरीसाठी भांडत का बसला आहात? मी सांगतो–तुमच्यापैकी जो कोणी पेटीतल्या प्रेताची मान कापेल, त्यालाच ती सुरी मिळेल." मूर्तीमागे लपलेला शेतकरी म्हणाला.

ते ऐकून मार्का एकदम घाबरून, उठून उभा राहिला. आणि जोराने किंचाळला– "बायरे! माझी मान कापणार?"

ते दृश्य पाहताच भयाने चोरांची गाळण उडाली आणि पैसे व दागिने तेथेच टाकून आपला जीव वाचवण्यासाठी ते तेथून मागे वळूनही न पाहता पळून गेले!

आता धीर धरून शेतकरी त्या मूर्तीच्या मागून बाहेर आला.

"पहा बाबा! काय झालं ते झालं! तुझ्यामाझ्यात हे भांडण कशाला? आपलं तर नशीबच उघडलं बघ, म्हणूनच इतकी सारी संपत्ति आपल्या हाती आली! सगळ्यांची दृष्टि चुकवून आता आपण हे सर्व आपसात सारखं वाटून घेऊ या. ये इकडे." मार्का शेतकऱ्याला म्हणाला. शेतकऱ्याने त्याचे म्हणणे मान्य केले. नन्तर दोघांनी ते धन आपसात सारखे वाटून घेतले.

"चल. आता आपण इथून निघून जाऊ या." मार्का म्हणाला.

"पण माझ्या नाण्याचं काय?" शेतकऱ्याने पुन्हा विचारले.

"तू पाहतोच आहेस ना! माझ्याजवळ आत्ता पैसे सुट्टे कुठे आहेत? उद्या नक्की ये हे माझ्याकडे!" मार्का उत्तरला.

यानंतरही कित्येक दिवस उलटले, पण शेतकऱ्याला त्याचे नाणे काही शेवटपर्यंत परत मिळालेच नाही!



# गुप्त खजिना

दृढव्रती विक्रमादित्य त्या भयानक अंधाऱ्या रात्री झाडाजवळ परत आला. झाडावरून प्रेत खाली काढून खांद्या वर टाकलं आणि नेहमीं प्रमाणे शांतपणे स्मशाना कडे चालू लागला. तेव्हा प्रेतात वास करणारा वेताळ त्याला म्हणाला–" राजा, या भयंकर मध्य-रात्री कोणतं कार्य साधण्यासाठी तू ही कठोर मेहनत करीत आहेस हे मला समजत नाही. पण हे मात्र तू लक्षात घेतलं पाहिजेस की एकादा गुप्त खजिना शोधण्यासाठी तू प्रयत्न करीत असलास तर त्यासाठी एवढी मेहनत करण्याची मुळिच आवश्यकता नाही. कारण गुप्त खजिना शोधून काढणं इतकं सोपं काम थोडंच आहे? शिवाय गुप्त खजिने लोकांना आपल्याकडे आकर्षित करतात, पण ते कोणाच्या हातीं मात्र लागत नाहीत. काही लोकांना प्रयत्न न

## वेताळाच्या गोष्टी



करताच सहज ते मिळून जातात. याचं उदाहरण म्हणून मी तुला श्रीकर राजाची गोष्ट सांगतो. ती ऐकून तुझा थोडा श्रम-परिहार ही होईल, ऐक.

वेताळ गोष्ट सांगू लागला—

कनकपुरी, धान्यपुरी आणि सप्तभूमि या तीन राज्यांना लागून एक विशाल जंगल होते. या अरण्यात अनेक वर्षे दरोडेखोरांचे दोन गट दबा धरून होते. दरोडेखोर तिन्ही राज्यांतील गावात घुसून लुटालूट करीत नि जंगलात पळून जात. काही वर्षांनंतर हळू हळू त्यांचा हा त्रास कमी होत गेला. दोन्ही गटांचे पुढारी मेले आणि मग अनुयायांनी दरोडे घालण्याचा व्यवसाय सोडून दिला. ते सामान्य नागरिकांचे जीवन जगू लागले.

कनकपुरी राज्याचा राजा श्रीकर तरुण होता, तरी पण तो अत्यन्त न्यायपूर्वक शासन करी. त्याने लोक-कल्याणाच्या अनेक योजना राबविल्या. त्याला सामुद्रिका नदी वर धरण बांधायचं होतं, पण तिजोरीत मात्र पैसा नव्हता. आपल्या व शेजारच्या राज्यातील जनतेचा सहभाग ही आवश्यक होता.

राजा याबाबत गंभीरपणे विचार करीत होता, इतक्यात त्याला एक बातमी मिळाली - धान्यपुरीचा राजा शिकारीसाठी जंगलात गेला आणि सर्पदंशामुळे तेथेच त्याला मृत्यु आला. याचा परिणाम असा झाला की राज्यात खूप अराजकता माजली.

सुमारे एक आठवड्यानंतर आणखी एक बातमी आली—सप्तभूमि राज्याचा राजा शिकारीसाठी जंगलात गेला असता वाघाने त्याच्यावर हल्ला केला आणि त्याला ठार केले.

मंत्र्याने राजाला ही बातमी देऊन म्हटलं—"महाराज, आता ही दोन्ही राज्यं जिंकून आपल्याला पैसा मिळू शकेल व धरण बांधता येईल."

याच वेळी गुप्त खजिना कोठे आहे हे सांगणारा एक ज्योतिषी राजधानीत आला.



राजाने या ज्योतिष्याशी सल्ला-मसलत केली. जंगलातील मध्यवर्ती एका जागी खूप सोने व दागिने एकत्र ठेवले असल्याचे ज्योतिषाने सांगितले, पण हे ही सांगितले की हा खजिना प्राप्त करण्यात मोठी जोखीम ही आहे.

राजा श्रीकरच्या हे लक्षात आले की असल्या गुप्त निधीवर मानवातीत शक्तींचा पहारा असतो आणि म्हणून त्यावर अधिकार प्राप्त करणे आपल्या शक्तीच्या बाहेरचे आहे. असा काही विचार करीत श्रीकर एकटाच घोड्यावर स्वार झाला आणि जंगलातील निर्दिष्ट स्थानी पोचला. तेथे त्याला एक झोपडी दिसली. राजाने आत डोकावून पाहिले, तेथे एक मुनि ध्यानमग्न बसला होता. मुनीने डोळे उघडले आणि विचारले—"पुत्र, तू कोण आहेस? आणि कशासाठी इथं आला आला आहेस?"

राजाने नम्रतापूर्वक उत्तर दिले—"महात्मन्, मी कनकपुरीचा राजा श्रीकर. या झोपडीत गुप्त खजिना असल्याचं मला समजलं आणि म्हणून मी इथं आलो आहे."

"हं, तू म्हणतोस ते खरं आहे. काही वर्षांपूर्वी डाकूंनी हा खजिना आमचे गुरु महामुनींच्या ताब्यात दिला." मुनीने माहिती दिली.



राजाने विचारले—"तर मग सध्या त्या खजिन्याचे संरक्षण आपण करीत आहात?"

"नाही, मी त्याचा संरक्षक नाही. एक साप नि एक वाघ हे त्या खजिन्याचे पहारेकरी आहेत." मुनीने उत्तर दिले.

आता श्रीकरला आठवलं की धान्यपुरीचा राजा जंगलात सर्प-दंशाने मरण पावला नि सप्तभूमीच्या राजाला वाघाने ठार केले. राजाने मुनीला ती सर्व हकीगत सांगितली.

"होय, तू सांगत आहेस ते सर्व खरं आहे. धान्यपुरीच्या राजाला कनकपुरी वर



आक्रमण करण्यासाठी सैन्य जमवायचं होतं. त्यासाठी धन मिळविण्याच्या इच्छेने तो इथं आला होता. त्याला साप चावला आणि तो मरण पावला. त्याच्या राज्यात माजलेल्या अराजकतेचा फायदा घेऊन धान्यपुरी वर आक्रमण करण्याची सप्तभूमीच्या राजाची इच्छा होती. यासाठी सेना-संगठन करण्यासाठी आवश्यक धन पाहिजे म्हणून सप्तभूमीच्या राजा इथं आला. वाघाने त्याला ठार मारलं. तथापि तुझ्या मनात कसलं ही भय नसेल तर तो साप नि वाघ तुला काही अपाय करणार नाहीत!" मुनीने श्रीकरला समजाऊन सांगितलं.

"महात्मन्, मला कशाची ही भीति वाटत नाही." असं म्हणून श्रीकरने मुनीला नमस्कार केला आणि तो खजिनावाल्या झोपडीकडे वळला.

राजाने आत प्रवेश करताच सापाने फूत्कार केला. राजा थोडा वेळ निर्भयपणे उभा राहिला आणि मागे वळून राजधानी कडे परत आला.

दुसऱ्या दिवशी श्रीकरने धान्यपुरी व सप्तभूमीच्या राजपरिवारांकडे आपले दूत पाठविले आणि त्यांच्या दुःखात आपण सहभागी असल्याचे कळविले. या संकट-काळी काही मदत पाहिजे असेल तर ती ही आनंदाने देण्याचे आश्वासन दिले. दोन्ही राज्यांच्या राण्या व मंत्री हे श्रीकरच्या औदार्यावर खुश झाले. त्यांनी आपली कृतज्ञता व्यक्त केली. आपापल्या राज्याच्या युवराजाच्या राज्याभिषेकाच्या वेळी अगत्यपूर्वक येण्याचे आमंत्रण ही दिले.

नंतर एक आठवड्याने श्रीकर पुन्हा जंगलात गेला, मुनीला नमस्कार करून नम्रपणे निवेदन केले–"महात्मन्, मी आज गुप्त खजिना आपल्या ताब्यात घेण्यासाठी निघालो आहे. आपण कृपा करून मला आशीर्वाद द्यावा."

मुनीने प्रसन्न अंतःकरणाने आशीर्वाद दिला. नंतर श्रीकरने निर्भयपणे खजिना असलेल्या झोपडीत प्रवेश केला. प्रथम साप फुफकारला, नंतर वाघाने ही गर्जना केली. पण दोघानी ही राजाला काही इजा केली नाही. ते प्रेमाने राजा जवळ आले.

धान्याच्या राशीप्रमाणे दागिन्यांच्या राशीतील एक दागिना हाती घेऊन तो बाहेर आला नि आपल्या शिपायांना काही सूचना देऊन राजधानीत परत आला. शिपायांनी सर्व खजिना राजधानीत आणला. त्या दिवसा पासून तो साप आणि वाघ पुन्हा कधी तेथे दिसले नाहीत.

यानंतर राजाने मुनीच्या अनुमतीने त्याच्या गुरूच्या समाधी वर एक टुमदार मंदिर बांधलं. धन खर्च करून राजाने सामुद्रिका नदी वर धरण बांधण्याचे काम पूर्ण केले.

त्यामुळे दर वर्षी नदीला येणाऱ्या पुराचं संकट नाहीसं झालं. आणि कनकपुरी राज्याची संपन्नता वाढू लागली.

वेताळाने राजाला ही गोष्ट ऐकवली आणि विचारलं–"राजा, धान्यपुरीच्या राजाला चावणाऱ्या सर्पाने सप्तभूमीच्या राजाला का बरे सोडले? सापाच्या तडाख्यांतून वाचलेल्या राजाला वाघाने का मारून टाकले? साप आणि वाघाने कनकपुरीच्या राजाला मात्र काही इजा केली नाही, त्याचं भाग्य बलवत्तर होतं म्हणून



का? प्रथम गुप्त खजिन्याच्या जवळ श्रीकरला भीति वाटली, नंतर-मात्र त्याने हे धाडस कसे केले? या माझ्या शंकांचं समाधान माहीत असून ही तू जर केलं नाहीस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होतील."

यावर विक्रमादित्याने उत्तर दिले–"हा गुप्त खजिना मोठा महिमाशाली आहे, हे विसरून चालायचं नाही. कारण डाकूंनी लुटलेलं आपलं सारं धन महामुनीला सोपवलं होतं. डाकूंचं हृदयपरिवर्तन झालेलं स्पष्ट दिसतंय! याशिवाय महामुनीने असा संकल्प केलेला दिसतो आहे की या खजिन्याचा उपयोग जनतेच्या कल्याणा-साठीच व्हावा. आणखी एक गोष्ट ध्यानात

घेतली पाहिजे–कनकपुरीचा राजा श्रीकर न्यायपूर्वक राज्यशासन चालवीत होता, तरी ही ईर्ष्या आणि स्वार्थ भावनेने प्रेरित होऊन धान्यपुरीच्या राजाने त्याच्यावर आक्रमण करायचा विचार केला. सप्त-भूमीचा राजा इतका दुष्ट नाही, तरी पण धान्यपुरीच्या राजाच्या मृत्युची बातमी मिळाल्यावर आपल्या स्वार्थासाठी या संधीचा उपयोग करण्याचा त्याने प्रयत्न केला जरूर. म्हणूनच सापाने जरी सोडलं तरी वाघाने त्याला मारून टाकलं!

आता राहिली श्रीकरची गोष्ट. आपल्या प्रजेच्या कल्याणासाठी त्याची सामुद्रिका नदी वर धरण बांधण्याची इच्छा होती. ही त्याची इच्छा चांगलीच बलवत्तर होती. पण शेजारच्या दोन राज्यांच्या राजांच्या मृत्यु नंतर, मंत्र्याच्या प्रोत्साहना मुळे ती आपल्या राज्यांत विलीन करण्याची इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली. पण तो स्वतः धार्मिक प्रवृत्तीचा असल्याने त्याला सतत वाटत राहिलं की आपण काही तरी चूक तर करीत नाही? म्हणून त्याने गुप्त खजिन्याच्या ठिकाणी जेव्हा प्रथम प्रवेश केला तेव्हा साप फूत्कारल्या बरोबर तो घाबरला आणि पुढे पाऊल टाकू शकला नाही. त्याच क्षणी त्याने शेजारच्या राज्यां वर आक्रमण करण्याची कल्पना सोडून दिली. इतकेच नव्हे तर त्यांच्याशी मैत्रीचे संबंध प्रस्थापित केले. आता त्याच्या मनात एकच एक संकल्प राहून गेला, आणि तो म्हणजे गुप्त खजिन्याचा उपयोग करून जन-कल्याणा-साठी सामुद्रिका नदी वर धरण बांधण्याचे काम पूर्ण करायचे! हा त्याचा विचार उदात्त असल्यामुळे पुन्हा त्याने जेव्हा झोपडीत प्रवेश केला, तेव्हां त्याला कसले ही भय नव्हते. अशा रीतीने महामुनीला पाहिजे होते ते सर्व घडून आले. म्हणून साप व वाघाने श्रीकरला जरा सुद्धा त्रास दिला नाही, उलट त्याला मदतच केली."

अशा प्रकारे राजाचे निवेदन संपल्यावर वेताळ प्रेता सह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडा वर जाऊन बसला.



चांदोबा पुरवणी–१४

# ज्ञानाचा खजिना

## तो कोण?

शहरातल्या खूप गर्दी असणाऱ्या चौकात भर दिवसा, आपल्या हातात दिवा घेऊन एक तत्त्वज्ञ रस्त्याने जाणाऱ्या प्रत्येकाचा चेहरा निरखून पहात होता.

असे विचित्रपणे वागणाऱ्या त्या विद्वान माणसाला ग्रीस देशातले सर्व नागरिक ओळखत असत. पण आत्ताचे त्याचे हे वागणे मात्र त्यांना भारीच विचित्र वाटले आणि काही लोकांनी त्याच्या जवळ जाऊन विचारले–"दिवसा ढवळ्या असा हातात दिवा घेऊन आपण काय शोधत आहात?"

"माणूस शोधत आहे." तत्त्ववेत्ता उत्तरला.

"काय म्हणालात? माणूस शोधत आहात? आपल्या आसपास तर माणसंच माणसं आहेत की!" नागरिकांनी आश्चर्याने विचारले.

"तोंडात येईल ते बोलत, स्वच्छंदतेने हवे तिकडे हिंडत, दोन पायावर चालणारे सर्व लोक काय 'माणूस' म्हणवून घ्यायला पात्र असतात?" त्याने उलटा प्रश्न केला.

तुम्हाला माहीत आहे, हा तत्त्वज्ञ कोण? [पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. एव्हरेस्ट शिखर चढून जाणारी पहिली महिला गिर्यारोहक कोण?
२. भारताच्या एकाद्या भागावर जपानने कधी विजय मिळवला होता काय?
३. "नायलॉन" हा शब्द कसा तयार झाला?
४. प्लूटो ग्रहाचा पत्ता कोणी व केव्हा लावला?
५. समुद्रात विलीन झालेल्या 'लास्ट ॲटलांटिस्' संस्कृतीचा उल्लेख सर्वात अगोदर कोणी केला?
६. बैलाचा सांगाडा, बकरीचे केस, घोड्याची शेपूट, गायीचे मस्तक–असे सर्व मिळून तयार झालेला आणि डुकरा सारखा डुरकणारा प्राणी कोणता? [पान ३६ पहा]

# लोकशाहीचे प्राचीन केन्द्र वैशालीनगर!




तुम्हाला असे वाटते का, कि लोकशाही राज्यपद्धति अगदी आधुनिक काळातच अस्तित्वात आली? लोकशाही अधिकार फक्त आपल्या काळातच आपणाला मिळाले असे वाटते तुम्हाला? खरे पाहता, लोकशाही ही आपल्याला नवी नाही. जवळजवळ दोन हजार वर्षांपूर्वी भारतातील काही प्रान्तात लोकशाही अस्तित्वात होती. याचे उत्तम उदाहरण म्हणजे वैशालीनगर!

वैशाली ही लिच्छवी घराण्याची राजधानी असे. या नगराचे नागरिक मतदान करूनच आपल्या शासकांची निवडणूक करत असत. परन्तु मतदानाचा अधिकार सर्वांना मिळत नसे. समाजाने ज्यांना 'जबाबदार नागरिक' म्हणून मान्यता दिली असेल, अशा लोकांपर्यंतच मतदानाचा हक्क सीमित असे.

इतिहास असे सांगतो की, इ. स. पू. सहाव्या शतकापासून इसवी सन चौथ्या शतकापर्यंत जवळजवळ हजार वर्षे लिच्छवी लोकांनी प्रजातंत्र व्यवस्थेचा अवलंब केला होता.

वैशालीनगर हे अत्यन्त विशाल व संपन्न होते. गंगा नदीच्या उत्तर किनाऱ्यावर, बिहार राज्यातील मुजफ्फरपुर जिल्ह्यातील बसरगाव या ठिकाणाजवळ वैशालीनगराच्या अवशेषांचा पत्ता लागलेला आहे. असे म्हटले जाते की, त्या वेळचे वैशालीनगरचे राज्य, हे आजच्या मुजफ्फरपुर जिल्ह्याच्या क्षेत्रफळापेक्षा थोडे मोठेच होते. अहिंसा-अवतार गौतम बुद्ध यानेही या राज्यात फिरून आपल्या सिद्धान्तांचे प्रबोधन केले होते.

गुप्तयुग सुरू झाल्यानंतर वैशालीनगराचे प्राधान्य व लिच्छवींचा प्रभाव कमी होऊ लागला होता.

## चान्दोबाच्या बातम्या



### भूकंपातून वाचलेला बक हेल्म

नुकत्याच कॅलिफोर्नियात झालेल्या भूकंपाच्या वेळी बक हेल्म नावाचा एक माणूस एका कारच्या खाली अडकला. नन्तर त्या कारवरच एक इमारत कोसळली. नव्वद तासांनंतर जेव्हा ढिगारा हलवला गेला, तेव्हा बक बेशुद्धावस्थेत सापडला! ताबडतोब बाहेर काढून त्याचा जीव वाचवला गेला. अशा अवस्थेत इतका वेळ जिवन्त रहाणे, ही गोष्ट आश्चर्याची मानली जाते. तरी ही वेदना सहन करण्याच्या बाबतीत ही घटना अपूर्व अशा मानवशक्तीची द्योतक आहे.



### नष्ट होऊ लागलेला खूप मोठा प्राणी

ब्लू व्हेल नावाचा देवमासा (व्हेल) हाच आजच्या संपूर्ण जगातला सर्वात मोठा प्राणी होय. अलिकडील काही वर्षेपर्यंत अशा जलचरांची संख्या दहा हजारपर्यंत होती; पण आता ती केवळ दोनशेच राहिली आहे. इंटरनॅशनल व्हेलिंग कमिशनने त्याचे सर्वेक्षण (सर्व्हे) करून ही बातमी जाहीर केली आहे. कायद्याने बन्दी असूनही देवमाशांची शिकार केली जात असते. त्यांच्या विनाशाच्या प्रमुख कारणांपैकी एक 'जलप्रदूषण' हेही आहे. मानवप्राण्याने आपल्या दृष्टिकोणात आणि नैसर्गिक बाबतीत फरक न केला तर देवमासे नष्ट होण्याचा धोका असाच चालू राहील.

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. शालेय शिक्षणही पूर्ण न करू शकलेल्या, पण महान् लेखक म्हणून ख्यातनाम झालेल्या तीन व्यक्तींची नावे सांगा.

२. संपूर्ण जगातील लहानात लहान पुस्तक कोणते?

३. आपले नाव सात प्रकारांनी लिहून दाखवणारा रचनाकार कोण?

४. नोबेल प्राईझचे वितरण कोणकोणत्या नगरात केले जाते?

५. नुकताच, 'खूप शीघ्र गतीने लिहिणारा' म्हणून प्रसिद्धि पावलेला लेखक कोण?

## उत्तरावली

**तो कोण?**

डायोजिनीस.

**तुम्हाला माहीत आहे?**

१. जपानची मिसेस जुंको टबी.

२. होय. दुसऱ्या महायुद्धात अन्दमान बेटे.

३. 'न्यूयॉर्क' चा 'नाय' आणि 'लंडन' चा 'लॉन' मिळून 'नायलॉन' शब्द बनला.

४. क्लॉड टॉबाग, ११३० मधे.

५. प्लेटो.

६. 'याक्'.

**साहित्य**

१. चार्लस् डिकन्स, मार्क ट्वेन, मॅक्सिम गॉर्की.

२. अल्बर्ट हब्बर्ट कृत 'एसे ऑन सायलेन्स' या पुस्तकात त्याच्या नावाशिवाय अधिक काहीच नाही.

३. विल्यम शेक्सपियर.

४. स्टॉकहोम, ऑस्लो.

५. अर्ल स्टॅन्ले गार्डनर (१८८०–१९७०) एकाच वेळी याने सात कादंबऱ्या लिहिल्या होत्या.

# नेहरूंची गोष्ट-१२



तुरुंगातून सुटल्यावर जानेवारी १९३४ मध्ये एक दिवशी दुपारी पं. नेहरू आपल्या घराच्या आवारात शेतकऱ्यांशी बोलत होते. त्यावेळी घराच्या छपरावरील कौलं खाली पडू लागली. त्यावेळी हळू हळू भूकंप सुरू होत होता.

तरी पण पं. जवाहरलाल आपल्या पूर्व-नियोजित कार्यक्रमानुसार आपल्या पत्नी सह कलकत्त्यास गेले. जहाल मतवादी पुढारी व कार्यकर्ते यांचे दमन करण्यासाठी सरकारने जे धोरण अमलात आणले होते त्याचे खंडण करीत पंडित नेहरूंनी अनेक सभांतून भाषणे दिली.





चार दिवसांनी ते पाटण्यास गेले. तेथील भूकंपाचे तांडव त्यांनी आपल्या डोळ्यांनी पाहिले. अनेक घरे जमीनदोस्त झालेली होती. ज्या घरात त्यांचं स्वागत होणार होतं ते ही अत्यंत ध्वस्त झालं होतं. सगळी रात्र त्यांनी त्या घराच्या आवारात घालवली.



नंतर नेहरू पति-पत्नी अलाहाबादला आले. एके दिवशी पं. नेहरू आणि बाबू पुरुषोत्तमदास टंडन गप्पागोष्टी करीत होते. त्याच वेळी पोलिस तेथे पोचले. कलकत्त्यांत पंडितजींनी जी भाषणे दिली ती सरकारच्या दृष्टीने आक्षेपार्ह आहेत म्हणून त्यांना कैद करण्यात आले. अधिकाऱ्याला पाहून पंडितजी म्हणाले–"मी केव्हांचा आपली वाटच पहात होतो."

पंडित नेहरूंना कलकत्यातील अली-पुरच्या तुरुंगात डांबण्यात आले. पाच-सहा फुट लांबी-रुंदीच्या छोट्या खोलीत पंडितजी हालचाल करीत, तेव्हां त्यांना पिंजऱ्यातील जनावरांची आठवण होई.





कार्यकर्त्यांच्या व्यवहाराबद्दल असंतोष वाटल्यामुळे म. गांधीजींनी १९३४ मध्ये आपली असहयोगाची चळवळ थांबवण्याचा आदेश दिला. वर्तमान-पत्रात ही बातमी वाचून पंडितजी फार निराश झाले.

मध्यंतरी कमलाजी फार आजारी पडल्या. त्यांना भेटण्यासाठी पं. नेहरूंना दोनदा तेवढ्या पुरतं मुक्त करण्यात आलं. सरकारने अशी अट घातली की ते जर राजकारणापासून दूर राहणार असतील तर त्यांची सुटका होऊं शकेल. कमलाजींनी नवऱ्याला विनंती केली की त्यांनी मुळीच असे करू नये.





यानंतर थोड्याच दिवसात कमलाजीं-च्या औषधोपचारासाठी पंडितजींना युरोपला जाण्याची परवानगी देण्यात आली. कमला नेहरू जर्मनीत निवर्तल्या. पंडितजींना पत्नीच्या निधनाचे फार दुःख झाले. त्या नित्य पंडितजींच्या सहचारिणी बनून राहिल्या होत्या. त्या बरोबर असल्या म्हणजे पंडितजींना मोठा आधार वाटे.

थोड्याच काळात पंडितजींच्या मातोश्रींचा पण देहांत झाला. तशा त्या एका सनातनी कुटुंबात जन्मल्या असल्या तरी त्यांचे विचार अत्यंत प्रगत होते. पोलिसांनी त्यांच्यावर जो लाठी-मार केला, त्याच्या परिणामां-पासून त्या मुक्त होऊंच शकल्या नाहीत.





इकडे दुसरे महायुद्ध सुरू झाले. १९४० मध्ये जपानने पेर्ल बंदरावर बाँब टाकले. यामुळे युद्धाला एक नवेच वळण लागले. परिणाम असा झाला की जपान व अमेरिका यांना युद्धात सामिल होणे भाग पडले. जगात सर्वत्र अशांततेचे साम्राज्य पसरले.

सन १९४२ मध्ये म. गांधीजींनी 'भारत छोडो' चळवळ सुरू केली. ब्रिटिशांनी भारत सोडून गेलं पाहिजे. कोणती ही अट न घालता हिंदुस्तानला स्वातंत्र्य मिळाले पाहिजे. आधुनिक भारताच्या इतिहासात ही एक अभूतपूर्व घटना होती.






ही चळवळ सुरु होताच सरकारने आपली कार्यवाही सुरू केली. देशांतील हजारो स्वातंत्र्य-सैनिकांना कैद करून तुरुंगात ठेवण्यात आले. पं. नेहरूंना ही कैद करण्यात आले. सर्वत्र असंतोषाचे वातावरण पसरले.

(पुढील अंकात समाप्त)




प्राचीन काळी श्रीरंगपट्टणमधे मोतीलाल नावाचा एक हिऱ्यांचा व्यापारी रहात असे. तो खूप धनवान होता; विशेषत: त्याचा समुद्री-व्यापार खूपच चांगला चाले.

एके दिवशी आन्ध्र प्रदेशातला रामगुप्त नावाचा एक श्रीमन्त माणूस मोतीलालकडे आला. त्याने मोतीलाल जवळची सर्व बहुमूल्य रत्नं पाहिली. त्यातील एक रत्न रामगुप्तला फारच आवडले. त्याची किंमत मोतीलालने 'चार हजार मुद्रा' इतकी सांगितली; परन्तु रामगुप्तजवळ त्यावेळी फक्त तीन हजारच मुद्रा होत्या. ते रत्न तर त्याला हातून सोडावेसे वाटत नव्हते. तो मोतीलालला म्हणाला–"महा-राज, माझ्याजवळ आत्ता फक्त तीनच हजार मुद्रा आहेत. आपण हे रत्न मला द्या. मी घरी पोचल्यावर राहिलेल्या हजार मुद्रा पाठवून देईन."

मोतीलालने ओळखले की रामगुप्त चांगला कुलीन व प्रामाणिक माणूस आहे. तो म्हणाला–"ठीक आहे, असंच करू या. आपल्याकडे जी बाकी रहाते, ती मी माझ्या खाते-वहीत लिहून ठेवीन आपल्या नावे!"

अत्यन्त आनन्दाने ते रत्न घेऊन राम-गुप्त आपल्या गावी परतला. पण थोड्याच दिवसात तो आजारी पडला अन् त्याने अंथरूण धरले. खूप उपाय झाले, पण काही उपयोग होईना. महिनाभर तो बिछान्यातच राहिला अन् अखेर मरण पावला. मरण्या-पूर्वी त्याने आपला पुत्र पद्मनाभ याला जवळ बोलावून त्याला आपण श्रीरंग-पट्टणच्या मोतीलालकडून रत्न कसे विकत घेतले ते सांगून ते कर्ज फेडण्याबद्दलची शपथही त्याच्याकडून घेवविली.

बराच प्रयत्न करून ही पद्मनाभ वडिलांचे हे कर्ज काही फेडू शकला नाही.

रजनी देवळे



शेवटी ते रत्न घेऊन पद्मनाभ श्रीरंगपट्टणकडे निघाला. त्याला वाटत होते की तेथे रत्न विकले गेले तर उत्तमच होईल. पण तसें न झाले तर ते मोतीलालकडे परत देऊन कर्जाचा जो हिशोब तो कापून घेईल तो देऊन टाकून बाकीचे पैसे घेऊन परत यावे. पण पद्मनाभ जेव्हां श्रीरंगपट्टणला पोचला, तेव्हा शत्रु-राजाने त्या राज्याची नाकेबन्दी केली होती व त्याचे सैन्य शहरांची लूट करीत होते. नगरात सर्वत्र अन्दाधुन्दी चालू होती. अशा स्थितीत पद्मनाभ रत्न घेऊन तसाच परतला असता तर बरे झाले असते. तो निदान नीटपणे घरी पोचला असता. त्याने कर्ज फेडायचा पक्का निश्चयच केला होता. म्हणून सारे नगर धुंडाळत तो मोतीलालचा पत्ता शोधू लागला. पण असे करत असताना एकदा तो शत्रुसैनिकांच्या हाती सापडला. त्यांनी बिचाऱ्या पद्मनाभला खूप मारपीट केली व त्याचे रत्न काढून घेऊन हाकलून दिले त्याला!

इकडे श्रीरंगपट्टणवर हल्ला झाला तेव्हा मोतीलालचा मुलगा घर सोडून म्हैसूरला पळून गेला आणि शत्रु सैनिकांनी मोतीलालची सर्व संपत्ती लुटून नेली. या चिन्तेमुळे मोतीलाल आजारी पडला आणि त्या मानसिक रोगाने शेवटी त्याचा बळी घेतला. म्हैसूरला पोचल्यावर मोतीलालच्या मुलाने वडिलांचे नाव सांगून इकडून तिकडून काही कर्ज मिळवून काही दिवस काढले. पण शेवटी त्याला कर्जही मिळेनासे झाले व शेवटी भुकेने तडफडून तो मृत्यु पावला!

मोतीलालच्या कुटुंबात आता त्याचा नातू गोविन्दगुप्तच काय तो उरला. तो अतिशय बुद्धिमान होता. त्याला आजोबांची संपत्ति तर मिळाली नाहीच, पण बापाने करून ठेवलेली कर्जं मात्र त्याच्या डोक्यावर बसली. गोविन्दगुप्तने खूप मेहनत करून विद्या मिळवली. मोठमोठ्या शेठ लोकांकडे कारकुनी करत करत तो मर्यादित



स्वरूपात लहान-मोठे खरेदी-विक्रीचे कामही करू लागला. अशा प्रकारे आपल्याच कमाईतून एक एक करत सर्व कर्जे फेडून टाकली.

इकडे पद्मनाभही फार जगू शकला नाही. आपल्या पित्या समोर त्याने मोतीलालचे कर्ज फेडायची प्रतिज्ञा तर केली होती. पण कारण नसताना तो आपले रत्न तर घालवून बसलाच, पण आपली चूक नसताना खूप मारही खावा लागला! याच आघाताने त्यानेही अंथरूण धरले आणि पुन्हा तो बरा झालाच नाही! मरणापूर्वी त्याने आपला पुत्र चन्द्रशेखर याला बोलावून म्हटले—"बेटा, तुझे आजोबा श्रीरंगपट्टणच्या मोतीलालचे देणेदार आहेत. एक हजार मुद्रा इतकं कर्ज आहे ते! कर्ज फेडायच्या प्रयत्नात उलट मला नुकसान मात्र आलं. त्या कर्जाची रक्कम आता तीन हजारच्या आसपास तरी झाली असेल. तेव्हा तू खूप मेहनत करून धन कमव आणि श्रीरंगपट्टणला जाऊन त्या कर्जाचा भार उतरवून टाक, अन् त्याच्या खातेवहीतली नोन्द खोडून घे. हे काम तू केलं नाहीस, तर माझ्या आत्म्याला शान्ति मिळणार नाही."

चन्द्रशेखरने खूप काम करून धन कमवायला सुरुवात केली. लवकरच त्याने चार हजार मुद्रा जमवल्या आणि ती रक्कम घेऊन तो श्रीरंगपट्टणला पोचला. तेथे



त्याला कळले की, मोतीलाल व त्याच्या पुत्राचेही निधन झाले आहे आणि आता त्याचा वारस गोविन्दगुप्त आहे. चन्द्रशेखर गोविन्दगुप्तकडे गेला आणि आपली ओळख देऊन तो म्हणाला—"महाराज, आपण आपल्या आजोबांची खाते-वही मला दाखवता? एक हजार मुद्रांसंबंधी हिशोब त्यात लिहिलेला असेल."

हे ऐकताच गोविन्दगुप्तला धडकीच बसली! त्याने आपल्या पित्याचे कर्ज पै अन् पै फेडले होते. नुकताच ऋणमुक्त होऊन तो आनन्दाने वावरू लागला होता. 'आता काय आपल्या आजोबांचं कर्जही आपल्या डोक्यावर बसणार?'

अशा विचाराने तो एकदम चन्द्रशेखरला म्हणाला–" महाराज वडिलांची कर्जं फेडता-फेडता माझे केस पांढरे झाले. आता काय मी आजोबांची कर्जही फेडायची? अन्याय नव्हे हा? ती जबाबदारी मी घेणार आता? त्याची मुदतही केव्हाच संपून गेलेली असेल न?"

चन्द्रशेखर स्मितहास्य करत यावर म्हणाला–" अरे! मला तुमच्या आजोबांकडून घ्यायचे काहीच नाही. खूप दिवसांपूर्वीपासून माझे आजोबा तुमच्या आजोबांचे एक हजार मुद्रा देणं लागतात. माझ्या आजोबांच्या केवळ वचनावर विश्वास ठेवून तुमच्या आजोबांनी ही उधारी ठेवली होती. ज्यांना आपली प्रतिष्ठा संभाळायची असेल त्यांना काळाचे कसले बंधन? मी आपल्या आजोबांचं कर्ज सव्याज फेडण्यासाठी रक्कम घेऊन आलो आहे. कृपा करून तेवढी खाते-वही शोधून काढा न?"

चन्द्रशेखरचा प्रामाणिकपणा पाहून गोविन्दगुप्त आश्चर्यचकित झाला. त्याने सर्व जुनी गाठोडी उघडून पाहिली; आणि शेवटी एका वहीत त्याला रामगुप्तच्या नावे लिहिलेला एक हजार मुद्रांचा हिशोब सापडला.

गोविंदगुप्त आता चन्द्रशेखरला म्हणाला–" मला तर आजपर्यंत या कर्जाबद्दल काहीच माहीत नव्हतं. आपणच स्वतः याविषयी बोललात. हे कर्ज मी रोख स्वरूपात घेऊ इच्छित नाही. आपणासारखा प्रामाणिक माणूस शोधूनही कुठे सापडणार नाही. आपण ज्या चार हजार मुद्रा घेऊन आला आहात त्या भांडवलातून आपण दोघंही संयुक्त स्वरूपात काही व्यापार सुरू केला तर कसं होईल? तुमची काही आडकाठी असेल तर स्वच्छ सांगा."

चन्द्रशेखरलाही गोविन्दगुप्तची ही कल्पना आवडली. नंतर दोघांनी मिळून उत्तर तऱ्हेने व्यापार करून खूप धन जोडले व मैत्रीपूर्ण व्यवहार ठेवून उर्वरित आयुष्य सुखाने व्यतीत केले.






एक दिवशी सकाळी श्रीकृष्ण सात्यकी आणि उद्धव यांना बरोबर घेऊन सभाभवनाकडे जायला निघाले, इतक्यात त्यांना भेटण्यासाठी एक माणूस आला. द्वारपाला बरोबर आत येऊन त्याने नम्र निवेदन केले–" महात्मन्, मगध देशचा राजा जरासंध याने वीस हजार राजांचा पराभव करून त्यांना तुरुंगात डांबले आहे आणि नाना प्रकारे त्यांचा छळ चालविला आहे. ते सर्व राजे आपणास शरण येऊ इच्छितात आणि सर्वांनी मिळून मला आपला प्रतिनिधी म्हणून आपणाकडे पाठविले आहे. आम्ही सर्व जण आपली प्रजा आहोत, म्हणून आमचे रक्षण करण्याची जबाबदारी आपली आहे."

त्याच वेळी अचानकपणे नारद तेथे येऊन पोंचले. श्रीकृष्णाने नारदाचे यथायोग्य स्वागत केले नि कुशल-क्षेम विचारले. नंतर नारद म्हणाले–" ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर राज्य-संपादनाच्या इच्छेने राजसूय यज्ञ करू इच्छितात. आपण या यज्ञाचे अध्यक्ष व्हावे अशी त्यांची इच्छा आहे. सर्व राजे आपल्या येण्याची वाट पहात आहेत."

एका बाजूला जरासंधाने कैदेत ठेवलेले सर्व राजे आपले साह्य मागत आहेत, त्यांनी आपला दूत पाठविलेला आहे. आणि दुसऱ्या बाजूला युधिष्ठिराने आरंभिलेल्या राजसूय यज्ञाची अध्यक्षता करण्याचे आमंत्रण नारद घेऊन आलेले आहेत.



“या दोन कामांपैकी कोणते कार्य आपण प्रथम करावे?” श्रीकृष्णांनी उद्धवाला सल्ला विचारला.

“जरासंधाचा संहार करण्यासाठी काही विशेष निमित्त शोधण्याची आवश्यकता मला दिसत नाही. कारण युधिष्ठिराचा राजसूय यज्ञ संपन्न करते वेळी अनेक राजांना पराभूत करावेच लागणार आहे. त्या वेळी जरासंधाचे पारिपत्य करता येणे शक्य आहे. म्हणून आता राजसूय यज्ञात भाग घेण्यासाठी जाणेच सर्वथा योग्य होईल.” उद्धवाने सल्ला दिला.

याच संदर्भात उद्धवाने आणखी एक गोष्ट लक्षात आणून दिली. “सैन्याच्या बळा वर जरासंधाचा पराभव करणे कदाचित् शक्य होणार नाही. शौर्य व पराक्रम या बाबतीत जरासंधाची बरोबरी करणारे फक्त भीमसेनच द्वंद्व-युद्धात त्याचा पाडाव करू शकतील. अन्य कोणत्या ही प्रकारे जरासंधाला पराभूत करणे कठीण.”

उद्धवाचे म्हणणे श्रीकृष्णाला पटले. त्यांनी बलरामाची ही परवानगी घेतली आणि सर्व स्त्री-वृंदासह इन्द्रप्रस्थाकडे जाण्याची तयारी करण्याचा दारूक वगैरे मंडळींना आदेश दिला. या नंतर रुक्मिणी, सत्यभामा वगैरे स्त्रिया पालखीत बसल्या आणि चतुरंग सेने सह श्रीकृष्ण वैभवपूर्वक निघाले. निघण्यापूर्वी नारदाला रवाना केले आणि आलल्या दूताला सांगितले– “तू जाऊन सर्व राजांना सांग की भिण्याचे कारण नाही. मी नक्की जरासंधाचा संहार करून तुम्हा सर्वांना त्याच्या तावडीतून मुक्त करीन.” असं समजाऊन सांगून दूताला ही रवाना केलं.

श्रीकृष्णाच्या आगमनाची वार्ता समजताच युधिष्ठिर त्यांना सामोरा आला. आणि आनन्दाश्रूं सह श्रीकृष्णाला आलिंगन दिले.

श्रीकृष्णांनी पांडवांचे क्षेम विचारले आणि नंतर पताका, तोरणे व केळीचे खुंट यांनी सुशोभित केलेल्या रस्त्यांवरून इन्द्रप्रस्थ नगरीत प्रवेश केला. श्रीकृष्णाचे दर्शन करण्यासाठी नागरिक रस्त्याच्या दुतर्फा घरांच्या गच्ची वर उभे होते.

युधिष्ठिराच्या महालात श्रीकृष्णाने कुंती व अन्य सर्व नातेवाईक स्त्रियांची विचारपूस केली.

श्रीकृष्ण सर्व पांडवांना अतिशय प्रिय होते. श्रीकृष्ण आणि अर्जुन यांची मैत्री लोकोत्तर आहे. अर्जुनाने जेव्हा खांडव-वन जाळले, तेव्हां श्रीकृष्ण स्वतः त्याचे सारथी बनले होते. श्रीकृष्णाने अर्जुनाला दिव्य रथ, घोडे आणि अक्षय बाण दिले होते. मयाकडून मय-सभा निर्माण करवली. म्हणून युधिष्ठिराने श्रीकृष्णाला अनेक दिवस सहकुटुंब आपल्या घरी ठेऊन घेतलं, आणि शेवटी एके दिवशी भर सभेत आपला राजसूय यज्ञाचा बेत श्रीकृष्णाला सांगितला.

युधिष्ठिराचे अभिनन्दन करीत श्रीकृष्ण म्हणाले–“राजसूय यज्ञ करण्यात आपणास कसलीच अडचण नाही. दिग्विजय करण्यासाठी दिक्पालांसारखे चार भाऊ आहेत. ते चारी दिशांची राज्ये आपणास जिंकून देतील.”



श्रीकृष्णाच्या या प्रोत्साहनाने युधिष्ठिराला अतिशय आनंद झाला. मग त्याने आपल्या चारी धाकट्या भावांना चार दिशांना राज्ये जिंकण्याच्या मोहिमे वर पाठवले. सहदेव दक्षिणे कडे, नकुल पश्चिम दिशेला, अर्जुन उत्तरे कडे नि भीमसेन पूर्व दिशेला रवाना झाले. त्यांनी त्या त्या दिशेची राज्ये जिंकून राजसूय यज्ञ संपन्न करण्यासाठी अपार धन आणून युधिष्ठिराच्या हाती दिलं.

युद्धात सर्व राजांचा पराभव झाला, पण जरासंधाला मात्र कोणी जिंकू शकलं नाही. यामुळे युधिष्ठिराला चिंता वाटू लागली. हे जाणून श्रीकृष्णाने युधिष्ठिराला समजाऊन सांगितलं–“आपण जरासंधाबाबत जरा सुद्धा काळजी करू नका. त्याला पराजित करण्याचा उपाय मला उद्धवाने घरून निघण्यापूर्वीच



सांगितलेला आहे. मी ते काम करून टाकीन."

यानंतर श्रीकृष्ण, भीम आणि अर्जुन यांच्या सह जरासंधाची राजधानी गिरिव्रजपुर येथे पोचले. तेथे या तिघांनी ब्राह्मणाचा वेष धारण केला. जरासंध रोज ब्राह्मणांची पूजा करीत असे. जेव्हां तो आपल्या या कामात मग्न होता, तेव्हां हे तिघे जण तेथे गेले आणि म्हणाले–"आम्ही दुरून आलेले अतिथी आहोत. आम्ही आपणाकडे जी मागणी करू, ते आपण द्यालच!"

जरासंधाने त्या तिघांकडे जरा न्याहळून पाहिले, त्यांचे रूप आणि ध्वनि अमळ परिचित असल्या सारखे वाटले. त्याने तर्क केला की हे निःसंशय ब्राह्मण-वेषधारी क्षत्रिय असले पाहिजेत.

तरी पण त्यांची इच्छा पूर्ण करण्याचा निश्चय करून जरासंधाने त्यांना विचारले–"सांगा ना, काय मागणी आहे तुमची?"

"आम्ही तुझ्याशी द्वंद्व-युद्ध खेळू इच्छितो! हा आहे भीमसेन नि हा आहे त्याचा छोटा भाऊ अर्जुन! आणि मी तुझा शत्रु श्रीकृष्ण!" श्रीकृष्णाने उत्तर दिले.

हे सर्व ऐकून जरासंध कुत्सितपणे हंसून म्हणाला–"हं, असं आहे होय? मग मी द्वंद्व-युद्ध अवश्य करीन. पण तुझ्याशी नाही. मला पाहून मथुरेला पळून जाणारा आणि समुद्रात लपणारा भ्याड तू! या अर्जुना बरोबर ही मी युद्ध करणार नाही. तो माझ्याहून लहान आहे. शौर्य आणि पराक्रमात तो माझी बरोबरी कसा करू शकेल? मला तुल्यबल आहे एकटा हा भीमसेनच! त्याच्याशी मी जरूर द्वंद्व-युद्ध करीन!"

असं म्हणून जरासंधाने एक भली मोठी गदा भीमसेनाच्या हाती दिली आणि स्वतःच्या हाती एक गदा घेऊन श्रीकृष्ण व अर्जुना सह ते दोघे राजधानीच्या बाहेर युद्ध-भूमीवर पोचले. तेथे भीमसेन नि जरासंध यांचे गदा-युद्ध सुरू झाले. एकमेक



एकमेकाचे प्रहार वाचवीत, पण संधि मिळाली तर एकमेकांना तडाखे देत दोघे ही मत्त हत्तीप्रमाणे लढू लागले. शेवटी दोघांच्या ही गदा मोडून पडल्या. मग त्यांनी मुष्टि-युद्ध सुरू केले.'

जरासंधाचा जन्म दोन तुकड्यात झालेला होता. जरा नावाच्या एका पिशाचिनीने हे दोन तुकडे जोडले होते. म्हणून त्याचं नाव जरासंध पडलं हे श्रीकृष्णाला माहीत होतं. त्याचा वध करण्यासाठी त्याला दोन तुकड्यात चिरणं हाच एक उपाय आहे, हे सांगण्यासाठी श्रीकृष्णाने एक गवताची काडी हाती घेऊन ती उभी चिरली. भीमसेनाला हा संकेत समजला. मग काय? भीमसेनाने जरासंधाला खाली पाडलं. त्याच्या एका पायावर आपला पाय ठेवला आणि दुसरा पाय हातात घेऊन जरासंधाला उभा चिरला.

हे युद्ध पाहण्यासाठी तेथे अनेक लोक जमा झाले. जरासंधाची ही अवस्था पाहून ते हळहळले.

श्रीकृष्ण नि अर्जुन यांनी भीमसेनाला आलिंगन दिले आणि त्याचे अभिनन्दन केले.

जरासंधाच्या मृत्यु नंतर त्याचा मुलगा सहदेव याचा श्रीकृष्णाने मगधचा राजा म्हणून राज्याभिषेक केला. आणि जरा-



संधाने कैदेत ठेवलेल्या सर्व राजांना बंदीखान्यातून मुक्त केले. श्रीकृष्णाच्या आज्ञेनुसार सहदेवाने सर्व राजांच्या स्नान-भोजनादिची व्यवस्था केली आणि नंतर त्यांना उत्तम भेटी देऊन सत्कार केला व त्यांना आपापल्या देशी रवाना केले.

श्रीकृष्ण भीम व अर्जुन यांना बरोबर घेऊन इन्द्रप्रस्थाला परत आले आणि जरासंधाच्या वधाची वार्ता युधिष्ठिराला कळवली. आपली इच्छा पूर्ण झाल्यामुळे युधिष्ठिराला अत्यंत आनंद झाला आणि त्याने श्रीकृष्णाचे शतशः आभार मानले.

आता युधिष्ठिराने आपला राजसूय यज्ञ प्रारंभ केला. कृष्ण-द्वैपायन, भरद्वाज,



वसिष्ठ, विश्वामित्र, गौतम इत्यादि अनेक ऋषि-मुनि या यज्ञाचे ऋत्विक् बनले.

युधिष्ठिराने यज्ञासाठी भीष्म, धृतराष्ट्र व त्याचे पुत्र, तसेच द्रोणाचार्य, विदुर इत्यादींना पण निमंत्रण दिले. या यज्ञासाठी अनेक राजे व चतुर्वर्णांचे लोक येऊन उपस्थित झाले.

सोन्याच्या नांगराने भूमि नांगरून यज्ञ-वेदी तयार करण्यात आली आणि मग ऋत्विकांनी युधिष्ठिराला यज्ञाची दीक्षा दिली. राजसूय यज्ञ मोठ्या थाटा-माटात साजरा झाला. शेवटी युधिष्ठिराने सर्व सदस्य व या याजकांचा सत्कार केला. त्या दिवशी युधिष्ठिराने सर्वांना उद्देशून विचारले—"आपणा पैकी कोणाची मी सर्वप्रथम पूजा करावी हे मला सुचवाल?"

या प्रश्नाचे उत्तर कोणी ही देऊ शकले नाही. कारण तेथे अनेक मोठमोठे लोक जमलेले होते. सर्वांना गप्प बसलेले पाहून सर्वांना उद्देशून सहदेव म्हणाला—"यात विचार करण्यासारखे विशेष काय आहे? भगवान श्रीकृष्णच सर्वांहून अधिक पूजनीय! त्यांचीच सर्वप्रथम पूजा करणे सर्वथा योग्य! त्यांची पूजा केली की सर्व भूतांची पूजा केल्यासारखीच होय?"

सहदेवाची ही सूचना सर्व सदस्यांना पसंत पडली. मग युधिष्ठिराने ताबडतोब श्रीकृष्णाचे पद-प्रक्षालन केले नि त्यांना पीतांबर व अलंकार सप्रेम भेट दिले. बाकी सर्व राजांनी श्रीकृष्णाला नमस्कार केला.

परंतु दमघोषाचा मुलगा शिशुपाल याला हे बिलकुल आवडले नाही. तो उठून उभा राहिला आणि गरजून तक्रार करू लागला—"याला काळाचीच महिमा म्हणायचे नाही तर काय? हा सहदेव श्रीकृष्णाची पूजा करावी काय सुचवितो आणि तुम्ही सर्व जण ते मान्य करता हा काय विनोद आहे! इथे अनेक उच्च कोटीचे विद्वान आहेत, असे असता या नीच कुळातील गोपाळाची प्रथम पूजा तुम्ही

कशी करीत आहात? ययातीने शाप शाप दिलेल्या यादवाची पूजा करणे योग्य आहे का?"

शिशुपालाच्या बोलण्याचा श्रीकृष्णावर काही ही परिणाम झाला नाही. पण बाकीच्या सभासदां पैकी काहींनी कानांवर हाथ ठेवले आणि ते उठून बाहेर निघून गेले. काही जण शिशुपाला बरोबर युद्ध करायला ही तयार झाले. श्रीकृष्णाने त्या सर्वांना थांबविले आणि आपले सुदर्शन चक्र शिशुपालावर फेंकून त्याचे डोके उडविले. सभा-स्थानी एकच गडबड उडाली. हा सर्व प्रकार पाहून शिशुपालाचे हस्तक भयभीत होऊन पळून गेले.

यानंतर युधिष्ठिराने सर्वांना यथोचित दानें दिली. आणि अवभृत स्नान करून आपल्या यज्ञाची सांगता केली.

राजसूय यज्ञासाठी आलेले सर्व पाहुणे रवाना झाल्यावर युधिष्ठिराच्या आग्रहा खातर श्रीकृष्ण आणखी काही दिवस इन्द्रप्रस्थ येथेच राहिले.

याच काळात दुर्योधनाच्या मनात ईर्ष्या उत्पन्न झाली. कारण त्याने युधिष्ठिराचे वैभव आपल्या डोळयांनी पाहिले होते. राजसूय यज्ञ फारच थाटात साजरा झाला होता. मयाने युधिष्ठिरासाठी एक अद्भुत भवन निर्माण केले. या भवनात सर्व राजांनी पांडवां बद्दलचे आपले प्रेम व्यक्त केले. या भवनांत श्रीकृष्णाच्या सर्व नाय-कांनी यथेच्छ विहार केला. याच भवनात दुर्योधनाचा मात्र पराभव झाला. कोठे पाणी आहे आणि कोठे नाही याबद्दल त्याला भ्रम झाला. जिथं पाणी नव्हतं तिथं दुर्योधनाने आपली वस्त्रे गुडघ्यापर्यंत वर उचलली आणि जिथं पाणी होतं तिथे मात्र तो तसाच आत शिरला आणि आपली वस्त्रे ओली करून घेतली. यावर द्रौपदी सह सर्व स्त्रिया परिहासपूर्वक गडगडून हंसल्या. युधिष्ठिराने त्यांना असे न करण्याची सूचना दिली तर खरी, पण ती कोणी ही मानली नाही. यामुळे अत्यन्त अपमानित होऊन दुर्योधन हस्तिनापुरी परत आला.






# शक्ती व युक्ती

अवन्ती राज्यातल्या अमरपुरी गावात शंभुमित्र नावाचा एक युवक रहात असे. त्याचे वडील अमरनाथ हे एक सामान्य नागरिक होते. परंतु जनता त्याची खूप वाहवा करत असे. शंभुमित्राला वाटे की आपणही 'पित्याचा योग्य मुलगा' म्हणून कीर्ती मिळवावी. अमरनाथच्या वेळी अवन्तीवर राज्य करणारा राजा फार दुष्ट होता. जनतेकडून मिळालेला पैसा तो आपले वैभव व विलास यासाठी खर्च करी; आणि प्रजेच्या अडचणींचा मुळिच विचार करीत नसे.

अशा स्थितीत अमरनाथने आपल्या गावातल्या लोकांची अपार सेवा केली. कोणी आजारी असेल तर तो स्वत: रोग्याला आपल्या गाडीत घालून राजधानीच्या गावी जाऊन इलाज करवी; गावच्या मुलांना जमेल तितके फुकट शिकवी; लोकांच्या मदतीने तो गावातले रस्ते दुरुस्त करी; अन् अशा अनेक प्रकारे केलेल्या सेवेमुळे अमरपुरीत त्याला खूप कीर्ती मिळाली.

अमरनाथच्या मृत्यूनन्तर शंभुमित्राला वाटले की आता आपणही जनतेची सेवा करून यश मिळवावे. परन्तु तोपर्यंत चक्रनेमीचा पुत्र विजयवर्मा राजा बनला होता. पण तो आपल्या पित्याप्रमाणे विलासी जीवन न जगता जनतेसाठी निरा-निराळ्या कल्याणकारी योजना अमलात आणू लागला. त्यामुळे आपोआपच अमर-पुरीतल्या लोकांचीही शिक्षण व औषध-योजना यांची सोय झाली. आता शंभुमित्राला काळजी वाटू लागली की राजाच्या या सोयींमुळे आपल्याला जनतेची सेवा करून कीर्ति मिळवायला वावच उरला नाही!

रवि भागवत



याच काळात एकदा दोन प्रवासी अमरपुरीत आले. त्यांना रहाण्यासाठी आसपास कोठे धर्मशाळा वगैरे नव्हती. त्यामुळे ते विचारात पडले की—आता काय करावे? ही बातमी कळल्या बरोबर शंभुमित्राने त्यांना गाठून ती रात्र त्यांनी आपल्या घरी राहून आपला पाहुणचार स्वीकारावा अशी त्यांना विनंती केली. पाहुण्यांनीही ती गोष्ट आनन्दाने मान्य केली.

बोलण्याच्या ओघात शंभुमित्राने प्रवाशांना आपली व्यथा सांगितली—"नवीन राजा प्रजेच्या कल्याणासाठी नवनवीन योजना राबवीत असतो. त्यामुळे मला लोकसेवेसाठी काम करायला संधिच मिळत नाही!"

एक प्रवासी यावर हसून त्याला म्हणाला—"अरे बाबा, आपला राजा जनकल्याणासाठीच निरनिराळ्या योजना राबवत आहे ना? तुझे वडील महान् होते, यामुळे तू जनतेची सेवा केलीस, न केलीस तरी जनतेला तुझ्याबद्दल आदर वाटेलच. पण आपल्या राजाची गोष्ट तशी नाही. तो आपल्या पित्याची अपकीर्ती धुवून काढायचा आटोकाट प्रयत्न करीत आहे."

शंभुमित्र यावर काहीच बोलला नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी ते प्रवासी निघून गेले.

या घटनेनंतर थोड्या दिवसांनी शंभुमित्राने एके दिवशी गरीबांना अन्नदान करण्याचा कार्यक्रम ठरवला. परन्तु त्याच दिवशी राजाही अन्नदान करणार असल्याची दवंडी राजधानीत पिटवली गेली.

यानंतर आपल्या पित्याच्या नावाने गावात धर्मशाळा बांधायची योजना शंभुमित्राने आपल्या मित्रांजवळ बोलून दाखवली. पण कीर्ति मिळवण्याची त्याची आकांक्षा माहीत असणाऱ्या त्याच्या मित्रांनी त्याला सल्ला दिला की, "बाबा रे, ही गोष्ट तुझ्या शक्तीच्या बाहेरची आहे; तेव्हा तू त्यात हात न घालावास हे बरे!"

पण त्यांच्या सल्ल्याची पर्वा न करता त्याच दिवशी त्याने धर्मशाळेच्या बांधकामाला सुरुवात केली; पण दुसऱ्याच दिवशी राजधानीतून काही कार्यकर्ते अमरपुरीत आले व अमरपुरीत राजा एक धर्मशाळा बांधणार असल्याची गोष्ट त्यांनी जाहीर केली.

"माझ्या पित्याचं नाव शाश्वत करण्यासाठी मी इथे धर्मशाळा बांधणार होतो; पण राजाने तेवढं सुखही मला लाभू दिलं नाही." असे म्हणून गावच्या प्रमुखांसमोर शंभुमित्राने आपली व्यथा प्रकट केली.

पुन्हा काही दिवसांनी त्याने आणखी एक उपाय केला—अमरपुरीत एक खूप मोठे ग्रन्थालय स्थापन करण्याची घोषणा शंभुमित्राने केली. पण यातही विघ्न उपस्थित झालेच! एक महिन्याच्या आतच राजाने अमरपुरीत ग्रन्थालय सुरू केले आणि शंभुमित्राचा उद्देश असफल झाला. त्याच्या मित्रांनी मग त्याचे कसे तरी सान्त्वन केले.

यानंतरही शंभुमित्राने एकाद-दुसरी कल्याणकारी योजना आखली, परंतु प्रत्येक वेळी राजामुळे त्याला बेत रहित करावा लागला.

नन्तर सहा महिनेपर्यंत शंभुमित्र गप्प राहिला. त्याने कोणत्याही कार्यक्रमासाठी चुळबूळ केली नाही. नंतर एके दिवशी त्याला राजधानीतून बोलावणे आले. शंभुमित्र राजधानीत जाऊन राजासमोर





हजर झाला. त्यावेळी मन्त्री धर्मकीर्तीही राजाच्या बाजूला उभा होता.

मन्त्री हसत हसत त्याला म्हणाला– "शंभूमित्र, आश्चर्य वाटू देऊ नकोस, मला तुला एक खबर सुनवायची आहे. एक दिवस प्रवासी म्हणून जे दोन लोक तुझ्या घरी आले होते, ते आणखी कोणी नसून आम्ही दोघं–राजा व मीच–होतो! त्यावेळी आपल्या बोलण्यातून आम्ही ओळखलं की तुझ्या मनात कीर्ती मिळवायची तीव्र इच्छा आहे; पित्याचा योग्य पुत्र म्हणवून घेण्याची लालसा आहे. पण यासाठी जनतेच्या अडचणी मुद्दाम शोधून काढत बसवण्याची किंवा जनता कोणत्याना कोणत्या अडचणीत असावी अन् आपण ती दूर करायला धावावं ही तुझी वृत्ति बरोबर नाही. तुला हा धडा शिकवावा म्हणूनच तुझ्या प्रत्येक योजनेत आम्ही पावलोपावली अडचणी आणल्या. आमच्या मते आपली कीर्ती महत्त्वाची नसून जनकल्याण हेच अधिक महत्त्वाचे आहे."

यावर शंभुमित्र मोठ्या विनयाने म्हणाला–"महाराज, क्षमा असावी. पण आपण जेव्हा अतिथि म्हणून माझ्याकडे राहिलात तेव्हाच मी आपणा दोघांना ओळखले होते. कारण कोणाचा पाहुणचार स्वीकारल्यावर आपण त्या व्यक्तीची टीका कधीच करत नाही; पण आपण महाराजांच्या दानशीलतेची स्तुति करून माझी मात्र टीका केली गेली, त्याच वेळी आपण दोघे–महाराज व मंत्री आहात हे माझ्या लक्षात आले, तसे नसते तर जे जे काम मी सुरू करीन, तेच राजाने सुरू केल्याचे समजल्यावर, हा एक केवळ योगायोग आहे असे मानायला मी मूर्ख थोडाच आहे?"

यावर मन्त्री धर्मकीर्तीने रागाने विचारले–"तर मग तू आमच्याशी चढाओढ करण्यासाठी दर वेळी नवनव्या योजना सुरू करायचा प्रयत्न का केलास? राजाशी स्पर्धा करणे हा अविवेक नव्हे काय?"

शंभुमित्र विनयाने उत्तरला–"मी आपली पुन्हा क्षमा मागतो. त्याच दिवशी माझ्याही मनात आले होते, की आपल्या स्वतःच्या कीर्तीपेक्षा जनकल्याण हेच महत्त्वाचे होय. या विचारानेच मी एक योजनाबद्ध कार्यक्रम आखला. मी मुद्दामच अशा योजनांची घोषणा करत गेलो, की ज्या पुऱ्या करण्याची माझी ताकदच नव्हती! महाराजांनीच माझ्याशी स्पर्धा करून त्या योजना स्वतः अंमलात आणल्या. त्यांनी जर हे केले नसते, तर माझी तितकी ताकद नसल्याने मीही त्यातून अंग काढून घेतलेच असते! माझ्यासारख्या सामान्य माणसाला धर्मशाळा बांधणे किंवा पुस्तकालय सुरू करणे या गोष्टी आपल्या आवाक्याबाहेरच्या आहेत. आता अमरपुरीच्या जनतेला कशाची जरूर वाटली तर ते लोक माझ्याजवळ येऊन म्हणतात– "शंभुमित्र, तुम्ही कोणताही संकल्प केलात की ते काम आपोआप पुरे होऊन जाते!"

हे उत्तर ऐकून राजा क्रोधाने म्हणाला– "म्हणजे तू आमचे श्रम व धन यांचा उपयोग स्वतःचे यश वाढवण्यासाठी करतोस तर!"

"असं नव्हे महाराज! मी लोकांच्या मनात फक्त तेवढा विश्वास पैदा केला आहे. आपलं यश वाढवायचं असतं, तर मी त्यांना म्हणू शकलो असतो, की मीच राजाला सांगून ही कामं करून घेतली आहेत! पण मी असं कधीच केलं नाही." शंभुमित्राने शांतपणे आपली बाजू मांडली.

यावर राजा विजयवर्मा प्रसन्न होऊन म्हणाला–"शाबास शंभुमित्र! तू खरोखरच आपल्या पित्याचा योग्य पुत्र आहेस! तुझ्या पित्याने आपल्या शक्तीनुरूप जनतेला मदत केली, अन् तू आपल्या युक्तीने जनतेचे कल्याण साधलेस!"

यानन्तर राजाने शंभुमित्राचा मोठ्या आदराने मान-सन्मान करून प्रजेचा एक सच्चा सेवक म्हणून नाव मिळवायची संधी प्राप्त करून दिली.





# ताम्र-यन्त्र

रत्नपारखी वीरभद्र शहरातले आपले काम संपवून बरीच रात्र झाल्यावर आपल्या गावाकडे निघाला. शहराची सीमा पार करीत असतानाच एका लांब दाढीवाल्याने त्याचा रस्ता अडवून विचारले–"महाराज, मी तासभर इथे उभा राहून वाट पहात आहे, पण एकही भाड्याची गाडी इकडून आली नाही. मला गाजीपुरला जायचे आहे. आपल्या गाडीत मला थोडी जागा देता?"

गाडीवानाने जरा 'कां कू' केले, पण तिकडे लक्ष न देता वीरभद्र म्हणाला–"आपल्याला तर गाजीपुरवरूनच जायचंय ना? मग येऊ दे की यांना गाडीत."

तो प्रवासी वीरभद्र जवळच गाडीत बसत म्हणाला–"फार उपकार झाले आपले माझ्यावर!" थोडा वेळ मौन राहिल्यानंतर तो पुन्हा म्हणाला–"माझी दाढी अन् मळके कपडे पाहून माझ्याबद्दल गैरसमज करून घेऊ नका. माझं नाव आहे रामेश. फार अडचणी सोसून मी हिमालयात गेलो होतो. आत्ता तिकडून येऊनच गावाकडे निघालो आहे."

"हिमालयांतून?" वीरभद्रने संशयित नजरेने त्याच्या कडे पहात म्हटले.

यावर आपल्या खिशातून तांब्याचे एक यन्त्र काढून रामेशने विचारले–"सांगा बरं, हे काय आहे?"

ते यन्त्र उलटसुलट करून पारखून पहात वीरभद्र म्हणाला–"या ताम्रपत्रावर काही बीजाक्षरे खोदलेली दिसत आहेत."

यन्त्र पुन्हा आपल्या खिशात घालत रामेश म्हणाला–"बीजाक्षर खोदलेलं हे काही साधंसुधं ताम्रपत्र नव्हे. माझ्यावरील संकटांबद्दल दया येऊन, हिमालयात तपस्या करणाऱ्या एका योग्याने हे यन्त्र मला दिलं

सुमित्रा करमरकर

स्वप्नात आली, आणि लाजत लाजत, पण हट्ट करीत त्याला म्हणाली–"बाबा, मला समोरच्या घरातल्या त्या तरुणाशी लग्न करायचं आहे. तुम्ही लवकरचाच मुहूर्त पहा."

हे ऐकून तर वीरभद्रला डोक्यावर वीजच कोसळल्यासारखे वाटले. तो म्हणाला–"काय म्हणालीस? त्या समोरच्या घरातल्या पोराशी लग्न करायचंय तुला? वेड तर नाही लागलं ना तुला? गावच्या सगळ्या लोकांना माहीत आहे की कित्येक दिवसांपासून त्याला अत्यन्त भयानक अशा रोगाने पछाडलं आहे!"

"ते मला पण माहीत आहे बाबा! पण लग्न करायचं ते मी याच मुलाशी करीन, कळलं?" असे म्हणून कोमली तेथून निघून गेली.

स्वप्न संपताच वीरभद्र भयाने कापत उठून बसला. आता तर त्याला असे वाटू लागले की एकाद्या दुःस्वप्नवाल्या भुतानेच आपल्या शरीराचा ताबा घेतला आहे. छे, छे! आता आणखी विलम्ब करण्यात काही अर्थ नाही.

सूर्योदय होताच वीरभक्त आपल्या आश्रमाकडे जायला निघाला. घराबाहेर निघताना त्याला रामेशच्या त्या ताम्रयंत्राची आठवण झाली. रामेशचे गाव गाजीपूर वरूनच त्याला आश्रमाकडे जावे लागे. म्हणून त्याने ते यन्त्रही बरोबर घेतले.



गाजीपूरला पोचल्यावर वीरभद्र रामेशच्या घरी गेला. रामेशच्या पत्नीने त्याचे स्वागत केले अन् बोलता बोलता तिने आपला पति घर सोडून पळून का गेला होता, याची कारणे सांगितली.

"आमचा मुलगा पंचवीस वर्षांचा झाला आहे; पण कुठे नोकरी करण्याऐवजी फक्त गावभर भटकत असतो. आता आमची मुलगी!–हुंडा वगैरे देऊन तिचं लग्न करून द्यायची आमची परिस्थिती नाही. समोरच्या घरात रहाणारा मुलगा हुंडा न घेता तिच्याशी लग्न करायला तयार आहे, पण तो कुरूप असल्याने आमच्या मुलीने त्याच्याशी लग्नाला नकार दिला आहे. राहता राहिली माझी गोष्ट–अलिकडे गेल्या दोन वर्षांपासून समोर भात दिसला की मला उलटया होऊ लागलात. माझ्या पतिला भीती पडली होती की मी पोटभर जेवले नाही तर फार दिवस जगू शकणार नाही. या सगळया समस्यांमुळे ते घाबरून गेले अन् घर सोडून जे गेले, ते पुन्हा जिवन्तपणी परत नाही येऊ शकले."

रामेशच्या पत्नीचे हे बोलणे ऐकून वीरभद्रला आपल्या दुःस्वप्नांचे खरे कारण कळून चुकले. रामेशच्या पारिवारिक अडचणी दूर करण्यासाठी योग्याने दिलेल्या बीजाक्षरवाल्या त्या ताम्रयन्त्रानेच आपल्याला आपला प्रभाव दाखवला!

वीरभद्रने रामेशच्या पत्नीला समजावले–"ताई, तुम्ही काळजी नका करू. तुमचा पति हिमालयात तपस्या करणाऱ्या एका योग्याकडून एक ताम्रयन्त्र मिळवून घेऊन आला होता." नंतर ते यन्त्र बैलगाडीतच कसे राहून गेले हे सांगून तो म्हणाला–"ताई, या यन्त्रात खरोखरच नक्कीच काही शक्ती आहे; हे ठेवून घ्या तुम्ही. ते आपल्या देवघरात ठेवा, म्हणजे तुमच्या सगळया अडचणी दूर होतील." असे म्हणून वीरभद्रने ते ताम्रयन्त्र तिच्या हातावर ठेवले अन् तो आपल्या गुरूच्या आश्रमाकडे चालू लागला.





आहे. त्याने सांगितले आहे की मी हे यन्त्र माझ्या देवघरात ठेवले तर माझ्या सर्व अडचणी दूर होतील. मी एक वर्षापूर्वी आपलं घर सोडून निघून गेलो होतो; आणि आता मन्त्रशक्ति असणारं हे यन्त्र मिळवून मोठ्या धैर्याने घरी जात आहे."

यानंतर ते दोघेही गाढ झोपून गेले.

"ओ महाराज, गाजीपुर आलं!" गाडीवानाने पुकारा केला आणि वीरभद्र दचकून उठून बसला. रामेशला उठवत तो म्हणाला–"रामेश, उठा, उठा. तुमच्या गावी पोचलो सुद्धा आपण."

पण रामेशने काहीच हालचाल केली नाही. यावर त्याला उठवण्यासाठी वीरभद्रने त्याला हलवण्यासाठी हात लावला, तो काय! त्याचे शरीर अगदी मेल्यासारखे थंड! वीरभद्र क्षणभर सुन्नच झाला. नंतर त्याच्या घराचा पत्ता लावून त्याने रामेशच्या बायकोला सर्व हकीकत सांगितली. वीरभद्र एक वर्षापूर्वी घरातून बाहेर पडला होता अन् आता त्याचे प्रेतच परत येत होते, हे पाहून त्याची बायको, मुलं वगैरे हंबरडा फोडून रडू लागली.

त्यांचे सान्त्वन वगैरे करून वीरभद्र आपल्या घरी पोचला तोपर्यंत सकाळ झाली होती. वीरभद्र गाडीतून उतरला तेव्हा ते ताम्रयन्त्र त्याच्या नजरेस पडले! पुन्हा संधी मिळेल तेव्हा रामेशच्या कुटुंबियांच्या हवाली करायचा विचार करून त्याने ते उचलून घरात नेले आणि आपल्या घरच्या देव्हाऱ्यात ते ठेवून दिले.

त्या रात्री वीरभद्रला नीटशी झोप आली नाही. त्याला वाईट स्वप्न पडत राहिली. स्वप्नात त्याला बालसखा कोदण्डपाणी दिसला. त्याने विचारले–"अरे वीरभद्र, तुझ्या मुलात अन् तुझ्यात अलिकडे काही भांडण-बिडण तर नाही झाले?"

"भांडण? नाही रे बाबा, असं तर काहीच नाही घडलं! पण तुझ्या मनात अशी शंका का बरं आली?" वीरभद्रने विचारले.



“तुझा मुलगा गावात सगळ्यांकडे जातो अन् नोकरी मागत असतो. गावातलं तुझं स्थान लक्षात घेऊन मी हे तुझ्या कानावर घालत आहे.” कोदण्डपाणीनं सांगितलं.

कोदण्डपाणी निघून गेल्यावर वीरभद्रला त्याचा मुलगा दिसला. त्याने रागाने ओरडून मुलाला विचारलं–“मी असं ऐकतोय की तू गावातल्या कोणाही सोम्या-गोम्याकडे जाऊन नोकरी देण्यासाठी विनवण्या करत असतोस? खरं आहे हे?”

“हो, हो! मला कोणती ना कोणती नोकरी तर मिळवायला हवी ना?” मुलानें गंभीर होत उत्तर दिले.

“अरे पण, तुझ्यावर असं काय संकट येऊन पडलंय? आपला व्यापार तर लाखोनें चालू आहे! आपला व्यापार सोडून असल्या कुठल्या सोम्या-गोम्याकडे नोकरी करणार तू? लाज नाही वाटत तुला!” वीरभद्रने त्याला दमात घेत विचारले.

“कोणीही असेल, मला काय त्याचं? मला तर नोकरीच हवी नोकरी!” असे म्हणून वीरभद्रचा मुलगा तेथून शीघ्रगतीने निघून गेला.

त्याच वेळी वीरभद्र जागा झाला. “आपल्याला आजपर्यंत कधीही अशी वाईट स्वप्नं पडली नव्हती; आजच काय झालं मला?” या विचाराने त्याला फार दुःख वाटले.

इतक्यात वीरभद्र जागा झाला अन् विचार करू लागला–“का अशी स्वप्नं पडत आहेत मला? काल मुलाची अन् आज बायकोची समस्या! मला वेड तर नाही ना लागत आहे? वेळ मिळाला की गुरुजींच्या आश्रमात जाऊन आलं पाहिजे मला!” असे विचार करत रात्रभर वीरभद्र जागाच राहिला.

पण दुःस्वप्नांची मालिका एवढ्यानेच संपली नाही. तिसऱ्या दिवशी रात्री स्वप्नात त्याची मुलगी कोमली त्याच्या







# दलाई लामाला शान्ति-पुरस्कार

दलाई लामाचा जन्म तिबेटच्या डोंगरी भागातील एका कोपऱ्यातल्या गावात झाला होता. तरीही तो तेथील जनतेच्या आध्यात्मिक राजनीतिचा नेता बनला. हाच ‘हिज होलिनेस तेनसिंग गियात्सो’ नावाने विख्यात असणारा चौदावा दलाई लामा होय.

तिबेट हा एक अत्यन्त विचित्र देश आहे. हिमालयाच्या उत्तरेला ४७०,०० मैलपर्यंत पसरलेल्या या देशाची लोकसंख्या पंधरा लाख आहे. तेथील सर्व लोक बौद्ध-धर्मीय आहेत.

तेथील जनतेची अशी समजूत आहे की, जेव्हा एकादा दलाई लामा मृत्यु पावतो, तेव्हा त्याचा आत्मा तावडतोब त्याच वेळी जन्मणाऱ्या एका बाळाच्या शरीरात प्रवेश करतो. दलाई लामाचा आत्मा ज्या बाळाच्या शरीरात शिरला असेल असे बाळ शोधून काढण्याकरता त्या संबंधीची सर्व लक्षणे माहीत असणारे लामा लोक महिनोन् महिने किंवा जरूर पडल्यास वर्षानुवर्षे ही फिरत रहातात. आजच्या दलाई लामालाही याच पद्धतीने शोधून काढले गेले आहे. बालरूपात असतानाच त्याने आपल्या अपूर्व अशा परिपक्व-तेची ओळख दिली. पूर्वी कधीही न पाहिलेल्या या लामा लोकांशी त्याने त्यांची नावे घेऊन बातचीत केली.

अर्थात् त्यांच्या जीवनातल्या या घटनेचा त्यांना मिळालेल्या शान्ति-पुरस्काराशी काही संबंध नाही.

तिबेटला अलिकडेच अनेक कठीण समस्यांना तोंड द्यावे लागले. अठराव्या शतकात चीनच्या मंचू राजांनी तिबेटवर कब्जा मिळवला, परन्तु मंचु वंशाचा अन्त झाल्यावर तिबेटच्या जनतेने चिनी सैनिकांना पळवून लावले आणि स्वतन्त्र देशाची घोषणा केली. तरीही १९५० मधे उत्तर तिबेट पुन्हा चीनने ताब्यात घेतलेच! १९५९ मधे तिबेटी जनतेने चीनविरुद्ध बंड केले, परन्तु चीनने अतिशय निर्दयतेने विद्रोही लोकांना दाबून टाकले आणि तिबेटच्या राजधानीत असलेले दलाई लामाचे भवन ध्वस्त केले. यानन्तर खूपशा संकटांना तोंड देत देत दलाई लामा भारतात येऊन पोचला! यानन्तर त्याच्या मागोमाग हजारो तिबेटवासी ‘प्रवासी’ म्हणून भारतात आले. ते सर्व दलाई लामाच्या नेतृत्वाखाली सध्या अत्यंत शिस्तबद्ध आणि आदरपूर्वक असे आपले जीवन व्यतीत करत आहेत. मोठ्या सहनशीलतेने दलाई लामाने आपल्या देशातील अडचणींचा साऱ्या जगाला परिचय करून दिला. या बाबतीत त्याने पराकाष्ठेचा संयम ही दाखवला. आपल्या प्रजेच्या दीनावस्थेबद्दल तो फार व्याकुळ असे, परंतु त्याने कधीही क्रोध

प्रकट केला नाही. तो स्वतःला सच्चा बौद्धधर्मी मानून शान्तिमार्गानेच आपले उद्दिष्ट साधण्याच्या निश्चयाने नेहमी कार्यरत असतो. सर्व जगाने त्याला एक 'शान्तिदूत' म्हणून ओळखले आणि यासाठीच त्याला नोबेल प्राईझ मिळाले आहे.

मार्च, १९८५ मध्ये 'दि हेरिटेज' बरोबर त्याची जी मुलाखत झाली, त्यावेळी त्याने म्हटले होते–"धर्माचे तात्पर्य केवळ त्या विषयाचे सम्यक् ज्ञान नव्हे, तो आचरणात आणणे



महत्वाचे आहे. ज्या प्रमाणे आहारामुळे आपली भूक भागते, त्याचप्रमाणे धर्म आपल्या अंतरंगातील तहान भागवतो. खाद्य-पदार्थ केवळ डब्यात बन्द करून ठेवल्याने त्यांचा काही उपयोग होत नाही, ते खाऊन पचवणे व नवीन शक्ति मिळविणे आवश्यक असते, त्याचप्रमाणे धर्माची उत्तम तत्त्वे समजून घेऊन आचरणात आणल्यावाचून त्यांचे प्रयोजन साध्य होणार नाही. आपल्या धर्माचे सत्य समजून घेणारा प्रत्येक माणूस दुसऱ्या धर्माची वैशिष्टये सहज ओळखू शकतो. या जगात भिन्न भिन्न मानसिक स्थिति असणारे, विभिन्न प्रकारचे लोक रहात असतात. त्यांना एकच एक धर्मप्रणाली संतुष्ट करू शकणार नाही. यासाठीच विभिन्न प्रकारचे धर्म-विश्वास आणि तात्विक सिद्धान्तांचा उगम झालेला आहे. म्हणूनच त्या सर्वांच्याच बाबतीत आदरभाव बाळगणे आवश्यक आहे."



## बेडकाचे अत्यंत भयंकर विष



दक्षिण आफ्रिकेतील कोकोय नावाचा बेडूक आपल्या तोंडाने अत्यंत प्राणघातक असे विष बाणासारखे बाहेर फेकतो. या विषाच्या १ ग्रॅमचा लाखावा भागही माणसाचा प्राण हरण करू शकतो.

असे मानले जात असे की आस्ट्रेलियाच्या उत्तर सीमेवर असणारा 'एअर्स रॉक' जगातील सर्वात मोठा खडक आहे. परंतु ही गोष्ट खरी नाही. ही ख्याति पश्चिम आस्ट्रेलियातील १२३७ फूट उंच अशा 'माउण्ट आगस्टस' ला मिळालेली आहे. वीस मैल लांब व दोन मैल रुन्द असा हा खडक सुप्रसिद्ध 'एअर रॉक' पेक्षा जवळजवळ दुपटीने मोठा आहे.

## अति-विशाल खडक

## दात

आफ्रिकेतील नर हत्तीचा डावा दात हा उजव्या दातापेक्षा लहान असतो. हा हत्ती आपल्या डाव्या दाताचा खोदण्यासाठी उपयोग करतो. त्यामुळेच झिजून तो उजव्या दातापेक्षा लहान होतो.






# फाळणी करणारी भिंत उध्वस्त !

चीनची भिंत सर्वांना माहीतच आहे. शत्रूच्या आक्रमणापासून चीनच्या सरहद्दीचे संरक्षण करण्यासाठी ही भिंत बांधण्यात आली होती. जगातील सात आश्चर्यांपैकी एक म्हणून ती सुप्रसिद्ध आहे.

नुकतीच म्हणजे सन १९६१ मध्ये आणखी एक भिंत बांधली गेली. पण ही भिंत बांधण्याचा उद्देश चीनच्या भिंतीहून भिन्न होता. आपल्या देशातील लोकांनी शेजारच्या देशात पळून जाऊ नये म्हणून राज्यकर्त्यांनी ही भिंत निर्मिली.

कोणत्या विशेष परिस्थितीत ही घटना घडली ते जाणण्यासाठी दुसऱ्या विश्व महायुद्धाच्या इतिहासाची पानें उलटावी लागतील. जर्मनीचा हुकुमशहा हिटलर याने जगावर प्रभुत्व स्थापण्याचा संकल्प केला होता, पण सन १९४५ मध्ये तो हारला. त्यावेळी त्याच्या राजधानीची बर्लिनची फाळणी करण्यात आली. बर्लिनचा पश्चिम भाग ब्रिटन, अमेरिका व फ्रान्स या देशांच्या ताब्यात आला. आणि पूर्वेकडील भाग सोविएट रशियाच्या अमलाखाली आला. हिटलर नि त्याच्या हस्तकांना पराभूत करण्याचे काम या चार प्रमुख राष्ट्रांनी केले होते.

१९५५ मध्ये बर्लिनचे हे दोन भाग स्वतंत्र देश बनले. पूर्व जर्मनीला 'जर्मन डेमोक्रॅटिक रिपब्लिक' व पश्चिम जर्मनीला 'जर्मन फेडरल रिपब्लिक' संबोधण्यात आले. दोन्ही देशांनी निरनिराळी राजनैतिक तत्त्वे स्वीकारली. नावात 'लोकशाही' (डेमोक्रॅटिक) शब्द असला तरी पूर्व जर्मनी साम्यवादी देश बनला. आणि पश्चिम जर्मनीची लोकशाहीच्या मार्गाने वाटचाल सुरू झाली. अनेक कारणांनी पूर्व जर्मनी पेक्षा पश्चिम जर्मनीने निरनिराळ्या क्षेत्रात नेत्रदीपक प्रगति केली. पण सर्वांत महत्त्वाचे म्हणजे पश्चिम जर्मनीच्या नागरिकांना विचार-स्वातंत्र्य होते. पूर्व जर्मनीतील लोकांना मत-स्वातंत्र्याचा अधिकार नव्हता.

हळू हळू पूर्व बर्लिनमधील काही लोक पश्चिम बर्लिन मध्ये प्रवासी बनून येऊ लागले. काही लोक आपल्या नातेवाईक व मित्रांना भेटण्याच्या निमित्ताने नियमितपणे येऊ लागले. पण पूर्व जर्मनीच्या सरकारने याला मनाई केली.

ही ये-जा थांबविण्यासाठी सीमेवर एक उंच भिंत उभारण्यात आली. ही भिंत ओलांडून कोणी पळून जाण्याचा प्रयत्न

केला तर पूर्व जर्मनीचे पोलिस त्याला बंदुकीच्या गोळीने ठार करत. यामुळे सामान्य जनतेच्या मनात या भितीबद्दल एक प्रकारची घृणा निर्माण झाली, आणि सर्वांनी आपला असंतोष व्यक्त केला. पूर्व जर्मनीच्या जनतेत स्वातंत्र्याची प्रबळ इच्छा निर्माण झाली. हळू हळू जनतेला असे वाटू लागले की नेहमीच एका पार्टीचे राज्य चालू रहाण्यापेक्षा आपल्याला पाहिजे त्या पार्टीची निवड करण्याचा अधिकार आपणास मिळावा.

शेवटी नुकताच पूर्व जर्मनीच्या सरकारने निर्णय घेतला की बर्लिनची फाळणी करणाऱ्या भितीचे दरवाजे उघडून टाकावेत! हा निर्णय जाणून हजारो नागरिक आनन्द व उत्साहातिरेकाने नाचू लागले. पश्चिम बर्लिन मधील नागरिकांना ही फार संतोष वाटला. या आनंदाच्या भरात काही लोकांनी या भितीच्या काही भागांचा विध्वंस केला!

बर्लिनच्या भितीचा विध्वंस मानवमात्राच्या ठिकाणी असणाऱ्या स्वयंनिर्णयाच्या इच्छेचा द्योतक होय असे समजायला हरकत नाही.






# कोळ्याचे मनोरथ

गौरीपुर गावाजवळ एक नाला वहात होता. त्याच्या किनाऱ्या वर लक्ष्मण नांवाचा एक कोळी झोपडी बांधून रहात असे. घरात बायको होती नि दोन मुलं. झोपडी समोरचा नाला थोडा खोल होता. पाण्याची गति ही संथ असे. त्यामुळे त्याला जाळ्यात पुष्कळ मासे मिळत. लक्ष्मण ही मासळी घेऊन शेजारच्या शहरात जाऊन विकी आणि मिळणाऱ्या पैशातून आपल्या छोट्या कुटुंबाचा निर्वाह करी.

एक दिवशी दोन शिपाई कोळ्याकडे येऊन म्हणाले–"हे बघ, महाराज चन्द्रसेन जनतेची दुःखे जाणून घेण्यासाठी देश भर दौरा करीत लवकरच इथं येणार आहेत. त्यांच्या मुक्कामासाठी ही जागा फार छान आहे, म्हणून तू ही जागा सोडून कोठे तरी दुसरीकडे जा."

नाइलाजाने कोळ्याला ती जागा सोडून थोड्या दूर अंतरावर जावे लागले. पण नाला तिथे उथळ होता आणि पाण्याचा प्रवाह अमळ जोरदार होता. त्यामुळे त्याच्या जाळ्यात फारच कमी मासळी मिळू लागली. मिळणारे मासे विकून जे पैसे हाती येत, तेवढ्यात आपल्या कुटुंबाचे पालनपोषण करणे त्याला जिकीरीचे झाले.

अनेक महिने गेले, पण कोळ्याने जी जागा सोडली तेथे पडाव टाकण्यासाठी महाराजा कधी आलेच नाहीत. म्हणून आपण पुन्हा तेथे रहायला जावे अशी इच्छा कोळ्याच्या मनात निर्माण झाली.

कोळी एकदा नाल्या जवळ मुक्काम ठोकलेल्या त्या शिपायांकडे गेला आणि आपल्या अडचणी सांगून त्यांना विचारलं–"महाराज आता पर्यंत येऊन गेले असते

वसंत कऱ्हाडकर



तर बरं झालं असतं. आता तरी केव्हां येणार आहेत ते सांगाल का ?"

शिपायांनी थोड्या रागाने उत्तर दिलं– "महाराज इथे केव्हां येणार आहेत हे केवळ महाराज नि महाराणी हे दोघेच जाणतात. महाराज इथे येऊन गेल्याशिवाय तुला इथं मुक्काम हलवता येणार नाही हे निश्चित ! तो पर्यंत तू इकडे चुकून सुद्धा फिरकू नकोस, समजलं ? जा आता."

आणखी एक आठवडा गेला. कोळ्याला आपला घर-खर्च भागवणं आणखी कठीण होऊन बसलं. आता त्याला या सर्व अडचणी सहन करणं अशक्य झालं. म्हणून थेट महाराजांकडे जाऊन त्यांच्याशीच बोलायचा त्याने निश्चय केला नि तो राजधानीच्या शहरात पोचला.

पण राजवाड्यावरील पहारेकऱ्यांनी कोळ्याला अडवलं आणि म्हणाले–"राजाला भेटणं काय सहज शक्य आहे का कोणाला ? तुझी इच्छा असेल तर बाजूला थांब थोडा. एक तासा भरात महामंत्री या बाजूला येतील. तुला जी काही तक्रार करायचीय, त्यांना सगळं सांग."

कोळ्याने स्वच्छ सांगितलं–"मला महामंत्र्यांना काही सांगायचं नाहीय ! मला तर महाराजांनाच भेटायचंय."

पहारेकऱ्यांना वाटलं की हा कोणी तरी भोळा खेडूत आहे. ते म्हणाले– "ऐक, महाराज आता राजवाड्यात नाहीत. उद्या ये."

"तर मग माझ्या गावाच्या नाल्याजवळ त्यांचा मुक्काम पडला असेल !" आनंदाने कोळ्याने तर्क केला.

पहारेकरी त्याला धमकावीत म्हणाले– "कुठलं गाव नि कुठला नाला ? चल जातोस की नाही इथून !"

राजवाड्याच्या गच्ची वरून राजाने हे सर्व बोलणं ऐकलं. आणि एका शिपाया करवी कोळ्याला बोलवून घेतलं.

शिपाई कोळ्याला राजाकडे घेऊन आला. तेव्हां महाराणी पण तिथंच होती.



कोळ्याने राजाला नम्रपणे नमस्कार केला आणि विचारले–"महाराज, माझ्या गावा जवळील नाल्याच्या किनाऱ्यावर आपला पडाव केव्हा पडणार आहे हे मला सांगाल ?"

आश्चर्याने राजाने विचारले–"तू कोण आहेस ? तुझ्या गावाचं नाव काय ? कुठल्या नाल्याबद्दल तू बोलत आहेस ?"

कोळ्याने आपलं नाव-गाव सांगितलं. काही महिन्यांपूर्वी शिपायांनी येऊन नाल्या-जवळची जागा त्याला कशी सोडायला लावली ती सर्व कथा राजाला सांगून तो म्हणाला–"महाराज, मी हल्ली जिथं रहातो, तो नाल्याचा भाग मासे पकडायला योग्य नाही. आपण माझ्या गावी येऊन नाल्याच्या किनारी लवकर पडाव टाकून जा. आपला मुक्काम संपला की मी पुन्हा आपल्या जागी येऊन राहीन. अन्यथा माझ्या कुटुंबाला भुकेने मरावे लागेल. आपण कृपया माझा मनोरथ पूर्ण करावा."

कोळ्याचा प्रस्ताव ऐकून राजा मंदस्मित करीत राणीला म्हणाला–"ऐकलंस ना ? माझ्या देशाटनामुळे काही लोकांचा जसा फायदा होतो, तसं काही लोकांचं नुकसान ही कसं होतं ते !"

राणीने विचारलं–"मग या कोळ्याला आपण काही नुकसान-भरपाई देणार की काय ?"

"तसं काही नाही. पण हा भोळा कोळी सरळ मला भेटायला आला. त्याच्या हिमतीचं मला मोठं कौतुक वाटतं. म्हणून मी त्याला काही बक्षिस देऊ इच्छितो." असं म्हणून राजाने कोषाध्यक्षाला बोलावलं आणि कोळ्याला शंभर मुद्रा देवविल्या.

राजा कोळ्याला म्हणाला–"मी तुझ्या बरोबर एक शिपाई पाठवतो. तुझ्या गावात रहाणारे दोन शिपाई तुला आपल्या पहिल्या जागी रहायला अडथळा आणणार नाहीत. तू जा, नि आपली बायको व मुलांसह सुखाने तुझ्या मूळच्या सोयीस्कर ठिकाणी रहा. मी तुला आशीर्वाद देतो."

आता कोळी मोठ्या आनंदाने आपल्या घरी जायला निघाला.





# संन्याशाचा शाप

फार वर्षा पूर्वीची गोष्ट आहे. कमलपुर गावात वीरेन्द्र नावाचा एक तरुण रहात असे. तो मोठा बलशाली आणि सुंदर होता. पण होता फार गरीब! तो रोज जंगलात जाऊन लाकडे तोडी नि ती विकून आपला निर्वाह कसा-बसा करी.

एक दिवशी तो जंगलात एका झाडावर चढून लाकडे तोडत होता, झाडाची एक फांदी खालून जाणाऱ्या एका संन्याशाच्या डोक्यावर पडली. संन्याशाला भयंकर राग आला, त्याने शाप दिला–"तू याच क्षणी राक्षस बनशील आणि या जंगलात भटकत राहशील!"

त्याच क्षणी वीरेन्द्राला एका राक्षसाचं रूप मिळालं. त्याने दयेची भीक मागितली.

संन्याशाने सांगितले–"जो पर्यंत एकादी मुलगी स्वेच्छेने तुझ्याशी लग्न करायला तयार होत नाही, तो पर्यंत तू असाच राक्षसाच्या रूपात भटकत राहणार!"

राक्षसाच्या रूपात वीरेन्द्र जंगलात नि आसपासच्या डोंगराळ मुलुखात हिंडत राहिला आणि संन्याशाने सांगितलेल्या उपायानुसार योग्य संधीची वाट पहात राहिला.

एके दिवशी एका जमीनदाराची मुलगी सुगुण-सुंदरी पालखीत बसून जंगलातील रस्त्याने आपल्या आजोळी चालली होती. मागे तिचे काही नोकर पण होते. एकाएकी काही डाकूंनी येऊन त्यांना घेरले. सुगुण-सुंदरीचे संरक्षण करण्यासाठी बरोबरच्या नोकरांनी डाकूंशी सामना केला. पण डाकूंची संख्या अधिक असल्यामुळे सर्व नोकरांनी मार खाऊन पळ काढला.

डाकूंचा पुढारी सुगुण सुंदरीच्या लावण्यावर मोहित झाला आणि तिच्याशी लग्न करण्याच्या इराद्याने डोंगरातील आपल्या घरी तिला घेऊन गेला. वीरेन्द्र अडोशाला उभा राहून हे सर्व पहात होता. त्याने डाकूंच्या पुढाऱ्याचा पाठलाग केला आणि गुप्तपणे त्याच्या घरात जाऊन लपून बसला. डाकूंच्या पुढाऱ्याने सुगुण सुंदरी बद्दल जाणण्यासाठी काही प्रश्न विचारले आणि म्हणाला–"माझी तुझ्याशी लग्न करायची इच्छा आहे. श्रीमंतीच्या बाबतीत मी तुझ्या वडिलांपेक्षा कमी नाही. पाहिजे तर शेजारच्या खोलीत जाऊन बघ. तिथं जेवढी सोनं-चांदी आहे, तेवढी कदाचित् राजाच्या खजिन्यात ही नसेल!"

"तुझ्या जवळ किती ही संपत्ति असली, तरी शेवटी तू आहेस एक डाकू! आताच्या आता चालू लाग इथून!" धमकावत सुगुण सुंदरी म्हणाली.

वीरेन्द्र घरातून बाहेर पडला. त्याने विचार केला आज नाही तर आणखी काही दिवसांनी सुगुण सुंदरीचा विचार बदलेल आणि ती लग्नाला तयार होईल.

याच वेळी वीरेन्द्राने तेथे प्रवेश केला. त्याला पाहताच सुगुण सुंदरी खूप घाबरून गेली. तो तिला म्हणाला–"मुली, मी एक राक्षस आहे, म्हणून तू भिऊ नकोस. मी तुला या डाकूंच्या तावडीतून मुक्त करून



सुरक्षितपणे तुझ्या वडिलांकडे पोचवीन. तू माझ्या बरोबर चल."

हे सगळं ऐकून सुगुण सुंदरीला मोठं आश्चर्य वाटलं. तिने विचारले–"तु माझ्या बद्दल इतकं सगळं कसं जाणतोस?"

"मला केवळ तुझीच नाहीं, तर तुझ्या वडिलांची ही माहिती आहे. आता ते संगळं सांगत बसायला नको. तू अगोदर बाहेर पड." असं म्हणून वीरेन्द्र पुढे पुढे चालू लागला.

ते दोघे जण जंगलात थोडे अंतर चालून गेले, एवढ्यात डाकूंचा पुढारी आपल्या साथीदारांसह तेथे आला आणि त्यांना थांबवून सुगुण सुंदरीला म्हणाला–"हा

रवि भागवत

राक्षस तुझं संरक्षण करणार होय? हा तर अगदीच भित्रा आहे. आज पर्यंत एकाद्या माणसाला मारून खाताना मी याला कधी पाहिलं नाही! हा खातो–कंद, मुळं आणि फळं!" असं म्हणून त्याने वीरेन्द्र वर तलवार उगारली.

वीरेन्द्रने डाकूंच्या पुढाऱ्यावर झडप घातली आणि त्याच्या हातातील तलवार हिसकाऊन घेऊन तीच त्याच्या छातीत खुपसली. मग तो त्याच्या साथीदारां वर तुटून पडला. आपला जीव वाचवण्यासाठी सर्व जण तेथून पळून गेले.

हा सर्व प्रकार पाहून सुगुण सुंदरीला खूपच आश्चर्य वाटलं. ती वीरेन्द्राला म्हणाली–"तू राक्षस आहेस. तुला पाहून तर डाकूंच्या पुढाऱ्याने पळून जायला हवं होतं!- उलट त्याने तुझा अपमान केला आणि तुझ्यावरच तलवारीचा वार करायचा प्रयत्न केला, याचं मला मोठं आश्चर्य वाटतं. तुझं काही तरी रहस्य त्याला माहीत असावं असं वाटतं."

"शक्य आहे की माझं रहस्य त्याला ठाऊक असावं!" मान खाली घालून वीरेन्द्र दुःखाने म्हणाला.

यावर सुगुण सुंदरी म्हणाली–"तुझ्यात जी दया-भावना आहे, ती माणसात फार कमी दिसून येते. जर तुझी काही हरकत नसेल तर मला तुझ्याशी लग्न करावंस वाटतं!"

आणि दुसऱ्याच क्षणी वीरेन्द्राचं राक्षस रूप नष्ट होऊ लागलं आणि तो पहिल्या सारखा मानव झाला.

सुगुण सुंदरीला थोडा वेळ मोठं आश्चर्य वाटलं. ती म्हणाली–"हा काय चमत्कार आहे? म्हणजे तू खरोखर राक्षस नाहीस तर!"

वीरेन्द्रने सुगुण सुंदरीला सर्व हकिगत सांगितली आणि तो तिला आपल्या वडिलांच्या घरी घेऊन गेला. जमीनदाराला आपल्या मुलीकडून सर्व वृत्त समजलं. त्याला फारच आनन्द झाला आणि त्याने सुगुण सुंदरीशी वीरेन्द्राचा विवाह मोठ्या थाटामाटाने साजरा केला.





# डाकू युवराज

## [५]

[वीरसिंहाने सुमेध राजपरिवाराचा शेवट करून राज्याधिकार हस्तगत करण्याचा कट रचला. राजा शान्तिदेवच्या आज्ञेवरून आपल्या दोन वर्षांच्या बाळासह राणी भुयारी मार्गाने जंगलात पोचली व युवराजाला तिने स्वामी जयानन्दच्या स्वाधीन केले. इतके करून झाल्यावर राणीने प्राण सोडला. इकडे मोठ्या शौर्याने शत्रुला तोंड देत देत राजाने नदीत उडी मारली. पुढे वाचा-]

राजवाड्यात चाललेल्या धुमश्चक्रीची, बाहेर एकत्र झालेल्या प्रजेला काहीच कल्पना नव्हती. काही लोक युवराजाच्या वाढदिवसानिमित्त करण्यात येणाऱ्या दारू-कामाची मजा लुटण्यात दंग होते, तर काही इतर करमणुकीचे कार्यक्रम पहाण्यात मग्न होते! आणखी काही लोक रोषणाई पहात होते, तर काही गर्दीची मजा पहात नुसतेच इकडे-तिकडे हिंडत होते.

अशातच रात्रीचा तिसरा प्रहर संपून गेला. चौथ्या प्रहरापर्यंत एक एक कार्यक्रम संपत गेला आणि तेथील कोलाहल हळूहळू शान्त होत राहिला. दारूकामाच्या जळलेल्या साहित्याचे तुकडे इतस्ततः विखुरलेले दिसत होते. नर्तक-नर्तकी आपापली वेषभूषा उतरवू लागले आणि नागरिक हळूहळू आपापल्या निवासस्थानी परतू लागले.



राजवाड्याच्या अधिकाऱ्याने तेथील सर्व नोकरांना एकत्र जमण्याची आज्ञा दिली. एका उंचशा मंचावर उभा राहून तो बोलू लागला–" ऐका, आपल्या राज्यात अधिकार आता राजा शान्तिदेवच्या हाती राहिलेला नाही. सर्वाधिकार सेनापति वीरसिंह यांच्या हाती आलेले आहेत. असे का घडले याचे कारण शोधण्याच्या प्रयत्नात कोणीही पडू नये. ही गोष्ट केवळ भूतपूर्व राजा आणि आजचा राजा यांच्या आपसातील संबंधातच मर्यादित राहील, तेव्हा याबाबत तुम्ही कोणीही, कोणत्याही प्रकारची चर्चा करण्याचे कारण नाही. ही राजाज्ञा आहे. तिचे उल्लंघन न करता आता तुम्ही सर्वांनी आपापल्या कामाला लागावे."

सर्व सेवक आपापल्या कामाला लागण्यासाठी मुकाट्याने माना खाली घालून निघून गेले. दवंडी देणाऱ्या शिपायांना संरक्षण देण्यासाठी त्यांच्या दोन्ही बाजूंना सशस्त्र सैनिक चालू लागले. ते सैनिक जनतेला धमकी देत होते की अधिकार-परिवर्तनाबाबत कोणी चकार शब्द काढला तरीं त्याचे डोके उडवले जाईल. ही दवंडी ऐकून प्रजा आश्चर्य-चकित झाली. एका चौकाजवळ ही दवंडी ऐकून एक म्हातारा दुःखाने उद्गारला– "अरेरे! म्हातारपणी काय ही अमंगळ बातमी मला ऐकावी लागत आहे!"

दुसऱ्याच क्षणी दोन सैनिक म्हाताऱ्यावर तुटून पडले व त्याला कैद करून घेऊन गेले.

नगराच्या मध्यावर असंख्य लोक दवंडी ऐकायला जमा झाले होते. दवंडी ऐकून त्यांना तर आपल्यावर वीजच कोसळल्या-सारखे वाटले! कोणी काहीच बोलू शकेना. तरीही त्यांच्यातील एक युवक पुढे येऊन विचारू लागला–" का बरं? आमच्या महाराजांनी स्वतःच्या इच्छेनेच ही व्यवस्था केली आहे? सध्या महाराज, राणीसाहेब व युवराज कोठे आहेत?"



"त्याच्याशी तुला काय करायचंय?" दवंडी देणाराने उलट प्रश्न विचारला.

" राजा शान्तिदेवच्या शासनात आम्हाला कोणत्याही प्रकारचा अभाव कधी जाणवला नाही. आम्ही सर्व शांतिपूर्वक सुखा-समाधानाने नांदत आहोत. हा प्रश्न आमच्या प्रिय महाराजांशी निगडित आहे, म्हणूनच आम्हा प्रजाजनांनाही तो तितकाच महत्त्वाचा वाटतो; अन् म्हणूनच प्रश्न विचारण्याचं धाडस मी करत आहे." तरुण उत्तरला.

" तर मग, चल आमच्या बरोबर म्हणजे नीट उत्तर मिळेल तुला!" सैनिक म्हणाला.

"मला तुझ्याबरोबर जायची काय जरूर? कालपर्यंत तर आमचे महाराज चांगले स्वस्थ व आनन्दात होते. असं असताना एकाएकी राज्य त्याग करण्याची त्यांना का आवश्यकता वाटली; ही गोष्ट आम्हाला कळायलाच हवी." तरुण पुन्हा म्हणाला.

यावर काहीही उत्तर न देता त्या सैनिकाने हाताने काही इशारा केला अन् दुसऱ्याच क्षणी चार सेवक पुढे होऊन त्याला पकडून, खेचून घेऊन गेले. तरुणाने त्यांच्या हातून सुटण्यासाठी खूप धडपड केली, पण काहीही उपयोग झाला नाही त्याचा!



हा प्रकार पाहून जनतेने ओळखले, की नक्कीच कोणा दुष्ट व्यक्तीने सिंहासन बळकावले असले पाहिजे. राजा व त्याचे कुटुंबीय कोणत्या अवस्थेत असतील याबद्दल त्यांना काळजी लागून राहिली. पण याबद्दल काही जाणून घ्यायचा प्रयत्न करणाराला नाना प्रकारच्या यातना दिल्या जात होत्या, म्हणून नगरावर अमंगल शान्ति व दुःखाचे ढग गोळा झाले होते!

शान्तिपुरात झालेल्या बंडाची बातमी राणीच्या पित्याच्या अमृतपुरी राज्यात पोचली. सुमेध राज्याच्या मानाने अमृत-पुरीचे सैन्यबळ अगदीच नगण्य होते; यामुळे राणीचा पिता काय करावे या चिन्तेत पडला.



दुसऱ्याच दिवशी राजपुरोहिताला बोलावून वीरसिंहाने स्वतः राज्याभिषेक करवून घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. राजपुरोहित यावर म्हणाला–"आपल्या रूढीनुसार राजाचा मृत्यु झाला किंवा त्याने निवृत्त होण्याच्या विचाराने राज्यत्याग केला तरच नवीन राजाला राज्याभिषेक केला जातो. शिवाय हा राज्याभिषेक स्वतः राजा किंवा राजपरिवारातील व्यक्तींच्या मर्जीनुसार करावयास हवा. अशा परिस्थितीत महाराज शान्तिदेव यांच्या अनुज्ञेवाचून आपल्याला राज्याभिषेक कसा बरे करावा ?"

पुरोहिताचे बोलणे ऐकून वीरसिंह फारच रागावला. त्याने तीक्ष्ण दृष्टीने पुरोहिताकडे पाहिले आणि दुसऱ्याच क्षणी शिपाई त्याला कैद करून तुरुंगात डांबण्यासाठी तेथून घेऊन गेले.

तत्काल आणखी एका पुरोहिताला आणून राज्याभिषेक विधि घाईगडबडीने उरकण्यात आला.

राजा शान्तिदेवचे आप्त-मित्र आणि विश्वासपात्र व्यक्तींना त्यांच्या पदावरून हटवून त्या स्थानी वीरसिंहाच्या विश्वासातील लोकांची नियुक्ती केली गेली.

नंतर राजदरबार बोलावला गेला आणि पहिल्याच दिवशी दरबारात वीरसिंह वृद्ध मन्त्र्याला म्हणाला–"मन्त्रीमहाराज, तुम्हाला माहीतच आहे की राज्य हे वीरभोज्य असते. परन्तु गेल्या अनेक वर्षात शान्तिपुर राज्याने कधी विजययात्रा केली नाही. आपले सैनिक यामुळे सुस्तावत चालले आहेत. आसपासची राज्ये जिंकून तो संतोष न मिळवणारा राजा हा 'राजा' म्हणवून घेण्यास लायक नसतो! तेव्हा आता असं सांगा की पहिल्या प्रथम आपण कोणत्या राज्यावर हल्ला करणे उचित होईल ?" आपल्या मिश्यांवर ताव देत देतच वीरसिंहाने हा प्रश्न मन्त्र्याला विचारला.

हळूच श्वास ओढत, जरासे खोकत मन्त्री म्हणाला–" सेनापति !...एक गोष्ट..."



पण त्याला पुढे बोलू न देता, मधेच थांबवत वीरसिंह म्हणाला–"मला 'सेनापती' म्हणून संबोधायची हिम्मत कशी झाली तुम्हाला? हां, कालपर्यंत मी जरूर सेनापति होतो, पण आजपासून या समृद्ध अशा शान्तिपुरचा विजयी राजा आहे मी! तेव्हा आजपासून मला 'सेनापति' न म्हणण्यातच तुमचं हित आहे." असे बोलून त्याने आपला मुकुट ठीकठाक केला.

"जशी आज्ञा! पण प्रथम शेजारच्या राज्यांवर हल्ला करण्यापूर्वी आपल्या राज्याच्या सुख-समृद्धीसाठी प्रयत्न करणे हे राज्यकर्त्याचं पहिलं कर्तव्य होय; असं मला वाटतं." मन्त्री म्हणाला.

"तुमचा विचार काहीही असो, पण शेवटचा निर्णय तर माझाच असेल न! तुम्हाला एक गोष्ट लक्षात ठेवणं अत्यन्त आवश्यक आहे की अजूनही तुम्ही मला 'महाराज' म्हणून संबोधित करत नाही आहात!" वीरसिंह चिडून म्हणाला.

"मी आता म्हातारा झालो आहे. आपल्या जुन्या सवयी बदलणं इतकं सोपं नाही. आपण परवानगी दिलीत तर मी आपल्या मन्त्रीपदावरून मुक्त होऊन आराम करू म्हणतो." मन्त्री म्हणाला.

"मन्त्री-पदावरूनच कशाला, मनात आणलं तर आयुष्यातून सुद्धा मुक्त करू शकतो मी महामन्त्री तुम्हाला! नीट लक्षात ठेवा, कळलं?" वीरसिंह गरजून बोलला.

मन्त्र्याने यावर कोणताही प्रतिवाद न करता आपल्या हातांची अशी काही हालचाल केली की त्यांतून प्रेरित होत होतं – 'तुम्हाला हवं ते करा नं!'

"बरंय, याच क्षणी मी तुला मन्त्री-पदावरून मुक्त करत आहे थेरड्या!" वीरसिंह म्हणाला.

मन्त्र्याने हात जोडून एकदा सभेला प्रणाम केला, आणि तो मुकाट्याने तेथून बाहेर निघून गेला. त्याला जाताना पाहून वीरसिंह कुत्सितपणे हसला अन् त्यावर त्याचे सर्व अनुयायी असे खो-खो हसले की त्यामुळे सारे सभागृहच दणाणून गेले.

त्याच दिवशी संध्याकाळी रोजच्या प्रमाणे वृद्ध मन्त्री नगरसीमेवरील शिवालयातून देवदर्शन करून परत येत होता. नुकताच सूर्यास्त होऊन गेला होता आणि चारी बाजूंना अंधाराचे साम्राज्य पसरत होते. दोन्ही बाजूंना हारीने उभ्या असलेल्या रस्त्याने मन्त्री चालत होता. इतक्यात एका झाडाच्या मागून तीन शिपाई उड्या मारून त्याच्यासमोर आले. एकाने मन्त्र्याचे हात धरले, दुसऱ्याने त्याच्या तोंडावर हात दाबून धरला; त्याला ओरडताही येईना. तिसरा या दोघांना मदत करत रस्ता दाखवू लागला.

त्यांच्या पकडीतून सुटण्याइतकी ताकद वृद्ध मन्त्र्याच्या शरीरात नव्हती! देवावर भरंवसा ठेवून तो मुकाट्याने ते नेतील तिकडे जात राहिला. तिसऱ्या शिपायाची तलवार अचानक चमकून उठली. मन्त्र्याच्या मानेवर तो वार करणार, इतक्यात त्याच क्षणी त्याच्या हातातली तलवार झटक्याने उडून दूरवर एका दगडावर आपटून तिचा खणकन् आवाज झाला! वेदनेनं ओरडून त्याने मागे वळून पाहिले! अचानक काय काय घडलं हे पहाण्यासाठी बाकी दोन्ही शिपाईही मन्त्र्याला सोडून इकडे-तिकडे पाहू लागले, पण त्यांना जराही सन्धी न मिळता एका मागून एक अशी तिघांचीही डोकी उडवली गेली!

आकाशातून वज्र कोसळावे अशा रीतीने तीनही शिपायांचा वध करणारा वीर मन्त्र्याला म्हणाला–"उद्या सकाळपर्यंत या तीन शिपायांचा कुणाला पत्ताही लागणार नाही. आज रात्रीच हे राज्य सोडून तुम्ही अमृतपुरीला निघून जा."

"आपण....." असे म्हणून आणखी काही बोलणाऱ्या वृद्ध मन्त्र्याला मधेच थांबवत तो वीर म्हणाला–"आता काहीच बोलू नका."

मन्त्र्याला सूचना देऊन दुसऱ्याच क्षणी वीर अंधारात गडप झाला.





# शेजारी

भूषण तसा चांगला श्रीमन्त; पण एक नंबरचा कंजूस! एकाद्या धार्मिक कामासाठी गावातले लोक वर्गणी मागायला आले, की तो सरळ उत्तर देई–"धार्मिक काम म्हणून जर मी अशी वर्गणी वगैरे देऊ लागलो, तर दिवाळंच निघेल की माझं! शाळा, देऊळ, भजन-पूजन, उत्सव–असली नावं घेऊन मला छळू नका बुवा!"

आपल्या नवऱ्याची वागणूक न आवडणारी भूषणची बायको त्याचं मन बरोबर ओळखून होती; म्हणूनच हे सर्व समोर घडत असूनही ती गप्प बसे.

भूषणच्या घराजवळच रामराव नावाचा शेतकरी रहात असे. त्याने कुठूनसे एक खास जातीच्या आंब्याचे कलम आणून आपल्या परसदारी लावले होते. हळूहळू वाढत जाऊन आता त्या कलमाला फळे धरू लागली होती. त्या फळांबाबत गावचे लोकही निरनिराळी चर्चा करू लागले होते.

डोळ्यांचे पारणे फेडणारी ती देखणी फळे पाहून भूषणच्या तोंडाला पाणी सुटे! कधी ना कधी रामराव आपल्याला थोडी फळे देईल अशा आशेने तो वाट पाहू लागला. पण रामरावने भूषणलाच काय, पण गावातल्या कोणालाच आंबे दिले नाहीत!

एके दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास भूषणचा तेरा वर्षांचा मुलगा गुरुनाथ आपल्या घराची मागची भिंत ओलांडून रामरावच्या परसात गेला आणि थोडे आंबे तोडून घेऊन परत आला. त्याचे हे कृत्य त्याच्या आईने–लक्ष्मीने–पाहिले.

गुरुनाथला पकडून ती त्याला रागाने म्हणाली–"काय रे, अशी चोरी करतोस काय? लाज नाही वाटत?"

यशोधन जोशी

यावर मुलगा म्हणाला–"अग आई, हे मी यात काय वाईट केलं? इतकी सुन्दर फळं आसपास कुठेच मिळत नाहीत. रामरावाला आपल्याला एकही फळ कधी द्यावंसं वाटलं नाही. काय कंजूस आहे बेटा! ही फळं खायला आपले बाबासुद्धा किती आसुसले आहेत! त्यांच्यासाठीच आणले मी हे आंबे पळवून!"

शेजारच्या खोलीत बसलेला भूषण आपल्या लेकाचे हे बोलणे ऐकत होता. तो मनोमन फारच खुश झाला आपल्या मुलावर! पण लक्ष्मी मात्र आणखीच रागावून गुरुनाथला म्हणाली–"अरे वा! म्हणजे तुला वाटतं की रामराव आपल्या आंब्यापैकी योग्य हिस्सा इतर कुणालाच देत नाही? मलाही दिसतंच असतं की तुझे बाबाही कसे लालूच भरल्या डोळ्यांनी त्या आंब्याकडे पहात असतात! तुला असंच वाटतं ना, की जी वस्तु आपल्याकडे खूप असते, तिचा काही भाग दुसऱ्यांना न वाटणं म्हणजे स्वार्थीपणा अन् कंजूसपणा आहे?"

"तुलाही हे सारं कळतं ना? मग माझ्यावर कशाला रागावतेस?" गुरुनाथने आईला विचारले.

"का ते माहीत आहे तुला? रामरावबद्दल मात्र तू टीका केलीस; पण तुझ्या बाबांचं काय? आपल्या गावात एकादी चांगलीशी शाळा किंवा धर्मशाळाही नाही. आपण गरीब तर नाही आहोत ना? चांगले पैसेवालेच आहोत. तरी काय तुझे बाबा



असल्या कामांसाठी कधी वर्गणी देऊन मदत करतात?" लक्ष्मीने लेकाला विचारले.

गुरुनाथ यावर काही म्हणणार, इतक्यात भूषणच आपल्या खोलीबाहेर येऊन म्हणाला—"अग, पोर आहे ते! लहान अजून! नवीन प्रकारचे आंबे दिसले म्हणून आणले तोडून चार त्याने! उगीच चोरी-बिरी म्हणून आरोप नको करू त्याच्यावर!"

लक्ष्मी यावर कुत्सितपणे हसत म्हणाली—"कोणाची वस्तु किंवा संपत्ति मिळावी म्हणून पळवून आणणं, म्हणजे चोरी नव्हे, तर आणखी काय? आपल्याकडचे पैसे कोणी लोभाने गरज म्हणूनही पळवले, तर आपण काय म्हणू त्याला?"

हे उत्तर ऐकून भूषण म्हणाला—"आंबे चोरून आणले म्हणून याला जे बोलत होतीस ते ऐकलंय मी सारं!"

"आं! आत्ता तर थोड्या वेळापूर्वी ही 'चोरी' नव्हेच असं म्हणत होता न? मग आता कशी चोरी झाली नी?" लक्ष्मीने आश्चर्याने विचारले.

"अग, जगाचे व्यवहार न जाणणाऱ्या या पोराच्या मनावर तुझ्या बोलण्याचा काय परिणाम झाला असेल ते मला नाही माहीत. पण माझ्या डोळ्यात मात्र छान अंजन घातलंस तू! माझं मन चांगलंच पालटलंय आता. उद्यापासून दिसेलच तुला!" भूषण बोलला.

मग काय! दुसऱ्याच दिवशी भूषण गावच्या प्रमुख माणसांना जाऊन भेटला. अन् लोककल्याणाच्या कामासाठी त्याने काही पैसे त्यांना दिले.

भूषणच्या वागण्यात झालेल्या या फरकामुळे गाववाले फारच खूश झाले त्याच्यावर! रामरावही स्वतः होऊन आपल्या परसातले आंबे घेऊन भूषणकडे गेला अन् ते त्याच्या हाती देत म्हणाला—"भूषण, आजपर्यंत माझ्या लक्षातही आलं नव्हतं की आपण शेजारी-आहोत!"

हे ऐकून भूषणबरोबरच लक्ष्मीही हसू लागली.



# दिव्यशक्तींची परीक्षा

दृढनिश्चयी विक्रमादित्य त्या झाडाकडे परत गेला, फान्दीला लटकलेले प्रेत खाली काढून त्याने खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतात रहात असलेला वेताळ त्याला म्हणाला—"हे राजा, एका देशाचा राजा म्हणून तुझी किती कीर्ति पसरली आहे आणि तुझी कितपत प्रतिष्ठा आहे हे मला मुळीच ठाऊक नाही. राजा हा केवळ धार्मिक, पराक्रमी किंवा बुद्धिमान असून भागत नाही. या गुणां-बरोबर त्याच्याजवळ सूक्ष्म बुद्धि आणि मानसिक संतुलन असणे, हेही अत्यावश्यक आहे. मला वाटतं की या गुणांचा अभाव असल्यामुळेच तू असा मध्यरात्रीच्या वेळी या भयानक स्मशानात कुठलंसं असाध्य असं काम साधण्यासाठी हिंडत आहेस. राजा माधवसेन सारखे काही लोक अशा

वेताळाच्या गोष्टी



पापांची आणि अपराधांची शिक्षा भोगत असतात, की जे त्यांनी स्वतः कधी केलेलेच नसतात. अन् याचं कारण सूक्ष्म बुद्धि आणि मानसिक संतुलनाचा अभाव हेच होय. थांब, मी तुला त्याची गोष्टच सांगतो; तुझे श्रमही विसरायला मदत होईल तुला!"

वेताळ गोष्ट सांगू लागला—

कोणे एके काळी कोसल देशावर माधवसेन नावाचा राजा राज्य करीत असे. प्रजेला तो स्वतःची अपत्ये मानी. त्यामुळे जनतेत अशीच भावना पसरलेली होती की, जनतेच्या हितासाठी झटणाऱ्या राजांच्यात आपल्या राजाशी कोणीच बरोबरी करू शकणार नाही, अगदी त्रैलोक्यातही!

एकदा देशात अग्निमित्र नावाच्या एक मान्त्रिकाने आपल्या क्षुद्र विद्यांच्या प्रभावाने जनतेला घाबरवून आपला स्वार्थ साधायला सुरुवात केली. आपल्या गुप्त हेरांकडून राजाला अग्निमित्राच्या अत्याचारांची बातमी मिळालीच! राजाने तत्काळ त्याला निरोप पाठवून दरबारात हजर होण्याची सूचना दिली.

दरबारात अग्निमित्राने राजा माधवसेनला मोठ्या विनयाने प्रणाम करून म्हटले—"महाराज, काय आज्ञा मला?"

माधवसेनने शान्तपणाने त्याला म्हटले—"तू जर माझं हे राज्य सोडून गेलास तर मला आनन्द वाटेल!"

"महाराज, माझ्यासारखा मान्त्रिक ज्या देशात रहात असेल त्या देशाची मान इतर राज्यात नेहमीच उंच राहील. तेव्हा आपण मला घालवून देण्याचा प्रयत्न का करत आहात, हे मी आपणाला विचारू इच्छितो." अग्निमित्राने राजाला विचारले.

"तुझी बुद्धि चांगली नाही, स्वार्थी आहेस तू! आपल्या दुष्ट शक्तींच्या जोरावर तू सामान्य प्रजाजनांना त्रास देऊन स्वतः सुख मिळवण्याच्या उद्योगात गर्क असतोस." माधवसेनने आरोप ठेवला.

उत्तरादाखल विकटपणे हसत अग्निमित्र राजाला म्हणाला—"महाराज, यात विशेष वाईट काय केलं मी? आपणाला स्वतःबद्दल असं वाटतं का, कि आपण जनतेकडून जो कर वसूल करता, तो जनता मोठ्या आनंदाने आपणाला देते? उलट जनता माझ्याबद्दल कधीच काही तक्रार करीत नाही; तेव्हा मीही एक चांगला माणूसच असलो पाहिजे. आता राहिला स्वार्थाचा प्रश्न, मग जनतेपेक्षा जास्त वैभवपूर्वक राहून सर्व सुखं भोगणारे आपणही स्वार्थीच नव्हे तर काय?"

"सर्व राजे राजवाड्यात रहातात हा एक रिवाज आहे. यात जास्त सुख वगैरे काहीच नसतं! तू जर हे सिद्ध केलंस, की मी एक स्वार्थी व्यक्ति आहे, तर मी नक्कीच हे राज्य सोडून जाईन." राजा उत्तरला.

विकट हास्य करत अग्निमित्र यावर म्हणाला—"मला आपल्याशी वाद घालायची इच्छा नाही. आपण उगीचच मला राज्य सोडून जाण्याची आज्ञा केलीत. आता मी आपल्या कन्येलाच पळवून नेणार आहे माझ्याबरोबर! काय करायचं असेल ते करून दाखवाच!" असे म्हणून तो तेथून अदृश्य झाला.

बास! अन् त्याच वेळी माधवसेनची एकुलती एक कन्या माधवीलताही



आपल्या अंतःपुरातून एकाएकी नाहीशी झाली!

काय करावे हेच राजा माधवसेनला सुचेना! त्याच्या मन्त्र्याने त्याला सुचवले—"आपण माधवीलतासाठी योग्य वर शोधण्याच्या विचारात आहात न? मग ही एक संधीच आपल्या पुढे चालून आलेली आहे. मला असं वाटतं की, जो वीर पुरुष या मान्त्रिकाचा संहार करून राजकन्येला सोडवून आणील, त्याच्याशीच युवराज्ञीचा विवाह करून देऊन, राज्यही त्याला अर्पण करावे."

नाइलाज म्हणून राजाने ही सूचना स्वीकारली आणि राज्यात सर्वत्र तशी

दवंडीही पिटवण्यात आली. राजकन्या आणि त्याबरोबरच राज्यप्राप्तीच्या विचाराने अनेक युवक पुढे आले.

पण या दरम्यान राजाही काही चुप बसला नाही. अंत:पुरातील तळघरात असणाऱ्या महादेवीच्या मन्दिरात तो गेला अन् त्याने प्रार्थना केली–"माते, मी स्वत: दुष्ट लोकांशी सामर्थ्यपूर्वक सामना करू शकतो. पण दुष्ट शक्तींना तोंड देण्याची शक्ती मात्र माझ्यात नाही. मला तूच शक्ती दे माते!"

यावर देवी राजासमोर प्रकट होऊन त्याला म्हणाली "राजा, काही दिव्य शक्ती तुझी परीक्षा घेत आहेत. पण तू काळजी करू नकोस. मी तुला एक खड्ग देते. त्याच्या केवळ स्पर्शानेच कोणतीही जबरदस्त शक्ती भस्म होऊन जाईल." असे बोलून राजाच्या हाती एक खड्ग देऊन देवी अंतर्धान पावली.

ते खड्ग म्यानात घालून राजा सुखाने झोपून गेला.

या घटनेला एक आठवडा लोटला आणि एक दिवस एका अपूर्व तेजस्वी अशा युवकासह माधवीलता राजवाड्यात परतली.

माधवसेनला वाकून प्रणाम करत तो तरुण म्हणाला–"मी अग्निमित्राचा वध करून माधवीलतेची सुटका करून तिला घेऊन आलो आहे. माझं नाव आहे अग्निसेन. माझ्या पूर्वजांनी विदेह राज्यावर राज्य केलं होतं, असं मानलं जातं." त्याने आपली ओळखही राजाला सांगितली.

यावर माधवसेनने झटकन आपले खड्ग म्यानातून खेचले व अग्निसेनवर त्याने वार केला. राजाचा हा विचित्र व्यवहार पाहून सर्व सभासद व माधवीलता या सर्वांना फारच आश्चर्य वाटले. पण अग्निसेनवर त्या प्रहाराचा काहीच परिणाम झाला नाही. तो हसतहसत अविचल उभाच होता.

माधवसेन तावडतोब तेथून निघून गेला. नन्तर अग्निसेन व माधवीलता यांचा विवाह पार पडला.

विवाहानन्तर अग्निसेनला राज्याभिषेक करण्यात आला. त्यावेळी अग्निसेनचे अचानक अग्निमित्राच्या रूपात रूपान्तर झाले. मन्दस्मित करीत तो म्हणाला–"महाराज, युवराज्ञीशी विवाह करायची माझी इच्छा होती, आणि येथील राजा बनायचंही माझं स्वप्न होतं. आपल्या या दोन इच्छा पूर्ण करण्यासाठी मी आपल्या सर्व शक्ति उपयोगात आणल्या. सर्वात आधी मी माधवीलतेचं अपहरण केलं अन् नन्तर मीच तिला आपल्या हाती सोपवलं."

विचार करत माधवसेन थोडा वेळ गप्प राहिला अन् मग म्हणाला–"अग्निसेन, तू एक सामान्य क्षत्रिय तरुण आहेस, माझी परीक्षा घेण्यासाठी काही दिव्य शक्तींनी तुझा उपयोग करून घेतला आहे. आता तू मान्त्रिकाच्या रूपाने कोणाला भिती दाखवू नकोस. कोसल देशाचा राजा





म्हणून न्यायाने राज्य कर. आपल्या पापांच्या परिहारार्थ मी काही दिवस वनात राहून तपस्या करू इच्छितो. थोड्या दिवसांनी मी परत येईन." असे म्हणून राजा माधवसेन तिथून निघून गेला. राजा गेल्यावर अग्निमित्राचे पुन्हा अग्निसेनात रूपान्तर झाले.

ही गोष्ट सांगून संपल्यावर वेताळ म्हणाला—"राजा, आपण पाप केलं आहे हे माधवसेनचं म्हणणं अर्थहीन नव्हे का? जे पाप केलंच नाही, त्याच्यासाठी वनात जायची गरज काय? त्याने प्रेम केलं आणि प्रजेला एक चांगला राजाही दिला. इतकं सगळं करूनही, मी पाप केलंय म्हणणं, त्याची बुद्धिहीनता आणि मानसिक संतुलनाचा अभावच दर्शवत नाही का? माझ्या या प्रश्नाचे उत्तर माहीत असूनही तू दिलं नाहीस तर तुझं मस्तक फुटून त्याचे तुकडे तुकडे होऊन पडतील."

विक्रमादित्य उत्तरला—"मी पाप केलंय या माधवसेनच्या म्हणण्याचा अर्थ तू सांगत असलेल्या दृष्टीने बरोबर नव्हे. त्याने पाप केलंय ही गोष्ट खरीच आहे. राज्य म्हणजे काही त्याची वैयक्तिक संपत्ति नव्हे! ती त्याची केवळ जबाबदारी आहे. समर्थ हातातच ते सोपवणं केव्हाही योग्य! कोणा दुष्ट किंवा असमर्थ व्यक्तीच्या हाती ते गेलं तर जनतेला अनेक अडचणींना तोंड द्यावं लगेल—या सर्व बाबींचा विचार न करताच माधवसेनने फक्त आपल्या कन्याप्रेमामुळेच दवंडी पिटवली की—'जो कोणी आपल्या मुलीला सोडवून आणील त्याला राज्य मिळेल!' हे माधवसेनचे पहिलं पाप! त्याला अद्‌भुत खड्‌ग देऊन कुलदेवीने सूचना दिली होती, की काही विचित्र शक्ति त्याची परीक्षा घेत आहेत. तरीही त्याने या सूचनेची उपेक्षा करून अग्निसेनवर खड्‌गप्रहार केला. हे त्याचे दुसरे पाप! हे सर्व जाणूनच माधवसेनने तपस्येसाठी वनात जाण्याचे ठरवले."

अशा प्रकारे निवेदन संपताच वेताळ त्या प्रेतासह अदृश्य होऊन झाडावर जाऊन बसला. (कल्पित)



चांदोबा पुरवणी–१५

# ज्ञानाचा खजिना

## तो कोण?

**पू**र्वी समुद्राच्या किनाऱ्यावर दूर पर्यंत रेती पसरलेली आहे. जवळपास एकादं छोटं गाव ही नाही. एक राजा आपल्या अंगरक्षकांसह घोड्यावर बसून रपेट करीत आहे. राजाच्या घोड्याच्या खुराला एकदम एक टणक वस्तु लागली आणि तेथून अग्नि-ज्वाला निघाली. रेतीतून आग कधी निघू शकेल? राजाने जिज्ञासेने आपल्या अंगरक्षकांना तिथे खोदायला सांगितलं. ते होतं एका मंदिराचं शिखर!

राजाने लगेच आसपासच्या प्रदेशातील मजुरांना बोलावून खोदकाम सुरू केले. अनेक दिवस खोदकाम झाल्यावर तेथे एका विशाल मंदिराचा शोध लागला. फार प्राचीन काळी बांधलेले पण कालाच्या उदरात गडप झालेले एक विशाल मंदिर अशा रीतीने पुनः उजेडात आले.

या घटनेत वर्णिलेल्या देवळाचा शोध लावणारा राजा कोण? या मंदिराचे नाव काय?

[पान २६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. एक मीनार हालली की शेजारची दुसरी मीनार ही हालते. अशा हालणाऱ्या मीनारी कोठे आहेत?
२. 'सरोवरांचं नगर' म्हणून प्रसिद्ध असलेलं भारतातील नगर कोणतं?
३. बंगालची खाडी नि अरबस्तानाचा सागर यांच्या मध्ये असलेल्या खाडीचं नाव काय?
४. या खाडीत असलेलं प्रसिद्ध बेट कोणतं?
५. ज्या मंदिरासाठी हे बेट प्रसिद्ध आहे ते मंदिर कोणतं?
६. या मंदिराचे वैशिष्ठ्य कोणते?

[पान ३६ पहा]



देशाची फाळणी करण्याचा हट्ट मुस्लिम लीगने धरला आणि 'प्रत्यक्ष आंदोलन' सुरू केले. त्यांनी हिंदूवर आक्रमण केले, तेव्हां हिंदूंनी त्याचा प्रतिकार केला. देशात सर्वत्र आणि विशेषत: पंजाब व बंगाल मध्ये सांप्रदायिक दंगे झाले.

शेवटी निरुपायास्तव कॉंग्रेसला देशाची फाळणी मान्य करावी लागली. पं. जवाहरलालजींनी ३ जून १९४७ रोजी आकाशवाणी वरून देशातील सर्व जनतेला आपला निर्णय ऐकवला. दोन्ही धर्माच्या लाखो अनुयायांना हा निर्णय ऐकून दु:ख झाले. देशाच्या वाटणीची योजना तयार करण्यात आली.





१५ ऑगस्ट, १९४७ रोजी आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळाले. पं. नेहरू देशाचे पहिले प्रधान मंत्री बनले. सर्व जनतेने नव-भारताच्या निर्मितीत शक्य ते साह्य करावे असे त्यांनी लोकांना आवाहन केले.

स्वातंत्र्या बरोबर आपल्या राष्ट्रापुढे अनेक समस्या उभ्या राहिल्या. ३० जानेवारी, १९४८ रोजी गोळ्या घालून महात्मा गांधींचा वध करण्यात आला. सारी जनता राष्ट्रपित्यासाठी रडली. पं. नेहरूंना तर फारच आश्चर्य वाटलं. तरी पण देशाच्या उज्ज्वल भवितव्या-साठी आणि कर्तव्य-पालनार्थ ते कार्य-प्रवृत्त झाले.






आपण स्वतंत्र राज्य बनून रहावं अशी काही संस्थानिकांनी स्वप्ने पाहिली. कांहींनी प्रत्यक्ष संघर्ष करण्याचा घाट घातला. हैद्राबाद संस्थान स्वतंत्र भारतात विलीन व्हावं अशी इच्छा करणाऱ्या भोळ्या-भावड्या लोकांवर संस्थानाचे समर्थन करणाऱ्या रझा-कारांनी अनन्वित अत्याचार केले.

काश्मीरचे राज्यकर्ते महाराजा हरिसिंह यांनी घोषित केले की त्यांचे संस्थान स्वतंत्र भारतात विलीन होण्यास तयार आहे. पण याचा विरोध करण्यासाठी पाकिस्तानने अनेक लोकांना भडकावले. आपली ताकत दाखविण्यासाठी त्यांनी श्रीनगर वर चाल केली. पण भारतीय सेनेने त्यांना पळवून लावले.





अशा प्रकारे अनेक समस्यांना तोंड देत पं. नेहरूंनी आपल्या देशात व संपूर्ण विश्वात शांति स्थापन करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. १९५४ मध्ये चीनचे प्रधान मंत्री चाऊ-एन-लाई भारताला भेट देण्यासाठी आले. शांतिपूर्वक सहजीवन जगण्यासाठी सहायक होईल अशा 'पंचशील' करारा वर त्या वेळी पंडितजींनी संमति-दर्शक स्वाक्षरी केली.

तरी पण सन १९६२ मध्ये चीनने 'पंचशील' सिद्धांत धुडकावून लावून भारतावर हल्ला केला. भारतीय सेनेने मोठ्या शौर्याने आपल्या देशाच्या सीमेचे संरक्षण केले. चीनचे सैन्य परत गेले खरे, पण त्यांच्या या व्यवहाराचे पंडितजींना फार आश्चर्य वाटले.






पं. जवाहरलालजींनी १७ वर्षे भारताचे प्रधान-मंत्री पद संभाळले. देशाची प्रगति आणि विश्व-शांतिसाठी पंडितजींनी जे प्रयत्न केले, त्यामुळे ते या शतकातील महान् राजनैतिक नेता म्हणून प्रसिद्ध झाले. आपल्या अंतिम क्षणापर्यंत देश नि जनतेच्या कल्याणा-साठी परिश्रम करणारे आमचे प्रिय नेता २७ मे, १९६४ रोजी मरून अमर झाले.



# स्वयंवर

**मा**लव देशचा राजा माधववर्मा म्हातारा झाला आणि त्याला एकाच काळजीने घेरले की, आता आपल्यामागून आपले राज्य कोणा परक्याच माणसाच्या ताब्यात जाणार. त्याला कोणी मुलगा नव्हता. एकुलती एक मुलगी मात्र होती—रत्नमाला.

रत्नमाला मोठी लावण्यवती व बुद्धि-मानही होती. पण राज्य-शासन करण्याची शक्ती, सामर्थ्य अन् दक्षता मात्र तिच्यात नव्हती.

माधववर्माने आपली ही समस्या मन्त्री सुगुणपालपुढे मांडली अन् उपाय विचारला.

यावर मन्त्र्याने सल्ला दिला—"महा-राज, या बाबतीत आपण मुळिच चिन्ता करू नये. सर्व प्रकारच्या विद्या आणि क्षत्रियोचित विद्यांमधेही प्राविण्य मिळवलेले पुष्कळसे तरूण आपल्या राज्यात आहेत. आपण युवराज्ञीच्या स्वयंवराची घोषणा करावी. त्यात भाग घेऊन सर्वात योग्य ठरणाऱ्या तरूणाशी रत्नमालेचा विवाह करून द्यावा. तोच युवक सर्व प्रकारच्या संकटापासून राज्याचे रक्षण करू शकेल आणि समर्थपणे राज्यकारभारही चालवू शकेल."

मन्त्र्याचा हा सल्ला राजाला फार आवडला आणि रत्नमालेची संमति घेऊन त्या अर्थाची दवंडीही राज्यात पिटवली गेली.

स्वयंवरासाठी आलेल्या तरुणात शास्त्र व सर्व क्षत्रियोचित विद्यांमधे निरनिराळ्या चढाओढी आयोजित केल्या गेल्या. त्यात जयवर्मा नावाच्या एका तरूणाने सर्व विषयांत इतर सर्वांना पराजित केले.

त्याचे अभिनन्दन करीत राजा माधव-वर्मा त्याला म्हणाला—"तू माझा भावी जावई आहेस. हेही सिद्ध झाले आहे की

मेधा जोशी

तूच या देशाचा भावी राजा आहेस. माझ्या कन्येशी विवाह करून देऊन तुला राज्याभिषेक करवण्यापूर्वी तुला आणखी एक मुख्य कामगिरी पूर्ण करावी लागेल."

"आज्ञा असावी महाराज! कोणती ती कामगिरी?" जयवर्माने उत्सुकतेने विचारले.

"उग्रसेन नावाचा एक डाकू उत्तरेकडील जंगलात धुमाकूळ मांडून बसला आहे. त्याचा पाडाव करण्याची जबाबदारी तुझी. बरोबर सैन्य घेऊन जा."

थोडा वेळ विचार करून जयवर्मा म्हणाला–"महाराज, सैनिक बरोबर घेऊन जाऊन हे काम साधता येणार नाही. ते आलेले पहाताच उग्रसेन आपल्या टोळीसह जंगलाच्या दुसऱ्या एकाद्या भागात पळून जाईल. तेव्हा मी एकटाच या कामगिरीवर जाऊ इच्छितो."

यानंतर जयवर्मा एकटाच जंगलात गेला आणि त्याने त्या प्रदेशातल्या रहिवाश्यांकडे उग्रसेनबद्दल चौकशी सुरू केली. उग्रसेनच्या टोळीतील लोकांना लवकरच ही गोष्ट कळली व ते जयवर्माला आपल्या नेत्याकडे घेऊन गेले.

उग्रसेनला आपला परिचय देऊन जयवर्मा त्याला म्हणाला–"मी या राज्यातल्या सर्व वीरांना पराभूत केलं आहे. आता राजा युवराणीशी माझा विवाह करून देऊन राज्य माझ्या हाती सोपवणार आहे. तू जर द्वन्द्वयुद्धात मला हरवलेस तर हे राज्य आणि राजकन्याही तुला मिळेल. बोल, आहे कबूल?"

ही बातमी ऐकून उग्रसेन फारच आनन्दित झाला व त्याने तावडतोब आपली तलवार म्यानाबाहेर खेचली. त्यावेळी दोघात जे युद्ध झाले, त्यात उग्रसेनने जयवर्माला अगदी सहजपणे हरवले. या नन्तर तो स्वत: राजधानीत जाऊन राजा माधववर्माला भेटून म्हणाला–"महाराज, राजकुमारीच्या स्वयंवरासाठी ठेवलेल्या चढाओढीत सर्वांना हरवणाऱ्या जयवर्माचा द्वन्द्वयुद्धात मी पराजय केला आहे. तेव्हा आपल्या वचनाप्रमाने आपण युवराज्ञीचा माझ्याशी विवाह करून देऊन आपले राज्य माझ्या स्वाधीन करावे.

या विचित्र घटनेमुळे राजा फार आश्चर्यचकित झाला. पण त्याच वेळी तेथे प्रवेश करत जयवर्मा म्हणाला–"महाराज, हा उग्रसेन म्हणतोय की त्याने माझा पराभव केला आहे. पण माझा पराभव करताना आपल्यापैकी कोणीही पाहिलेले नाही न? तेव्हा एकदा दरबार बोलवून सर्वांसमक्ष आम्हा दोघात चढाओढ ठेवा."

यावेळी दोघात जे खड्गयुद्ध झाले, त्यात जयवर्माने त्या डाकूंच्या नेत्याचा अगदी सहजपने पराभव केला अन् त्याच्या गळयावर आपली तलवार टेकवून त्याने आज्ञा दिली–"ऐक, मालवदेशचा भावी राजा म्हणून मी तुला आज्ञा देत आहे की तू तावडतोब आपल्या टोळीसह





आमचे राज्य सोडून अन्यत्र निघून जावेस."

प्राणभयाने घाबरून उग्रसेन दोन्ही हात जोडून म्हणाला–"होय. मी आपल्या आज्ञेचं जरूर पालन करीन. आजच मी आपला प्रदेश सोडून निघून जाईन. मी आपणाला दिलेले हे वचन नक्की पाळीन." इतके बोलून नेता उग्रसेन तेथून निघून गेला.

या घटनेमुळे राजा माधववर्मा अतिशय प्रसन्न झाला. त्याने लवकरच रत्नमालेचा जयवर्माशी विवाह करून दिला अन् 'मालवराजा' म्हणून त्याला राज्याभिषेकही केला. यानंतर एके दिवशी माधवसेनने जयवर्माला विचारले–"जयवर्मा, तू जेव्हा उग्रसेनच्या शोधासाठी एकटाच बाहेर पडलास, तेव्हा तुझ्या रक्षणासाठी म्हणून मी काही गुप्त हेर तुझ्या मागे पाठवले होते. तेथे तू उग्रसेनकडून हरलास, पण मग राजसभेसमोर काही क्षणातच तू त्याचा पराभवही केलास. हे कसे काय घडय झालं बरं?"

जयवर्मा हसून राजाला–"न्यायनिवाडच्या वाचूनच जेव्हा एकादी स्पर्धा घडून येते तेव्हा ती अगदीच अर्थहीन असते, म्हणूनच जंगलात डाकूंच्या त्या नेत्याला हरवायचा मी प्रयत्नच केला नाही. हे पहिले कारण झाले."

"मग दुसरं कारण काय बरं?" माधववर्माने विचारले.

"मी त्याचा जंगलातच पराभव केला असता, तर उग्रसेन स्वत: आपल्यासमोर कधीच हजर झाला नसता. राज्याच्या अन्य एकाद्या भागात जाऊन तेथेही त्याने लुटालूट सुरू केली असती. याच विचाराने राज्य व राजकुमारीची लालूच दाखवून त्याला इथे उपस्थित होण्याची संधी मी दिली." जयवर्मा उत्तरला.

हे उत्तर ऐकून जयवर्मांचा आनन्द द्विगुणित झाला. त्याच्या लक्षात आले की–आपला जावई केवळ विद्वान व पराक्रमीच नव्हे, तर अत्यन्त विवेकशीलही आहे.






शिशुपालाचा एक साल्व नावाचा मित्र होता. श्रीकृष्णानें जेव्हां रुक्मिणीला उचलून आणले, त्यावेळी अनेक योद्धयांबरोबर साल्वचा ही पराभव झालेला होता. म्हणून रागाच्या भरात त्याने प्रतिज्ञा केली होती–"जगातील सर्व यादवांचा मी सर्वनाश करीन!" आपली ही प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी त्याने शिवाची उपासना केली. जेव्हा शिवजी प्रत्यक्ष उपस्थित झाले, तेव्हा साल्वने त्यांना एक अपूर्व विमान मागितले. शिवाने विश्वकर्म्याला एक अद्‌भुत विमान बनवून साल्वला देण्याचा आदेश दिला. विश्वकर्म्याने सौभ नावाचे एक लोखंडाचे मजबूत काळे विमान बनवून ते साल्वला दिले. या विमानात बसून साल्वने द्वारके वर हल्ला केला. त्याच्या सैन्याने द्वारकेला चारी बाजूंनी वेढले.

साल्वने विमानातून दगड, झाडे नि अस्त्र-शस्त्र फेकून एकच हलकल्लोळ माजवला. त्याची सेना द्वारकेतील इमारती व उद्याने यांचा ध्वंस करू लागली. हा सर्व प्रकार पाहून यादवांच्या सैन्याने प्रद्युम्नाच्या नेतृत्वाखाली साल्व वर आक्रमण केले. साल्व आणि यादव यांच्या सैन्यात सत्तावीस दिवस भयंकर युद्ध झाले. शेवटी श्रीकृष्णांनी आपल्या सुदर्शन-चक्राने साल्वचा वध केला.

श्रीकृष्णाचा सुदामा नावाचा एक बालमित्र होता. बालपणी दोघांनी एकाच

२९. सुदामाची गोष्ट



गुरुजवळ राहून विद्या संपादन केलेली होती. सुदामा लग्न करून गृहस्थाश्रमी बनला होता. पण त्याच्या घरात अठरा-विश्वे दारिद्र्य नांदत होते. सुदामा पेक्षा त्याच्या बायकोला दरिद्र्याचं दुःख अधिक सतावत असे. म्हणून एक दिवशी ती नवऱ्याला म्हणाली—"श्रीकृष्ण तर तुमचे चांगले मित्र आहेत न? ते ब्राह्मणांना अपार दान देतात असं ऐकलं आहे मी! जे त्यांना शरण जातात, त्यांना ते साह्य करतात म्हणे. तुम्ही तर त्यांचे बाल-मित्र! शिवाय दारिद्र्य आपल्या पाचवीला पुजलेले! अशा परिस्थितीत ते काय तुम्हाला मदत करणार नाहीत?"

सुदामाच्या मनात ही मदत मागण्याच्या मिषाने श्रीकृष्णाचे एकदा दर्शन करायची तीव्र इच्छा होती. श्रीकृष्णाची भेट काही व्यर्थ जाणार नाही असा त्याला पक्का विश्वास होता. सुदामा बायकोला म्हणाला—"अग, मी श्रीकृष्णाला भेटायला अवश्य जाईन. पण हात हलवीत जाणं बरं दिसेल का? भेटी दाखल बरोबर काही तरी घेऊन जाणं योग्य नाही का? पण आपल्या घरात आहे काय देण्यासारखं?"

सुदामाची बायको शेजार-पाजारच्या घरी जाऊन थोडे पोहे घेऊन आली. एका छोट्या फडक्यात पुरचुंडी बांधली नि नवऱ्याच्या हाती दिली. पोह्यांची पुरचुंडी घेऊन सुदामा घराबाहेर पडला आणि द्वारकेला पोचला. श्रीकृष्णाच्या निवास-स्थानाचा शोध घेत इकडे-तिकडे भटकू लागला.

श्रीकृष्णांनी सुदामाला दुरून पाहिले आणि ते स्वतः उठून बाहेर आले, प्रेमाने त्याला आलिंगन दिले आणि आपल्या महालात घेऊन जाऊन पलंगावर आपल्या शेजारी बसवले. श्रीकृष्णांनी सुदामाचे पाय धुतले आणि ते पाणी थोडे आपल्या डोक्यावर शिंपडले. आणि सुदामाच्या शरीरा वर चन्दन लावले, गळ्यांत पुष्प-माला घालून त्याचा उत्तम सत्कार केला.





सुदामाला नवी वस्त्रे दिली. सुदामा वरील श्रीकृष्णाचे हे प्रेम पाहून रुक्मिणी ही त्याच्यावर चौरी ढाळू लागली. तिथे हजर असलेल्या सर्व लोकांना ही हे पाहून मोठे आश्चर्य वाटले.

सर्व प्रारंभिक आदरातिथ्य संपल्यावर श्रीकृष्ण नि सुदामा गुरुकुलातील आपल्या बालपणच्या आठवणी स्मरून आपापसात गप्पा मारू लागले.

एकदा गुरुपत्नीने त्यांना समिधा गोळा करण्यासाठी जंगलात पाठवलं होतं. दोघे जण एका विशाल वनात पोचले. एवढ्यांत भयंकर वादळ सुरू झालं नि मुसळधार पाऊस आला. आकाशात विजा कडकडू लागल्या. मेघांची गर्जना सुरू झाली. ही अंधार पडण्याची वेळ होती. दोघे ही पावसात चिंब भिजले. खडकाळ प्रदेशात रस्ता दिसेनासा झाला. दोघे एकमेकांचा हात धरून रात्र भर जंगलात हिंडत राहिले. दुसऱ्या दिवसाची सकाळ झाली. आपले शिष्य जंगलात कुठे तरी वाट चुकल्याचे जेव्हा गुरु सांदीपनींना समजले, तेव्हा ते त्यांना शोधण्यासाठी निघाले. भेट झाल्या-वर त्यांची अवस्था पाहून सांदीपनींना अतिशय दुःख झालं. म्हणाले—"तुम्ही दोघांनी माझ्यासाठी केवढे परिश्रम केलेत! तुमची भक्ति पाहून मला अतिशय आनंद झाला. तुमच्या सर्व मनोकामना अवश्य पूर्ण होतील. तुम्ही माझ्यासाठी जेवढे केलेत त्याहून अधिक कोण शिष्य गुरुसाठी काही करूं शकेल?" असं म्हणून त्यांनी अंतःकरणपूर्वक शिष्यांना आशीर्वाद दिले. ही सर्व घटना स्मरून श्रीकृष्णांनी सुदामाला विचारले—"तुला हे सगळं आठवतंय?"

सुदामा म्हणाला—"गुरुकुलातील आपल्या सारखा मित्र असताना माझी कोणती इच्छा पूर्ण होणार नाही?"

श्रीकृष्ण मंद-स्मित करीत म्हणाले—"बरं, आता हे तरं सांग माझ्यासाठी घरून काय आणलं आहेस?"



सुदामा अमळ घाबरला. आपण आणलेले पोहे श्रीकृष्णाला द्यायला लाज वाटली. यावर श्रीकृष्णाने जबरदस्तीने सुदामाच्या हातांतील पुरचुंडी आपल्या हाती घेत विचारलं–"काय आहे या पुरचुंडीत?" आणि त्यांनी लगेच पुरचुंडी उघडली सुद्धा! म्हणाले–"वा! पोहे आहेत? आपल्याला पोहे फार आवडतात बुवा!" असे म्हणत श्रीकृष्णाने मुठ भर पोहे खाल्ले आणि आणखी एका मुठीत पोहे घेतले.

रुक्मिणीने श्रीकृष्णाचा हात धरीत म्हटले–"पुरे, खाल्लेत तेवढे पुरे झाले!"

त्या दिवशी रात्री सुदामाने श्रीकृष्णाच्याच महालात मुक्काम केला. स्नान व भोजन करून छान झोप घेतली. खरोखरीच आपण स्वर्गात असल्याचा त्याला भास झाला.

दुसऱ्या दिवशी सुदामा जेव्हां घरी जायला निघाला तेव्हा श्रीकृष्ण थोडं अंतर त्याच्या बरोबर चालत आले आणि मग त्याला रवाना केलं. पण श्रीकृष्णाने सुदामाला धन-अलंकार वगैरे काही दिलं नाही. सुदामा मनातल्या मनात विचार करू लागला–"श्रीकृष्ण तर महाराजा आहेत, मी त्यांचा कंगाल मित्र! ब्राह्मण म्हणून त्यांनी आदरपूर्वक मला आलिंगन दिलं. आपल्या धाकट्या भावाप्रमाणे ते माझ्याशी वागले. आपल्या शय्ये वर त्यांनी मला शेजारी बसवून घेतलं. त्यांच्या पत्नीने आपल्या हाताने माझ्यावर चौरी ढाळली. मला धन न देण्यात कदाचित त्यांचा असा विचार असावा की धन-प्राप्तीमुळे मला गर्व होऊ नये!"

पण सुदामा जेव्हां आपल्या गावी पोचला, तेव्हां तेथील दृश्य पाहून आश्चर्य-चकित झाला. राजवाड्यासारखी सुंदर इमारत त्याला आपल्या समोर दिसली. सुरेख उद्याने नि तलाव दिसले. सरोवरांत कमळाच्या जातीची विविध फुले फुललेली होती. हंस जल-विहार करीत होते. अनेक सेवक व सेविका आपापल्या कामात मग्न होत्या.

"हे कोणाचं घर असेल बरं? माझं तर दिसत नाहीं? मग हे इथं कोठून आलं?" विस्मयपूर्वक सुदामा असा काही विचार करीत असता अनेक सुंदर स्त्रिया व पुरुष मंगल-वाद्ये वाजवीत त्याला घेऊन जाण्या-साठी आले. त्यांनी सुदामाचे स्वागत केले आणि मग ते त्याला महालात घेऊन गेले.

सुदामाची बायको आता लक्ष्मी सारखी दिसत होती. नवऱ्याला येताना पाहताच ती सामोरी आली आणि आनन्दाश्रूंनी डबडबलेल्या डोळ्यांनी तिने पतीला नमस्कार केला नि मनोमन आलिंगन दिलं.

हा सगळा थाट पाहून सुदामा आपल्या मनात विचार करू लागला–"श्रीकृष्णांचं प्रत्यक्ष दर्शन घडल्यावरच मला हे सर्व ऐश्वर्य प्राप्त झालेलं आहे. याशिवाय दुसरं काही कारण दिसत नाही. मित्र असावा तर असा! मी त्यांना तुच्छ भेट दिली, केवढ्या प्रेमाने त्यांनी तिचा स्वीकार केला! आणि आता मला एवढं ऐश्वर्य दिलं, एक छोटीशी भेट म्हणून!"

यानंतर सुदामा सर्व प्रकारच्या वैभवाचा उपभोग घेत आपली पत्नी व मुलां-बाळांसह सुखाने जीवन जगू लागला.

एकदा खग्रास सूर्य-ग्रहण झाले. सर्व यादवांनी द्वारकेच्या संरक्षणाची जबाबदारी अनिरुद्धावर सोपवली आणि ते कुरुक्षेत्राला





आले. तेथे श्रीकृष्ण आपल्या सर्व नातेवाईकांना भेटले. नंद आणि यशोदा तेथे आली. भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, संजय, विदुर, कृपाचार्य, दुर्योधन इत्यादीं सह गांधारी, पांडव व त्यांच्या बायका सर्व जण दीर्घ कालावधी नंतर तेथे भेटले. सर्वांनी परस्पर गप्पा-गोष्टी केल्या.

पांडवांची पत्नी द्रौपदी हिने श्रीकृष्णाच्या आठ बायकांना विचारले—"तुम्हा सर्वांचा श्रीकृष्णाशी विवाह कसा झाला ती हकिगत सांगाल?"

रुक्मिणीने आपल्या लग्नाचे वृत्त सांगितले—"शिशुपालाशी माझा विवाह करण्याचा जरासंध इत्यादींनी निश्चय केला होता, पण श्रीकृष्णांनी येऊन सर्वांचा पराजय केला आणि मला घेऊन गेले."

"माझे वडील सत्राजित यांनी दुसऱ्या कोणाशी तरी माझा विवाह करण्याचा संकल्प केला होता, पण दरम्यानच्या काळात माझे काका दिवंगत झाले. माझ्या वडिलांनी अशी अफवा पसरवली की हे काम श्रीकृष्णांचे आहे. ही अफवा खोटी सिद्ध करण्यासाठी श्रीकृष्ण निघाले आणि माझ्या काकांवर आक्रमण करणाऱ्या सिंहाचा त्यांनी वध केला. स्यमंतक मणि प्राप्त करून नंतर जांबवानाचा पराभव केला, आणि स्यमंतक मणि माझ्या वडिलांना आणून दिला. आणि नंतर त्यांनी माझ्याशी विवाह केला." सत्यभामेने आपली गोष्ट ऐकवली.

"जांबवान हे माझे वडील. पंचवीस दिवस श्रीकृष्णासह लढाई केल्यावर त्यांना समजलं की त्या युगातील रामचन्द्रांनीच आता श्रीकृष्णाच्या रूपात जन्म घेतलेला आहे. मग ते त्यांना शरण गेले आणि माझं सालंकृत कन्यादान केलं. श्रीकृष्णाचं आणि माझं लग्न झालं." जांबवतीने आपली विवाह-कथा सांगितली.

कालिंदी म्हणाली—"श्रीकृष्णांना जेव्हां समजलं की मी त्यांच्या प्राप्ती साठी तपस्या केलेली आहे. तेव्हां ते अर्जुनाला घेऊन

आले व त्यांनी माझ्याशी विवाह केला."

"माझ्या स्वयंवराचे वेळी अनेक राजे आलेले होते. श्रीकृष्णांनी सर्वांना पराजित केलं आणि माझ्याशी विवाह केला!" भद्राने आपल्या लग्नाची गोष्ट ऐकवली.

नीला म्हणाली–"माझ्या वडिलांनी अशी अट घातली होती की ७ बैलांना जो हारवील, त्याच्याशी माझे लग्न करून दिले जाईल. श्रीकृष्णांनी सात बैलांना शेळ्यांसारखं मागे हटवलं! म्हणून माझ्या वडिलांनी माझा श्रीकृष्णाशी विवाह करून दिला."

मित्रविंदाने सांगितले–"श्रीकृष्ण माझे मामे भाऊ. माझ्या वडिलांना जेव्हां समजलं की मी श्रीकृष्णांशी विवाह करू इच्छिते, तेव्हां त्यांनी अत्यंत प्रसन्न अंतःकरणाने माझे श्रीकृष्णांशी लग्न करून दिले."

शेवटी लक्षणाने आपल्या विवाहाची हकीगत अशी सांगितली–"तुझ्या वडिलां-प्रमाणेच माझ्या वडिलांनी ही एका मत्स्ययंत्राची योजना केली होती. आणि अशी घोषणा केली होती या यंत्राचा जो छेद करील त्याच्याशी माझा विवाह केला जाईल. तुमच्या वडिलांचे मत्स्य-यंत्र बाहेरून दिसत नसे, पण आतून दिसे. पण माझ्या वडिलांनी बनविलेले यंत्र आतून ही दिसत नसे. पाण्यात फक्त त्याचे प्रतिबिंब दिसे व ते ही अंधुक! त्याची स्थापना करण्यासाठी माझ्या वडिलांनी ज्या धनुष्याचा उपयोग केला, अनेक राजांना त्या धनुष्याचा उपयोग करणेच जमले नाही. जरासंध, शिशुपाल, भीम, दुर्योधन, कर्ण वगैरेंनी धनुष्यावर बाण तर चढवला, पण पाण्यातील यंत्राचे प्रतिबिंब त्यांना दिसले नाही. अर्जुनाला प्रतिबिंब दिसले, पण तो यंत्राचा छेद करू शकला नाही. शेवटी श्रीकृष्णांनी अचूक आपल्या बाणाने यंत्राचा छेद केला आणि नंतर माझ्याशी विवाह केला."

या सर्व विवाह-कथा ऐकून द्रौपदी व तेथे उपस्थित असलेल्या सर्व स्त्रियांना खूप आनंद झाला.





# जन्मजात कला

शिवशर्माने चालवलेल्या गुरुकुलात एकाच दिवशी तीन विद्यार्थी येऊन दाखल झाले. थोड्या दिवसांनंतर गुरूने त्यांना विचारले–"तुम्हा तिघांचं प्राथमिक शिक्षण काल पर्यंत पूर्ण झालं आहे. आता तुम्हाला कोणकोणत्या विषयांची आवड आहे, ते तुम्ही स्वतःच सांगा."

सर्वात आधी सुनन्द म्हणाला–"गुरुजी, राजदरबारात काम मिळावं अशी माझी इच्छा आहे."

दुसरा तरूण भूपति म्हणाला–"मी वैद्यकशास्त्र शिकून एक चिकित्सक बनावं असं मला वाटतं. माझ्या माता-पित्यांचीही हीच अपेक्षा आहे माझ्या-कडून."

पण शेवटचा माधव मात्र आपला निर्णय न सांगता त्याबद्दलची जबाबदारी आपल्या गुरूवरच सोपवत म्हणाला–"कोणती एकादी विशेष अशी विद्या मिळवावी असा काही माझा विचार नाही."

आचार्य शिवशर्मांनी यावर माधवला सुचवले–"मग तू सर्वच विषयात लक्ष घालून अध्ययन करत रहा. तसं करता-करता एकाद्या विशेष विषयात तुला गोडी वाटू लागली, तर मला सांग. नंतर पाहू काय करायचं ते." यानंतर आचार्यांनी सुनन्दला गणित व अर्थशास्त्र, आणि भूपतिला वैद्यक शिकवायला सुरुवात केली.

माधव असाच भटकत राहिला.

इतक्यात आचार्यांचा प्रमुख शिष्य तेथे येऊन म्हणाला–"गुरुजी, माधवबद्दल आम्ही पत्ता लावलाय! जवळच्या जंगलात गुराख्यांबरोबर तो आपला वेळ घालवत असतो. आपण उद्या स्वतःच जाऊन पाहून या."

रोहिणी जोशी



दुसऱ्या दिवशी आचार्य माधवला शोधण्यासाठी जंगलाकडे निघाले. थोडे पुढे जाताच त्यांना बासरीचे मधुर असे सूर ऐकू येऊ लागले. त्या बाजूला थोडे पुढे जाताच त्यांना एक अद्भुत दृश्य दिसले!

एका झाडा खाली बसून माधव मोठ्या मनोहर पद्धतीने मुरली वाजवत आहे, अन् त्याला घेरून सर्व गुराखी अगदी थोडीही हालचाल न करता बसून ते संगीत ऐकण्यात तल्लीन झाले आहेत! त्या बासरी-वादनावर शिवशर्माही अगदी मुग्ध होऊन गेले!

बासरी-वादन संपताच आचार्य माधव-जवळ गेले अन् म्हणाले–"मला नव्हतं माहीत की तू इतकं मधुर बासरी-वादन करूं थकतोस! तू तर मला कधी बोलला नाहीस? आहे काय भानगड ही?"

गुरुजींना प्रणाम करत माधव म्हणाला–"क्षमा असावी गुरुदेव! पण मी नुकतीच या गुराख्यांकडून ही कला शिकून घेतली. पण ही माझी विद्या अशी काही मोठी महत्त्वाची नव्हे!"

माधवच्या खांद्यावर थोपटत शिवशर्मांनी–"अरे, हे तर तुझे जन्मजात पांडित्य आहे, चांगला विकास कर या कलेचा!" असे म्हणत त्याला आशीर्वाद दिला.

आपला विद्याभ्यास संपल्यावर सुनन्दची राजदरबारात एका उच्च पदावर नियुक्ती झाली. भूपतिने राजधानीत एक खूप मोठे चिकित्सालय उघडले; पण माधव मात्र आपले बासरी-वादन करत देशाटन करत राहिला आणि त्यात त्याने चांगले नाव कमावले. अशीच काही वर्षे निघून गेली. एकदा शिवशर्मा आपल्या काही कामासाठी राजधानीला गेले होते. त्यावेळी आपल्या शिष्यांचीही खबर घ्यावी असे वाटून प्रथम ते भूपतिकडे गेले.

कुशल प्रश्नांची देवाण-घेवाण झाल्या-नन्तर आपल्या रिकाम्या चिकित्सालयाचा निर्देश करत भूपति आचार्यांना म्हणाला–"गुरुजी, या वैद्यशास्त्राची रहस्यं काही मला अजून समजून येत नाहीत! मी खूप कष्ट करून जी विद्या शिकून घेतली, तिचा मला काहीच फायदा करून घेता आला नाही."

हे ऐकून त्याचे सान्त्वन करून त्यालाच बरोबर घेऊन शिवशर्मा सुनन्दकडे गेले. आपल्या घरी सुनन्दने त्यांचे खूप आगत-स्वागत केले. तसा तो खूपच चांगला सुसंपन्नही होता. पण आचार्यांनी बोलण्यातून ओळखले की आपल्या त्या उच्च पदावरही सुनन्द फारसा खूष दिसत नाही.

गप्पा मारता-मारता सुनन्द म्हणाला–"गुरुजी, उद्या राजदरबारात माधवच्या बासरी-वादनाचा कार्यक्रम आहे."

दुसऱ्या दिवशी ते तिघेही राजसभेत पोचले. आपल्या भोवतालचे जग विसरून माधव बासरी-वादनात तन्मय होऊन गेला होता. सर्वच प्रेक्षकांनीही मुग्ध होऊन ते वादन ऐकले आणि कार्यक्रमाच्या शेवटी खूप जोरजोरात टाळ्या वाजवून त्यांनी आपला हर्ष व्यक्त केला.

राजा स्वतः सिंहासनावरून उठून माधवजवळ येऊन म्हणाला–"वा वा! काय अद्भुत संगीत हे! यातून तर सजीवतेचा भास होत होता. तू माझ्या दरबारात दरबारी बासरी-वादक म्हणून रहा." आणि राजाने त्याला एक थाळी भरून सुवर्णमुद्रा भेट म्हणून दिल्या.

मोठ्या विनयपूर्वक राजाला प्रणाम करून माधव म्हणाला–"महाराज, देशाटन करीत फिरणाऱ्या माझ्यासारख्या भटक्या प्राण्याला



कशाला हे पद? आपण आज्ञा द्याल, तेव्हा मी असेन तेथून धावत येऊन आपल्यापुढे हजर होईन." इतके बोलून त्याने त्या सुवर्णमुद्रा अन्नदान करणाऱ्या एका धर्मशाळेला दान करून टाकल्या.

त्या रात्री जेव्हा तिघेही शिष्य गुरुजवळ बसले होते, तेव्हा सुनन्दने त्यांना विचारले– "गुरुजी, मी आपल्या मनातला संकल्प पुरा करू शकलो, तरीही मला जीवनात समाधान वाटत नाही. याचं कारण काय बरं असावं?"

यावर आचार्य शिवशर्मा उत्तरले–"तू मोठ्या सावधानतेने विद्या मिळवलीस खरी; पण सुरुवातीपासून उच्च स्थानावरच तुझे लक्ष केन्द्रित झालेले होते. त्यामुळे केवळ ज्ञानामुळे मिळणारं समाधान तुला कधीच लाभलं नाही."

यानन्तर भूपतिकडे वळून शिवशर्मा म्हणाले–"तू धनार्जन करणे हेच आपल्या जीवनाचे उद्दिष्ट मानलेस. आणि स्वतःच्या सहजप्रवृत्तीच्या विरुद्ध जाऊन चिकित्सकाचा पेशा पत्करून स्वतःचं नुकसान करून घेतलंस, अन् अशा प्रकारे तुम्ही दोघेही मृगजळामागेच धावत राहिलात. आपण इच्छा केल्याने धन, कीर्ति आणि पदवी प्राप्त होईलही कदाचित्! अन् कदाचित् तसं नाहीही घडणार! पण त्यातून समाधान कधीच लाभणार नाही." इतके बोलून पळभर थांबून ते पुन्हा म्हणाले– "माधवला हे पक्कं ठाऊक होतं की संगीतामुळे अधिकार व धन-संपादन करणं शक्य होणार नाही; तरी ही जन्मजात प्राप्त झालेल्या बासरी-वादनाचा त्याने चांगला अभ्यास केला. त्याची ही जन्मजात विद्याच त्याला जीवनाच्या अखेरपर्यंत समाधान व आनन्द देत राहील."

आता कुठे भूपति व सुनन्दच्या लक्षात आले की आपण केवळ धन-संपत्ति आणि पदवीचे दास बनून आपल्या जन्मजात प्रवृत्तीनुरूप विद्या प्राप्त करण्याचा प्रयत्नच केला नाही, अन् परिणामतः जीवनात आनन्द आणि संतोषाला वंचित राहिलो.





# न्यायदेवता

चीन देशात चांग नावाचा एक तरुण माणूस रहात असे. तो फार गरीब होता. त्याचे आई-वडील लहानपणीच वारले होते. म्हणून चांग मिळेल ते काम करून कसे-बसे आपले पोट भरी. वडिलार्जित संपत्तीच्या नावा वर एक घर फक्त उरलं होतं. त्यात तो रहात असे.

चांगच्या घराजवळच एक व्यापारी रहात असे. अनाथ चांगला नोकरी देऊन हळू हळू त्याचं घर आणि आसपासची मोकळी जमीन बळकावण्याचा त्या व्यापाऱ्याचा विचार होता. व्यापाऱ्याचा हा हेतु चांगच्या चांगला लक्षात आला होता, म्हणून व्यापाऱ्याने देऊ केलेली नोकरी चांगने धुडकाऊन लावली.

चांगची कुल-देवी होती 'टोंगो', चीन-वासियांची ती न्यायदेवता ही होती. सकाळी आपल्या कामावर जाण्यापूर्वी तो रोज अत्यन्त मनोभावे 'टोंगो' च्या मूर्तीची पूजा करीत असे.

उपवधु होईपर्यंत चांगने बराच पैसा जमवला. तो नेहमी आनन्दी व उत्साही असे, यामुळे व्यापाऱ्याला त्याचा हेवा वाटू लागला. चांगच्या आनन्द व उत्साहाचे रहस्य जाणण्याची व्यापाऱ्याच्या मनात फार इच्छा निर्माण झाली. एक दिवशी मध्य-रात्री तो चांगच्या घरापाशी पोचला आणि खिडकीतून जे दृश्य त्याने पाहिले, त्याच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही.

चांगच्या मागे एक मोठी पेटी होती आणि तो सोन्याची नाणी मोजून पेटीत ठेवत होता. शेवटी त्याने आपल्या खिशांतून आणखी काही नाणी काढली आणि ती ही पेटीत टाकली. नंतर त्याने ती पेटी जमिनीतील खड्ड्यात ठेवली आणि एका लाकडाच्या फळीने ती झाकून टाकली. त्या फळी

एक चीनी लोककथा



वर 'टोंगो' ची मूर्ति ठेऊन तिची पूजा केली आणि बिछान्यावर जाऊन झोपी गेला.

ते दृश्य पाहून व्यापारी आपल्या घरी परत आला. पण रात्र भर त्याला झोप लागली नाही. त्याच्या मनात विचार आला–"या गरीब तरुणाने किती सोनं जमवलंय? कसं का होईना, त्यावर डल्ला मारला पाहिजे."

दुसऱ्या दिवशी चांग जेव्हा कामावर गेला, तेव्हा व्यापाऱ्याने कसा-बसा त्याच्या घरात प्रवेश केला. 'टोंगो' ची मूर्ति बाजूला ठेवली नि फळी उचलून पेटीचे दार उघडले. पेटीतील सर्व सोन्याची नाणी आपल्या पिशवीत भरून घेतली. पेटी बंद करून तीवर लाकडाची फळी ठेवली नि मूर्ति पूर्ववत् ठेवून तो आपल्या घरी परत आला.

चांगला जेव्हा आपल्या सोन्याची चोरी झाल्याचं समजलं तेव्हा त्याला फार दुःख झालं. तो उठून थेट न्यायाधीशाकडे गेला आणि त्यांना चोरीची हकिगत सांगितली.

न्यायाधीशाने चांगला घरी रवाना केले आणि बराच वेळ विचार केल्यावर त्याच्या मनात व्यापाऱ्या विषयी संशय आला. काही असलं तरी चोराला पकडण्याची जबाबदारी आपली आहे, म्हणून न्यायाधीशाने रात्रीच्या वेळी चांगच्या घरावर पहारा देण्यासाठी एका गुप्त सेवकाची नियुक्ति केली.

दोन दिवस चांगच्या घराकडे कोणी माणूस फिरकला नाही पण तिसऱ्या दिवशी रात्री मात्र व्यापारी चांगच्या घराजवळ आला आणि खिडकीतून आत डोकावून पाहू लागला. पहारेकऱ्याने हे पाहिलं नि धावत जाऊन न्यायाधीशाला खबर दिली. न्यायाधीशाचा व्यापाऱ्यावर संशय होताच, आता तो सिद्ध झाला.

आता व्यापाऱ्याला चोर म्हणून पकडणे फक्त शिल्लक होते. त्यासाठी न्यायाधीशाने एक युक्ति केली आणि चांगला सर्व काही समजाऊन सांगितले.



चौथ्या दिवशी व्यापारी रात्री आला आणि चांगच्या घराच्या खिडकीतून डोकावून पाहू लागला, तर त्याला एक विचित्र दृश्य पहायला मिळालं.

खिडकीकडे पाठ करून एक स्त्री उभी होती. तिच्या पुढे गुडघे टेकून चांग मनोभावे नमस्कार करीत होता. ती स्त्री चांगला म्हणाली–"बाळा, माझ्या विषयी तुझ्या अंतःकरणातील भक्ति व प्रेम अनुपम आहे. पिढ्यान् पिढ्या तुझ्या वंशांतील लोग माझी पूजा करीत आले आहेत. तुझ्यावर कोणी तरी घोर अन्याय केला आहे, हे मला माहीत आहे; तुझी संपत्ति चोरणारा माणूस ही मी जाणते. त्याने तुझ्या ज्या एक हजार सुवर्ण-मुद्रा चोरलेल्या आहेत, त्या मी तुला परत मिळवून देईन! काळजी करू नकोस."

हे दृश्य पाहून व त्या स्त्रीचे बोलणे ऐकून व्यापाऱ्याला आश्चर्य वाटलं! त्याने मनात विचार केला–"एक हजार स्वर्ण-मुद्रा? मी तर शंभरच नाणी घेतली होती. मी मोजण्यात तर चूक नाही ना केली?" काही तरी बडबडत तो पळत आपल्या घरीं आला, आणि चोरलेल्या मुद्रा मोजू लागला.

व्यापारी जेव्हा सोन्याची नाणी मोजत होता, तेव्हा न्यायाधीश आपल्या दहा शिपायां सह तेथे पोचला नि व्यापाऱ्याला कैद केलं. व्यापाऱ्याने आपण चोरी केल्याचे कबूल केले. मग त्याला तीन महिने तुरुंगवासाची शिक्षा दिली आणि चांगला त्याचे सर्व सोने परत देण्याची व्यवस्था करण्यात आली.

या निवाड्यामुळे न्यायाधीशाची प्रतिष्ठा वाढली. 'टोंगो' देवी न्यायाधीशांना प्रत्यक्ष रूपाने मदत करते असे चीनचे लोक मानतात. पण अशा या देवीला आपल्या डोळ्यांनी आज वर कोणी पाहिलेले नाही.

लोकांचा असा विश्वास आहे की या न्यायाधीशाला पण 'टोंगो' देवीने साह्य केले! म्हणून त्याच्या काळात अन्याय व गुन्हेगारी यांचे प्रमाण खूपच घटले.





# उषा

सृष्टि जेव्हा निर्माण झाली. तेव्हा आपली पृथ्वी पाण्यातुन वर आली. पृथ्वीवर सर्व प्राण्यांचा जन्म झाला. परंतु सूर्य नसल्यामुळे हे सर्व प्राणी अंधारातंच रहात असत.

रानटी, रक्तपिपासू प्राण्यांमुळे मानवांना फार त्रास होई.

अंधारामुळे त्यांना आपली कामे हीं करता येत नसत.

असेच काही दिवस गेले आणि एकदा मानवप्राण्यात ज्ञानी बनलेला एक माणूस इतरांना सांगू लागला–

"इतर सर्व साधनं आणि प्राण्यांबरोबरच ब्रह्मदेवाने सूर्यभगवानाचेही सृजन केलेलं आहे. आपल्यातल्या एकाद्या व्यक्तीने जाऊन सूर्याला विनन्ती केली तर तो अनुग्रह करून नक्कीच आपल्याला प्रकाश देईल. मग आपल्याला प्रकाश आणि उष्णताही प्राप्त होईल आणि आपले स्वास्थ्य सुधारून आपण सुखाने आपली सर्व कामं करू शकू. सूर्य भगवान फारच दयाळू आहे. त्याची कृपा झाली तर अपलं सगळं जीवन उजळेल!"

ही सूचना तर सर्वांना खूप आवडली; पण सूर्याला हे निवेदन करण्यासाठी जाणार कोण–हा प्रश्नच होता!

साठ वर्षांचा एक वृद्ध म्हणाला–"मुलांनो, मी तर आता म्हातारा झालोय. माझा तसा तुमच्यापैकी कोणलाच कसला उपयोग नाही. पण माझ्या पायात अजून भरपूर ताकद आहे. मी सूर्याला भेटून हे काम यशस्वी करून परत येईन. माझ्या बद्दल तुम्ही कसली ही काळजी करू नका."

यावर एक तरूण बोलला–"आजोबा, हे काम म्हाताऱ्या माणसाच्या हातून पुरं होणार नाही. सूर्यापर्यंत पोचायलाच किती काळ लागेल हे आपल्यापैकी कोणाला ठाऊक नाही. तेव्हा मी आत्ताच या कामाला निघतो. वाटेत कसल्याही अडचणी आल्या तरी मी त्यांवर मात करू शकेन.

हे ऐकून एक लहान मुलगा म्हणाला–"ही फार लांबची सफर असावी. प्रवासाला बहुधा अनेक वर्षं लागतील. मला या कामाला पाठवलं, तर म्हातारा होण्यापूर्वी मी सूर्यापर्यंत पोचू शकेन. आत्ता तर माझं वय केवळ दहाच वर्षांचं आहे. तुमच्यापैकी कोणीच ही दूरची यात्रा पुरी करू शकणार नाही."

मुलाचे हे बोलणे ऐकून सर्वांना वाटले, कि याच्या बोलण्यात तथ्यांश आहे.

इतक्यात त्या गर्दीतून वीस वर्षांची एक तरुणी पुढे आली. ती म्हणाली–"माझं बोलणं सर्वांनी नीट ऐकून घ्या. खरी गोष्ट आपणा कोणाच्याच नीट लक्षात आलेली दिसत नाही. हे काम एका पिढीच्याने पुरे होणारे नव्हे. तुम्ही मला जाऊ द्या. मी कोणत्याही परिस्थितीत स्वत: सूर्यापर्यंत पोचू शकणार नाही. पण, कमीत कम वाटेतच जन्म घेणारा माझा मुलगा काही दिवसांनी ही संधी साधू शकेल."

त्या तरुणीचे नाव होते उषा! तिचे म्हणणे सर्वांनी मानले. यात्रेला निघण्यापूर्वी तिने सांगितले–"मी ज्या दिशेने जात आहे, त्या दिशेकडे सर्वांनी नीट लक्ष ठेवा. हे काम जेव्हा पूर्ण होईल, तेव्हा मी जाळ



२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट

करीन किंवा ते काम मी आपल्या मुलाकडून करवीन. तो जाळ दिसला की तुम्हा सर्वांना कळेल की सूर्यभगवान आपणावर प्रसन्न झाले आहेत."

नंतर उषा एका दिशेने सरळ पुढे जात राहिली आणि तिने आठ महिने अशीच यात्रा केली. अन् एक दिवस वाटेतच तिने एका मुलाला जन्म दिला. नंतर मुलाला घेऊन ती पुढे जात राहिली.

उषाला निघून आता सत्तर वर्षे झाली. ती अतिशय म्हातारी झाली. एके दिवशी ती आपल्या मुलाला म्हणाली–"बाळा, आता मी यापुढे चालू शकणार नाही. उरलेला प्रवास तू एकट्यानेच पुरा कर. सूर्याचा अनुग्रह प्राप्त झाल्याबरोबर मोठा जाळ कर. तो पाहून आपले लोक आनंदित होतील बघ."

उषाने सांगितलेल्या दिशेकडे जाळ दिसेल म्हणून सर्व लोक इतकी वर्षे डोळे लावून बसले होते. ती निघाल्यापासून शंभर वर्षांनी एक दिवस त्यांना एक लाल असा प्रकाश दिसला. मोठ्या आनन्दाने लोक ओरडू लागले–"अरे पहा पहा, तीच आपली उषा! काम पूर्ण झालं आहे! आता आपल्यासाठी सूर्योदय होईल." असे म्हणून लोक लगेच आपापल्या कामाला लागले. थोड्याच वेळाने सूर्य उदित झाला आणि त्याने जनतेला प्रकाश, उष्णता आणि स्वास्थ्य प्रदान केले, जनतेला सुख लाभले.

आजही एकादे काम करायचे असले तर लोक उषेसाठी त्याच दिशेकडे पहातात. तीच पूर्व दिशा! उषा दिसताच लोक कामाला लागतात. सूर्य उगवेपर्यंत वाट पहात नाहीत!

याशिवाय उषेपासून लोक आणखीही एक धडा शिकले आहेत–ती अशी की मानवाला एकादे महान कार्य साधायचे असेल तर ते एकाच व्यक्तीकडून, एकाच पिढीत पूर्ण होईल अशी अपेक्षा करू नये. अनेक पिढ्यांपर्यंत मन लावून व दृढतेने अशी कामे पूर्ण करावी लागतात.



## झाडावर चढणारे खेकडे



रॉबर क्रॉब (बर्गस लाटो) नावाचे खेकडे नारळ खाण्यासाठी झाडावर चढून जातात!

सर्व पक्ष्यात काटेरी शेपूट असणारा पपीहा फार वेगाने उडतो. तासी १०६.७५ मैलांच्या गतीने तो उडू शकतो.



## प्रचंड वेगाने उडणारा पक्षी

## बर्फापासून संरक्षण

उंच उंच डोंगरावर कोफूट (रानस्कुलस ग्लासियालिस) नावाची सुन्दर फुले उमललेली दिसतात. या फुळांचा मकरंद हिम-प्रतिकाराचे काम करून त्यांचे संरक्षण करतो.













# IMMUNIZATION AN ASSURANCE OF GOOD HEALTH TO CHILDREN

VACCINATIONS When and How Many

| Age to Start Vaccination | Name of Vaccine | Name of Disease | How Many Times |
|---|---|---|---|
| Birth | **BCG** | **Tuberculosis** | Once |
| 6 weeks | **Polio** | **Polio** | Three times with intervals of at least one month |
| 6 weeks | DPT | **Diphtheria Pertussis (Whooping Cough) Tetanus** | Three times with intervals of at least one month |
| 9 months | **Measles** | **Measles** | Once |

**Babies should receive all vaccinations by the time they are twelve months old.**



Pregnant women should get themselves vaccinated against Tetanus (TT) twice—in an interval of at least one month—during the later stages of pregnancy.



# देवीच्या साड्या

एका जवाहिऱ्याकडे गोवर्धन नावाचा एक नोकर होता. काही दिवसांनंतर एकाएकी त्याची नोकरी सुटली. त्याच्या मालकाने व्यापारात लाखो रुपये कमवले. तरी पण त्याच्या मनात समुद्री व्यापार करायची फार दिवसांची इच्छा होती. म्हणून एके दिवशी तो सहपरिवार आपलं गाव सोडून निघाला.

घर सोडून निघते वेळी व्यापाऱ्याने गोवर्धनच्या हाती एक हजार रुपये दिले नि म्हणाला–" हे बघ गोवर्धन, खूप दिवस तू माझ्या जवळ इमानदारीने काम केलंस, म्हणून मी तुला ही रक्कम भेटीदाखल देत आहे. आता आपल्या कुटुंबाचं पालन-पोषण करण्यासाठी तू दुसरं काही तरी कर."

नोकरी सुटल्यामुळे गोवर्धन निराश होऊन घरी आला नि बायकोला सर्व हकिगत सांगितली. नवऱ्याचं सान्त्वन करीत बायको गोमती म्हणाली–" जे काही झालं, त्याच्या बद्दल काळजी करीत बसून आता काय फायदा? तुम्हाला एक हजार रुपये मिळालेले आहेत. त्या भांडवलातून साड्यांचा व्यापार सुरु करा."

"तुम्ही सोमपूरला जाऊन चांगल्या पक्क्या रंगाच्या साड्या खरेदी करून आणा. मी त्यांवर कशीदा-काम करीन. चांगल्या किंमतीला या साड्या विकल्या जातील अशी मला खात्री आहे. आपण त्या साड्यांना एक छान नाव देऊं."

बायकोने सुचवल्याप्रमाणे एक आठवड्यात गोवर्धनने साड्या खरेदी करून आणल्या. गोमतीने त्या साड्यांवर छान कशिदा काम केले.

या नवीन प्रकारच्या साड्यांना एक सुंदर नवीन नाव देण्याचा गोमतीने विचार केला. तिने पुष्कळ नावांची कल्पना केली,



पण त्यातील एक ही तिला आवडले नाही.

साड्यांचं गाठोडं बांधून गोमती म्हणाली– "बरं का, मी लवकरच या साड्यांसाठी एक नवे नाव शोधून काढीन. तुम्ही या साड्या शहरात घेऊन जा नि लोकांना दाखवा. हातो हात विकल्या जातील याबाबत मला खात्री आहे!"

गोवर्धन साड्या घेऊन शहरात पोचला. दाखवल्यावर मोठ्या जिज्ञासेने लोकांनी साड्या पाहिल्या, पण कोणी खरेदी मात्र केल्या नाहीत. कारण त्यांना अशी भीति वाटली की धुतल्यावर हे कशीदाकाम दिसते तसे राहणार नाही, नि मग साड्या आकर्षक राहणार नाहीत. संध्याकाळ पर्यंत गोवर्धनने ठिकठिकाणी साड्या दाखवल्या, पण त्याची एक ही साडी कोणी खरेदी केली नाही. शेवटी चिडून तो परत आपल्या गावाकडे यायला निघाला.

गोवर्धन आपल्या गावाच्या अलीकडच्या गावी पोचला तोपर्यंत अंधार पडला. तो दमला होता आणि पुढे चालणं त्याला आता कठीण वाटू लागलं. म्हणून थोडी विश्रांती घेण्यासाठी तो जवळच्या एका देवीच्या देवळाच्या चबुतऱ्यावर जाऊन बसला.

अर्धा तास विश्रांति घेतल्यावर गोवर्धन चबुतऱ्यावरून उतरला आणि साड्यांचं गाठोडं डोक्यावर घेणार इतक्यात देवी प्रत्यक्ष पुढे येऊन उभी राहिली नि म्हणाली– "तुझ्या गाठोड्यात तर छान छान साड्या दिसताहेत!"

क्षण भर गोवर्धन आश्चर्यचकित झाला. नंतर तो नम्रतापूर्वक देवीला म्हणाला– "होय देवीजी, साड्या तर सुंदर आहेत. या विकण्यासाठीं मी शहरात गेलो होतो. पण माझं दुर्भाग्य! एक ही साडी विकली गेली नाही."

"असं होय? मी पाहू का तुझ्या साड्या?" देवीने विचारले.

गोवर्धनने गाठोडं उघडलं आणि देवीला एक-एक साडी दाखवू लागला.



"हे बघ, हा रंग मला खूप आवडला. या साडीवर काढलेला कशीदा फारच छान आहे. ही जरीची साडी तर फारच सुरेख आहे!" असं म्हणत देवीने सर्व साड्या एका बाजूला ठेवून घेतल्या!

"देवीजी, आपण असं का म्हणता? भक्त लोक तर तुम्हाला एकाहून एक सरस साड्या अर्पण करीत असतात ना?" गोवर्धनने प्रश्न विचारला.

"भक्त-मंडळी ज्या साड्या देतात त्यापैकी छान छान साड्या तर पुजाऱ्याची भांडखोर बायको स्वतःसाठी ठेवून घेते. त्यामुळे पुजारी निरुपायास्तव हिणकस साड्या मला नेसवतो. मंदिराचे विश्वस्त पुजाऱ्याच्या बायकोचे नातेवाईक आहेत, म्हणून पुजाऱ्यावर अंध-विश्वास ठेवून त्यांनी मंदिराची जबाबदारी पुजाऱ्यावर सोपवली आहे!" देवीने गोवर्धनला समजाऊन सांगितलं.

गोवर्धनने देवीला नम्रपणे नमस्कार केला आणि म्हणाला–"देवीजी, आपण माझ्या साड्यांचा स्वीकार केला, हे माझं केवढं भाग्य!" असं म्हणून गोवर्धन तिथून निघाला.

"एक, जरा थांब. साड्यांची किंमत घ्यायचं विसरलास वाटतं? तू उद्या सकाळी विश्वस्तांच्या घरी जा, नि त्यांना सांग–देवीजींनी माझ्याकडून दोन हजार रुपयांच्या साड्या खरेदी केल्या आहेत. त्यांची किंमत मला मिळावी. यात





तुझं नि माझं दोघांचं ही हित आहे."
देवीनं सांगितलं

यानंतर गोवर्धन प्रसन्न अंतःकरणाने आपल्या घरीं पोचला. सर्व हकिगत ऐकून गोमती खुश झाली. त्या रात्री पति-पत्नि रात्र भर जागतच राहिले.

सकाळ होताच गोवर्धन मंदिराच्या विश्वस्तांच्या घरी पोचला, आणि देवीने सांगितल्या प्रमाणे सर्व निवेदन केले.

विश्वस्ताने एकदा गोवर्धनला नख-शिखान्त न्याहाळले नि रागा-रागाने म्हणाला—"तुला वेड तर नाही ना लागलं? देवी तुझ्याकडून साडया कशा खरेदी करील? खरोखरीच देवी तुझ्यापुढे प्रत्यक्ष आली काय? छट्, जा पळ इथून."

मंदस्मित करीत गोवर्धन म्हणाला—"महाराज, पुजाऱ्याच्या करणीमुळेच देवीजींना स्वतः साडया खरेदी कराव्या लागल्या! नाही तर काय करतील? कलियुगाचं महात्म्य म्हणायचं झालं."

हे उत्तर ऐकून विश्वस्त चिडला आणि त्याच क्षणी पुजाऱ्याच्या घरी जायला निघाला. पुजाऱ्याचं घर मंदिराजवळच होतं. गोवर्धन पण विश्वस्ताच्या मागे गेला.

सूर्य उगवला होता, तरी पण पुजारी गाढ झोपलेला होता. विश्वस्ताची हाक ऐकून पुजारी जागा झाला नि दार उघडून बाहेर आला.

विश्वस्तांनी गोवर्धन कडे पाहिलं आणि पुजाऱ्याला विचारलं—"हा एक साडयांचा व्यापारी आहे. याचं म्हणणं आहे की काल रात्री देवीजींनी याच्याकडून दोन हजार रुपये किमतीच्या साडया खरेदी केल्या आहेत. तुम्हाला हे सर्व माहीत आहे का?"

"देवीजींनी साडया खरेदी केल्या? शिव, शिव! काय हे पाप? हा कोणी तरी निढविलेला डाकू दिसतोय, नाही तर गावांतील रस्त्यांवरून भटकणारा एकादा वेडा असावा." रागा रागाने पुजारी ओरडला.

विश्वस्ताने चिडून गोवर्धन कडे पाहिलं आणि पुजाऱ्याला म्हणाला—"या गोष्टीचा निर्णय आताच्या आताच लागला पाहिजे. आताच चला नि मंदिराची दारं उघडा बरं!"

पुजाऱ्याने जाऊन मंदिराचे दार उघडले, आणि सर्व लोकांनी काय पाहिलं? देवीच्या पायापाशी साडयांचं गाठोडं पडलेलं आहे. देवीजींच्या अंगावर मात्र एक फाटकी साडी आहे.

विश्वस्ताने पुजाऱ्याकडे कठोर नजरेने पहात विचारले—"काल सायंकाळी मुलीची सासरी रवानगी करते वेळी मी देवीला जरीची रेशमी साडी अर्पण केली होती. तुम्ही रात्री ती साडी देवीला नेसवण्याबाबत कबूल केलं होतं. कुठं आहे ती साडी?"

पुजाऱ्याचा थरकाप झाला. लाजून त्याने मान खाली घातली. यावर गोवर्धन विश्वस्तांना म्हणाला—"महाराज, हा प्रश्न आपण पुजाऱ्याच्या बायकोला विचारायला हवा होता. आपण तो पुजाऱ्याला विचारीत आहात. ते याचं काय बरं उत्तर देणार?"

अमळ विचार केल्यावर विश्वस्तांच्या लक्षात आलं की पुजारी कसा गैर व्यवहार करीत आहे. विश्वस्तांनी त्याच क्षणी पुजाऱ्याला कामावरून दूर केले. आणि गोवर्धनला दोन हजार रुपये देऊन रवाना केले. ही सर्व वार्ता गावात आणि आसपास पसरायला फार काळ लागला नाही. लोकांच्या झुंडीच्या झुंडी देवीच्या मंदिराकडे आल्या आणि त्यांनी देवीचीं पूजा-अर्चना केली. काही स्त्रिया गोवर्धनच्या घरी गेल्या आणि 'आम्हाला देवीच्या साडया पाहिजेत!' असं म्हणून त्यांनी साडयांची मागणी केली.

गोमतीला अत्यंत आनंद झाला. ती गोवर्धनला म्हणाली—"आपल्या साडयांना नाव देण्याचा प्रश्न कसा आपोआप छान सुटला! लोकांनीच साडयांचं नामकरण केलं—"देवीच्या साडया!" आपण भरपूर मेहनत करणारी माणसं आहोत. देवीच्या कृपेने आता आपल्याला कशाची ही कमतरता पडणार नाहीं."



# परीक्षा

मुकुन्द नावाचा तरुण आपल्या घरासाठी जरूर असणाऱ्या वस्तु खरेदी करण्यासाठी एका दुकानात गेला. तेथे लोकांची गर्दी होती. ती सर्व गिऱ्हाइके जाईपर्यंत मुकुन्द तेथेच थांबला आणि आपली पाळी आल्यावर दुकानदाराला त्याने यादी दिली. आणि दुकानदाराला म्हणाला–"या यादीप्रमाणें सर्व पदार्थ मला बांधून द्या."

दुकानदाराने थोड्याच वेळात त्याला सर्व वस्तु बांधून दिल्या आणि त्यांची एकूण किंमत सांगितली. मुकुन्दने त्याला पैसे दिले. आपण दिलेल्या सर्व वस्तूंची किंमत घेऊन दुकानदाराने बाकीचे पैसे परत दिले.

पैसे मोजून पाहिले तेव्हा मुकुन्दला आश्चर्य वाटले, कारण दुकानदाराने त्याला चुकून दहा रुपये जास्त दिले होते. "पैशांच्या बाबतीत जरा सावध असायला हवं पैशांच्या देण्या-घेण्यात चूक झाली तर व्यापाऱ्याचं तरी नुकसान होतं, अथवा ग्राहकाचं तरी." इतके बोलून तो जायला निघाला.

पण दुकानदार त्याला थांबवत म्हणाला–"तुम्हीही पैसे देताना मला शंभरची एक नोट अधिक दिली होती. जे लोक पैशांबाबत बेपर्वा असतात, त्यांच्या हातून अशा चुका होतात. असे पैसे त्यांना परत देण्यापेक्षा एकाद्या गरीबाला दान करणं अधिक चांगलं. असा विचार करून मी तुमची परीक्षा घेतली. मी तुम्हाला जे दहा रुपये जास्त दिले होते, ते घेऊन तुम्ही चालू लागला असतात, तर तुमचे शंभर मी तुम्हाला नक्कीच परत दिले नसते. पण आता तुमच्या प्रामाणिकपणाबद्दल मला आनन्द वाटला. हे घ्या तुमचे शंभर रुपये." असे म्हणून दुकानदाराने मुकुन्दला शंभरची नोट देऊन टाकली.





# डाकू युवराज

[ ६ ]

[सेनापती वीरसिंहाने सुमेध राज्याचे सिंहासन बळकावले. एका तरुणाने त्याला राजा व राजपरिवार यांच्याबद्दल माहिती विचारली, तेव्हा त्याच्या शिपायांनी त्या तरुणाला कैद केले. वृद्ध मन्त्र्याने वीरसिंहाला राजा म्हणून मान्यता दिली नाही, म्हणून त्याने मन्त्र्याची हत्या करण्याची व्यवस्था केली; एका अज्ञात वीराने मन्त्र्याचे प्राण वाचवले. पुढे वाचा...]

दुसऱ्या दिवशी सूर्योदयाच्या वेळी राजोद्यानात वीरसिंह राजा शान्तिदेवच्या चालण्याचे अनुकरण करीत फिरत होता. तरीही शान्तिदेवच्या चालण्याचा डौल त्याला साधत नव्हता. सूर्योदयाच्या वेळी निसर्ग सौन्दर्याचा आस्वाद घेत फिरण्यात राजा शान्तिदेवला अतिशय आनन्द वाटे. तो निसर्गाचा पुजारी होता, अन् त्याच्या मनात कोणत्याही प्रकारच्या भीतीला थारा नसे. यामुळेच त्याच्या चालीत एक प्रकारचे गांभीर्य आणि पूर्णत्व निदर्शनास येई. परंतु वीरसिंहाला निसर्गाचे प्रेम नव्हते. निसर्गाचेच काय, पण स्वतःला सोडून दुसऱ्या कोणाबद्दलच त्याच्या मनात प्रेम नव्हते. शिवाय त्याच्या मनात कायम भय असे की केव्हा, कोणत्या दिशेने संकट उपस्थित होईल, याचा काय नेम! शान्तिदेवला तो मारू शकला नव्हता, त्याचे काय



बरे झाले असेल? राज्यभर त्याला विरोध करणारे किती बरे लोक असतील? ते सर्व एक होऊन आपल्याविरुद्ध एकादे कारस्थान तर करीत नसतील ना? अशा अनेक भेडसावणाऱ्या प्रश्नांनी तो मनोमय व्याकुळ झालेला असे. अनेक प्रकारच्या चिन्तांनी ग्रस्त झालेल्या वीरसिंहाला रात्री नीट झोप लागत नसे. तो मध्यरात्रीपर्यंत अनेक दुःस्वप्ने पहात राही. मनातल्या मनात तो नेहमी घाबरलेला असे. यामुळेच त्याच्या चालीत स्थैर्य अन् आत्मविश्वास दिसत नसे.

"महाप्रभु!" कोतवालाने वीरसिंहाच्या जवळ येऊन हाक मारली. कोतवाल जरा घाबरलेलाच दिसत होता.

"काय झालं?" वीरसिंहाने विचारले.

"प्रभु! नेमकं नको ते घडलं आहे. जे काही घडलं त्याचं अत्यंत दुःख आहे मला! पण नाइलाज झाला प्रभु!" कोतवाल उत्तरला.

"झालं काय? नीट स्पष्ट सांग ना! काय झालं ते स्पष्ट शब्दात नीट वर्णन करून सांग काय झालं ते." वीरसिंहाने गरजत विचारले.

चोहीकडे चौकसपणे पाहून, आसपास कोणी नसल्याची खात्री करून घेत कोतवाल म्हणाला—"वृद्ध मन्त्री, शिपायांच्या तावडी-तून निसटून पळून गेला आहे."

"काय? पळून गेला? म्हणजे नक्कीच तू या कामाला चांगल्या समर्थ लोकांची नेमणूक केली नव्हतीस; असंच ना? नाहीतर तो म्हातारा सुटलाच कसा असता? कोणत्या कामावर कोणाची नेमणूक करावी हे तुझ्या लक्षात आलं नाही! अशीच कामं करणार का इथून पुढं तूं?" वीरसिंहाच्या तळपायाची आग मस्तकाला पोचली.

"हे सांगायलाही शिपायांच्या पैकी कोणी जिवन्त नाही. ते सर्व मारले गेले आहेत." मान खाली घालत कोतवाल म्हणाला.

"छीं, छी! तू अगदीच भित्र्या लोकांना नेमलंस या कामावर!" वीरसिंह गुरकावला.



"प्रभु! आपण क्षमा करावी. खरं काय घडलं हे मला माहीत नाही. पण सकाळी नगरसीमेजवळ तीन्ही शिपायांची प्रेतं पडलेली होती. एक गोष्ट मात्र नक्कीच, की आपल्या वृद्ध मन्त्र्याने एकाच वेळी तीन वीर योद्धांना स्वतः मारले असेल ही विश्वास ठेवण्यायोग्य गोष्ट नव्हे. दुसऱ्याच कोणाचं तरी हे काम असलं पाहिजे."

"मग कोणी केलं असेल सांग पाहू!" वीरसिंहाने विचारले.

"तेच रहस्य उकलत नाहीय. त्याचा पत्ता लावण्यासाठी मी गुप्त हेर नेमले आहेत. ते चारी दिशांना रवाना झाले आहेत. कसून तपास करण्याचं काम चालू आहे." कोतवालाने सांगितले.

कोतवाल थोडा वेळ गप्प राहिला. वीरसिंह मुठी आपटत म्हणाला—"हा धोका आपल्याला मुळापासून उपटायला हवा. हे असंच चालू दिलं तर आपल्याच प्राणांवर बेतेल. मला तर वाटतं की आपल्या-विरुद्ध काही कारस्थान चालू असलं पाहिजे. कारस्थान करणारे सर्वजण एक होऊन आपल्याविरुद्ध काही हालचाल करण्या-पूर्वीच आपल्याला त्यांच्यावर हल्ला करायला हवा. अरे हां!...काल आपल्या शिपायांकडे शान्तिदेवबद्दल चौकशी करणारा



तो तरुण कुठे आहे? तो सुद्धा या कारस्थान करणाऱ्यांपैकीच असला पाहिजे."

"प्रभु, त्या तरुणाचं नाव आहे वसन्त, पण तो काही कारस्थानं करणाऱ्यांपैकी असावा असं वाटत नाही. आपण राज्य करत आहात यालाच फक्त त्याचा विरोध आहे, असं वाटतं." कोतवाल म्हणाला.

"उगीच काही तरी बोलू नको. तो जर कारस्थानी नसेल तर मला आव्हान करून विरोध करण्याची हिम्मत झालीच कशी त्याला? त्याचा चांगला छळ करा म्हणजे तो सत्य बरोबर ओकेल की नाही पहा." वीरसिंहाने आज्ञा दिली.

"स्वामी, आम्ही त्याला अनेक प्रकारे छळलं, पण काहीही उपयोग झाला नाही त्याचा!" कोतवालाने आपली बाजू मांडली.

"तर मग त्याचा तावडतोब वध करा. नगराच्या सर्व प्रमुख रस्त्यांनी त्याला फरपटत ओढून न्या. सर्वांना कळू दे, की शासनाच्या विरुद्ध आन्दोलन करण्याचा कसा भयंकर परिणाम होतो. त्या तरुणाला सार्वजनिक ठिकाणी फाशी द्या म्हणजे ते पाहून जनतेचा थरकाप होईल." वीरसिंहाने फरमावले.

वीरसिंहाची आज्ञा घेऊन कोतवाल तेथून निघून गेला.

तावडतोब दवंडी पिटवण्यात आली की, वसन्तला फाशीची शिक्षा सुनावण्यात आली आहे. नगराजवळीलच एका मैदानात फाशीची व्यवस्था करण्यात आली होती.

त्यां दिवशी दुपारीच वसन्तला तुरुंगातून काढून प्रमुख रस्त्यांवरून त्याची धिंड काढली गेली.

त्यावेळी नगरातल्या लोकांचे लक्ष वेधून घेण्यासाठी कोतवाल भडक रंगाचा विचित्र पोशाख घालून एका मजबूत अरबी घोड्यावर बसून त्या मिरवणुकीपुढे राहून—"बाजूला व्हा....बाजूला व्हा." असे ओरडत होता. वसन्तला दिल्या जाणाऱ्या मृत्युदण्डामुळे प्रजा भयभीत न झाली तरी हरकत नाही, पण आपला मोठेपणा पाहून प्रजेने आपली वाहवा करावी—असे त्याला वाटत होते. पण अचानक त्याच वेळी दाट धुके पसरले आणि जनता त्याला स्पष्टपणे पाहूही शकली नाही; यामुळे तो फारच निराश झाला.

कोतवाल बसला होता त्या घोड्याच्या मागे मागे वसन्त, अन् त्याच्या दोन्ही बाजूंना दोन शिपाई चालत होते. या सर्वांच्या मागून सशस्त्र सैनिक चालत होते. वसन्त चेहऱ्यावर कोणताच भाव न दर्शवता गंभीरपणे पावले टाकत होता.

तसे पाहता, रस्त्यात लोकांची किंवा इतर कसलीच अडचण नव्हती, तरीही केवळ प्रजेला आकृष्ट करण्यासाठीच कोतवाल सारखा सारखा "बाजूला व्हा." असे ओरडत होता.

इतक्यात अचानक कोणीतरी कोतवालाला घोड्यावरून ढकलून दिले आणि तो धाडकन् खाली कोसळून हातपाय झाडू लागला. दुसऱ्याच क्षणी विजेच्या वेगाने वसन्तच्या हाताचे बन्धन त्याने तलवारीने कापून टाकले!

वसन्तने मागे वळून पाहिले, तो एक बुरखाधारी वीर त्याला म्हणत होता—"चटकन् माझ्यामागे घोड्यावर बैस." इतके बोलून त्या योद्ध्याने आपल्या घोड्यावर उडी मारली आणि लगाम पकडला. पाठोपाठ वसन्तही उडी मारून त्याच्या मागे बसला अन् घोडा वायुवेगाने तेथून नाहीसा झाला. शिपाई भय व आश्चर्याने जागीच उभे राहिले. पण कोतवालाचे कण्हणे







ऐकून ते भानावर आले. जवळ जाऊन त्यांनी कोतवालाला हळूच उठवून उभे केले.

"मला घोड्यावरून कोणी पाडलं? घोडा कुठंय माझा?" घाबरल्या स्वरात कोतवालाने विचारले.

"घोडा पळून गेला." शिपाई उत्तरले.

"काय? पळून गेला?" कोतवालाने आश्चर्य प्रकट केले.

"हं! अन् कैदीही सुटून गेलाय." दुसऱ्या एका शिपायाने माहिती पुरवली.

"कैदीही पळून गेला? झालंच, म्हणजे माझाही मृत्यूच ओढवला म्हणायचा!" असे म्हणत आपली कंबर दाबत वेदनेने कोतवाल विव्हळू लागला. इकडे बुरखाधारी व्यक्तीने अरण्याच्या मध्यभागी पोचून एका गुहेच्या तोंडाशी आपला घोडा थांबवला.

दोघेही घोड्यावरून खाली उतरले.

"आपण वेळेवर पोचला नसतात तर एव्हाना माझे प्राण उडून गेले असते." हात जोडून कृतज्ञता दाखवत वसन्तने बुरखाधारी वीराला नमस्कार केला.

"तू म्हणतोस ते बरोबर आहे, पण मृत्युदण्ड दिला जाण्याइतका मोठा अपराध तरी कोणता घडला तुझ्या हातून?" त्या वीराने विचारले.

"आमचे महाराज शान्तिदेव कुठे आहेत अन् रातोरात सेनापति राजा कसा बनला, हेच प्रश्न मी दवंडीवाल्याला विचारले. बस! माझ्या प्रश्नांना काहीही उत्तर न देताच शिपायांनी मला कैद केले. नन्तर मी असं ऐकलं की रात्री कोणी अज्ञात व्यक्तींनी तीन शिपाई मारून टाकले आहेत. म्हणून माझ्यावर आरोप केला गेला की त्या शिपायांचा वध करणाऱ्यांशी माझा संबंध असला पाहिजे, आणि वीर-सिंहाला गादीवरून दूर करण्यासाठी मी काही कारस्थान रचत आहे. हा अपराध माझ्यावर लादून मला मृत्युदण्ड सुनावला गेला." वसन्तने सांगितले.

"असं? बरं ते असो. पण राजा शान्तिदेवचं काही ही झालं असलं तरी

तुझं काय बिघडलं त्यात? त्याचा का इतका पुळका?" बुरखेवाल्याने विचारले.

"वा! असं कसं? शान्तिदेव महाराज आम्हा प्रजाजनांना आपल्या पित्यासारखे वाटतात. अतिशय दयाळू आहेत ते. अशा त्या धर्मात्म्यावर काय प्रसंग ओढवला आहे हे जाणून घेणं आमचं कर्तव्यच नाही का? शिवाय हा वीरसिंह अतिशय दुष्ट माणूस आहे. हाती अधिकार आल्याबरोबर घमेंडीत येऊन जनतेचा छळ आरंभला आहे त्याने?" वसन्त म्हणाला.

"तुझं म्हणणं बरोबर आहे वसन्त! त्या दुष्टाचा काटा काढायला हवा आपल्याला! एकट्याने नव्हे, सर्व शत्रूंना आपण आपल्याकडे वळवून घ्यायला हवं." गम्भीर आवाजात तो वीर म्हणाला.

"मग काल रात्रीं त्या शिपायांचा वध आपणच केला काय?" वसन्तने विचारले.

"होय, पण त्यांच्या वध करायचा माझा उद्देश नव्हता. त्यावेळी ते वृद्ध मन्त्र्याचा वध करणार होते. मन्त्र्याला वाचवायचं, तर त्या शिपायांचा वध करणं भाग होतं. दुसरा उपायच नसल्याने मला तसं करावं लागलं. नाहीतर अधिकाऱ्यांचं आज्ञापालन करणाऱ्या बिचाऱ्या अबोध व्यक्तींचा वध करणं मला अजिबात पसन्त नाही. आज कुणाचेही प्राण-हरण न करता मी तुला वाचवू शकलो याचा मला फार आनन्द वाटला. भित्री माणसंच अशा अबोध अन् असहाय माणसांवर तलवार चालवतात. आपण एक महान् कार्य करायला कटिबद्ध झालो आहोत, तेव्हा आपल्याला साहसपूर्वक लढलं पाहिजे." असे म्हणून बुरखाधारी वीर गुहेत जाऊन काही गोड फळे घेऊन आला. वसन्तला ती देऊन त्याने अरण्यातून अमृतपुरीला जाण्याचा रस्ता समजावून सांगितला, आणि म्हटले—"तू आता अमृतपुरीला जा. तेथे नगराच्या पश्चिम सीमेवरील महाकालीच्या मन्दिरात जा. तिथेच भेटू आपण यानन्तर." इतके सांगून तो बुरखाधारी योद्धा घोड्यावर स्वार होऊन तेथून निघून गेला. (क्रमशः)





# बहुरूपी

दृढनिश्चयी राजा विक्रमादित्य त्या झाडाकडे परत आला, झाडाच्या फान्दीला लटकणारे प्रेत खाली काढून त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाकडे चालू लागला. शवात रहाणारा वेताळ त्याला म्हणाला—"राजा, एका देशाचा राजा असूनही, आपले सिंहासन तात्पुरते दुसऱ्या एकाद्या राजावर सोपवून, तू स्मशानात अशा तऱ्हेने आपला वेळ घालवत असावास. तो तुझ्याशी दगाफटका करून तुझ्या अनुपस्थितीचा फायदा घेऊ शकेल, याचं उदाहरण म्हणून मी तुला राजा नन्दीवर्धनची गोष्ट सांगतो."

मणिमेखला देशचा राजा धर्मचन्द्र म्हातारा झाला, तेव्हा राज्य आपला पुत्र नन्दीवर्धन याच्यावर सोपवून आपण विश्रान्ति घ्यावी असे त्याने ठरवले.

## वेताळाच्या गोष्टी



पण आपल्या पित्याचा हा निर्णय नन्दीवर्धनला मात्र काहीसा गैरसोयीचा वाटला. आतापर्यंत जास्तीत जास्त वेळ एकाकी राहून तो भविष्यात जनकल्याणासाठी काय काय योजना राबवता येतील यासंबंधी विचार करत असे. आता नाइलाज होऊन स्वत:ला राज्याभिषेक करवून घेण्यास त्याने संमति दिली. नन्दीवर्धनच्या राज्याभिषेकानंतर थोड्याच काळात राजा धर्मचन्द्र मृत्यु पावला. नन्दीवर्धन मोठ्या समर्थपणे राज्यकारभार करू लागला. परन्तु त्याला अनेकदा आपल्या एकाकी पूर्वायुष्याची आठवण होई व तेच जीवन यापेक्षा जास्त चांगले, असे त्याला वाटे.

एके दिवशी नन्दीवर्धन आपल्या विश्रामगृहात विश्रान्ति घेत असताना एक तरूण त्याला भेटण्यासाठी तेथे आला व म्हणाला–"महाराज, माझं नाव विश्वकर्म. वेषांतर करण्यात मी चांगला प्रवीण आहे. वाटलं तर माझी परीक्षा घेऊन आपण आपल्या दरबारात एकादी नोकरी द्यावी अशी माझी विनन्ति आहे."

नन्दीवर्धनलाही वाटले की या बहुरूप्याची परीक्षा घेऊन पहावी. तेव्हा त्याने शेजारील देशचा राजा सिंहभूपति, मणिमेखलाचा सेनापति विक्रम व मन्त्री सुबुद्धि यांची सोंगे घेऊन दाखवली. त्या त्या वेळी त्याने केलेला वेष, बोलण्याची-चालण्याची लकब वगैरे इतके हुबेहूब वठवले की ते पाहून राजाने आश्चर्याने तोंडात बोट घातले!

आता नन्दीवर्धनच्या आज्ञेवरून विश्वकर्मने खुद्द राजाचेच रूप धारण केले. त्याचे बोलणे-चालणे आणि एकूण रूप अगदी हुबेहूब स्वत:चेच पाहून राजा भान हरपून अवाक् झाला!

विश्वकर्मचे अभिनन्दन करीत नन्दीवर्धन त्याला म्हणाला–"तुझ्यासारखा कुशल माणूस माझ्या दरबारात राहिला तर माझे अहोभाग्यच म्हटले पाहिजे! तू थोडे दिवस इथेच रहा. तुझ्यासाठी एकादी चांगलीशी नोकरी पाहून देईन मी!"



खरा राजा एका खास महालात आपला वेळ काढत असतो ही गोष्ट प्रजेला कळून चुकली.

आपली जबाबदारी टाळून स्वच्छन्दपणे आपला वेळ घालवणाऱ्या नन्दीवर्धनपेक्षा विश्वकर्म हाच अधिक समर्थ आहे आणि पुढेही त्यानेच राज्याचा भार वहन करावा असे आन्दोलन प्रजा करू लागली.

आपल्या प्रजेसमोर आपली जी नाचक्की झाली त्याबद्दल नन्दीवर्धनला मनोमन फार दु:ख झाले. यावर तो विश्वकर्मला म्हणाला–"हे पहा विश्वकर्मा, जनतेत माझ्याबद्दल जो आदर होता, माझी जी कीर्ती पसरलेली होती, ती सर्व तुझ्यामुळे धुळीस मिळाली. तू जर असं वेषांतर केलं नसतंस तर हा अनर्थ झाला नसता."

"महाराज, आपला वेष धारण केल्यामुळेच जनतेत आपणाबद्दल असंतोष पसरला असं जर आपलं म्हणणं असेल तर, असंच म्हणावं लागेल की आपण पक्के स्वार्थी आहात." विश्वकर्म उत्तरला.

त्याचे हे बोलणे ऐकून नन्दीवर्धन रागावून म्हणाला–"जनतेचा क्रोध माझं काय बिघडवू शकणार आहे? त्यांच्या म्हणण्यावरून मी सिंहासनाचा त्याग करीन, अन् तू राजा बनशील हे शक्य आहे का?"

"महाराज, क्षमा करा मला. मी जे काही बोललो, त्याचा नीट शान्तिपूर्वक विचार करावा आपण!" विश्वकर्म बोलला.





त्याच्याबद्दल कसलाच संशय वगैरे आला नाही. जनतेच्या निनिराळ्या अडचणींवर आपले लक्ष केन्द्रित करून विश्वकर्मने थोड्याच दिवसात त्या दूर करण्याबद्दलच्या योजना बनवल्या अन् त्या अमलात आणण्यासाठी त्याने अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या. पूर्वीच ठरवून ठेवल्याप्रमाणे दोन महिन्यांनंतर नन्दीवर्धनच्या रूपातला विश्वकर्म नन्दीवर्धनला भेटायला गेला.

राजा नन्दीवर्धन त्याला म्हणाला—"आता काही वेळाकरता तू या खास महालातच रहा. मी स्वत: जरा बाहेर जाऊन तुझ्या राज्य-शासनाबद्दल काय जनमत आहे, हे पाहून येतो."

राजवाड्यात पोचलेल्या नन्दीवर्धनला भेटायला मन्त्री सुबुद्धि आला आणि म्हणू लागला—"महाराज, आज सकाळीच मी मी आपल्या गुप्त हेरांशी देशातल्या हालचालीबद्दल मंत्रणा केली. मला असं कळलं की आपण अलिकडे गेल्या दोन महिन्यात जे नवे निर्णय घेतले आहेत त्यांबद्दल जनता आपली खूप प्रशंसा करत आहे."

नन्तर नन्दीवर्धन आपल्या खास महालात गेला आणि विश्वकर्मला म्हणाला—"मी आणखी काही दिवस या खास महालात राहू इच्छितो, तू पहिल्याप्रमाणेच राज्य-कारभार संभाळत रहा तोपर्यंत."

आणखी चार महिने असेच निघून गेले. या अवधीत जनतेच्या उद्धारा संबंधीच्या निरनिराळ्या योजना राबवून विश्वकर्मने देशाची नेत्रदीपक प्रगति केली. नव्या धर्मशाळा त्याने बांधल्या, प्रत्येक गावात शाळा स्थापन केल्या, शेतीवाडी साठी नवे पाटबंधारे बनवून घेतले—या सर्वांमुळे देशभर राजाची खूप स्तुति केली जाऊ लागली.

परन्तु याच परिस्थितीत एक महत्वाची घटना घडली! ती अशी कि हल्ली राजा नन्दीवर्धन राज्य करत नसून त्याचे सोंग घेतलेला विश्वकर्म राज्य करत असतो, अन् खरा राजा एका खास महालात आपला वेळ काढत असतो ही गोष्ट प्रजेला कळून चुकली.

आपली जबाबदारी टाळून स्वच्छन्दपणे आपला वेळ घालवणाऱ्या नन्दीवर्धनपेक्षा विश्वकर्म हाच अधिक समर्थ आहे आणि पुढेही त्यानेच राज्याचा भार वहन करावा असे आन्दोलन प्रजा करू लागली.

आपल्या प्रजेसमोर आपली जी नाचक्की झाली त्याबद्दल नन्दीवर्धनला मनोमन फार दुःख झाले. यावर तो विश्वकर्मला म्हणाला—"हे पहा विश्वकर्मा, जनतेत माझ्याबद्दल जो आदर होता, माझी जी कीर्ती पसरलेली होती, ती सर्व तुझ्यामुळे धुळीस मिळाली. तू जर असं वेषांतर केलं नसतंस तर हा अनर्थ झाला नसता."

"महाराज, आपला वेष धारण केल्यामुळेच जनतेत आपणाबद्दल असंतोष पसरला असं जर आपलं म्हणणं असेल तर, असंच म्हणावं लागेल की आपण पक्के स्वार्थी आहात." विश्वकर्म उत्तरला.

त्याचे हे बोलणे ऐकून नन्दीवर्धन रागावून म्हणाला—"जनतेचा क्रोध माझं काय बिघडवू शकणार आहे? त्यांच्या म्हणण्यावरून मी सिंहासनाचा त्याग करीन, अन् तू राजा बनशील हे शक्य आहे का?"

"महाराज, क्षमा करा मला. मी जे काही बोललो, त्याचा नीट शान्तिपूर्वक विचार करावा आपण!" विश्वकर्म बोलला.





यानन्तर नन्दीवर्धन आपल्या राजवाड्यात गेला. पुढील कार्यक्रमाबद्दल खूप विचार करून त्याने एक निर्णय घेतला.

दुसऱ्या दिवशी राजा नन्दीवर्धनने साऱ्या राज्यात दवंडी पिटवली की देशातल्या सर्व प्रतिष्ठित व्यक्तींनी आणि नगरातल्या प्रमुख माणसांनीही मुख्य सभामंडपात हजर व्हावे.

त्या सर्व प्रमुख माणसांना संबोधित करून नन्दीवर्धन म्हणाला–"आपली जबाबदारी विसरून मी वागत असल्याचं जनतेचं मत आहे, असं मला कळून आलेलं आहे. जनतेचा निर्णय मानायचा असं मी ठरवलं आहे. आजपासून विश्वकर्मच राज्याचा भार सांभाळील."

राजाचे हे बोलणे ऐकून सर्वांनी स्वीकृतिसूचक टाळ्या वाजवल्या. यावर नन्दीवर्धन विश्वकर्मला म्हणाला–"जनतेचा अभिप्राय जाहीर झालेला आहे. आता तूच सिंहासनावर बैस."

ही गोष्ट मान्य न करता विश्वकर्मने सभासदांसमोर निवेदन केले की–"महाराजांनी आपली जबाबदारी टाळण्याचे वर्तन कधीही केलेले नाही. अलिकडे काही काळ मी ज्या योजना अमलात आणल्या त्या सर्व राजानेच आखलेल्या होत्या. राज्यकारभार करणं ही माझ्या शक्तिबाहेरची गोष्ट आहे. आपण सर्वांनी मला क्षमा करावी."

विश्वकर्मच्या तोंडचे हे बोलणे ऐकून सर्व सभासदांनी हर्षनाद केला–"महाराज नन्दीवर्धनचा विजय असो."

आता नन्दीवर्धन सभासदांना म्हणाला–"आपणा सर्वांना वाटत असेल की प्रत्यक्ष सिंहासन त्यागणारा हा विश्वकर्म किती थोर असला पाहिजे! तो किती योग्य माणूस आहे, हे आपण ओळखलंच असेल! म्हणूनच मी आजपासून त्याला माझा 'व्यक्तिगत सल्लागार' म्हणून नेमत आहे."

जनतेने या गोष्टीला आनन्दाने मान्यता दिली. सभा विसर्जित करून नन्दीवर्धन विश्वकर्मला बरोबर घेऊन खास महालात गेला. जाताना वाटेत विश्वकर्म राजाला म्हणाला–"महाराज, आपण फारच निस्वार्थी माणूस आहात."

ही गोष्ट सांगून वेताळाने विक्रमराजाला विचारले–"राजा, अगदी सहजपणे मिळणाऱ्या सिंहासनाचा विश्वकर्मने त्याग का केला? अशाकरता, की खरोखरच राज्यभार वाहणे त्याच्या शक्तिबाहेरचे होते? तो एकदा नन्दीवर्धला 'स्वार्थी' म्हणाला होता अन् दुसऱ्या वेळी तोच त्याला 'निस्वार्थी' म्हणाला–याचं कारण काय? या प्रश्नांची उत्तरं माहीत असूनही तू दिली नाहीस तर तुझ्या मस्तकाचे शतशः तुकडे होऊन पडतील."

यावर विक्रमादित्य उत्तरला–"हे तर शाबित झालं होतंच की विश्वकर्म राज्यशासनात अगदी दक्ष आहे. पण त्याबरोबरच तो अतिशय प्रामाणिक व स्वामीभक्तही होता. त्यामुळे 'राज्यकारभार करणं आपल्या शक्तिबाहेरचं आहे' असं खोटंच सांगून त्याने सिंहासनाचा त्याग केला. एका संदर्भात तो राजाला 'स्वार्थी' म्हणाला, ते अशाकरता की, खरोखर नन्दीवर्धनसमोर जी समस्या उत्पन्न झाली ती विश्वकर्मच्या वेषांतर करण्यामुळे नव्हे, तर स्वतःच्याच ग्रन्थ-पठनाच्या आवडीमुळे! केवळ ती आवड भागवण्यासाठीच राजा अज्ञातवासात गेला होता, या गोष्टीची चेतावणी विश्वकर्मने त्याला दिली. आता राहिला नन्दिवर्धनला पुन्हा 'निस्वार्थी' म्हणण्याचा प्रश्न! त्याचं कारण असं आहे की–काही महिनेपर्यंत राज्य कारभारासंबंधी सर्व रहस्यं समजून आलेल्या विश्वकर्मला कुठे बाहेर जाऊ न देता राजाने त्याला आपला 'व्यक्तिगत सल्लागार' बनवून आपल्या बुद्धिमत्तेची चुणूक दाखवली. यासाठीच विश्वकर्म राजाला निस्वार्थी म्हणाला."

राजाचा मौनभंग होताच वेताळ त्या प्रेतासह अदृश्य होऊन पहिल्या प्रमाणे त्याच झाडावर जाऊन लटकू लागला.

(कल्पित)



# स्वार्थ व परमार्थ

माणिकपुर नावाच्या गावात दोन प्रौढ माणसे गावात देऊळ बांधण्यासाठी लोकांकडून वर्गणी गोळा करू लागली. त्या गावातला भूषणसिंह नावाचा माणूस एक नंबरचा कंजूष होता. वर्गणीदारांच्या यादीत आपले नाव नाही हे त्याला फारच अपमानकारक वाटले.

एके दिवशी भूषणसिंह गावाकडे परतत असताना अचानक त्याला हे वर्गणी वसूल करणारे दोघजणं वाटेत भेटले. त्या दोघांना भूषणसिंहाने घरी बोलवले.

दुसऱ्या दिवशी सकाळी ते दोघे जेव्हा भूषणसिंहाच्या घरी पोचले, तेव्हा त्याने हसून त्यांचे स्वागत केले. पशुचिकित्सक शिवराजला आपल्या म्हशीच्या कान दाखवला.

म्हशीला तपासून तिच्या कानात कसलासा रस शिवराजने पिळला.

लक्ष्मणसिंहला उद्देशून भूषणसिंह म्हणाला–"लक्ष्मणसिंह, आपण चांगले वस्तुशास्त्रज्ञ आहात. माझ्या गायी-म्हशी बांधायला कुठे गोठा बांधावा हे सांगा बरं जरा!"

यावर लक्ष्मणसिंहने गोठा बांधायची एक जागा निश्चित करून नकाशा काढून दिला.

त्या दिवशी संध्याकाळी चावडीवर जमलेल्या लोकांसमोर शिवराज आणि लक्ष्मणसिंह गर्वाने बोलले–"ऐका लोकहो, भूषणसिंहासारख्या एक नंबरच्या कंजूष माणसाकडूनही आम्ही देवळासाठी पन्नास रुपये वर्गणी उपटली बरं का."

हे ऐकून सर्व लोकांना मोठे आश्चर्य वाटले. पण एका म्हाताऱ्या माणसाने शिवराजला विचारले–"कायरे, तु जेव्हा एकाद्या जनावरावर अशा प्रकारचा इलाज करायला जातोस, तेव्हा त्याची किती फी घेतोस?"

"वीस रुपये घेतो मी." शिवराज उत्तरला.

"आणि तू रे, असा नकाशा काढून दिलास तर किती घेतोस." म्हाताऱ्याने लक्ष्मणसिंहाला विचारले.

"मी कमीत कमी सव्वाशे रुपये तरी घेतोच." लक्ष्मणसिंहने सांगितले.

"ओहो, तर मग भूषणसिंहाने तुम्हाला वर्गणी देऊन आपला स्वार्थ अन् परमार्थ दोन्हीही साधलं की!" म्हातारा हसत म्हणाला.





# ज्ञानाचा खजिना

## तो कोण?

एके काळी एका ब्राह्मण तरुणाने आपल्या काही मित्रांसमवेत समुद्र-यात्रा करण्याचे साहस केले. कित्येक आठवडे त्यांनी नावांमधून जल-प्रवास केला. शेवटी त्यांनी एका द्वीपाचा पत्ता लावला. पण त्यांच्या नावा जेव्हा समुद्रकिनाऱ्याजवळ पोचल्या, तेव्हा त्यांना दिसले की तेथे एक सशस्त्र सैन्य उभे आहे. ब्राह्मणकुमाराने आपले धनुष्य सज्ज केले, पण त्याला एकही बाण चालवावा लागला नाही. कारण त्या तरुण स्त्रीने कोणतीच प्रतिक्रिया व्यक्त केली नाही. शेवटी ब्राह्मण तरुणाने समुद्रकिनाऱ्यावर पाऊल ठेवले आणि त्या तरुणीने एक सुंदर वस्त्र त्याला नजर केले. नंतर त्या दोघांनी विवाह केला. त्या ब्राह्मण-तरुणाने तेथे एका हिन्दू राज्याची स्थापना केली. ही घटना इ. स. १९७ मधील आहे.

या गोष्टीतील हा ब्राह्मण युवक कोण?

[पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. पाकिस्तानला हे नाव कोणी दिले?

२. हे नाव केव्हां दिले गेले?

३. या नव्या नावाचा काही अर्थ आहे काय?

४. बुद्धाचा जन्म लुम्बिनी येथे झाला होता. आज त्या भागाचे नाव काय आहे?

५. हे स्थान कसे ओळखले गेले?

[पान ३६ पहा]

# गांधार-तक्षशिला

आजच्या आपल्या देशाच्या नकाशात गांधार नावाचा प्रान्त दिसून येत नाही. तरीही आपल्या देशात असा कोणी माणूस नसेल, की ज्याला गान्धार देश माहीतच नाही.

आपल्या प्राचीन साहित्यातही जिथे-तिथे गांधार देशाबद्दल उल्लेख सापडतो. अंग, वंग, कलिंग आदि छप्पन राज्यांत गांधार ही एक प्रमुख राज्य आहे. धृतराष्ट्राची पत्नी गांधारी ही गांधार देशाची युवराज्ञी होती, यामुळेच तिचे नाव गांधारी पडले. गांधारीचा भाऊ शकुनी गांधार देशाचा राजा होता. कौरव-पांडवांच्या युद्धात शकुनीचा जो महत्त्वपूर्ण भाग आहे तो सर्वश्रुतच आहे.

सिंधु नदीच्या दोन्ही बाजूंना गांधार राज्य पसरलेले होते. तो प्रदेश आज पाकिस्तानात रावळपिंडी व पेशावर जिल्ह्यांच्या नावाने व्यवहारात आहे.




प्राचीन काळानंतरही गांधार राज्याचे वैभव तसेच राहिले. विशेषत: त्या राज्यातील तक्षशिला आणि पुष्कलावती ही नगरे उच्च शिक्षण, संस्कृति व व्यापारउदीम यांची महान् केन्द्रे बनून राहिली होती.

विश्वविख्यात तक्षशिला विश्वविद्यालयात जगद्विख्यात अशा अनेक बुद्धिमान लोकांनी आपला विद्याभ्यास केलेला होता. इ.स.पू. ५ व्या शतकात बिम्बिसारने मगध देशावर राज्य केले होते. त्याच्या दरबारात स्थान मिळालेला वैद्यकशास्त्रज्ञ जीवक, याने सात वर्षे तक्षशिला विश्वविद्यालयात आपले अध्ययन केले होते.

रावळपिंडीपासून ३० किलोमिटर अंतरावर असणाऱ्या सराय-कोला नामक रेल्वे स्टेशनच्या जवळ तक्षशिलेचे अवशेष सापडले आहेत.

गांधार राज्य काही काळपर्यंत पर्शियन साम्राज्यात समावलेले होते. या राज्याचा काही भाग ग्रीक लोकांनीही जिंकलेला होता. याच कारणामुळे त्या प्रदेशातील कला व शिल्पकला यांवर विदेशी प्रभाव पडलेला असल्याचे स्पष्टपणे दिसून येते. आजही गांधार कलांसाठी एक विशिष्ट स्थान प्राप्त झालेले आहे.

पर्वतमय प्रदेशात अधून मधून असणाऱ्या समतल प्रदेशात राहाणाऱ्या, आणि असामान्य धैर्य व साहस यांसाठी प्रसिद्ध असणाऱ्या पठाणांची मातृभूमि म्हणून पेशावर हे सिंहद्वार बनून राहिलेले आहे.

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. श्रीकृष्णाचा परिचय देणारे दोन प्रमुख ग्रंथ कोणते?

२. तीन निरनिराळ्या महत्वाच्या विषयांचा परिचय देणारी तीन शतके कोणत्या कवीने रचली?

३. त्या तीन शतकांची नावे कोणती?

४. त्या कवीचा जन्म कोठे झाला?

५. मिश्र देशाचा अत्यंत प्राचीन ग्रंथ कोणता?

६. हा ग्रंथ किती जुना आहे?

## उत्तरावली

**तो कोण?**

कांभोज. त्याने कांबोडिया देशाची स्थापना केली.

**तुम्हाला माहीत आहे?**

१. चौधरी रहमत अली.

२. १९३३ मधे.

३. पवित्र भूमि.

४. नेपाळ मधील स्थान लुम्मिण्डी.

५. सम्राट अशोकाने निर्माण केलेला शिला-स्तम्भ. तो आज ही तेथे आहे.

**साहित्य**

१. भागवत व महाभारत.

२. भर्तृहरि.

३. श्रृंगार शतक, वैराग्य शतक नि नीतिशतक.

४. उज्जयिनीत. त्याला उज्जयिनीचा युवराज म्हणतात.

५. मृतकांचा ग्रंथ.

६. याचा काही भाग ईसवी सन पूर्व ३२०० मध्ये विद्यमान होता.



# नकली सोनं

शिवपुरीत कनकदास नावाचा एक सामान्य गृहस्थ रहात असे. त्याला मोहनदास अन् कृष्णदास नावाचे दोन मुलगे आणि आणि राधाबाई नावाची एक मुलगी होती. वयात आल्यावर कनकदासने तीनही मुलांची लग्ने करून टाकली. तो मरेपर्यंत सर्वजण एकत्रच रहात असत. राधाबाईलाहीं त्याच गावात दिलेली होती.

कनकदासच्या मृत्यूनन्तर त्याच्या दोन्ही मुलांनी त्याची जी काही संपत्ति होती, ती आपसात सारखी-सारखी वाटून घेतली. आणि दोघे निरनिराळे राहू लागले. कनकदासची बायको सुगुणाबाई आपल्या दोन मुलांकडे पाळी-पाळीने राहू लागली.

सुरुवातीला सुगुणाबाईच्या सुना तिला आदराने वागवत असत; पण नन्तर हळूहळू घुसफुस सुरू झाली. त्याचे मुख्य कारण म्हणजे सुगुणाबाईजवळ दागिने किंवा पैसे वगैरे काहीच नव्हते. ती कधी आजारी पडली तर पैसे खर्च व्हायला नकोत म्हणून नीट इलाजही केला जात नसे तिच्यावर! तिच्या मुलांचे आपआपल्या बायकांपुढे काहीच चालत नसे. त्यामुळे थोड्याच दिवसांत ते दोघेही असे वागू लागले की जणू काही आपली आई आपल्याला भारच होऊन रहात आहे!

सुगुणाबाईला आता आपल्या मुलांकडे रहाणे कठीण झाले, म्हणून ती आपली मुलगी राधाबाई हिच्याकडे जाऊन राहू लागली. राधाबाईनेही काही दिवस आपल्या आईला चांगली वागणूक दिली, पण नंतर तीही आडून आडून घालून-पाडून बोलू लागली. ती टोमणा मारायची—"हं! इस्टेट वाटून घ्यायला तेवढे मुलगे, अन् पालन-पोषण करायला मात्र मुलगी! खासा न्याय आहे!"

अशोक आठवले

सुगुणाबाईलाही पटले, की मुलीचे बोलणे खरेच आहे. तेव्हा एक दिवस ती गावप्रमुखाकडे गेली आणि तिने त्याच्याजवळ आपल्या मुलांबद्दल तक्रार केली. या गावप्रमुखाला गावातले सर्वच लोक खूप मान देत असत. त्याने घेतलेल्या निर्णयामुळे सर्वांना बरोबर न्याय मिळतो असाच सर्वांचा विश्वास होता.

सुगुणाबाईशी तिच्या मुला-मुलींच्या कटु-व्यवहारामागचे कारण या प्रमुखाने बरोबर हेरले. मग त्याने तिला समजावले–"ताई, तू मुळीच चिन्ता करू नकोस. तुझ्या नवऱ्याने मरण्यापूर्वी काही दिवस अगोदर सोन्याचे काही दागिने ठेवलेली एक पेटी माझ्या हवाली केली होती. असे करण्यामागे त्याचा काय उद्देश होता, हे काही त्याने मला सांगितले नव्हते. आता मी तुझ्या मुलांशी या बाबत बोलेन. तो पर्यंत तू माझ्याच घरी रहा."

नंतर प्रमुखाने सुगुणाबाईच्या दोन्ही मुलांना व मुलीला बोलवून घेतले आणि त्यांना सांगितले–"सुगुणाबाईचं नीट पालनपोषण न करणं हा अन्याय आहे. ते करणं हे मुलांचे कर्तव्यच असते. तुम्ही तिची नीटपणे देखभाल केली नाहीत, तरीही सुखाने जगता येईल अशी तिची सोय आहे – हे नीट लक्षात ठेवा."

प्रमुखाचे हे बोलणे मुलांच्या लक्षात आले नाही. त्यांनी म्हटले–"काकाजी, आपल्या बोलण्याचा अर्थ आम्हाला नीट समजला नाही. जरा स्पष्टपणे सांगा ना!"

"गोष्ट अशी आहे, की कनकदासने आपल्या मृत्युसमयी सोन्याच्या दागिन्यांची एक पेटी माझ्या हाती देऊन ते दागिने तुम्हा दोघा भावांना अन् राधाबाईलाही सारखे सारखे वाटून द्यायला सांगितले होते. पण त्याबरोबरच हे ही सांगितले होते की, तुमच्यापैकी कोणी तिला सांभाळण्यात काही कसर केली तर त्यांचा हिस्सा त्यांना द्यायला मी साफ नकार द्यावा! आजची बिचारीची परिस्थिती पाहून मला असं वाटतंय की ते दागिने विकून मीच तिच्या पालनपोषणाची व्यवस्था लावून द्यावी. बोला, तुमचं काय म्हणणं आहे?"

यावर सुगुणाबाईची मुले व इतर सर्वच त्या प्रमुखाकडे आश्चर्याने पाहू लागले. प्रमुख घरात जाऊन एक पेटी घेऊन आला आणि त्याने सर्वांसमक्ष तिचे झाकण उघडले. त्यात कितीतरी दागिने चमचमत होते! त्यांची किंमत पन्नास हजार तरी नक्कीच झाली असती!

आता सुगुणाबाईचे मुलगे म्हणू लागले–"काका, झालं ते झालं. आजपर्यंत आमच्या हातून जी चूक झाली, तिच्याबद्दल आम्हाला क्षमा करा." असे बोलून ते तिघंही सुगुणाबाईला आपापल्या घरी नेण्यासाठी आता आग्रह धरू लागले.

सुगुणाबाईने प्रत्येकाच्या घरी आळी-पाळीने एक-एक महिना रहायचे कबूल





केले. त्या दिवसापासून तिची मुलगी व सुनाही मोठ्या प्रेमाने तिची काळजी घेऊ लागल्या. तिच्यासाठी सर्व सोयी त्यांनी करून दिल्या. यानन्तर काही दिवस सुगुणाबाईने मोठ्या सुखाने घालवले आणि शेवटी एक दिवशी तिने राम म्हटला!

मुलांनी अन् जावयाने मोठ्या समारंभ-पूर्वक तिचे क्रियाकर्मही पुरे केले.

एके दिवशी ते सर्व गावप्रमुखाकडे गेले व त्यांनी त्याला ते दागिने वाटून देण्यासाठी विनन्ती केली. प्रमुखाने ती मान्य केली आणि दागिन्यांची खरी किंमत करण्यासाठी आणि त्याची बरोबर वाटणी करण्यासाठी शरभ नावाच्या सोनाराला बोलावून घेतले.

दागिने पाहून शरभ आश्चर्यचकितच झाला, कारण ते दागिने सोन्याचे नव्हतेच! खोटे-नकली सोन्याचे होते ते! शरभच्या तोंडून हे ऐकून सुगुणाबाईचे मुलगे, सुना व मुलगी सर्वजण आश्चर्यात पडले.

सर्वजण एका स्वरात म्हणू लागले—"काय कपट हे! कसा धोका दिला आम्हाला! खरे दागिने लपवून आमच्यावर अन्याय केला आहात काका तुम्ही!"

यावर थोडेसे हसून प्रमुख म्हणाला—"तुम्ही तरी असे कोणते उपकार केलेत? दागिन्यांच्या मोहाने सुगुणाबाईवर खोटं प्रेम दाखवलंत तुम्ही! खोट्या प्रेमाचं फळ म्हणजेच खोटे दागिने!"

आता कोण काय तोंड उघडू शकणार? सुगुणाबाईशी जी निर्दय वागणूक केली होती त्याचे स्मरण करून त्यांनी सर्वांनी शरमेने माना खाली घातल्या.

"तुम्ही लोकांनी ऐकलंच असेल की—जसे बीज, तसे रोप! तुमचं मन जसं आहे, तसेच हे दागिनेही फक्त वरून चमचम दाखवत आहेत; आतून ते काही निराळेच आहेत! जाऊ शकता सर्वजण तुम्ही आता." प्रमुख म्हणाला.

खरी गोष्ट अशी होती की, कनकदासने प्रमुखाजवळ मुळात दागिने दिलेच नव्हते! त्याच्या मुलांच्यात मनपरिवर्तन घडवण्यासाठी प्रमुखानेच ती कल्पना लढवली होती.





# गच्चीवर अद्भुत

**दो**न भाऊ होते—अरविन्द नि मुकुन्द. श्रीकांतपुर मध्ये दोघांनी जवळ जवळ आपली नवी घरे बांधली. गृह-प्रवेशाच्या वेळी पुरोहित वेंकट शास्त्रींनी सल्ला दिला—"वास्तुशास्त्राच्या नियमानुसार ही दोन्ही घरे निश्चित बांधली गेली आहेत, पण डाव्या बाजूच्या घरात मुकुन्द नि उजवीकडील घरात अरविन्द राहील तर उत्तम!"

दोघे भाऊ अंमळ घाबरले आणि मोठ्या उत्कंठेने त्यांनी वेंकट शास्त्रींना विचारलं—"समजा की आपल्या सूचने प्रमाणे आम्ही घरं बदलली नाहीत तर काय होईल बरं?"

पुरोहितजींनी सांगितलं—"तुम्हा दोघांची जन्म-कुंडली पाहून त्या हिशोबाने मी सल्ला दिला आहे. जर तुम्हीं दोघांनी आपापली घरं न बदलली तर काही दुष्ट शक्ति तुम्हाला त्रास देतील. पण त्यामुळे तुमच्या जिवाला मात्र धोका नाही."

"बस्, एवढच ना? आम्हाला वाटलं की काही भयंकर अघटित असं घडेल काय! आमचा दुष्ट शक्तींवर विश्वास नाही. आपल्या स्वतःच्या शक्तीवर आमचा संपूर्ण विश्वास आहे. मुकुन्द, माझं म्हणणं बरोबर आहे की नाही?" अमळ कंपित स्वरात अरविन्दने आपल्या छोट्या भावाला विचारलं.

"नाही तर काय?" इकडं तिकडं पहात मुकुन्द थोड्या गर्वाने म्हणाला.

दोघां भावांच्या बोलण्यावर अमळ नाराज होत वेंकट शास्त्री म्हणाले—"असं असेल तर माझ्या हस्ते गृह-प्रवेशाचे कार्य तुम्हीं का करवलत? मला जे काही समजतं ते तुम्हाला सांगणं मी माझं कर्तव्य समजतो. आतां तुमच्या नशिबात जे असेल ते भोगा

मेघा जोशी



झालं!" इतकं बोलून शास्त्रीजी तिथून निघून गेले.

यानंतर अरविंद नि मुकुन्द यांनी आपापल्या घरात आपलं सामान समजवलं. खूप समान होतं, म्हणून काही सामान त्यांना गच्ची वर ठेवावं लागलं. अरविंदने आपल्या घराच्या गच्चीवर दोन तेलाचे डबे अन् दहा धान्याची पोती ठेवली. मुकुंदने आपल्या घराच्या गच्ची वर पाच उडीदांची पोती आणि लोणच्याच्या बरण्या ठेऊन दिल्या.

त्या रात्री दोन्ही भावांची कुटुंबीय मंडळी आपापल्या घरात झोपली. मध्य रात्रीच्या सुमारास अरविन्द काही विचार करीत होता, मग एक धान्याचं पोतं खाली आणायचा विचार करून तो गच्ची वर गेला. पाहतो तर काय, तिथं धान्याच्या पोत्यांऐवजी उडदाची पोती नि लोणच्याच्या बरण्या त्याला दिसल्या. अरविन्दने विचार केला – ही पोती तर मुकुन्दची आहेत! तो झटपट गच्चीवरून खाली आला नि आपल्या धाकट्या भावाच्या घराकडे निघाला.

सकाळी झोपेतून जागे झाल्यावर अरविन्द विचार करू लागला – हे कसलं दुःस्वप्न! आपल्या धाकट्या भावाकडील समाचार जाणून घेण्यासाठी तो मुकुन्दच्या घरी गेला.

त्यावेळी मुकुन्द आपल्या घराच्या व्हरांड्यात बसून कसला तरी विचार करीत होता. त्याच्या डोळ्यांकडे पाहून असं वाटत होतं की रात्र भर त्याला काही झोप मिळालेली नसावी.

धाकट्या भावाजवळ जाऊन अरविन्दने विचारले–"का रे? रात्री नीट झोप नाही का मिळाली?"

मुकुन्दने मोठ्या भावाच्या चेहऱ्याकडे नीट निरखून पहात विचारलं–"असं दिसतंय की तुला ही रात्र भर झोप आलेली नाही काय, झालं काय तुला?"

यावर अरविन्दने रात्री घडलेला सर्व वृत्तांत कथन केला. मुकुन्दने विस्मयपूर्वक सांगितलं – "मला ही काही असाच अनुभव आला बघ! गच्चीवर जाऊन उडदाचं पोतं खाली आणायचा विचार केला, तर तिथं काय पाहिलं की धान्याचीच पोती ठेवलेली आहेत."

"हे सगळं काही विचित्रच दिसतं आहे. दुष्ट शक्तींवर तुझा विश्वास आहे?" अरविन्दने आपल्या छोट्या भावाला विचारलं.

मुकुन्दने उत्तर दिलं–"पुरोहित वेंकट शास्त्रींना तर आपण स्पष्ट सांगितलं होतं की असल्या शक्तींवर आपला विश्वास नाही!"

"होय, आपण सांगितलं होतं नाही का? मी तर अगदीच विसरून गेलो ते!" असं म्हणून अरविन्द आपल्या घरी निघून गेला.

दोन्ही भावांनी त्या दिवशी रात्रा दुःस्वप्नांचं कारण शोधून काढायचा निश्चय केला आणि आपापल्या गच्चीवर जाऊन झोपले.

दुसऱ्या दिवशी अरविन्द झोपेतून जागा झाला नि त्याने पाहिलं सगळं सामान जिथलं तिथं सुरक्षित आहे. त्याने आनंदाने आपल्या बायकोला हाक मारली.

हाक ऐकून धाकटा भाऊ मुकुंदची पत्नी वर आली नि म्हणाली–"भावजी, तुम्ही आमच्या गच्चीवर केव्हां आलात हे मला समजलं नाही."

अरविन्दला आश्चर्य वाटलं आणि तो काही उत्तर देणार एवढ्यात झोपेंतून जागा झाला. त्याच वेळी त्याची बायको



गच्चीपर्यंत पोचली आणि अमळ चिडून म्हणाली–"काही काम असलं म्हणून का असं गच्चीवरून हाक मारायचं ?"

"हे तर एक आणखी दु:स्वप्न आहे !" असा काही विचार करीत अरविन्द लगेच धाकट्या भावाकडे गेला आणि सगळं त्याला सांगून म्हणाला–"मुकुन्द, तू तर रात्री काही दु:स्वप्न पाहिली नाहीस ना ?"

रडव्या चेहऱ्याने मुकुन्दने उत्तर दिले–"दु:स्वप्न ! एक ना दोन, किती म्हणून लक्षात ठेवूं ? सगळी रात्र स्वप्नच पहात राहिलो असतो तरी बरं झालं असतं ! पण मधून मधून सारखा झोपेत व्यत्यय येत राहिला. असंच चालू राहिलं तर माझी तब्येत आणखी बिघडायला फार दिवस लागणार नाहीत."

"दुष्ट शक्तीवर तुझा विश्वास नाही न ?" अरविन्दने प्रश्न विचारला.

"मी काय सांगू ? वेंकट शास्त्रींनी आपल्याला घरं बदलण्याचा सल्ला दिला होता, तेव्हा तूच असल्या अंधविश्वासाचा विरोध केला होतास ना ? तू जे म्हणालास त्याचं तेव्हा मी समर्थन केलं होतं !" मुकुन्दने उत्तर दिलं.

थोडा वेळ विचार करीत अरविन्द गप्प बसला, आणि मग म्हणाला–"दुष्ट शक्ती आहेत की नाही, हे आपण घटका भर सोडून देऊ. वेंकट शास्त्रींनी आपल्याला जो सल्ला दिला त्यामुळे आपल्या दोघांच्या मनात शंका जरूर निर्माण झाली. मला वाटते, आपण या वाद-विवादात न पडलेले बरें. ही असली दु:स्वप्न पहात आपण किती दिवस झोपेवाचून राहणार ? शास्त्रीजींच्या सूचनेनुसार घरं बदलून टाकू या कशी !"

प्रसन्नतापूर्वक मुकुन्द म्हणाला–"मला ही असंच वाटतंय. करू या असंच !"

त्याच दिवशी दोन्ही भावांनी आपापलं सामान बदललेल्या घरात नेलं. नंतर त्याच रात्री काय, पण कोणत्याही रात्री त्यांनी दु:स्वप्नं पाहिली नाहीत. तो त्रास कायमचा गेला.






द्रौपदी, श्रीकृष्णाच्या बायका व अन्य स्त्रिया एका बाजूला परस्पर गप्पा-गोष्टी करीत होत्या, तर दुसऱ्या बाजूला सर्व पुरुष-मंडळी एकत्र जमून वादविवादात रंगली होती. त्यावेळी अनेक मुनी बलराम व श्रीकृष्ण यांना भेटण्यासाठी आले. पांची पांडव व सर्व राजांनी उठून मोठ्या आदराने मुनींना नमस्कार केला. सर्वां-बरोबर श्रीकृष्ण नि बलराम यांनी ही श्रद्धा-भक्तिपूर्वक मुनींची पूजा केली.

श्रीकृष्णाची प्रशंसा करीत मुनी म्हणाले–"आपण तर मानव-रूप धारण केलेले साक्षात् आदि देव आहात ! आम्ही लोक मोठे तत्त्वज्ञानी असलो तरी आपल्या मायेच्या अधीन आहोत."

मुनींच्या सल्ल्यानुसार वसुदेवाने देवांचे ऋण फेडण्याचा संकल्प केला. त्यासाठी एक यज्ञ करण्याची योजना तयार करण्यात आली. यज्ञासाठी आवश्यक सामानाची एक सूची तयार केली. तीनुसार यादवांनी यज्ञासाठी आवश्यक सर्व सामग्री जमवली. वसुदेव व त्यांच्या अठरा बायकांनी स्नान करून नवी वस्त्रें व आभूषणे धारण केली नि यज्ञाची दीक्षा घेतली. यानंतर मुनींच्या मदतीने प्रकृति आणि विकृति संबंधी यज्ञ करून यज्ञ-पुरुषाची आराधना केली, आणि ऋत्विकांना संतुष्ट करण्यासाठी गायी, जमीन आणि सुंदर कन्या यांचे दक्षिणा म्हणून दान दिले. यज्ञ संपल्यावर वसुदेवाने अवभृत स्नान केले आणि आपल्या सर्व

३०. कृष्णाचे निर्वाण



बंधु-जनांना प्रीतिभोजन दिले. नंतर सर्व मुनी संतुष्ट होऊन आपापल्या आश्रमाकडे रवाना झाले. श्रीकृष्णाने प्रेमाने सर्वांना निरोप दिला.

एक दिवशी देवकीच्या मनात एक विचार आला, तिचे पुत्र बलराम नि श्रीकृष्ण ही काही सामान्य माणसं नाहीत, ते मोठे शक्तिशाली आहेत. त्यांनी आपल्या गुरूच्या मृत पुत्राला जिवंत करून पुन: त्यांच्या हाती दिलं. कंसाने तिच्या सर्व मुलांना मारून टाकलं होतं. त्या सर्वांना श्रीकृष्ण काय आपल्याला दाखवू शकणार नाही?

हाच प्रश्न देवकीने बलराम व श्रीकृष्णाला विचारला. देवकीची इच्छा पूर्ण करण्यासाठी दोघे जण योगमाया धारण करून सुतलात पोचले. बलि चक्रवर्तीने तिथे त्या दोघांचे अपूर्व स्वागत केले नि त्यांच्या येण्याचे कारण विचारले.

"महाराज, प्राचीन काळी स्वायंभू मन्वन्तराच्या वेळी मीरीचीचे सहा मुलगे ब्रह्मा आणि सरस्वती यांना एकमेकांवर प्रेम करताना पाहून हंसले होते. यावर ब्रह्माने त्यांना राक्षसांच्या रूपात जन्म धारण करण्याचा शाप दिला होता. नंतर ते स्मर, उद्गीथ, परिष्वंग, पतंग, क्षुद्रभ आणि घृणि नावाने सर्वप्रथम हिरण्यकश्यपाच्या पुत्रांच्या रूपात जन्मले आणि नंतर आमची आई देवकीच्या गर्भातून उत्पन्न झाले. कंसाने त्या सर्वांना मारलं आणि सध्या ते सर्व जण आपल्या राज्यात आहेत. आपण जर त्यांना आमच्या बरोबर पाठवलं तर आम्ही त्यांना आमच्या आईला दाखवून तिची काळजी दूर करू शकू. नंतर त्यांना पुन्हा उत्तम लोकात पाठवून देऊ." बलि चक्रवर्तीला श्रीकृष्ण म्हणाले.

बलीने श्रीकृष्णाची विनंती मान्य केली आणि त्या सहा मुलांना श्रीकृष्णाच्या बरोबर पाठवून दिलं. आपल्या मृत पुत्रांना पुन्हा एकदा पाहून देवकीला खूपच आनंद झाला. तिने त्या सर्वांना आलिंगन दिले, दूध पाजले नि त्यांना उत्तम भोजन दिले. नंतर ही सर्व मुले श्रीकृष्णाच्या कृपेने ऊर्ध्व लोकात निघून गेली.

कालचक्र फिरत राहिलं. मध्यंतरी महाभारत युद्धात कौरव आणि पांडव यांच्या बाजूचे असंख्य लोक मारले गेले. या युद्धात युधिष्ठिराचा जय झाला. त्याला सिंहासनावर बसवून श्रीकृष्ण द्वारकेला परत आले.

एक दिवशी विश्वामित्र, असित, कण्व, दुर्वासा, भृगु, अंगीरस, कश्यप, वासुदेव, अत्रि, वसिष्ठ, नारद इत्यादि मुनी श्रीकृष्णाला भेटण्यासाठी आले. त्या वेळी काही यादवकुमारांनी सांबला गर्भवती स्त्रीचा वेष चढवला आणि त्याला मुनींसमोर आणून अत्यंत नम्रपणाचा भाव आणून विचारलं–"आपल्या गर्भातून कोण जन्माला येईल' हे विचारायला हिला फार लाज वाटत आहे. म्हणून तिच्या वतीने आम्ही विचारीत आहोत. आपण तर सर्वज्ञाते आहात. हिच्या पोटी कोण शिशु जन्माला येईल सांगाल?"

यावर मुनी अत्यंत रागावले नि त्यांनी शाप दिला–"मूर्खांनो, याच्या गर्भातून कुलनाशक मुसळ जन्माला येईल."

यादव-कुमार घाबरून पळून गेले. सांबूचे कपडे काढून पाहिलं तर खरंच त्याच्या पोटांतून मुसळ बाहेर पडताना दिसलं. त्यांनी ते बाहेर काढलं नि पश्चात्ताप करू लागले–"उफ्, काय भयंकर पाप केलं आम्ही? हे सर्व





समजल्यावर यादव प्रमुख काय म्हणतील कोण जाणे?" घाबरत घाबरत ते राजा उग्रसेनकडे गेले आणि त्यांना झालेलं सर्व वृत्त सांगितलं.

मुनींचा शाप नि मुसळाची बातमी लवकरच सर्व यादवांना समजली. त्यांना मोठं आश्चर्य वाटलं अन् भीति पण! राजा उग्रसेनने यादवांना सल्ला दिला की त्यांनी ते मुसळ उगाळून त्याचं चूर्ण समुद्रात टाकून द्यावं. यादवांनी त्याप्रमाणे केलं. समुद्रातील लाटांमुळे ते चूर्ण किनाऱ्याकडे वाहून आले आणि तेथे नागरमोथ्याच्या रूपात उगवलं. मुसळ उगाळून संपल्यावर शेवटी लोखंडाचा एक तुकडा शिल्लक राहिला तो समुद्रात टाकून दिल्यावर एका माशाने गिळला. तो मासा अन्य माशांबरोबर एका कोळ्याच्या जाळ्यात अडकला नि कोळ्याच्या तावडीत सापडला. कोळ्याने माशाच्या पोटातून तो काढला आणि एका शिकाऱ्याला दिला. शिकाऱ्याने तो तुकडा आपल्या बाणाच्या टोकावर बसविला.

अशा प्रकारे यादव-वंशाच्या सर्वनाशाची सर्व तयारी संपूर्ण झाली.

यानंतर थोड्याच काळात द्वारकेत भयंकर उत्पात सुरू झाले. श्रीकृष्णाने सर्व यादवांना सुधर्म सभा-मंडपांत बोलवून घेतले नि त्यांना समजाऊन सांगितले—

"मित्रांनो, द्वारकेत निरनिराळे उत्पात घडताना दिसत आहेत. हे सर्व आपल्या हानीची सूचना देत आहेत. मुनींनी यादव वंशाला दिलेला शाप तुम्हा सर्वांना ठाऊकच आहे. म्हणून आता इथून पुढे एक क्षण ही आपण इथे रहाणं उचित नाही. बायका, मुलं आणि वयोवृद्धांना आपण शंखद्वारला पाठवून देऊं, आणि बाकीचे आपण सर्व जण सरस्वती नदीच्या किनाऱ्यावरील प्रभास तीर्थाकडे प्रयाण करूं. तिथे जाऊन शुचिर्भूत होऊन उपवास करू व देवतांची पूजा करू. ब्राह्मणांना गायी, वस्त्र, हत्ती, घोडे व घरे दान करू. त्यांच्या हातून शांति-कर्म घडवून आणू. अशा रीतीने आपली सर्व संकटे टळतील आणि आपले शुभ होईल."

श्रीकृष्णाची योजना सर्व प्रमुख यादवांनी मान्य केली. लगेचच स्त्रिया, मुलं नि वृद्ध-जनांची शंखद्वारकडे रवानगी केली गेली आणि बाकीचे यादव नावात बसून समुद्र पार करून प्रभास तीर्थ-स्थानी पोचले. पण इथं त्यांना देव-मायेने घेरले. सर्वांनी मद्य-प्राशन केलं आणि ते आपापसात लढू लागले. शेवटी या सर्वाला एकाद्या युद्धाचं स्वरूप प्राप्त झालं. या युद्धात अनेक हत्ती व घोडे मारले गेले. रथ मोडून पडले. प्रमुख यादव-मंडळी आपापसात द्वंद्व खेळू लागली. प्रद्युम्न नि सांबु यांनी आपापसात युद्ध केले. त्याच प्रमाणे अक्रूराने भोजा बरोबर, अनिरुद्धाने सात्यकीशी, सुभद्राने संग्रामजित बरोबर, सचारने गदुशी, सुमित्राने सुरथ बरोबर युद्ध केले. तसेच इतर अन्य वीर ही आपापसात लढू लागले. त्यांच्यातील बंधु व मित्रभाव नाहीसा झाला. वेड्यासारखे एकमेकांचा संहार करू लागले.

थोड्याच वेळात त्यांचे सर्व बाण संपले. सर्वांची धनुष्ये मोडून गेली. त्यांच्या हाती एक ही आयुध शिल्लक राहिले नाही. समुद्राच्या किनाऱ्यावर नागरमोथे उगवलेले होते. ते उपटून यादव एकमेकांना मारू लागले. श्रीकृष्णाने त्यांना थांबवण्याचा प्रयत्न केला. यावर ते रागाच्या भरात





बलराम नि श्रीकृष्ण यांच्यावर तुटून पडले. श्रीकृष्णाच्या रागाचा पारा चढला. त्यांनी भरपूर नागरमोथे उपटून अनेक यादवांचा संहार केला. अशा प्रकारे मुनींच्या शापामुळे दावानला प्रमाणे सर्व यादव-वंश समूळ नष्ट झाला.

आता सर्व लोक धारातीर्थी पडलेले होते. श्रीकृष्णाने चारी बाजूंना दृष्टि फिरवली नि सुस्कारा टाकला—"चला, आता पृथ्वीचा भार हलका झाला."

बलराम समुद्र-किनाऱ्यावर योग-समाधि लावून बसला नि त्याने प्राणार्पण केले. श्रीकृष्णांनी स्वतः हे दृश्य पाहिलं आणि ते एका विशाल पिंपळाच्या झाडाच्या बुंध्याशी उजव्या मांडी वर डावा पाय ठेवून बसले. एक शिकारी त्यांच्या डाव्या लाल पायाला एक जनावर समजला नि त्याने बाण फेंकला. यादवांनी मुसळ उगाळून उरलेला लोखंडाचा जो तुकडा समुद्रात टाकला होता, तो या बाणाच्या टोकावर बसवलेला होता.

बाण फेकून तो शिकारी पळत आपल्या सावजापाशी आला. तो ज्याला जनावर समजला होता तो एका माणसाचा पाय होता हे त्याच्या लक्षात आलं. त्याने येऊन श्रीकृष्णाला निवेदन केलं—"महाराज, माझ्या हातून मोठी चूक झाली. कृपया मला क्षमा करा."

श्रीकृष्णांनी शिकाऱ्याला समजाऊन सांगितलं—"तू काळजी करू नकोस. माझी जी इच्छा होती तेच घडलं!" आणि त्यांनी शिकाऱ्याला रवाना केलं.

एवढ्यात दारुक श्रीकृष्णाला शोधत तिथे येऊन पोचला. श्रीकृष्णाला पहाताच रथातून खाली उतरला आणि जवळ आला. श्रीकृष्णानी दारुकाला सांगितलं—"तू द्वारकेला जाऊन सर्वांना सांग—आपल्या वंशातील सर्व लोक मेलेले आहेत. बलरामाने ही प्राण ठेवला आहे, नि माझी स्थिति ही अशी आहे. आपण सर्व लोक द्वारका सोडून जा. मी शरीर सोडलं की

द्वारका समुद्रात बुडणार आहे. माझे आई वडील तसेच अन्य लोकांनी इन्द्रप्रस्थी जाऊन अर्जुनाच्या आश्रयाला रहावं. तू ही सर्व घटना विसरून जा आणि ज्ञान-निष्ठेत आपलं बाकीचं जीवन चालव."

दारूकाने व्यथित अंतःकरणाने श्रीकृष्णाला प्रदक्षिणा घातली आणि तो द्वारकेला परत आला. तेथे उग्रसेन आणि वसुदेव यांच्या पायांवर डोकं ठेऊन त्याने सर्व यादवांच्या मृत्युची खबर त्यांना दिली. सर्व जण छाती पिटीत व आक्रोश करीत यादवांच्या मृत्यु-स्थानी पोचले. वसुदेव, देवकी व रोहिणी यांनी आपले पुत्र बलराम व श्रीकृष्ण यांना शोधून काढलं. पण ते त्यांना कोठें दिसले नाहीत. याचं त्यांना भयंकर दुःख झालं आणि त्यांनी तेथेच आपले प्राण सोडले.

यादवांच्या बायकांनी तेथेच आपल्या नवऱ्यांच्या शरीरा बरोबर सहगमन केले. बलरामच्या सर्व बायका ही आपल्या पतीच्या चितेत भस्म झाल्या. वसुदेवाच्या बायका व श्रीकृष्णाच्या बायकांनी ही अन्य यादव-स्त्रियांचे अनुकरण केले.

यानंतर अर्जुन तेथे येऊन पोचला. त्याने आपल्या सर्व नातेवाईकांची अन्त्येष्टि क्रिया संपन्न केली. याच वेळी द्वारका नगरी समुद्रात बुडाली. केवळ नगरीतील एक मंदिर पाण्यावर स्पष्ट दिसू लागले.

शिल्लक राहिलेल्या स्त्रिया, मुलं व वृद्धां बरोबर घेऊन अर्जुन इन्द्रप्रस्थ येथे पोंचला. त्याने वज्राचा राज्याभिषेक केला. यानंतर पांडव द्रौपदी सह महाप्रस्थाना-साठी निघाले.

श्रीकृष्णाच्या निर्वाणाच्या वेळी तेथे ब्रह्मा, इन्द्र, अन्य देव, प्रजापति सिद्ध, अप्सरा तसेच विद्याधर हे सर्व आले. सारं आकाश विमानांनी भरून गेलं. विमानातून पुष्पवृष्टि झाली. श्रीकृष्णाने दिव्य विष्णुरूप धारण केलं. आपल्या दर्शनासाठीं आलेल्या सर्वांकडे श्रीकृष्णाने एकदा डोळे भरून पाहिलं आणि सत्य, धर्म, धृति, श्री आणि कीर्ति सह वैकुण्ठाकडे प्रयाण केलं.





# मंत्र्याची युक्ति

प्राचीन काळी अरबस्तानात एक सुल्तान राज्य करीत असे. राज्यकारभाराच्या कामात तो नेहमी अत्यन्त निष्काळजी असे. आपल्या सुखोपभोगाशिवाय त्याला अन्य काही सुचत नसे. त्यामुळे राज्याची स्थिति दिवसें दिवस खालावत चालली.

सर्व अधिकारी वर्ग आळशी बनला. सर्व उद्योग व्यवसायांना अवकळा आली. जनतेत सर्वत्र निराशा भरून गेली.

सुल्तानाच्या पदरी अनेक मंत्री होते. त्यांच्या पैकी काहीं सुलताना सारखेच ऐश-आरामात मग्न झालेले होते. बाकीच्या मंत्र्यांच्या मनात राज्याच्या दुर्दशेबाबत काळजी लागून राहिली होती, पण ते अशासाठी गप्प बसून रहात की खरी गोष्ट सुल्तानाला सांगून पटली तर उगाचच त्याची आपल्यावर खफा मर्जी व्हायची!

शेवटी एका मंत्र्याने सुलतानाला सावध करण्यासाठी एक नामी युक्ति शोधून काढली. एक दिवशी तो सुल्ताना बरोबर बागेत फिरण्यासाठी म्हणून बाहेर पडला. परत येते वेळी अंधार पडला होता. त्यावेळी घुबडाच्या ओरडण्याचा आवाज ऐकू आला. तो आवाज ऐकून मंत्री थोडा थांबला आणि अत्यंत काळजीपूर्वक तो आवाज ऐकू लागला.

सुलतानाला मोठं आश्चर्य वाटलं. त्याने मंत्र्याला विचारलं—"मंत्री महाशय, एवढं काय विशेष ऐकता आहात?"

"हुजूर, दोन घुबडांचं आपापसात बोलणं चालू आहे. त्यांचा संवाद मी ऐकतो आहे!" मंत्र्याने उत्तर दिलं.

"म्हणजे तुम्हाला घुबडांची भाषा समजते? ते काय म्हणत आहेत बरे?" सुल्तानाने विचारले.

अशोक पवार

"यांच्या या सर्व खोट्या गोष्टी मला सुद्धा ऐकवत नाहीत. आपण कशा या ऐकू शकाल?" मंत्र्याने नम्रपणे विचारले.

"जर असं असलं तर घुबडांना आपण चांगली कठोर शिक्षा देऊ. पण ते म्हणतात तरी काय ते कळू द्या ना मला!" सुल्तानाने पुन्हा आपली जिज्ञासा प्रकट केली.

"तर मग ऐकाच! ही घुबडं आपल्या मुलांच्या लग्ना बाबत बोलत आहेत. नर घुबडाची आई मादी घुबडाच्या आईला हुंडा म्हणून पन्नास ओसाड गावांची मागणी करीत आहे! यावर मादी घुबडाची आई म्हणते–पंन्नासच काय, मागशील तर पाचचे ओसाड गावे सुद्धा देईन! यावर नर घुबडाची आई विचारते–पाचशे ओसाड गावं तू कशी ग देऊ शकशील? उत्तरादाखल मादी घुबडाची आई काय म्हणते? आमच्या सुल्तानांच्या राज्यात ओसाड गावांची काय कमतरता आहे बरं!" मंत्र्याने घुबडांचा मथितार्थ सांगितला.

सुल्तानाला कळून चुकलं की आपल्या राज्याची दुर्दशा आपल्याला दाखवण्यासाठी मंत्र्याने ही कपोल-कल्पित गोष्ट रचली आहे.

यानंतर दोघे जण राजवाड्याच्या दिशेने चालू लागले. मंत्र्याने सुल्तानाला विचारलं–"हुजूर, असली अफवा उडवणाऱ्या दुष्टांना काय बरं शिक्षा द्यावी?"

"त्यांनी खरी गोष्ट बोलून दाखवली, याबद्दल त्यांना का शिक्षा द्यायची? मी आता तुम्हाला प्रधान मंत्री बनवतो. तुम्ही राज्याची अशी व्यवस्था करा की घुबडाला हुंड्यादाखल द्यायला एक ही उजाड गाव सापडायचं नाही!" सुल्तान म्हणाला.

मग काय, त्या दिवसा पासून सुल्तानात खूपच बदल झालेला दिसू लागला. आपला ऐश-आराम सोडून सुल्तान शासनाच्या कामात लक्ष घालू लागला. थोड्याच काळात उद्योग-व्यवसाय, व्यापार व शेती यांची खूपच प्रगति झाली. राज्यात सुख समृद्धि वाढून सर्व लोक सुखाने आपले दिवस घालवू लागले.





# दारची कडी

रामभद्र नावाचा एक गृहस्थ आंघोळीसाठी न्हाणीघरात गेला आणि त्याने आतून दाराला कडी लावली. आंघोळीनंतर तो कडी काढायला लागला, तर खूप प्रयत्न करूनही कडी काही उघडेना! कुठेतरी अडकली होती ती! नशीबाने रामभद्रला न्हाणीघरातल्या कोपऱ्यात एक हातोडी दिसली. त्याने ती हातोडी कडीवर मारली अन् कडी निघाली!

न्हाणीघरातून बाहेर आल्यावर त्याने आपल्या बायको व मुलांना सांगितले–"कडीची दुरुस्ती करेपर्यंत तुम्ही कोणी आतून दाराला कडी लाऊ नका हं!"

हे ऐकून रामभद्रचा धाकटा मुलगा सुताराकडे पळाला; पण त्याला कळलं की सुतार शेजारच्या गावी गेला आहे आणि त्याला परतायला एक आठवडा तरी लागेल.

'सवय बदलणं इतकं सोपं नसतं!' चुकून रामभद्रच्या मोठ्या मुलाने ती कडी एकदा लावलीच आणि ती उघडायला त्याला चांगला अर्धा तास खटपट करावी लागली. तेव्हापासून घरातले सर्वच जण कडीबाबत सावध राहू लागले.

या घटनेनंतर चारच दिवसांनी रामभद्रच्या घरी कृष्णचन्द्र नावाचा त्याचा एक नातेवाईक पाहुणा म्हणून आला. दिसायला तो अगदी बारीक व अशक्त होता. घरात पाऊल घातल्या बरोबर तो म्हणाला–"काय कडक उन्ह पडलंय बाहेर! सारं अंग घामाने थबथबलंय माझं. तेव्हा सर्वात अगोदर मी आंघोळ करतो; तेव्हाच माझा थकवा नाहीसा होईल!" आणि कृष्णचन्द्र सरळ न्हाणीघरात घुसला.

नंतर लगेच आतून दाराला कडी घातल्याचा आवाज आला!

"वसुंधरा"



तो आवाज ऐकून रामभद्र तर भिऊनच गेला! न्हाणी-घराच्या दाराला आतून कडी न घालण्याबद्दल पाहुण्याला सावध करायचे तो विसरून गेला होता! आता जर त्याला बाहेर येता न आलं तर दारच तोडावं लागेल ना!

"काही असो, हातोडी तर आतच आहे. तेव्हा कृष्णचन्द्रला आत्ताच सावध करून ठेवतो." रामभद्र म्हणाला.

"दाराची कडी काढता न आली, तर तेच हाका मारतील आपल्याला. अगोदर कशाला आपण त्यांना घाबरवून सोडायचं?" रामभद्रच्या बायकोने त्याचे बोलणे खोडून काढले!

याबद्दल घरातले सर्वजण काहीसे घाबरून वावरत होते, इतक्यात न्हाणीघरातून पुन्हा कडीचा आवाज आला आणि दार उघडून कृष्णचन्द्र बाहेर आला. चेहरा हसरा करीत तो म्हणाला—"बाप रे! आत्ता कुठे माझा जीव शांत झाला बुवा!"

रामभद्रच्या कुटुम्बातल्या सर्वांनाच फार आश्चर्य वाटले अन् ते सर्वजण कृष्णाचन्द्राकडे विस्मयाने पाहू लागले! तेव्हा त्याने विचारले—"अरे, आहे काय भानगड? न्हाणीघरासमोर उभे राहून तुम्ही सर्व माझ्याकडे असं पहात आहात की जणू काही एकादं भूत समोर उभं आहे तुमच्या?"

"अं, अं; तसं काही नाही!" चाचरत रामभद्रने विचारले—"आंघोळ करताना काही त्रास तर नाही झाला तुम्हाला?"

"हे पहा लोक तर प्रवासात काही त्रास वगैरे झाल्याबद्दल विचारतात, अन् तुम्ही लोक आंघोळीच्या त्रासाबद्दल विचारता आहात! मला नाही कळत की आंघोळ करताना कसला आला आहे त्रास न् बीस!" आश्चर्याने कृष्णचन्द्र म्हणाला.

हे ऐकून, आपली चूक लक्षात येऊन रामभद्र गप्प झाला. त्याला मनातल्या मनातल्या वाटले की, कडी आपोआपच नीट झाली असावी. त्या दिवशी रात्री उकाड्यामुळे पुन्हा आंघोळ करताना रामभद्रने दाराला आतून कडी घातली. पण ती उघडताना त्याला खूप त्रास झाला.

न्हाणीघराजवळ येऊन कृष्णचन्द्रने विचारले—"अरे रामभद्र, हा हातोडीचा कसला आवाज येतोय आतून? तू करतोयस तरी काय आत?"

मोठ्या कष्टाने कडी काढून रामभद्र न्हाणीघरातून बाहेर आला आणि म्हणाला—"या दाराची कडी बिघडली आहे. ती दुरुस्त करायची म्हटली, तर सध्या सुतार गावात नाहीये. कडी उघडायला त्रास होतो, म्हणून हल्ली आम्ही सर्वजण आतून कडी न घालताच आंघोळी उरकतो. तुम्ही मात्र सकाळी आरामात कडी घालून उघडलीत; म्हणून मला वाटलं की ती आपोआप ठीक झाली असावी. तुमच्या नशिबानेच ती सहज उघडली जात आहे, की तुमच्या या अशक्त दिसणाऱ्या शरिरात इतकी ताकत आहे—हेच मला समजत नाहीये! मला तर अजूनही ती उघडायला खूप त्रासच होत आहे!"

"ओहो, असं झालं होय?" असे म्हणून कृष्णचन्द्र खो खो हसू लागला.

"हसायला काय झालं तुम्हाला? अरे कारण तर सांगाल की नाही?" हैराण होत रामभद्रने विचारले.

आपलं हसं थांबवून कृष्णचन्द्र बोलू लागला—"मी तर असा अगदी लुकडा माणूस आहे. आमच्या घरी माझी सर्वजण टर उडवतात. आमच्या न्हाणीघराची कडीही अशीच जाम बसते. घरचे सर्वजण सहज उघडतात ती; पण मला मात्र फार झगडावं लागतं तिच्याशी! सगळ्यांचं चिडवणं टाळावं म्हणून मी आतुन कडी न घालता, नुसताच कडी घातल्यासारखा आवाज करतो. मला ती संवयच झाली आहे, म्हणून मी इथेही तसंच केलं सकाळी!" असे म्हणून तो पुन्हा हसत सुटला!

कडीचं हे रहस्य कृष्णचन्द्रच्या तोंडून ऐकून रामभद्रच्या घरातल्या सर्वांचीच हसून हसून पोटं दुखू लागली!





# गरिबाचे नशीब

एका गावात एक शेतकरी रहात असे. तो व त्याची पत्नी – दोघंही फार धार्मिक वृत्तीचे होते. पण त्यांना मुलं जास्त असल्यामुळे खूप मेहनत करूनही ते मुलांना खायला केवळ कांजीच देऊ शकत असत. एखाद्या वेळी कधी घरात डाळ शिजली किंवा पोळ्या करता आल्या तर 'घरात मेजवानीच झाली' असं वाटे त्यांना.

अशा प्रकारे अन्नाच्या दाण्या-दाण्यासाठी रखडत असतानाही घरी कुणी आलं तर त्याला काही न काही खायला घातल्याशिवाय तें कधीच रवाना करीत नसत.

एके दिवशी त्या कुटुम्बातले लोक जेवायला बसले; इतक्यात एक भुकेलेला भिकारी त्यांच्या दारी आला. शेतकरी व त्याच्या पत्नीने आपल्या वाटणीच्या कांजीचा अर्धा-अर्धा हिस्सा बाजूला काढून त्या भिकाऱ्याला दिला. मरायला टेकल्यासारखा दिसणारा तो भिकारी कांजी प्यायला; तेव्हा त्याला असं वाटलं की, आपण जणू काही अमृतच पीत आहोत. शेतकऱ्याला तो प्रसन्नतेने म्हणाला–"ज्या भांड्यात तुम्ही ही कांजी शिजवलीत ते इकडे आणा, मी त्याचं 'अक्षयपात्र' बनवून देतो."

शेतकऱ्याच्या बायकोनें भांडं आणून भिकाऱ्याच्या हाती दिलं. त्यावर हात ठेवून भिकारी काही मन्त्र पुटपुटू लागला. ते संपल्यावर भांड्यावर झाकण ठेवून त्याने ते शेतकऱ्याला देत म्हटले–"यापुढे तुम्हाला कधीही खायलाप्यायला कमी पडणार नाही. राजाच्या जेवणात बनणारा प्रत्येक पदार्थ तुम्हाला याच भांड्यातून मिळत राहील."

शेतकरी जोडप्याचा भिकाऱ्याच्या बोलण्यावर विश्वास बसला नाही, पण या रूपाने भिकाऱ्याने आपल्याला आज सांगितले. नंतर तो म्हणाला–"बाबांनो, वाढू ते मुकाट्याने खाऊन घ्या, पण आम्हाला कृपा करून कसले प्रश्न-बिश्न विचारू नका!"

पत्रावळींवर वाढले जात असलेले पदार्थ पाहूनच वेषांतर करून आलेल्या राजा व मन्त्र्याने ओळखले की हे पदार्थ तर राजवाड्यातलेच आहेत! खरे तर ते जेवणासाठी तिथे गेलेच नव्हते, म्हणून त्यांनी शेतकऱ्याला विचारले–"मोठमोठ्या धनवानांनाही अप्राप्य असे हे पदार्थ तुमच्या घरी कसे काय?"

"कृपा करून मला असलं काही विचारू नका." शेतकरी म्हणाला.

नाइलाजाने शेतकऱ्याने सगळी हकीकत सांगितली त्यांना! ते ऐकून राजा रागाने लाल झाला. तो उठून उभा राहिला आणि हातातल्या छडीने त्याने मातीचं ते भांडं फोडून टाकलं! ताबडतोब मन्त्र्याला बरोबर घेऊन तो तिथून निघून गेला.

शेतकऱ्याची बायको ते तुकडे गोळा करीत छाती पिटून घेत रडू लागली.

"अग, गप्प बैस ना! आपण पहिल्यापासून थोडंच असलं जेवण जेवत आलोत! आजपासून आपलं भोजनसुख संपलं हे खरं, पण आपली कांजी किंवा पेज तर कुठे गेली नाही ना? काही काळजी नको करूस तू."



शेतकरी आपल्या बायकोचं सान्त्वन करू लागला.

मातीचं भांडं फोडून टाकून राजा राजवाड्यात परत गेला. पण त्याला व मन्त्र्याला त्यावेळी जेवणासाठी मुदपाकखान्यात अन्नच शिल्लक नव्हतं.

"महाराज, पदार्थ चुलीवर असतानाच नाहीसे होत आहेत. वाटलं तर आपण भांडी तपासून पहावीत. बाहेरून भांड्यांवर काजळी धरली आहे, पण आतून ती अगदी स्वच्छ आहेत पहा! प्रत्येक पदार्थ चारचार पाच-पाच वेळा शिजत घातला, पण दुसऱ्याच क्षणी चुलीवरचे पदार्थ नाहीसे होत आहेत." आचारी म्हणाला.

राजा शेतकऱ्याच्या घरीही जेवला नव्हता, म्हणून मन्त्र्याने आपल्या घरून राजपरिवारासाठी जेवण पाठवलं, पण राजवाड्यात येताच ते पदार्थही गायब झाले!

राजाच्या लक्षात येऊन चुकलं की, आपण जो अन्याय केला त्याचंच फळ आपल्याला असं भोगावं लागतंय. मग काय! मन्त्र्याला बरोबर घेऊन तो पुन्हा शेतकऱ्याच्या घरी गेला. अन् शेतकऱ्याच्या पायावर लोटांगण घेत तो म्हणाला– "रागाच्या भरात मी तुझा जो अपराध केला आहे, त्याबद्दल क्षमा कर मला! मी तुझं मातीचं भांडं फोडून टाकलं, त्याचं परिमार्जन म्हणून मी तुला खूपशी जमीन इनाम देतो; आणि आजपासून माझ्या मुदपाकखान्यात जे पदार्थ शिजवले जातील, त्यातले अर्धे तुझ्या घरी पाठवले जातील. पण तू आम्हाला भुकेने मारू नकोस." असे म्हणून त्याने शेतकऱ्याला विनवले. शेतकरी घाबरून म्हणाला–"महाराज, मी जाणून बुजून आपला कोणताच अपराध केलेला नाही. भांडं फुटल्यामुळे माझी बायको रडू लागली, तर मी तिची समजूत काढली कि आपण कांजी किंवा पेज पिऊन आपलं पोट भरू पहिल्यासारखं. आपल्यावर काही. अन्याय झालाच असेल तर नक्की विश्वास ठेवा की तो माझ्याकडून झालेला नाही. आपणाला कोणी क्षमा करून शकेल तर तोच सज्जन माणूस, ज्याने मला ते भांडं दिलं होतं."

राजाने शेतकऱ्याला जेव्हा असं म्हटलं, की माझ्या स्वयंपाकातले अर्धे पदार्थ मी मी तुला पाठवीन-तेव्हाच इकडे राजवाड्यातल्या मुदपाकखान्यातले पदार्थ भांड्यात तसे राहू लागले! राजाकडून जमीन मिळाल्यामुळे शेतकरी आता सुखाने आपली कालक्रमणा करू लागला; पण तरीही राजमहालातून दोन्ही वेळचं अन्न त्याच्याकडे पाठवलं जात राहिलं. अशा प्रकारे पुढच्या तीन पिढ्यांपर्यंत ही अन्न पाठवण्याची प्रथा चालू राहिली.





आशिर्वाद दिला, असं त्यांना वाटलं. रात्री कांजी बनवण्यासाठी शेतकऱ्याच्या बायकोने भांड्याचे झाकण उघडले तो काय! त्यातून सुग्रास पदार्थांचा सुवास आला. खरोखरीच राजाघरचं जेवण मिळालं सर्वांना!

त्या दिवसापासून शेतकऱ्याच्याघरचे सर्व-जण रोज राजभोजन जेवू लागले; इतकेच नव्हे, तर आपल्याकडे येणाऱ्या आतिथींनाही तेच जेवण दोघं वाढू लागले. येणाऱ्या अतिथींना हात जोडून शेतकरी इतकंच विनवत असे की–"बाबांनो, आम्ही जे वाढू ते मुकाट्याने खा; पण त्याबाबत आम्हाला काही प्रश्न-बिश्न मात्र विचारू नका हं!"

इकडे शेतकऱ्याच्या घरची ही हकीकत, तर तिकडे राजाच्या मुदपाकखान्यात निराळंच काही घडत होते! तिथले पदार्थ रोज कमी होते! ही गोष्ट प्रथम राजाच्या मुख्य आचाऱ्याच्या लक्षात आली. आचाऱ्याला प्रथम वाटलं की हा एखाद्या चोराचाच उद्योग असावा. पण पाळत ठेवूनही चोर काही सापडला नाही. शेवटी त्याने ही विचित्र गोष्ट राजाच्या कानी घातली. राजाचा यावर प्रथम विश्वासच बसेना. पण त्याने नीट चौकशी करवली तेव्हा ते खरेच असल्याचे आढळून आले. खरोखरीच शिजवलेले पदार्थ कमी होत होते!

राजाने ही गोष्ट मन्त्र्याच्या कानांवर घातली. मन्त्र्यानेही पडताळून गोष्ट खरीच असल्याचे जाणले. राजपरिवाराशी संबंधित असणाऱ्या अशा प्रकारच्या गोष्टी कधी गुप्त रहात नाहीत. कर्णोपकर्णी नगरात सर्वांना ही गोष्ट समजली. दुसरीकडून ही हकीकतही फैलावली की एका साध्या शेतकऱ्याच्या घरी अतिथि लोकांना फार उत्तम जेवण मिळत असतं! या दोन्ही बातम्या जुळवल्यानन्तर जो निष्कर्ष निघत होता, तो असा की, राजाच्या मुदपाकखान्यातले घटत जाणारे पदार्थ या शेतकऱ्याकडेच जातात, ही बातमी राजा व मन्त्री यांच्या ऐकण्यात आली.



मन्त्र्याने चौकशी करून राजाला म्हटले– "महाराज, मी शेतकऱ्याच्या बाबतीत चौकशी करवली. हा शेतकरी आपल्या नगराच्या टोकाशी असणाऱ्या एका झोपडीत रहातो. तो अतिशय गरीब आहे, पण लोक म्हणतात की तो एकाद्या देवासारखा आहे. ही गोष्ट मात्र अविश्वसनीय आहे, की तो रोज राजवाड्यात घुसून मुदपाकखान्यातून अन्न चोरून नेत असावा! तो जर गुप्तपणे असा राजवाड्यात घुसू शकत असेल, तर केवळ अन्नाचीच चोरी काय म्हणून करील? काही किमती आभूषण किंवा धन चोरून आपलं सर्व आयुष्यच आरामात नाही घालवू शकणार? अन् दोन्ही वेळचं जेवण चोरण्यासाठी प्रत्येक वेळी राजवाड्यांत शिरणं ही सामान्य गोष्ट नव्हे!"

"तरीही आपण जर एक दिवस त्याच्या घरी जाऊन तिथलं जेवण जेवलो, तरी खरी गोष्ट आपल्याला कळून चुकेल की नाही? असं कळतं की त्याच्या घरी जो कोणी अतिथि जाईल, त्याला तो जेवण दिल्यावाचून तिथून जाऊ देत नाही!" राजानं सुचवले.

या योजनेप्रमाणे राजा आणि मन्त्री डोक्यावर मोठमोठ्या पगड्या ठेवून अन् हातात छड्या धारण करून सर्वांची नजर चुकवून पायीच निघाले. बाहेर पडण्यापूर्वी आज मुदपाकखान्यात कोणकोणते पदार्थ शिजवले जात आहेत हे त्यांनी जाणून घेतले होते.

इकडे शेतकऱ्याकडे सर्वजण जेवायला बसायच्या तयारीतच होते; इतक्यात हे दोन अनोळखी पाहुणे तेथे पोचले व म्हणू लागले–"आम्ही दोघं शेजारच्या गावचे रहिवासी आहोत. आता दुपारी इथे पोचत आहोत. आम्हाला आत्ता थोडं जेवण मिळू शकेल काय तुमच्याकडे?"

शेतकऱ्याने उठून मोठ्या प्रेमाने दोघांचं स्वागत केलं, जेवणासाठी दोन पत्रावळी मांडल्या आणि बायकोला वाढायला





# पनामावर हल्ला

पनामात सैनिक-शासन चालवणारा नियन्त्रक जनरल अँटोनियो नोरिएगा याला त्याच्या पदावरून खाली ओढण्यासाठी अमेरिकेने गेल्या डिसेंबरच्या २० तारखेला पनामावर हल्ला केला.

नोरिएगाच्या नेतृत्वाखाली झालेल्या निवडणुकीत विरोधी पक्षाचा नेता एण्डोरा याचा जय झाला. परन्तु त्याच्या हाती अधिकारसूत्रे सोपवण्यास नोरिएगाने नकार दिला व स्वतःच अधिकार हस्तगत करून बसला.

नोरिएगाचे हे कृत्य अपराधपूर्ण नक्कीच आहे; परंतु एकाद्या परक्या देशाच्या आंतरिक मामल्यात हस्तक्षेप करायचा अमेरिकेला काहीही हक्क नाही, असे म्हणून जगातल्या जवळजवळ सर्वच देशांनी अमेरिकेच्या या कृत्याला विरोध दर्शवला.

नोरिएगा हा केवळ नियंत्रकच आहे असे नव्हे, तर गेल्या सहा वर्षांत त्याला विरोध करणाऱ्या सर्वच लोकांची त्याने पायमल्ली केली अन् त्यांना खूप त्रासही दिला. याबरोबरच आपला अधिकार चालू ठेवण्यासाठी त्याने जगातील तरुण पिढीचे जीवन नरकतुल्य बनवणाऱ्या नशील्या पदार्थांच्या आयातनिर्यातीत करोडो रुपये मिळवले. या संदर्भात अमेरिकेच्या समर्थकांचे असे म्हणणे आहे, की नोरिएगाच्या या अनुचित कृत्याला आळा घालण्यासाठीच अमेरिकेने पनामावर हल्ला केला.



# पूर्व युरोपात काय चालले आहे?

अल्बेनिया, बुल्गेरिया, झेकोस्लोवाकिया, हंगेरी पोलंड, रुमानिया, युगोस्लाविया इत्यादि देश पूर्व युरोपात मोडतात. काही संदर्भात जर्मन डेमोक्रॅटिक रिपब्लिक व सोविएट रशियाचा काही भाग यांचा ही पूर्व युरोपात समावेश केला जातो.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात जर्मनीचा नेता हिटलर आणि इटलीचा नेता मुसोलिनी यांनी मिळून या पूर्व युरोपीय देशांचा पराजय केला. शेवटी जर्मनीचा पराभव झाला, तेव्हां मित्र राष्ट्रांनी या देशांना स्वतंत्र केलं. तसे नावापुरते हे देश स्वतंत्र झाले खरे, पण सोविएट रशियाचा साम्यवादी नियंता स्टॅलिन याच्या अंकित होऊन राहिले. या सर्व देशांचे शासक साम्यवादीच होते. ते सर्व स्टॅलिनच्या छत्र-छायेत राहून त्याचे विश्वासपात्र बनले.

परंतु युगोस्लावियाचा नेता मार्शल टिटो याने सोविएट रशियाचे वर्चस्व न मानता एका निराळ्याच मार्गाचे अनुसरण केले. बाकीच्या सर्व देशांचे शासक स्टॅलिनच्या मृत्यु नंतर ही सोविएट नेत्यांचे अंकित राहिले. शासकांच्या विरुद्ध कोणी बंड केलं तर मोठ्या निर्दयपणे ते दाबून टाकलं जाई. कधी रशियाचे सैन्य ही त्यांच्या मदतीला धावून येई. राज्य-शासनाच्या बाबतीत साम्यवादी दलाशिवाय अन्य कोणत्या ही पार्टीला निर्णय घेण्याचा अधिकार नसे.

या परिस्थितीचे दोन प्रकारचे दुष्परिणाम झाले. एक तर जनता आपले मत कधी स्वेच्छापूर्वक व्यक्त करू शकली नाही आणि दुसरी गोष्ट म्हणजे साम्यवादी पार्टीच्या नावावर काही व्यक्ति आपली निरंकुश सत्ता गाजवू लागल्या. याचे उत्तम उदाहरण म्हणजे रुमानियाचा नियंता निकोलाय चुसेस्को. हा एकाद्या चक्रवर्ती राजाप्रमाणे भोग-विलासमय जीवन जगत असे, वेड्याप्रमाणे त्याने अफाट संपत्ति जोडली. त्याला जर कोणी विरोध केला, तर विरोधकाला तो केवळ दाबून टाकी असे नव्हे, त्याला नेस्तनाबूत करून टाकी. असा

निर्घृणपणे तो आपली सत्ता गाजवी. गेल्या १२ डिसेंबरला त्याच्या विरुद्ध जे भयंकर बंड झालं, त्यात त्याची हत्या केली गेली आणि अशा प्रकारच्या शासनापासून जनता मुक्त झाली.

एकच एक पार्टी अथवा एकाच परिवाराच्या शासनाचे कटु अनुभव प्राप्त करून आज रुमानिया लोकशाहीच्या मार्गावर वाटचाल करीत आहे. पूर्व युरोपातील अन्य देशात ही काहीसे असेच घडत असल्याचे दिसते. एकाच पार्टीच्या शासनाला कंटाळून जनता आता लोकशाही शासनाकडे आकर्षित होत आहे. सोविएट रशियात अलिकडे जो बदल घडून आला, त्यामुळे या स्थितीला अधिक उत्तेजन मिळालं. मिखेल गुर्बचिव्ह यांच्या नेतृत्वाखाली सोविएट रशिया खूपच उदार सिद्धान्तांचे अनुसरण करीत आहे. जनतेला विचार-स्वातंत्र्याचा उपयोग करू देण्याकडे आज रशियाचा कल दिसत आहे.

साम्यवादी दलांनी पुरस्कारिलेल्या समाजवादाच्या स्थापनेचा आदर्श या घटनेमुळे अर्थ-हीन झाला असं समजण्याचं कारण नाही. परंतु अलीकडे जगातील बुद्धिमान लोक हे समजून चुकले आहेत की लोकशाही राज्य-तंत्रातून समाजवादाचा विकास होऊ शकेल.








# निकुंभाचा गर्व-भंग

निकुंभ नावाच्या एका पंडिताने अनेक देशात भ्रमण केले नि आपल्या पांडित्याने तेथील पंडितांना हारवले. दिवसें-दिवस त्याचा अहंकार वाढत गेला. त्याला वाटले की आपल्याला जिंकणारा पंडित आता कोणी राहिला नाही.

अशा प्रकारे देशाटन करीत एकदा निकुंभ सौशील्य देशाची राजधानी मलयावतीला पोचला. तेथील राजा सर्वोत्तमने निकुंभाचे यथोचित स्वागत केले नि त्याच्या येण्याचे कारण जाणून घेतले. मग एक दिवशी राजसभेत दरबारी पंडितांची सभा बोलवून शास्त्रार्थ करण्यात आला.

दरबारी पंडितांनी निकुंभापुढे अनेक क्लिष्ट समस्या ठेवल्या, पण निकुंभाने चुटकी सरशी त्या सोडविल्या. निकुंभाच्या प्रश्नांची उत्तरे मात्र दरबारी पंडित देऊ शकले नाहीत, निरुत्तर होऊन ते इकडे-तिकडे पाहू लागले.

सर्व दरबारी पंडितांनी आपला पराभव मान्य केल्यावर निकुंभाने राजाला विनंती केली—"महाराज, आपल्या पंडितांना मी हारवलं आहे. आपल्या पंडितांनीं माझी विद्वत्ता मान्य करण्यादाखल माझ्या पायांना स्पर्श करावा. एवढीच माझी इच्छा!"

राजा सर्वोत्तमला निकुंभाची ही अपेक्षा अपमानकारक वाटली. तो विचार करू लागला की त्याला काय उत्तर द्यावं? इतक्यात तेथे हजर असलेल्या लोकातून एक माणूस पुढे आला नि त्याने राजाला अभिवादन करून म्हटले—"महाराज, मी धरहास. आपण मला परवानगी दिलीत तर मी या पंडितांना काही प्रश्न विचारू इच्छितो."

रोहिणी जोशी



राजाने हे मान्य केले. उंच व हाडकुळ्या धरहासकडे पाहून निकुंभ तुच्छतेने हंसला.

आता धरहास निकुंभाला उद्देशून म्हणाला–"पंडितजी, आपण तर महान् विद्वान आहात! आपणा सारख्या बुद्धि-वंताच्या प्रश्नांची उत्तरं मी अडाणी कसा देऊं शकेन? मी आपणास दोन साधे प्रश्न विचारतो. आपण जर त्यांची बरोबर उत्तरं दिलीत तर मी आपली हार मान्य करीन. पण जर आपण उत्तरे देऊ शकला नाहीत, तर मात्र आपला पराभव मान्य करून आपण या राज-सभेतून चालतं व्हायचं!"

"एवढंच ना? तुझी अट कबूल. चल विचार बरं तुझे प्रश्न!" धरहासकडे तुच्छतेने पहात निकुंभ म्हणाला.

धरहास म्हणाला–"नीट लक्षपूर्वक ऐका हं. एका पाऊलवाटेने तीन बकऱ्या एका मागून एक चालत होत्या. समोरून एक माणूस आला. त्याने पहिल्या बकरीला विचारले–'तुझ्या मागे किती बकऱ्या येत आहेत?' तिने उत्तर दिले–'दोन.' नंतर त्या माणसाने दुसऱ्या बकरीला तोच प्रश्न विचारला. ती बकरी पण म्हणाली–'दोन.' आता पंडितजी, आपण सांगा–हे कसं शक्य आहे बरं? दुसरी बकरी असं का म्हणाली? हा माझा पहिला प्रश्न आहे. द्याल या प्रश्नाचं उत्तर?"

निकुंभ खदखदा हंसून धरहासकडे तुच्छतापूर्ण नजरेने पहात म्हणाला–"वा! हा पण काय प्रश्न आहे?"

धरहास म्हणाला–"मी एक अडाणी माणूस आहे हे पहिल्यांदाच मी आपणास सांगितलं होतं. माझ्या सारख्या खेडवळ माणसाच्या प्रश्नांची उत्तरे आपण न देऊ शकलात, तर आपण पंडित कसले हो?"

निकुंभाने अमळ विचार केला नि म्हणाला–"कदाचित् या बकऱ्या वर्तुळाकार मार्गावर चालत असतील! गोल मार्गावर



दुसऱ्या बकरीच्या मागे दोन बकऱ्या चालत असणे शक्य आहे."

धरहास मंदस्मित करीत म्हणाला–"नाही मी अगोदरच सांगितलं होत ना की या बकऱ्या एका पाऊलवाटेने ओळीत एका मागून एक चालत आहेत!"

आता निकुंभ विचारात पडला. बराच वेळ विचार करून ही त्याला काही उत्तर सुचेना. निरुपायाने तो धरहासला म्हणाला–"सांग बरं, तुझं काय उत्तर आहे ते!"

"हत्तीच्या! आहो, दुसरी बकरी खोटारडी आहे. म्हणून तिनं असं उत्तर दिलं." धरहास हंसत म्हणाला.

राजसभेत हजर असलेले सर्व लोक जोर-जोराने हंसू लागले. धरहासकडे त्यांनी प्रशंसात्मक दृष्टीने पाहिले. आपण हारल्याचे मान्य करून निकुंभ म्हणाला–"बरं, आता तुझा दुसरा प्रश्न विचार."

धरहासने आपला दुसरा प्रश्न विचा-रायला सुरुवात केली–"एक मनुष्य एका डोंगरावर उभा राहून थोडा वेळ सूर्याकडे पहात राहिला. मग तो डोंगरावरून खाली उतरला आणि पूर्वेकडे चार कोस पायी चालत गेला. तिथे तो उजव्या बाजूला वळला आणि पाच कोस चालत राहिला. नंतर तो डाव्या बाजूला वळला आणि दोन कोस अंतर चालल्यावर एकदम थांबला.



तो माणूस का बरे थांबला असावा?" निकुंभाने धरहासकडे अशा काही नजरेने पाहिले की धरहास एक वेडा माणूस आहे. तरी पण उत्तर द्यायलाच हवं होतं. तो म्हणाला–"कदाचित् त्याच्या समोर समुद्र आडवा आला असेल!"

"अंऽहं!" धरहास लगेच म्हणाला.

हा माणूस का बरे थांबला असावा? निकुंभाने विचार करून चार-पाच उत्तरे सांगितली. पण धरहास प्रत्येक उत्तराला "चूक" म्हणत गेला. बराच विचार करून ही निकुंभाला काही बरोबर उत्तर सुचलं नाही.

शेवटी निरुपाय होऊन निकुंभने आपला पराजय मान्य केला नि मग विचारलं– "बरं, तर आता तूच सांग तुझ्या प्रश्नाचं उत्तर! तो माणूस का बरं थांबला?"

"ज्याची त्याची इच्छा! त्याला थांबावंसं वाटलं. तो थांबला! बस, एवढंच आहे उत्तर माझ्या प्रश्नाचं!" धरहास म्हणाला.

निकुंभाचा चेहरा काळा-ठिक्कर पडला. राजसभेतील सभासदांनी आनंदाने टाळ्यांचा कडकडाट केला. राजाने प्रशंसापूर्वक नजरेने धरहासकडे पाहिलं!

मान खाली घालून जमिनीकडे पहात बसलेल्या निकुंभला धरहास म्हणाला– "आपण मोठे पंडित असू शकाल, पण ज्ञानधनी मात्र नाहीत. कारण ज्ञानाची काही सीमा नसते. जो आपल्याला ज्ञानी समजतो, त्याने आपल्या हातात मूठभर वाळू घेऊन समजा विचारलं–"यात किती वाळू आहे?" तर आपण उत्तर द्याल– "त्याचा हिशेब करणं अशक्य आहे!" आपण असं साधं उत्तर देणार नाहीत की "हातात मुठभर वाळू आहे!" आपण त्या श्रेणीचे पंडित आहात झालं!"

धरहासचं हे म्हणणं ऐकून राजा नि धरहास यांच्याशी एक शब्द ही न बोलता निकुंभ मुकाट्याने राजसभा सोडून चालता झाला.

राजा सर्वोत्तमने धरहासला जवळ बोलवलं आणि त्याची विचारपूस केली.

धरहासने नम्रतापूर्वक निवेदन केले– "महाराज, इथून थोड्या अंतरावर मृणालिनी नदी वाहते. तिच्या किनाऱ्यावर आमचं छोटं गाव आहे." भावांकडे बोट दाखवीत तो म्हणाला–" माझ्या धाकट्या भावाचं नाव मंदहास, नि मोठ्या भावाचं नाव आहे अट्टहास! आम्ही तिघे जण काही नोकरी मिळावी या आशेने इथं आलो आहोत."

मग राजा सर्वोत्तमने धरहासचा भव्य सत्कार केला आणि तिन्ही भावांना आपल्या दरबारात त्यांच्या योग्यतेनुसार नोकऱ्या दिल्या.





# गैरसमज

सीतापुर गावात कृष्णकान्त नावाचा एक कीर्तनकार रहात असे. त्याच्या कथांना श्रीहरी, गणपती आणि चन्द्रनाथ आपल्या गाण्यांची अन् वाद्यांची साथ देऊन छान रंगत आणत असत. आसपासच्या गावांमधे कथेकरीबुवा चांगले लोकप्रिय झाले होते.

एक कथा सांगण्याचे कृष्णकान्त एकशे सोळा रुपये घेत असे. याशिवाय श्रोत्यांपैकी काहीजण खुशीने थोडे-फार पैसे देत असत. शेवटी देवाची आरती झाल्यानंतर त्या तबकात श्रद्धेने जे पैसे लोक टाकत, ते पैसे कृष्णकान्त घेत असे. आपल्या साथीदारांना कृष्णकांत फारच कमी पैसे देई.

कृष्णकान्त एकदा बाहेरगावी गेला आहे असे पाहून हे तिघं साथवाले त्याच्या घरी गेले अन् त्याची पत्नी अच्युतांबा हिला दीनतेने म्हणाले–" वहिनीबाई, कृष्णकान्त मिळणाऱ्या पैशांचा फारच थोडा वाटा आम्हाला देतात. आम्हालाही बायकामुलं आहेत, आम्हालाही अनेक गोष्टींची जरूर असतेच–ही गोष्ट ते जर विचारात घेतील तर बरं होईल!"

कथेकरी बुवांची बायको क्षणभर विचार करून म्हणाली–"ठीक आहे. संधी पाहून तुमचं म्हणणं कानावर घालीन मी त्यांच्या! तुम्ही आता उगीच काळजी करत बसू नका."

त्या दिवशी संध्याकाळी अच्युतांबाने आपल्या नवऱ्याजवळ साथवाल्यांची गोष्ट सांगून म्हटले–" अहो, तुम्ही तर सगळ्या ठिकाणी सांगत असता की, तुम्ही जे पुराण सांगता, त्यात या साथवाल्यांचं हो महत्त्वाचं स्थान असतं. पण मग यात तुम्हाला जे पैसे मिळतात, त्यातला न्याय्य हिस्सा त्यांना द्यायला नको का?"

ग. सा. मुळे



हे ऐकून कृष्णकान्त जरासा रागावलाच! तो धीम्या आवाजात बायकोला म्हणाला– "ते बघ, या बाबतीतला न्याय अन् अन्याय मला चांगला कळतो बरं! पुन्हा कधी याबाबतीत माझ्याशी बोलायचा प्रयत्न करू नकोस."

आणखी काही दिवस असेच निघून गेले. कथेकरीबुवांनी एका योग्य अशा मुलाशी आपल्या मुलीचे मोठ्या थाटामाटाने लग्न लावून दिले. नंतर थोडी नवीन जमीन खरेदी केली. पण अनेक वर्षे साथ करणाऱ्या लोकांशी पहिल्यासारखाच कंजूषपणा ते करत राहिले. श्रीहरी, गणपती व चन्द्रनाथ यांना आता हा अन्याय सहन होईनासा झाला आणि त्यांनी साथीला जाणे बन्द करून टाकले.

कारण जाणून घेण्यासाठी कृष्णकान्त प्रथम श्रीहरीच्या घरी गेला. त्याला पाहून श्रीहरीच्या बायकोला आश्चर्यच वाटले. ती म्हणाली–"तुम्ही तर खूपच दिवसांनी येत आहात आमच्याकडे! या कथा-कीर्तनाच्या नादी लागून आमचे मालक तर कुटुंबाची काहीच काळजी करीत नाहीत. आमच्या मुलीचं लग्नाचं वय उलटत चाललंय. आता मुळीच उशीर न करता तिच्यासाठी एकादं स्थळ पक्कं करायला हवं." अशा प्रकारे तिने आपल्या कुटुम्बाच्या काही अडचणी त्याला ऐकवल्या.

हे सर्व बोलणे ऐकून घेऊन कृष्णकान्त सरळ गणपतीच्या घरी गेला. गणपतीच्या आजारी बायकोने अंथरूण धरले होते. त्याच्या पंधरा वर्षाच्या मुलाने कृष्णकान्त-जवळ तक्रार केली–"माझे वडील आईच्या आजाराची मुळीच काळजी घेत नाहीत. तिची तब्येत सुधारण्याचं काही चिन्ह दिसत नाही. एकाद्या चांगल्या वैद्याकडून इलाज करवायचा म्हटलं तर आमच्या जवळ पुरेसे पैसेही नाहीत. आम्ही खूप सक्ती केली म्हणून आत्ताच ते गावातून कुठून तरी उसने पैसे आणायला गेले आहेत."



कृष्णकान्तने गणपतीच्या बायकोची विचारपूस केली, आजार किती मुरला आहे याचा अन्दाज घेऊन तो थेट चन्द्र-नाथच्या घरी पोचला.

घराबाहेरच ओटचावर एका फाटक्या तुटक्या चटईवर चन्द्रकान्त उदास मुद्रेने बसलेला होता. कृष्णकान्तची हाक ऐकून तो भडाभडा बोलू लागला–"महाराज, माझ्या असमर्थतेमुळे आणि निष्काळजी पणामुळे आज आम्ही सर्व अशा हालात दिवस कंठत आहोत. खाण्या-पिण्यापुरते अन् कपड्या लत्त्यांपुरतेही पैसे मिळवू न शकल्यामुळे मी माझ्या बायकामुलांना आत्तापर्यंत काहीच सुख दिलं नाही. आता यापुढे मी तुमच्याबरोबर फिरू शकत नाही, म्हातारा झालोय मी! जास्त हिंडाफिरायची ताकद नाही राहिली माझ्यात!"

"असं होय!" असे कृष्णकान्त हसून म्हणाला. नंतर आपल्या घरी जाऊन तीन्ही साथवाल्यांना त्याने बोलावून घेतले आणि गावातल्या चार वडिलधाऱ्या माणसांसमोर त्याने तिघांनाही म्हटले– "माझ्याबद्दल तुमच्या मनात जे काही आहे ते स्पष्टपणे अन् निःसंकोचपणे बोलून टाका."

कथाकार कृष्णकान्तच्या वर्तणुकीमुळे गांजलेल्या श्रीहरी, गणपती व चन्द्रनाथ या तिघांनीही कृष्णकान्तला अत्यन्त कंजूस व लोभी म्हणून त्याच्या वागणुकीची निर्भर्त्सना केली.



नंतर कृष्णकान्त घरातून पैशांच्या तीन थैल्या घेऊन आला अन् त्यांच्या समोर त्या ठेवून म्हणाला–"तुम्ही माझ्याबद्दल गैरसमज करून घेतलात, त्याला कारण मीच आहे. पण मी मात्र हे सर्व तुमच्या भल्यासाठीच केलं. तुम्हाला मिळायच्या पैशातून नेहमीच अर्धे बाजूला काढून तुम्हाला ची अर्धी रक्कम देत आलो. माझ्या अंगात जी नियन्त्रणाची आणि सहन करण्याची शक्ति आहे, ती तुमच्यात नाही. मी हे धन जेव्हाच्या तेव्हाच तुम्हाला दिलं असतं तर तुम्ही व्यर्थच खर्च करून टाकलं असतं; आपल्या म्हातारपणी आपलं कोणतंही कर्तव्य नीटपणे करू शकला नसतात, अन् संकटं झेलत राहिला असतात."

"हो हो! तुमचं म्हणणं अगदी बरोबर आहे." श्रीहरीने कबुली दिली.

कृष्णकान्तने तिघांनाही त्या थैल्या समर्पित करून म्हटले–"मी तुम्हापैकी प्रत्येकाला हे दहा-दहा हजार रुपये देत आहे. या चन्द्रनाथच्या म्हणण्याप्रमाणे तो एकटाच नव्हे, तर आपण चौघेही आता म्हातारे झालो आहोत. मी जे दिलं आहे, त्यातून तुमच्या घरच्या अडचणी दूर होऊ शकतील असं वाटतं मला. तरीही कधीही, कसली गरज भासली तर माझ्याकडे या. मी यथाशक्ति जरूर तुम्हाला मदत करीन."

मग काय! श्रीहरी, गणपती व चंद्रनाथ या तिघांनीही कृष्णकांतच्या पायाला शिवून त्याला नमस्कार केला. अन् क्षमा-याचना करत म्हटले–"महाराज, आमच्या हातून चूक घडली असली, तर क्षमा करा आम्हाला."

यावर कृष्णकान्त काही म्हणणार, इतक्यात त्याला थांबवत गावातला एक वयस्कर माणूस म्हणाला–"यात एकमेकांना क्षमा कसली करायची? कृष्णकान्त तुमच्या भल्याचा विचार करूनच, तुमच्यापुरता काही दिवस कंजूस बनला होता!"

त्याचे हे बोलणे ऐकून कृष्णकान्तसकट सर्वच गडगडून हसू लागले!






[७]

[सेनापति वीरसिंहाने कारस्थान करून सुमेध राज्याचे सिंहासन बळकावले. नंतर त्याच्या अत्याचारांचे प्रमाण वाढतच राहिले. त्याचा अधिकार न मानणाऱ्या वृद्ध मन्त्र्याचा व वसन्त नावाच्या विरोधी युवकाचा वध करण्याची योजना त्याने आखली. पण ऐन वेळी एका गुप्त वीराने त्या ठिकाणी पोचून दोघांचेही प्राण वाचवले. पुढे वाचा–]

एका गुप्त वीराच्या मदतीने वसन्तही कोतवालाच्या हातून निसटल्याची बातमी वीरसिंहाला मिळाली, तेव्हा तो रागाने चवताळून गेला! सहायक कोत-वालाने हात बांधून वीरसिंहासमोर जाऊन निवेदन केले-"महाराज, प्रमुख कोतवालाला आपणासमोर यायची लाज वाटत आहे."

सहायक कोतवालाच्या तोंडून सारा वृत्तान्त ऐकल्यावर वीरसिंह चांगलाच भडकला; आणि म्हणाला–"मी त्या कम्बख्त नालायकाचा चेहरा सुद्धा पाहू इच्छित नाही. आत्ताच्या आत्ता जाऊन त्याला निरोप दे कि, हे राज्य सोडून चालता हो कुठेही! या क्षणापासून मी तुलाच प्रमुख-कोतवाल बनवत आहे."

वीरसिंहाने हे बोलणें ऐकून सहायक कोतवाल आनन्दाने वेडा झाला; अन् दुसऱ्याच क्षणी त्याच्या पायावर लोटांगण



घालत म्हणाला–"प्रभु, आपल्यासाठी मी आपले प्राणही द्यायला तयार आहे."

"प्राण-बीण द्यायची काही जरुरी नाही मूर्खा! खरोखरीच तुझा प्राण गेला तर मला पुन्हा नवा कोतवाल पहायची यातायात करावी लागेल!" वीरसिंह रागावून त्याला म्हणाला.

"खरंच महाराज, आपण छान डोळे उघडलेत माझे! आता मी आपणाला विरोध करणारांचे प्राण हरण करीन. आज्ञा द्यावी महाराज!" असे म्हणत नवा कोतवाल वीरसिंहाला मुजरा करून तेथून निघाला.

"शाबास! जा. मला नुसत्या कोरड्या गप्पा नकोत, काही भरीव काम पाहिजे!" वीरसिंहाने त्याला प्रोत्साहन दिले.

नवा कोतवाल तेथून निघून गेला. बरोबर दहा शिपाई घेऊन तो शान्तिपुरच्या नगरसीमेवरील वसन्तच्या गावी पोचला. वसन्तचे वृद्ध आई-वडील, त्याचा धाकटा भाऊ व बहीण या सर्वांना फरपटत ओढत त्याने गावाच्या मध्यावर असलेल्या चावडी-पर्यंत आणले. त्या सर्वांना तेथे उभे करून त्यांच्या छातीवर भाले रोखून, त्याने विचारले–"हं बोला. वसन्तला तुम्ही सर्वांनी कुठे लपवून ठेवलं आहे?"

"हुजूर, त्याला तर राजाचे शिपाई कैद करून घेऊन गेले आहेत." वसन्तच्या बाबांनी हात जोडून गरिबीने उत्तर दिले.

"अहा! ते तर सर्वांनाच माहीत आहे. पण आता तो कुठे आहे! जुन्या कोतवालाला घोड्यावरून ढकलून देऊन, अन् बाकी शिपायांच्या डोळ्यात धूळ फेकून वसन्तला सोडवून नेणारा तो बदमाश कोण आहे बोला?" गर्जून कोतवालाने विचारले.

"आमच्या भावाला कोणा शूर वीराने जेव्हा वाचवले, तेव्हा आम्ही तर तेथे नव्हतो ना? उलट आम्ही ऐकलं, की त्यावेळी आपण स्वतः तिथे होता! मग माझ्या भावाची माहिती आमच्यापेक्षा



तुम्हालाच जास्त असायला पाहिजे ना?" वसन्तचा धाकटा भाऊ कोतवालाला पेचात टाकत म्हणाला.

"त्या मिरवणुकीत आपणच कोतवालाच्या मागे-मागे चालत होता नं? याचाच अर्थ असा, की तो बुरखाधारी तेथे आला, तेव्हा आपणही तेथेच होता!" गर्दीतला एक तरुण म्हणाला.

"अरे मूर्ख तरुणा, मी जर त्यावेळी तेथे असतो, तर तुमच्यातला एक तरी माणूस जगू शकला असता काय?" असे म्हणून कोतवालाने त्या तरुणाला आपल्या दंडुक्याने मारले.

"अरे, त्या बिचाऱ्याला आपण का म्हणून मारत आहात?" एका गृहस्थाने विचारले.

"महाराज, शान्तिदेवांच्या राज्यात असा अत्याचार कधीच घडला नाही." गावातला एक म्हातारा म्हणाला.

"हे तर सर्व विद्रोही लोकांचंच गाव दिसतंय! जाळून टाका ते ताबडतोब! होऊ दे सर्वांची राख! हूं, लावून द्या आग!" कोतवालाने आपल्या शिपायांना हुकुम दिला.

"हुजूर, आमचं गाव का जाळता? आम्ही काय अपराध केलाय तो तर सांगा!" गावकरी एका स्वरात ओरडू लागले.

तरी त्यांच्याकडे मुळीच लक्ष न देता दोन शिपाई एका घरात घुसले. चुलीतलं



जळतं लाकूड आणून त्यांनी त्या घराच्या छपराला आग लावून दिली.

मोठ्या खुशीने मिशांना पीळ देत कोतवाल म्हणाला–"छान! द्या पेटवून सगळी घरं! एकही घर सोडू नका. होऊ दे भस्म सगळ्याचं!"

थोड्याच वेळात सर्वत्र आगीचा डोंब उसळला! सर्वच घरं पेटू लागली धडाधडा! लोक आग विझवायचा प्रयत्न करत इकडून तिकडे धावू लागले. पण एकीकडची आग विझवावी तर दुसरं घर नव्याने पेटत होतं. आगीच्या ज्वाळातूनच मधून मधून बांबू फुटण्याचे आवाजही येत होते. मोठं हृदयविदारक दृश्य दिसू लागले तिथे



थोड्याच वेळात! ते पाहून खदाखदा हसत कोतवाल आपल्या शिपायांना घेऊन, घोड्यावर बसून राजधानीकडे निघून गेला.

त्या रात्री पाऊस पडत होता. आकाश मेघाच्छादित होते, मधून-मधून विजा चमकत होत्या; अरण्यातून जयपुरी कडे जाणाऱ्या रस्त्यावर मुनि जयानन्द एकटाच चालत होता. त्याच्या मागून धिम्या गतीनें वाघीण चालत होती. मुनीच्या खांद्यावर एक सुन्दरसा पोपट बसलेला होता.

त्या राज्याची राजधानी होती जयपुरी. पण ते शान्तिपुरसारखे मोठे शहर नव्हते. दिसायला ती एकाद्या मोठ्या खेड्यासारखीच भासत होती. तरीही ते एक स्वतन्त्र राज्य होते–त्या राज्याच्या एका बाजूला सुमेध राज्य होते आणि दुसऱ्या बाजूला होता समुद्रकिनारा. बाकीच्या दोन बाजूंना घनदाट असे विशाल जंगल पसरलेले होते.

काही पिढ्यांपूर्वी जयपुरीच्या सामन्त राजाने सुमेधच्या त्या वेळच्या राजाचे प्राण एका महासंकटातून वाचवले होते. तेव्हापासून शान्तिपुरच्या राजांनी जयपुरीच्या राजांना पूर्ण स्वातन्त्र्य दिले होते; आणि त्यांच्या राज्याच्या संरक्षणाचीही काळजी घेतली होती. कारण जयपुरीवर हल्ला करायचा झाला, तर हल्लेखोरांना सुमेध राज्य ओलांडून जाणेच आवश्यक असे.

जयपुरीच्या सध्याच्या राजाचे नाव होते शंकरवर्मा. तो मुनि जयानन्दच्या प्रमुख शिष्यांपैकी एक होता.

मुनि निर्जन रस्त्याने जाऊन जयपुरीच्या सीमेवरील एका मन्दिराजवळ पोचला. तेथे त्याने वाघिणीला म्हटले–"आता मी परत येईपर्यंत तू इथेच थांब." आणि खांद्यावरच्या पोपटाला हातात घेऊन तो म्हणाला–"मल्ली, तू राजाजवळ जाऊन त्याला सांग की, माझी त्याला भेटायची इच्छा आहे."

पोपट लगेच पंख फडफडवीत किल्ल्याकडे उडून गेला.

राजा शंकरवर्मा उशीरानेच जेवून, विश्रान्तीसाठी आपल्या शयनकक्षाकडे निघाला होता. इतक्यात त्याला हाक ऐकू आली–"वत्स!" राजाने मागे वळून पाहिले.

पोपट फुर्रकन उडून राजाच्या खांद्यावर येऊन बसला आणि त्याने पुन्हा हाक दिली–"वत्स!"

"काय झालं मल्ली?" पोपटाला कुरवाळत राजाने विचारलं.

"महात्मा." पोपटाने सांगितले.

"असं होय?" असे म्हणून शंकरवर्माने एका शिपायाला बोलावून किल्ल्याचा दरवाजा उघडायची आज्ञा दिली.

मुनि जयानन्द शंकरवर्माला 'वत्स!' अशी हाक मारत असे अन् राजा मुनीला 'महात्मा' म्हणत असे. केवळ याच दोन शब्दांचा उच्चार करून पोपटाने आपले निरोप देण्याचे कार्य साधून घेतले.

शंकरवर्माने पुढे होऊन मुनीला मोठ्या भक्तिभावाने नमस्कार केला व म्हटले–"महात्मा, पावसात स्वत: इतक्या दूर येण्याचे कष्ट का बरं घेतलेत? मल्लीकडून निरोप दिला असतात, तर मी स्वत:च आपल्या सेवेला हजर झालो असतो."

"होय, गोष्ट खरीच! पण तू माझ्या आश्रमांत आला असतास म्हणजे सर्वांची दृष्टि तुझ्यावर केन्द्रित झाली असती; म्हणून मी स्वत:च आलो इकडे." मुनि म्हणाला.





शंकरवर्माने ओळखले की मुनि काही गुप्त बातमी सांगण्यासाठीच आलेला आहे. राजा त्याला आदराने आपल्या महालात घेऊन गेला. त्याला कपडे बदलून ताजे-तवाने होण्यास सांगून, बसायला एक उच्चासन दिले राजाने. मुनि बसल्यावर राजाने स्वत:च्या हाताने त्याला गरम दूध दिले, आणि मुनीच्या आज्ञेने तो त्याच्या समोर बसला.

"वत्सा, मी ऐकलं की अलिकडे तू कशामुळे तरी फार व्याकुळ झालेला आहेस. खरं आहे हे?" मुनीने एकदम मुद्याला हात घातला.

"होय खरंच! तसं पाहता मी स्वत: आपणाला भेटून माझी व्यथा सांगायच्या विचारात होतो." राजा म्हणाला.

"शान्तिपुरमधे घडलेल्या घटनेनेच तुझं मन दु:खी आहे काय?" मुनीने विचारले.

"होय. कित्येक पिढ्यांपासून कीर्तीच्या शिखरावर असणारा राजवंश पार नाहीसा झाला. राजघराण्याशी नातं असूनही वीरसिंह बंडखोर बनला. त्याचे अत्याचार दिवसेंदिवस वाढतच आहेत. कोण आळा घालू शकणार त्याला? लवकरच त्याची दृष्टि आपल्या राज्यावर पडण्याचीही शक्यता आहेच ना!' शंकरवर्मा म्हणाला.

"पण वत्सा, त्या जुन्या वंशाचा अन्त झालेला नाही. बघ काय आहे माझ्या हातात!" असे म्हणून मुनीने आपली मूठ उघडली. मधे पदक असणारा एक सुवर्ण-हार मुनीच्या हातात चमकत होता. त्या पदकावर सुमेध राजवंशाची मोहोर अंकित केलेली होती!

ते पाहिल्याबरोबर शंकरवर्माचे डोळे आश्चर्याने विस्फारित झाले.

"हा तर सुमेध राज्याच्या युवराजाचा कंठहार! आपल्या हातात कसा काय आला तो?" उत्सुकतेने त्याने विचारले.

"युवराजासह हा हारही माझ्या हाती आला आहे. वत्सा! युवराज सध्या

माझ्याजवळच आहे." जरासे हसत मुनि जयानन्द म्हणाला.

"महात्मा, आपण तर ही मोठीच आनन्ददायक वार्ता सांगितलीत की! यापुढे युवराजाला संभाळण्याची जबाबदारी माझी!" शंकरवर्मानें मदतीचा हात पुढे केला.

"हे काम तू अंगावर घेशील असे मला वाटलेच होते. पण हे काम तुला व युवराजाला हितकारक ठरेल काय?" मुनीने विचारले.

शंकरवर्मा थोडा वेळ गप्प राहिला, नंतर डोके हलवीत तो म्हणाला—"महात्मा, जरा नीट विचार केल्यावर मलाही पटलं की, आपण म्हणता त्याप्रमाणे हे काम आम्हा दोघांनाही हितकर नव्हे! कारण मला माहीत झालं आहे की, त्या दुष्ट वीरसिंहाने युवराजाला शोधण्यासाठी चारी दिशांना आपले गुप्त हेर पाठवलेले आहेत. अशा परिस्थितीत युवराजाला आपण गुप्तपणे लपवू शकणार नाही ना इथे!"

"तुला सत्य परिस्थिति बरोबर समजली आहे; तेव्हा आता युवराज गुप्तपणे जंगलात माझ्याकडेच वाढत रहाणं हिताचं होईल. पण हा युवराजाशी संबंध असणारा हार मात्र तूच सुरक्षिततेने संभाळायला हवास. युवराजाच्या गळ्यात तो राहू देणं धोक्याचं होईल." मुनि राजाला म्हणाला.

"जशी आपली आज्ञा! तरीही आपण मला राजवंशासाठी आणखी काही योग्य अशी मदत सुचवावी. मी ती जरूर करीन." शंकरवर्मानें मुनीला आपली इच्छा सांगितली.

"तुला तर भविष्यात खूपच करायचं आहे. पहा प्रत्येक गोष्टीसाठी योग्य वेळ येणं आवश्यक असतं. तोपर्यंत सुमेध राज्यातल्या दुःखद वार्ता धैर्याने ऐकत रहा. सुमेध राज्याच्या जनतेचं दुःख व त्यांचे कष्ट दूर करण्यासाठी आपल्याला आपली कर्तव्ये प्रथम पार पाडायला हवीत." मुनि म्हणाला.

(क्रमशः)



# वेताळाच्या गोष्टी

## तीन मित्र



दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाकडे परत आला. फांदीवरून प्रेत उतरवून त्याने ते आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमी प्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाकडे चालू लागला. तेव्हा त्या प्रेतात रहाणारा वेताळ राजाला म्हणू लागला—"हे राजा, या मध्यरात्रीच्या वेळी, खरे म्हणजे तू आपल्या राजवाड्यात मऊ शय्येवर झोपलेला असायला हवा होतास. पण मला समजत नाही, कि या भयानक मसणवटीत कसलं काम साधायला तू असा भटकत आहेस? तुझे कष्ट कमी भासावेत म्हणून मी तुला हरिणी नावाच्या मुलीची गोष्ट सांगतो. नीट लक्षपूर्वक ऐक."

वेताळ गोष्ट सांगू लागला—

प्राचीन काळी दण्डकारण्यात एक गुरुकुल होते. आचार्य विद्यासागर या गुरुकुलाचे संचालन करीत असत. गुरु-



कुलाला कोणत्याही प्रकारचा राजाश्रय मिळत नसल्यामुळे श्रीमन्त लोक आपल्या मुलांना त्यांच्याकडे शिकायला पाठवत नसत. पण त्यामुळे विद्यासागरना ते चालवणे कठीण जात असे. अगदीच सामान्य कुटुम्बातल्या मुलांना आपले शिष्य म्हणून स्वीकारुन त्यांच्या आवडी प्रमाणे ते त्यांना शिकवत असत.

या गुरुकुलात हरिणी नावाची एक मुलगी साहित्य विषय शिकण्यासाठी दाखल झाली. संगीताचा अभ्यास करणारा मल्लीनाथ आणि खड्गविद्या शिकणारा शशिधर यांच्याशी तिची इथे ओळख झाली आणि हळूहळू हे तिघंजण चांगले मित्र बनले.

हरिणीला संगीत विशेष आवडे. त्यामुळे मल्लीनाथची मधुर गाणी ती तल्लीन होऊन ऐकत असे. खड्गविद्येचा शशिधर हाही चांगला कला-प्रेमी होता, पण स्वतः मात्र तो कोणत्याही अभिनव कलेत प्रवीण होऊ शकला नाही.

थोड्याच काळात हरिणी एक उत्तम कवयित्री बनली, मल्लीनाथ महान् संगीतज्ञ बनला अन् शशिधर ही आपल्या खड्ग-विद्येत चांगलाच पारंगत झाला.

एके दिवशी आपल्या या विद्यार्थ्यांना एकत्र बोलावून विद्यासागर म्हणाले– "आजपासून तुमची विद्यार्थी अवस्था संपली. तुम्ही तिघंही आता बाहेर पडून आपापलं नशीब शोधा." आणि त्यांचे कल्याण चिंतून त्यांनी आपल्या शिष्यांना आशीर्वाद दिले.

शशिधर एका घोड्यावर बसून वाटेतल्या एका जंगलातून आपल्या गावाकडे जात होता. रस्त्यात काही बुरखाधारी लोक एका माणसावर हल्ला करीत असलेले त्याला दिसले. त्याने तावडतोब आपली तलवार म्यानातून बाहेर खेचली अन् तो त्या बुरखाधारींवर चालून गेला. विजेच्या गतीने फिरणाऱ्या त्याच्या तलवारीसमोर ते बुरखावाले टिकाव धरू शकले नाहीत; आणि त्यांनी तेथून पोबारा केला!

काहीसा जखमी होऊन जमिनीवर पडलेला तो माणूस शशिधरला म्हणाला– "मी या देशाचा राजा आहे. तू मला ऐन वेळी मदत केलीस. तुझी खड्गविद्या प्रशंसनीय आहे."

"महाराज, प्रशंसा करायचीच, तर माझ्या गुरुजींची करायला हवी." शशिधर मोठ्या नम्रतेने म्हणाला.

"ओहो, असं होय? तुझे गुरुजी इतके महान आहेत? बरं आता तुला हवं ते मागून घे माझ्याकडून." राजा म्हणाला.

"मी आपल्या गुरुजींना–विद्यासागरना– काही गुरुदक्षिणाही देऊ शकलो नाही; इतका गरीब आहे मी! माझी इतकीच इच्छा आहे, की ते जे गुरुकुल चालवत आहेत, त्याला आपण काही आर्थिक मदत करावी." शशिधरने विनंती केली.

राजधानीत पोचल्याबरोबर स्वतःचे प्राण पणास लावून आपले प्राण वाचवणाऱ्या शशिधरची राजाने आपला अंग-रक्षक म्हणून नेमणूक केली; आणि त्याचे गुरु विद्यासागर यांच्याकडे आपल्या एका अधिकाऱ्याकरवी खूपसे धन पाठवले.

एके दिवशी शशिधर त्याच शहरात रहाणाऱ्या आपल्या मित्राकडे–मल्लीनाथकडे त्याला भेटायला गेला. आपल्या मित्राला राज-दरबारात नोकरी मिळाल्याचे ऐकून मल्लीनाथला फार आनन्द वाटला. तो शशिधरला म्हणाला–"अरे दोस्त,





मलाही तुझ्या ओळखीने दरबारात एकादी नोकरी दे ना मिळवून!"

शशिधरने मल्लिनाथची राजाशी भेट घडवून आणली नाही, परन्तु राजदरबारात उच्च पद भूषवणाऱ्या काही अधिकारी आणि शहरातल्या काही मुख्य व्यक्ति यांच्याशी मल्लीनाथची ओळख करून दिली. शशिधरने त्यांना सांगितले, कि मल्लीनाथ हा एक उत्तम संगीतकार आहे. त्यांच्यातील काहींनी मल्लीनाथला संगीत विद्यालय उघडायला प्रोत्साहन दिले.

थोड्याच दिवसात मल्लीनाथचे संगीतातले कौशल्य शहरातल्या सर्व प्रमुख लोकांना कळून चुकले. ते लोक खूपदा त्याचे जलसे घडवून आणू लागले. अशा सर्वच जलशांना हजर असणारी त्या गावातली एकच एक व्यक्ति म्हणजे हरिणी असे! वेळ होईल तेव्हा शशिधरही आपली हजेरी लावत असे.

एके दिवशी मल्लीनाथ हरिणीला म्हणाला–"राजदरबारात शशिधर आपला चांगला प्रभाव जमवून आहे. पण त्याने अजून एकदाही दरबारात माझ्या गाण्याचा कार्यक्रम घडवून आणला नाही. मला वाटतं की माझ्या यशाबद्दल त्याला ईर्ष्या वाटत असावी! ते काही असो, पण तू एकदा त्याला भेटून दरबारात माझ्या गाण्याचा कार्यक्रम करण्याचे जमवशील?"

यानंतर हरिणींने अनेकदा शशिधरजवळ याबद्दल बोलणे केले.

थोड्याच दिवसांनी शशिधरच्या प्रयत्नाने राजासमोर मल्लीनाथचा गाण्याचा जलसा झाला. त्याच्या संगीतावर मुग्ध होऊन राजाने त्याला अमूल्य अशा भेटवस्तु आणि खूपसे धन देऊन त्याचा अपूर्व असा सत्कार केला. यामुळे आता त्याच्या संगीत विद्यालयाची कीर्ती केवळ त्याच नगरात नव्हे, तर सर्वत्रच पसरली.

एके दिवशी नेहमीप्रमाणे मल्लीनाथच्या एका जलशानन्तर हरिणी आपल्या घराकडे परतत होती. तेव्हां मल्लीनाथ तिला गाठून म्हणाला–"हरिणी, मी खूप दिवसांनी तुझ्याजवळ माझ्या मनातली एक इच्छा प्रकट करत आहे. तुझ्याशी विवाह करावा अशी माझी इच्छा आहे."

यावर हरिणी शान्तपणे म्हणाली–"मी तुमच्या प्रत्येक सभेला यासाठी हजर रहाते, की तुमच्या संगीताचं मला फार आकर्षण वाटतं. बस, इतकंच! तेव्हां कृपा करून माझ्यासमोर विवाहाबद्दल पुन्हा कधी बोलू नका." इतके बोलून हरिणी तेथून निघून गेली.

तिचे हे उत्तर ऐकून मल्लीनाथला वाटले की, हरिणी केवळ गर्विष्ठच नव्हे तर मूर्खही असली पाहिजे.

एके दिवशी हरिणी शशिधरच्या घरी गेली आणि तिने त्याला विचारले–"माफ करा, मी एकदम स्पष्टच बोलते आहे. पण, म्हणून मी अगदीच अधीरशी मुलगी आहे असे मात्र समजू नका. माझे आई-वडील माझ्या लग्नाच्या प्रयत्नात आहेत; पण माझी मात्र तुमच्याशी विवाह करायची इच्छा आहे. तुमचा काय विचार आहे?"

हरिणीचे हे निश्चयाचे बोलणे ऐकून शशिधर खूश झाला आणि त्याने आपली सम्मति देऊन लवकरच तिच्याशी विवाह केला. एवढी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, संगीतप्रेमी हरिणीने त्या विद्येत अत्यंत यशस्वी व संपन्न अशा मल्लीनाथची मागणी धुडकावून आणि स्त्रीसुलभ अशी लाजही गुंडाळून ठेवून शशिधरशी लग्न केलं. ही तिची कृति तिचा गर्व अन्



अविवेकाची द्योतक नव्हे काय? आपला मित्र मल्लीनाथ याने विनवूनही शशिधरने राजदरबारात त्याच्या जलशाची व्यवस्था केली नाही. पण हरिणीने म्हटल्यावर मात्र त्याने लगेच ती व्यवस्था केली. ही गोष्ट त्याने केवळ ईर्ष्येमुळेच केली हे सिद्ध होत नाही काय? या शंकेचं उत्तर माहीत असूनही तू दिलं नाहीस तर पहा राजा, तुझं मस्तक फुटून त्याचे तुकडे तुकडे होऊन पडतील."

विक्रमादित्य यावर ताबडतोब उत्तरला–"हरिणीच्या वर्तनावर गर्व अन् अविवेकी-पणाचा शिक्का मारणं चुकीचं होईल. कोणत्याही प्रकारचा राजाश्रय नसलेल्या गुरुकुलात तिने आपले शिक्षण पूर्ण केले होते. त्यामुळेच तिने चांगला तर्कसंगत विचार करून, कीर्ति व पैसा यांच्या मोहात न पडता आपल्या वर्गबंधूंपैकी जो आचार-विचाराने अधिक उन्नत वाटला, त्यालाच वरले."

"आता राहिली शशिधरची गोष्ट! जो मागितल्यावर मदत करतो, तो मित्र असतो; पण न मागता मदत करणारा हा आप्त असतो. त्यामुळे शशिधरने प्रथम मल्लीनाथचा शहरातल्या प्रमुख लोकांशी परिचय करून दिला. त्याने लगेचच राज-दरबारात मल्लीनाथचा जलसा न करवण्याचे कारण ईर्ष्या वगैरे काहीच नव्हते. खरी गोष्ट अशी की, जलशासाठी राजाची परवानगी मिळवायची असेल तर त्या संगीत-विद्वानाची केवळ लायकीच पुरेशी नसते, पण त्याची लायकी सिद्ध झालेली असावी लागते. नगरातल्या प्रमुख व्यक्ति आणि अन्य संगीत प्रेमी लोकांनी त्याच्या संगीत-कलेची स्तुति केली, अन् त्याची लायकी सिद्ध झाली. त्या नंतर हरिणीने त्यासाठी विनंती करणे आणि प्रत्यक्ष जलसा होणे या गोष्टी आपोआपच घडून आल्या योगायोगाने!"

इतके बोलून राजा मौन होताच प्रेतासह वेताळ अदृश्य झाला आणि पुन्हा त्या झाडावर जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



चांदोबा पुरवणी–१७

# ज्ञानाचा खजिना

## तो कोण?

दिल्ली वर राज्य करणारा एक सुलतान एकदा आक्रमण करण्यासाठी निघाला. ज्या ज्या राजांशी त्याने युद्ध केले, त्या सर्वांना हरवले. अशा रीतीने अनेक राज्ये जिंकून सुलतान विजयाच्या गर्वात दिल्लीला परत यायला निघाला.

त्या काळी दिल्लीत एक फकीर रहात असे. सुलतान त्या फकिरावर फार चिडून होता. म्हणून फकीराच्या शिष्यांनी त्याला सुचवले–"सुलतान दिल्लीकडे परत येत आहे. आता आपण कोठे तरी दुसरीकडे जाणे योग्य होईल!"

यावर फकीर म्हणाला–"सुलतानाला दिल्ली तर अजून खूप दूर आहे!"

फकीराचे हे बोलणे ऐकून तिथे जमलेल्या सर्व लोकांना मोठं आश्चर्य वाटलं. कारण तोपर्यंत सुलतान दिल्ली शहराच्या सीमेत प्रवेश करून चुकला होता.

पण सुलतान जेव्हां दिल्लीत प्रवेश करीत होता, तेव्हा त्याच्या स्वागतासाठी उभारलेलं तोरण-द्वार अचानकपणे मोडून सुलतानावर पडलं नि त्यातच त्याचा अंत झाला. फकीर बोलल्याप्रमाणे सुलतान काही दिल्लीत प्रवेश करू शकला नाही.

या फकीराचं नाव काय? नि हा सुलतान कोण? [पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. जगात सर्वात अधिक लोक बोलतात अशी भाषा कोणती?

२. जगात भूमिती वर लिहिलेला सर्वात पहिला ग्रंथ कोणता?

३. आज भारताच्या साधारण नागरिकाचे सरासरी वय काय?

४. जगात साखरेचे सर्वात अधिक उत्पादन कोणत्या देशात होते?

५. जगात सर्वात अधिक चित्रपट निर्माण करणारा देश कोणता?

[पान ३६ पहा]

# कान्यकुब्ज नावाने प्रसिद्ध कनौज

उत्तर प्रदेशातील फरुखाबाद जिल्ह्यात कनौज हे एक छोटं शहर आहे. या शहरा जवळ अर्धवर्तुळाकार क्षेत्रात प्राचीन कान्यकुब्ज शहराचे अवशेष जवळ जवळ सात किलोमीटर अंतरापर्यंत पसरलेले आहेत.

महाभारताच्या काळात नि त्यापूर्वी ही कान्यकुब्ज नगरी एका महासाम्राज्याची राजधानी म्हणून प्रसिद्ध होती. सातव्या शतकात हे शहर अनेक हिन्दू मंदिर नि बौद्धारामातून येणारे शंखनाद नि घंटांच्या घण-घण् ध्वनींनी दुमदुमलेले असे. प्रसिद्ध चीनी यात्री ह्यू-एन्-त्संगने सन ६३६ मध्ये या शहराला भेट दिली आणि इथे आपल्या जीवतातील सात वर्षे घालविली. कान्यकुब्जला आपली राजधानी बनवून हर्षवर्धनाने राज्य केले. हर्षवर्धनाने अनेक तलाव खोदले, उद्याने व राजमार्ग यांची निर्मिति केली नि यात्रेकरूंसाठी धर्मशाळा बांधल्या. अशा रीतीने हर्षवर्धनाने कान्यकुब्जला एक सुंदर नगर बनविले.

अकराव्या शतकाच्या प्रारंभी सुलतान महम्मदाने या नगरीवर आक्रमण केले आणि तिचा बराच भाग उध्वस्त केला. यानंतर राठोड राजांनी कान्यकुब्जाची पुनर्निर्मिति केली. शेवटचा राठोड राजा जयचन्दने अजमेर व दिल्लीचा शासक पृथ्वीराज याच्याशी वैर आरंभिले. कारण पृथ्वीराजने जयचन्दच्या इच्छेविरुद्ध त्याच्या मुलीशी लग्न केले. याचा सूड उगवण्यासाठी जयचन्दने महम्मद घोरीला पृथ्वीराज वर चढाई करण्यास प्रवृत्त केले. प्रथम झालेल्या लढाईत पृथ्वीराजाने घोरीचा पराभव केला. पण नंतर घोरीने पृथ्वीराजचा पराजय केला आणि त्याला ठार मारले.

एवढ्या वरच तो गप्प बसला नाही. परत येताना त्याने जयचन्दशी युद्ध करून त्याला ही हरवलं. घोरीचा सेनापति कुतुबुद्दीन याने इ.स. ११९२ मध्ये जयचन्दला ही मारले.




## चांदोबाच्या बातम्या




### हवेतील प्रदूषण

असं सांगतात की मुंबई शहरातील हवेत स्वासोच्छ्वास करण्याने दहा सिगरेट ओढल्या इतकी हानि होते. हल्ली शहरात हवेचे प्रदूषण भयानक वाढले आहे. आज दिल्लीची स्थिति काही विशेष संतोषजनक आहे असे नाही. कारण जगातील अत्यधिक हवेचे प्रदूषण असलेल्या दहा शहरात दिल्ली एक आहे.

नुकतेच काही तज्ञांनी जे सर्वेक्षण केले त्यांतून ही गोष्ट लक्षात आली. या भयानक प्रदूषणातून मुक्त होण्यासाठी सर्व सरकारी व खाजगी उद्योगांशी संबंधित लोक व जनता यांनी एकत्रित येऊन प्रयत्न केले पाहिजेत.

### प्राणांचे रक्षण करणारे नवे यंत्र

बर्फाच्या पाण्यात अर्धा तास पर्यंत कोणी बुडाला तर त्याचा मृत्यु झाल्याशिवाय राहील का? लासवेगसचा निवासी सूर्रे ब्राउन बर्फाळ पाण्याच्या प्रवाहात बुडाला. त्याला जेव्हा बाहेर काढलं तेव्हा सर्वांना वाटलं की तो मेलेला आहे. त्याच्या मेंदूची चेतना नाहीशी झालेली होती. पण डॉ. लैरी जेंटलेलोने बनविलेल्या, यंत्राच्या साह्याने एका विशिष्ट पद्धतीने उष्णता दिल्यावर काही तासातच तो शुद्धी वर आला. चिकित्साशास्त्रांतील हा एक अद्भुत प्रयोग मानला पाहिजे.



# साहित्य सोनियाच्चिया खाणी

१. दोन सुप्रसिद्ध बालोपयोगी पुस्तके—खरं म्हणजे ती मोठ्यांसाठी लिहिली गेली आहेत. ही पुस्तके कोणती ?

२. बायबलच्या दोन भागांची नावे कोणती ?

३. पहिल्या भागात किती प्रकरणे आहेत ?

४. दुसऱ्या भागात किती प्रकरणे आहेत ?

५. जगातील सर्वात मोठा काव्य-ग्रंथ कोणता ?

## उत्तरावली

**तो कोण ?**

निजामुद्दीन, सुलतान गयासुद्दीन

**तुम्हांला माहीत आहे ?**

१. चीनी भाषा
२. भारतात दसवी सन पूर्व आठव्या शतकात लिहिलेला ग्रंथ 'सुलभ सूत्र'
३. ५४ वर्षे
४. भारत
५. भारत

**साहित्य**

१. मार्क ट्वेनने लिहिलेली दोन पुस्तके—'टामसायर' व 'हकील बेरीफिन'
२. 'ओल्ड टेस्टामेंट', 'न्यू टेस्टामेंट'
३. ३९
४. २७
५. महाभारत



# तीन परीक्षा

**प्रा**चीन काळी केकय आणि गान्धार या देशांच्या मधे कौमुदी नावाचा एक लहानसा देश होता. लोक म्हणत असत की त्याही पूर्वी कौमुदीही एक खूप मोठा देश होता. पण अनेक युद्धात पराजित होत गेल्यामुळे या देशाचे भाग शेजारील देशांना मिळवले गेले.

सध्या कौमुदीचा राजा चन्द्रकान्त होता. त्याला मुलगा नव्हता. एकुलती एक मुलगी होती, तिचे नाव ज्योत्स्ना. उपवर होता होता एक अद्वितीय सौन्दर्यवती व बुद्धिमान राजकन्या म्हणून ज्योत्स्नाची कीर्ति सर्वत्र पसरली.

आपल्या या मुलीबद्दल राजाला मोठा अभिमान वाटे. त्याने मनात निश्चय केला होता, की योग्य असा वर पाहून मुलीचा विवाह करून देऊन जावयाच्याच हाती राज्यही सोपवावे. एक दिवस राजकन्येला तो म्हणाला—"बाळा, मला वाटलं होतं की, तुझ्या विवाहाचा प्रश्न अतिशय सोपा आहे. पण आता वाटतंय की तो एक राजनैतिक प्रश्न बनून रहाणार आहे ! आपल्या दोन्ही बाजूंच्या शक्तिशाली राज्यांची तुला माहिती आहेच. मला असं कळलंय की त्यापैकी केकयचा राजकुमार सिंहवर्मा याला तुझ्या सौन्दर्याचं फार आकर्षण वाटत आहे. आपल्या गुप्त हेरां-कडून मला असं समजलंय की वेळ आली तर युद्धही करून तुला तो आपली अर्धांगिनी बनवायच्या विचारात आहे."

"आता गान्धार राजकुमार कृष्ण-वर्माच्या मनात काय आहे हे तर आपल्याला माहीत नाही, पण तोही चांगला लायक राजकुमार आहे. तेव्हा असं वाटतं की तोही केकय राजकुमाराशी स्पर्धा करू पाहील. या दोघांपैकी कोणाही एकाला तू

भानुमति सावळे



"वरलेस तर, मला वाटतं की, दुसऱ्याशी युद्ध अटळ आहे."

चन्द्रकान्त पुढे बोलू लागला–"मी आता जे सांगणार आहे, ते आपल्या घरातलंच आहे. तुझ्या आईचा हट्ट आहे की तुझा विवाह आपल्या छोट्या भावाशी, म्हणजेच तुझ्या छोट्या मामाशी व्हावा. तिची प्रबळ इच्छा अशी की आपल्याला मुलगा नसल्यामुळे, इतर कोणी बाहेरचा राजकुमार माझ्या गादीवर बसण्यापेक्षा, धाकटा भाऊ माणिक्यवर्माच आपला जावई बनून या देशाचा राजाही बनावा. मी अजून या समस्येचं योग्य उत्तर शोधू शकलो नाही, म्हणूनच हे सर्व तुझ्यासमोर मांडत आहे. आपले मित्रच आपले शत्रू बनून रक्ताची नदी वहाण्याचा प्रसंग न येईल अशा प्रकारे मोठ्या दक्षतेने तूच आपल्या विवाहाचा प्रश्न सोडव. ही जबाबदारी मी आता तुझ्यावरच सोपवत आहे."

हे सर्व बोलणे ऐकून ज्योत्स्ना म्हणाली–"बाबा, मला या सर्व गोष्टी माहीत आहेत. या अडचणीला कसं तोंड द्यायचं हेही मी ठरवून ठेवलं आहे. जो तरुण माझ्याशी विवाह करू इच्छित असेल, त्याला मी तीन प्रश्न विचारणार आहे. या तिन्ही परीक्षेत जो सफल होईल, त्याच्याशीच मी विवाह करीन. आता तुम्ही ही गोष्ट सर्व राजकुमारांना कळवायची व्यवस्था करा."

आपल्या मुलीचे बोलणे ऐकून राजाने कुतुहलाने विचारले–"तीन परीक्षा? कसल्या त्या?"

यावर हळूच हसत ज्योत्स्ना म्हणाली–"आता घाई कशाला बाबा? लवकरच तुम्हाला सर्व दिसेल."

ज्योत्स्नेच्या सूचनेप्रमाणे लवकरच विविध देशांकडे दूत रवाना केले गेले. इकडे परीक्षांसाठीही आवश्यक त्या सोयी केल्या गेल्या. या स्पर्धेत भाग घेण्यासाठी पुष्कळसे राजकुमार आले आणि पराभूत होऊन परतही गेले.

यानन्तर माणिक्यवर्मा, सिंहवर्मा आणि कृष्णवर्माही दोन दोन दिवसांच्या अंतराने येऊन पोचले. आपल्या गुप्त हेरांकरवी ज्योत्स्नाने त्यांच्या हालचालींवर नजर ठेवायची व्यवस्था केली. त्यांच्याकडून तिला असे समजले की माणिक्यवर्मा व सिंहवर्मा एकमेकांचे चांगले मित्र बनले आहेत. पण कृष्णवर्मा अन् या दोघांचा अजून साधा परिचयही झालेला नाही. हे ऐकून ज्योत्स्नाला मनातल्या मनात हसू आले. नंतर ही खबरही मिळाली की, माणिक्यवर्मा आणि सिंहवर्मा दोघेही त्या परीक्षेत भाग घेऊन पराजित झाले. ही बातमी मिळताच आपल्या पित्याला सांगून कृष्णवर्माच्या निवासस्थानाच्या कडक संरक्षणाची व्यवस्था ज्योत्स्नाने करविली.

दुसऱ्या दिवशी कृष्णवर्मा परीक्षा-गृहात पोचला. तिथे अगोदरच हजर असलेल्या ज्योत्स्नेच्या सख्यांनी त्याचे सादर स्वागत केले, आणि त्या त्याला एका दालनात घेऊन गेल्या. त्या दालनाच्या भिंतींवर सर्वत्र तऱ्हेतऱ्हेची चित्रे लटकावलेली होती. त्यातच मधे अपूर्व सुन्दरी राजकुमारी ज्योत्स्नाचे चित्रही प्रदर्शित केलेले होते.

ती सर्व चित्रे कृष्णवर्माला दाखवून सख्यांनी त्याला विचारले–"या सर्व चित्रात सौन्दर्य व चित्रकाराच्या प्रतिभेच्या दृष्टीने



सर्वात श्रेष्ठ असे चित्र कोणते आहे हे आपण सांगावे."

यावर कृष्णवर्माने आपले डोके हलवून त्यातील एका चित्राकडे संकेत केला व म्हटले–"तुम्ही एका उत्तम चित्राची जी लक्षणे सांगितलीत, त्या दृष्टीने हेच चित्र सर्वात उत्तम होय. सर्व लक्षणांनी युक्त असं चित्र आहे हे!"

त्या चित्रात रंगीबेरंगी फुलांनी भरून गेलेल्या झाडांच्या मधे उभी असलेली एक गाय मोठ्या प्रेमाने आपल्या वासराला चाटत आहे; आणि तिच्या जवळच पूर्ण-विकसित अशा कमळांनी विभूषित असा तलाव असल्याचे दृश्य चित्रित केलेले होते.



सख्यांनी ओठ मुडपून पुन्हा विचारले— "इतक्या साऱ्या चित्रातून आपणाला हेच चित्र पसंत पडलं? आमच्या राजकुमारीच्या अपूर्व सौन्दर्यापेक्षाही आपल्याला या चित्रातलंच सौन्दर्य अनुपम वाटत आहे?"

त्यांच्या बोलण्यावर हसून कृष्णवर्मा म्हणाला—"कदाचित राजकुमारीच्या प्रश्नांना उत्तर देण्यासाठी आलेल्या युवकांना घाबरवून सोडण्यासाठीच तुमची नेमणुक झालेली असावी. तुमच्या राजकुमारीनेच तुम्हाला असे बोलायला सांगितलेले असावे. खरं म्हणजे हेच चित्र सर्वात अप्रतिम आहे."

"तर मग आपलं म्हणणं जरा विस्ताराने मांडा बरं?" सख्यांनी म्हटले.

"जेव्हा कोणी कला-दृष्टीने सौन्दर्याची समीक्षा करतो, तेव्हा त्याने शाश्वत आणि निर्मळ अशा नैसर्गिक सौन्दर्यालाच प्रथम स्थान द्यावे. अशाश्वत आणि नवरसपूर्ण मानवी सौन्दर्याला अर्थातच दुसरे स्थान मिळेल. मानवी सौन्दर्य स्पष्ट असतं. त्याचं रेखाटन करण्यासाठी चित्रकाराला जास्त श्रम करायची आवश्यकता नसते. पण निसर्गाचं सौन्दर्य अस्पष्ट असतं. ते अस्पष्ट सौन्दर्य मनमोहक रंगांनी रेखाटणारा हा चित्रकार आपल्या प्रयत्नात पूर्णतः सफल झालेला आहे. म्हणूनच हे चित्र उत्तम होय." कृष्णवर्माने आपले म्हणणे स्पष्ट करून सांगितले.

हे उत्तर ऐकून ज्योत्स्नाच्या सख्या त्याला प्रणाम करून म्हणाल्या—"आमच्या राजकुमारीला हेच उत्तर अपेक्षित होतं. आता आमचा दुसरा प्रश्न पहा." असे म्हणून त्यांनी कृष्णवर्माच्या हाती एक ताडपत्र दिले.

त्यात लिहिले होते—"विवाहेच्छु स्त्रीने पुरुषाच्या बाबतीत, आणि पुरुषाने स्त्रीच्या बाबतीत दोन मुद्दे विचारात घेऊ नयेत. ते मुद्दे कोणते?"

हा प्रश्न वाचून कृष्णवर्मा उत्तरला— "पुरुषाने केवळ स्त्रीचे सौन्दर्य पाहून व स्त्रीने पुरुषाचे ऐश्वर्य पाहून विवाह करू नये. कारण सौन्दर्य हे अशाश्वत असते. ऐश्वर्याच्या बाबतीतही हेच सत्य बऱ्याच अंशांनी लागू पडते."

या उत्तराने सख्यांच्या चेहऱ्यावर प्रसन्नता झळकली. त्यांनी ताबडतोब वाकून त्याला प्रणाम केला आणि त्या म्हणाल्या— "राजकुमार, आपण आमच्या ज्योत्स्नादेवीच्या दुसऱ्या परीक्षेतही उत्तीर्ण झालात. आता शेवटच्या परीक्षेचंही उत्तर द्यावं." असे म्हणून सख्या आत गेल्या आणि एक छोटीशी चंदनी पेटी आणून त्याच्या हातात देऊन म्हणाल्या—'आमच्या राजकुमारीने आम्हाला सांगून ठेवले होते की जो राजकुमार पहिल्या दोन परीक्षात उत्तीर्ण होईल, त्याच्या हाती ही मंजूषा द्यावी. तिचे रहस्य जाणण्यासाठी आपणास एक दिवसाची मुदत दिली जात आहे. आता आपण ती घेऊन आपल्या निवास-स्थानी जाऊ शकता."

मंजूषा घेऊन कृष्णवर्मा आपल्या निवासस्थानी पोचला. आणि बारकाईने तो त्या पेटीकडे पाहू लागला. चौरसाकार असलेल्या त्या पेटीच्या समोरच्या व बाजूच्या भागांवर सुन्दर चित्रे कोरलेली होती. पेटीत निरनिराळ्या प्रकारची वाळलेली व ओली पाने, काटे अन् थोडेसे गवत—असे सर्व मिसळून ठेवलेले होते. मंजूषेवर प्रभातकालीन सूर्याचे चित्र काढून त्याच्या खाली एक झाड दाखवलेले होते. झाडाला दोन सापांनी विळखा घातलेले होता. त्या वृक्षाच्या चारी बाजूंना वेल कोरलेले होते.

ते सर्व पाहून त्या पेटीचे रहस्य समजल्याप्रमाणे कृष्णवर्माने आपले डोके हलवले. नंतर त्याने आपल्या एका सेवकाकरवी ज्योत्स्नाला निरोप पाठवला की, त्याला आणखी तीन दिवसांची मुदत हवी. कृष्णवर्माची ही मागणी मंजूर करण्यात आली. त्याच दिवशी अंधार झाल्यावर वेष बदलून तो घोड्यावर स्वार होऊन कौमुदी देशाच्या पूर्व दिशेला निघून गेला.

(पुढील अंकी समाप्त)



# संन्यासी कोण ?

एके दिवशी भर दुपारच्या वेळ नन्द व सुनन्द नावाचे दोन संन्यासी एका अरण्यातल्या रस्त्यावरून चालते होते. त्यांचे गुरु ज्ञाननेत्र यांचा आश्रम तेथून खूपच दूर होता. अंधार होण्यापूर्वी आश्रमात पोचण्याच्या विचाराने ते भरभर पाय उचलत होते. वाटेत एक नदी आडवी आली. नदीत पाणी तसे गुडघ्यापर्यंतच होते, पण धारेला वेग मात्र चांगलाच होता !

ते तरुण संन्यासी नदी पार करण्यासाठी पाण्यात पाय घालणार, इतक्यात त्यांना एक तरुणी त्या पाण्याच्या धारेकडे घाबरल्या नजरेने पहात उभी असलेली दिसली.

"ताई, कोण आहेस तू ? कुठे जायचंय तुला ?" सुनन्दने त्या मुलीला विचारले.

"या नदीच्या पलिकडल्या किनाऱ्यावर आमचं गाव आहे. पाण्याचा वेग पाहून मला भीती वाटतेय !" तरुणी उत्तरली.

"नदी ओलांडायला मी मदत करतो तुला. ये इकडे." असे म्हणून सुनन्दने तिला आपल्या दोन्ही हातांनी उचलले अन् पलीकडे नेऊन सोडले.

कृतज्ञतेने सुनन्दकडे पाहून ती तरुणी आपल्या गावाकडे निघून गेली.

नन्तर ते दोघे संन्यासीही आपल्या गुरूच्या आश्रमाकडे चालू लागले. वाटेत एक-दोन वेळा सुनन्दने नन्दला हाक मारली, पण त्याला काही उत्तर न देता नन्द मुकाट्याने चालत राहिला !

दोघे जेव्हा आश्रमाजवळ पोचले, तेव्हा नन्दने तीव्र स्वरात विचारले—"सुनन्द ! आपण सर्वसंग परित्याग केलेले संन्यासी आहोत ना ? आपण तर स्त्रीकडे डोळे वर करून पहायचेही नाही. अशा परिस्थितीत नदीच्या त्या बाजूच्या तटावर तू त्या तरुणीशी बोललास ! अन् इतकेच नव्हे, तर तिला आपल्या दोन्ही हातात उचलून नदी ओलांडून दिलीस ! संन्यासी बनला आहेस तू; तुझं हे कृत्य संन्याशाला योग्य आहे काय ?"

यावर सुनन्दने उत्तर दिले—"अरे नंद, मी तर त्या तरुणीला नदी पार करून देऊन, तिथे सोडूनही दिलं. पण मला वाटतं, तू मात्र अजूनही तिचे ओझे वहात आहेस !"





# धंद्याचा देव

गोष्ट खूपच जुनी आहे. चीन देशातल्या एका गावात 'चांगला' नावाचा एक नावाचा एक टोप्या विकणारा व्यापारी रहात असे. पिढ्यान् पिढ्या त्याच्या कुटुम्बाचा हाच धंदा चालत आलेला होता.

परन्तु पित्याच्या मृत्यूनन्तर त्याला हे काम आवडेनासे झाले. पण त्याच्या मनात ही भीतीही घर करून. होती की, आपण अचानक आपला धन्दा सोडून दिला तर आपला 'धंद्याचा देव' आपल्यावर नाराज होईल! त्यामुळे धन्दा सोडून न देता तो अगदी निष्काळजीपणे टोप्या शिवू लागला. गावचे लोक त्याच्या या वागणुकीमुळे त्याच्यावर नाराज झाले, अन् त्यांनी जवळच्या गावातल्या 'वांगला' नावाच्या शिप्याला आपल्या गावी बोलावून घेतले. वांगलाने धंद्याचा छान जम बसवला.

चांगला एक दिवशी आपल्या दुकानात आरामात बसला असताना, अचानक त्याला दिसले की, वांगलाच्या दुकानात एक संन्यासी शिरत आहे. त्याच्याजवळ चमकत्या सोनेरी रंगाचे एक हरणाचे कातडे होते. त्याची एक पिशवी शिवायला सांगून, कातडे वांगलाच्या हाती सोपवून तो संन्यासी निघून गेला. वांगलाने छान पिशवी तयार करून दुकानात टांगली.

पण पुढल्याच दिवसापासून वांगला गावातल्या लोकांना, पैसे न घेताच टोप्या देऊ लागला, अन् कोणी संन्यासी वगैरे आले तर त्यांना तो जेवणही देऊ लागला!

थोड्याच दिवसांपूर्वी आपल्या गावात आलेला हा वांगला इतका दानधर्म करू लागला आहे; तेव्हा त्याच्यामागे नक्कीच रहस्य असावे—असे चांगलाला वाटले; अन् त्याचा पत्ता लावायाचे त्याने ठरवले.

चीनमधील लोककथा

एके दिवशी वांगलाने आपले दुकान बन्द केल्यानंतर चांगला त्याच्या दुकानाजवळ गेला आणि दाराच्या फटीतून आत पाहू लागला. दुकानात वांगला संन्याशासाठी बनवलेली ती पिशवी हलवत उभा होता, अन् त्यातून सोन्याची नाणी खाली पडत होती!

चांगलाचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना! त्याने दुसऱ्या दिवशीही ते दृश्य पाहून घेतले; आणि त्याच्या मनात ती पिशवी हडपण्याचा विचार घोळू लागला.

दुसऱ्या दिवशी काही कामासाठी वांगला दुकानातून आतल्या खोलीत गेला असे पाहून, संधीची वाटच पहात असलेला चांगला पटकन त्याच्या दुकानात शिरला अन् भिंतीवर लटकवलेली ती पिशवी घेऊन त्या जागी तशीच दिसणारी दुसरी पिशवी ठेवून आपल्या दुकानात परत आला.

त्या दिवशी संध्याकाळी आपले दुकान बन्द करून चांगलाने ती चोरून आणलेली पिशवी झटकून पाहिली. पण त्यातून काही नाणी-बिणी बाहेर पडली नाहीतच; उलट त्याच्या घरातले सर्व सोन्याचे दागिने मात्र अचानक नाहीसे झाले!

चांगला घाबरून जाऊन वांगलाकडे गेला. त्याने आपण केलेल्या दुष्कृत्याचा पाढा त्याच्यापुढे वाचला आणि आपले रक्षण करण्याची विनन्ति केली. थोड्याच वेळात तेथे बऱ्याच लोकांची गर्दी जमली. त्या गर्दीतूनच एक संन्यासी पुढे येऊन म्हणाला–"चांगला, तुझा आपल्या धंद्यावर विश्वास नाही. म्हणून आजपासून ही पिशवी–ही झोळीच तुझ्या निर्वाहाचे साधन बनून राहील." इतके बोलून तो संन्यासी एकदम अदृश्य झाला.

बस! त्या दिवसापासून ती झोळी खांद्यावर लटकावून चांगला भीक मागून आपले पोट भरू लागला. लवकरच ही बातमी सर्वत्र पसरली. लोक म्हणू लागले की, 'धन्याचा देव'च संन्याशाच्या रूपाने तेथे आला होता.





# श्रीजगन्नाथाचा इतिहास

राजा इन्द्रद्युम्न अवंती राज्यावर राज्य करीत असे. तो मोठा धर्मात्मा होता. त्यामुळे त्याच्या राज्यात सर्वत्र आबादी-आबाद असे. प्रजा सुखी होती, कुणाला युद्धाची भीति नसे. अन्न-धान्य व दही-दुधाची कमतरता नसे. कोणी दान दिलं तर ते घेणारा कोणी नव्हता. कारण राज्यात ज्याला कशाचा अभाव आहे असा माणूस नसे. राजा इन्द्रद्युम्न कलाप्रेमी होता, तो कवि व पंडितांना आश्रय देत असे. त्याचे उत्तम गुण व आदर्श शासन यांची प्रशंसा करणारी अनेक काव्यं कवींनी रचली.

इतकं सगळं असलं तरी राजाच्या मनात कसला तरी असंतोष असे. तो त्याचे मन उद्विग्न करून टाकी. एकदा राजाची ही अज्ञात इच्छा प्रकट झाली. जणू काही आकाशातील काळे ढग अदृश्य होऊन चन्द्राने आपले शीतल चांदणे सर्वत्र पसरून टाकावे! सहज त्याच्या मनात एक विचार आला. भावी पिढ्यांच्या भक्तांसाठी यात्रास्थान होईल असे एक भव्य मंदिर आपण निर्माण करावे. हा विचार मनात येताच राजाच्या मनातील असंतोष मावळून गेला. तरी पण त्याच्या पुढे एक प्रश्न उभा राहिला की या नवनिर्मित मंदिरात कोणत्या मूर्तीची प्रतिष्ठापना करावी? त्या दिवशी झोपण्यापूर्वी राजाने खूप गंभीर चिंतन केले आणि त्या तन्द्रीतच त्याला झोप लागली. झोपेत राजाला एक स्वप्न पडले. स्वप्नात त्याला

## १. मंदिराची निर्मिति



एक वाणी ऐकू आली–" तू प्रथम मंदिर बांधून पूर्ण कर, योग्य वेळी तुला मूर्ति प्राप्त होईल !"

राजा प्रसन्न अंतःकरणाने झोपेतून उठला. सकाळ होताच त्याने आपल्या सर्व मंत्र्यांना बोलवलं आणि आपल्या मनातील इच्छा त्यांना सांगितली. यानंतर वास्तुशास्त्रज्ञांना बोलवून मंदिर बांधण्यासाठी योग्य स्थळ शोधून काढण्याचा आदेश त्यांना देण्यात आला. तसेच ज्योतिषांना निमंत्रण देऊन मंदिराच्या पाया-भरणीसाठी एक शुभ मुहूर्त शोधायला सांगण्यात आले.

यानंतर एका शुभ मुहूर्तावर पूर्व समुद्राच्या किनाऱ्यावरील एका विशाल प्रदेशात आगम शास्त्र्यांच्या नेतृत्वाखाली मंगल वाद्ये व वेद-मंत्रांच्या घोषात नव्या मंदिराच्या बांधकामाचा शुभारंभ झाला.

मंदिर बांधण्यासाठी आवश्यक असलेल्या मोठमोठ्या शिळा दूर-दूरच्या पर्वतांवरून आल्या. समुद्र व नद्यांच्या जल-मार्गाने जहाजातून व नावावरून नि हत्ती जुंपलेल्या वाहनांवरून या शिळा समुद्र-किनाऱ्यावरील बांधकामाच्या ठिकाणी पोचविण्यात आल्या.

देशाच्या काना-कोपऱ्यातून आलेले हजारो शिल्पकार व कारागीर रात्रं-दिवस मंदिराच्या बांधकामात गुंग झाले. श्रद्धा व भक्तिपूर्ण त्यांच्या अंतःकरणातील उत्साह आणि अथक परिश्रमातून त्या कठिण शिळांतून मोहक फुले हंसू लागली. एकाहून एक सरस शिल्पाकृति निर्माण झाल्या. काही वर्षांतच मंदिराचे बांधकाम पूर्ण झाले. या गगनचुंबी भव्य मंदिरावर समुद्राच्या लाटा येऊन नित्य आदळू लागल्या.

मंदिर तर बांधून तयार झाले. सर्व जण एकच प्रश्न विचारू लागले–" मंदिरात परमेश्वर कोठे आहे ?" राजा इन्द्रद्युम्न ही या संबंधी गंभीरपणे विचार करू लागला, त्याला मोठीच चिंता वाटू लागली. एक दिवशी राजाने मंदिराच्या गाभाऱ्यात प्रवेश केला नि डोळ्यांत अश्रू आणून म्हणाला–" परमेश्वरा, या मंदिरात कोणत्या रूपात तू अधिष्ठित होणार आहेस ? मूर्ति प्रकट होण्याची ती वेळ अजून आली नाही का ? आणखी किती दिवस आम्हाला वाट पहावी लागणार ? किती परिश्रमपूर्वक हे देऊळ बांधले, आणि आता या देवळात परमेश्वराची मूर्ति नाही ! हे पाहून लोक मला हंसणार नाहीत का ?"

त्या दिवशी रात्री राजाला पुन्हा एक स्वप्न पडलं. त्या स्वप्नात त्याला एक दिव्य संदेश मिळाला–" इथं जवळच परमेश्वर श्रीकृष्णाच्या रूपात आहे ! शोधलंस तर तो कृपा-निधान तुला वश होईल निश्चित !"

भक्तांशी लपंडावाचा खेळ खेळणं हा श्रीकृष्णाचा स्वभावच आहे. राजाला हे कळून चुकलं की हे काम अगदी सहज होणारे नाही. विवेकशील व निर्मल हृदयाच्या भक्तालाच तो सापडू शकेल. म्हणून राजाने हे महत्कार्य आपल्या दरबारातील चार पंडितांवर सोपविले. चारी पंडित चार दिशांना रवाना झाले.

सर्वांत अल्पवयीन पंडित विद्यापति पूर्व दिशेकडे निघाला. काही अंतर चालून गेल्यावर तो उत्तरेकडे वळला. तिथं त्याला एक जंगल आढळलं. विद्यापतीने शरणागत भावाने मनातल्या मनात श्रीकृष्णाची प्रार्थना केली नि म्हणाला–" परमेश्वरा, आता पुढील सर्व जबाबदारी तुझीच." जणू काही परमेश्वरच आपल्याला वाट दाखवीत





आहे असा विचार करून त्याने जंगलात प्रवेश केला. हळू हळू जंगल घनदाट होत गेलं.

जंगलाच्या मध्यभागी त्याला एक डोंगर दिसला. डोंगराच्या वरच्या बाजूने लयबद्ध संगीताचे सूर ऐकू येऊ लागले. 'हा एकादा संगीत-पर्वत तर नाही?' असा विचार करीत विद्यापति त्या डोंगराजवळ गेला. मृदंग, बांसरी आणि टाळांच्या संमिश्र तालावर अद्भुत गाणं ऐकू येत होतं. विद्यापतीच्या लक्षात आलं की या संगीत-लहरी डोंगरा पलीकडून येत आहेत.

त्याने डोंगरावर चढून पलिकडे पाहिलं. डोंगराला लागून एक सुंदर दरी होती, नि तिथं काही भिल्ल तरुणी नाचत गात होत्या. शेजारच्या झाडाची फांदी हातात धरून विद्यापति ते मनोरम दृश्य पहात राहिला, बरेच अंतर तो पायी चालून आला होता, त्यामुळे त्याला हे दृश्य विशेष आल्हाददायक वाटले.

एकाएकी वाघाचे गर्जन ऐकून तो घाबरला नि त्याने मागे वळून पाहिले. वाघ गर्जना करीत त्याच्याच रोखाने येत होता. काय करावं हे घटका भर त्याला समजेना. या विचित्र परिस्थितीत तो बेशुद्ध होऊन खाली पडला.

एका युवतीने वाघाला हाक मारली—"राजा!" ती ऐकून वाघ निश्चल उभा राहिला.

त्या युवतीने पुन्हा पुकारलं—"परत ये!"

वाघ परत फिरला आणि हळू हळू त्या स्त्रियांच्या बाजूला चालू लागला. त्याला बोलविणाऱ्या युवतीच्या जवळ जाऊन तिच्या पायाशी एकाद्या बालकाप्रमाणे जाऊन बसला. त्या युवतीने वाघाच्या पाठीवरून प्रेमाने हात फिरवला. तेथील सर्व स्त्रियात ही युवती अधिक उंच व सुंदर होती. तिचं नाव होतं ललिता. भिल्ल सरदार विश्वावसूची ती एकुलती एक मुलगी होती.

ललिताच्या आज्ञेवरून दोन स्त्रिया बेशुद्ध पडलेल्या विद्यापतीकडे गेल्या आणि



केळाच्या पानाने त्याला वारा घालू लागल्या. एक स्त्री जवळच्या झऱ्यावर गेली आणि कमल-पत्राच्या द्रोणात पाणी घेऊन आली. तोंडावर पाणी शिंपडल्यावर विद्यापतीने हळू हळू डोळे उघडले. त्या स्त्रियांनी विद्यापतीला प्यायला पाणी दिले.

आता ललिता विद्यापतीजवळ आली आणि म्हणाली—"महाराज, मला माहीत नाही की आपण कोण आहात? आपणास कोठे जायचे आहे ते ही मला ठाऊक नाही.

कदाचित जंगलात रस्ता चुकून आपण येथे आला असाल! अशा स्थितीत आपणास येथे सोडून जाणे माझ्या मनाला भावत नाही. आपण माझ्या बरोबर आमच्या वस्तीवर चलाल?"

ललिताच्या बोलण्यावर विद्यापती फार खुष झाला. तो तिच्या बरोबर जायला तयार झाला.

ललिता पुढे झाली नि रस्ता दाखवू लागली. मागे विद्यापती नि ललिताच्या मैत्रिणी चालू लागल्या. काही अंतर चालून गेल्यावर ललिताने एका मैत्रिणीला बोलवून सांगितलं—"तू थोडी पुढं जा आणि बाबांना या पाहुण्यांच्या आगमनाची सूचना दे." ती धावत निघाली आणि थोड्याच वेळात वृक्ष-राजीत अदृश्य झाली.



काही वेळाने समोरच्या डोंगरावरून आजानुबाहु भिल्ल सरदार विश्वावसु तेथे येऊन पोचला. त्याने हात जोडून विद्यापतीला नमस्कार केला आणि नम्रपणे म्हणाला—"मी अंतःकरणपूर्वक आपले स्वागत करीत आहे. या."

उत्तरादाखल प्रणाम करीत विद्यापती म्हणाला—"मी महाराज इंद्रद्युम्नाच्या आदेशावरून एक देव-कार्य करण्यासाठी इकडे आलो आहे."

विश्वावसु विद्यापतीला आदरपूर्वक आपल्या वस्तीवर घेऊन गेला आणि त्याचे योग्य ते आदरातिथ्य केले. विद्यापति एक महान् पंडित आहे हे जाणून विश्वा-



वसूला अत्यंत आनंद झाला. विद्यापतीने काही दिवस तेथे राहून दर्शन-शास्त्रांतील काही रहस्यांचे मर्म प्रतिपादन करावे अशी त्याने विद्यापतीला विनंती केली.

विद्यापतीने ही विनंती मान्य केली. काही दिवस इथेच रहावे असा त्याने विचार केला. श्रुति व स्मृति या ग्रंथातील काही श्लोक घेऊन त्यांचा अर्थ व तात्पर्य विद्यापति उदाहरणांसह समजावून सांगू लागला. त्याची ही प्रवचने विश्वावसु व ललिता मोठ्या आवडीने ऐकू लागली.

या अवधीत विद्यापतीला कळून चुकलं की ललिता त्याच्याकडे विशेष आकर्षित झालेली आहे. पण जे कार्य करण्यासाठी तो राजधानीतून निघाला होता, ते अत्यन्त महत्त्वाचे होते. म्हणून त्या कामाबाबत चिंतन करीत तो सदान् कदा परमेश्वराचे ध्यान करीत राहिला.

विद्यापति याच दिवसात एकाएकी आजारी पडला. ललिताने नित्य त्याच्या जवळ राहून त्याची सेवा-सुश्रूषा केली. हळूहळू ते दोघे एकमेकांच्या अधिक जवळ आले. विद्यापतीच्या ही लक्षात आलं कि त्याचं ललिता वर प्रेम बसलं आहे. विश्वावसूने इच्छा प्रकट केली की त्या दोघांनी विवाह-बद्ध व्हावे. विद्यापतीने हे मान्य केले.

वसंत ऋतु सुरू झाला. सर्वत्र हिरवेगार गालीचे पसरले गेले. रंगी-बेरंगी फुलांचा मादक वास वातावरणात दरवळू लागला. कोकिळांची कुहू-कुहू आणि भिल्ल युवतींच्या नृत्य-गानाच्या सुमधुर वातावरणात ललिता नि विद्यापति यांचा विवाह अत्यंत थाटा-माटात साजरा झाला.

मोठ्या आनंदात काही दिवस गेले. ललिताशी लग्न करून विद्यापतीला खूप प्रसन्नता वाटली असली तरी एक रुखरुख त्याच्या मनात सतत सलत होती. जे देव-कार्य करण्यासाठी तो राजधानीतून बाहेर पडला होता, ते अजून पूर्ण झालेलं नव्हतं.

या काळात एक गोष्ट विद्यापतीच्या लक्षात आली. विश्वावसु रोज पहाटे उठून कोठे तरी बाहेर जातो नि सूर्योदयानंतरच परत येतो. भयंकर वादळ असो, मुसळधार पाऊस असो, त्याच्या ह्या कार्यक्रम कधी टळत नसे. विश्वावसूच्या या नियमित कार्यक्रमाबद्दल विद्यापतीला मोठे कुतूहल वाटे. विश्वावसु रोज पहाटे जातो तरी कोठे हे जाणण्याची उत्कण्ठा त्याच्या मनात निर्माण झाली. एक दिवशी त्याने ललिताशी याबाबत बोलणे केले.

ललिताने विद्यापतीला समजाऊन सांगितले–"ते आमचं एक वंशगत रहस्य आहे. ते कोणाला ही सांगणे इष्ट नाही, तरी पण आपण माझे पति आहात, म्हणून आपणापासून ते लपवून ठेवणें मला योग्य वाटत नाही. इथून थोड्या अंतरावर एक लेणं आहे, त्या लेण्यात जो परमेश्वर आहे, त्याची आम्ही पिढ्यान् पिढ्या पूजा करीत आलो आहोत. त्या परमेश्वराची पूजा करण्यासाठी माझे वडील रोज तेथे जात असतात. असं सांगतात की माझ्या वडिलांप्रमाणेच माझे आजोबा व पणजोबा ही या आराध्य देवाची पूजा करीत असत."

विद्यापति उत्साहाने म्हणाला–"त्या परमेश्वराचे दर्शन करण्याची माझी फार उत्कट इच्छा आहे!"

"त्या परमेश्वराबाबत कोणाला काही सांगणं हा ही माझ्या वडिलांच्या दृष्टीने मोठा अपराध आहे. तेव्हा दर्शन करण्याची गोष्ट दूरच! कृपा करून आपण आपली ही इच्छा विसरून जावी हे बरे." ललिताने विनवणी केली.

विद्यापतीने व्यग्र होऊन विचारले–"माझ्याशी लग्न केल्यावर ही तू अजून मला परका समजतेस?"

ललिता थोडा वेळ विचार करीत राहिली. मग म्हणाली–"ठीक आहे. आपण चिन्ता करू नका. आपणास त्या लेण्यातील परमेश्वराचे दर्शन घडावे यासाठी मी आपल्या बाबांना विनंती करीन. ते मांझ्या विनंतीचा अव्हेर करणार नाहीत." (क्रमशः)





# साहसी विक्रम

प्राचीन काळी उज्जयिनीवर अनेक महान् राजांनी राज्य केलं. एकदा एक दुष्ट नि दुबळा राजा ही राज्य करीत होता. त्याच्या जुल्मी कारकीर्दीत प्रजा अत्यंत दुःखी-कष्टी होती. काही साहसी तरुणांनी या राजाविरुद्ध बंड पुकारलं. प्रजेच्या बंडाने घाबरून दुष्ट राजा उज्जयिनी सोडून पळून गेला.

उज्जयिनी जवळून नर्मदा नदी वाहते. नर्मदा नदीच्या पलीकडे राजा मार्ताण्डचं राज्य होतं. उज्जयिनीचा पळपुटा राजा मार्ताण्डच्या आश्रयाला गेला. मार्ताण्डने उज्जयिनीच्या राजाच्या दुष्टपणाचा विचार न करता दया-बुद्धीने त्याला आधार दिला नि उज्जयिनी जिंकण्याचा बेत करून आपलं सैन्य तयार केलं.

या काळात उज्जयिनीत जनतेचं राज्य स्थापित झालं. देशातील वयोवृद्ध नागरिक, तरुण, स्त्रिया नि योद्धे यांनी नव्या शासनाला मान्यता दिली. देशातील अन्यायकारक कायदे रद्द झाले. अधिकाऱ्यांचा दबदबा कमी झाला. जनता चोर-डाकूंच्या कचाट्यातून सुटली. प्रजेला अभय-दान मिळालं. सर्वत्र एका नव्या जीवनाचा प्रारंभ होत असल्यासारखं लोकांना वाटलं. या विश्वासामुळे प्रजा सुखी झाली.

राजा मार्ताण्ड उज्जयिनी वर आक्रमण करण्याची तयारी करीत असल्याची वार्ता गुप्त हेरांकडून उज्जयिनीच्या नागरिकांना मिळाली. उज्जयिनीचे शासन संभाळणारे वृद्ध व त्यांना मदत करणारे त्यांच्या हाता खालचे लोक ही बातमी ऐकून घाबरून गेले. कारण उज्जयिनी जवळ सैनिक बळ नसल्यासारखं होतं नि राजा मार्ताण्ड मात्र युद्ध-कलेत निपुण होता. तसेच इथून पुढे सैन्याची जमवाजमव करायला आता



उज्जयिनीच्या शासनाला वेळ ही नव्हता. एका विशाल मैदानावर एक सार्वजनिक सभा बोलविण्यात आली. अनेक तरुण मंडळी सभा-स्थानी हजर झाली— "उज्जयिनीचं संरक्षण केलं पाहिजे." अशा आरोळ्यांनी आकाश दुमदुमलं!

वृद्धांनी विचारलं—"उज्जयिनीचं रक्षण कोण करणार? ज्यांना काही उपाय सुचत असेल त्यांनी पुढे यावे."

तरुण मंडळीतून विक्रम नावाचा एक वीर युवक गर्दीतून पुढे सरसावला आणि म्हणाला—"आपण मला फक्त वीस योद्धे द्या. मी उज्जयिनीच्या रक्षणाची जबाबदारी घेतो."

विक्रमचे हे बोलणे ऐकून सर्वांना मोठं आश्चर्य वाटलं. वीस हजार प्रशिक्षित सैनिकांचा सामना विक्रम केवळ वीस योद्धयांच्या साह्याने करणार! हे कसं शक्य आहे?

याच्या उत्तरादाखल विक्रमने समजावून सांगितलं—"राजा मार्तण्डच्या सैन्याला उज्जयिनीत प्रवेश करण्यासाठी फक्त एकच मार्ग आहे. तो मार्ग म्हणजे नर्मदा नदीवरील अत्यंत अरुंद पूल. या पुलावरून एका वेळेला एकच सैनिक चालू शकतो. राजा मार्तण्डच्या सैन्याला ही असं एक-एक करूनच पूल ओलांडावा लागेल. जर पुलाच्या खांबांमागे आपले योद्धे उभे राहिले तर पुलावर येणाऱ्या एकेक सैनिकाचा परामर्श सहज घेता येईल. हेच योद्धे तशी वेळ आली तर पूल पाडून टाकू शकतील. म्हणून राजा मार्तण्डच्या प्रचंड सैन्याला पाहून आपण घाबरण्याचे कारण नाही."

विक्रमची ही सूचना सर्वांना पसंत पडली. तावडतोब वीस तरुण विक्रम बरोबर जाण्यासाठी तयार झाले. त्यांच्या हातात तलवारी व कुऱ्हाडी देऊन विक्रम लगेच नर्मदेवरील पुलापाशी पोचला. पुलाच्या खांबांच्या आडोशाला या योद्धयांना शिस्तीत उभं करण्यात आलं. पुलावरून





येणाऱ्याचा वध करणं आता अगदी सोपं काम होतं. शिवाय पुलावरून येणाऱ्या शत्रूच्या सैनिकांच्या तावडीत उज्जयिनीचे हे वीर सापडणे शक्य नव्हते.

सूर्योदयाच्या वेळी राजा मार्तण्डचे सैनिक लाकडी पूल पार करू लागले.

पुलाच्या पहिल्या खांबामागे स्वतः विक्रम उभा राहिला. सर्वात प्रथम पुलावर चढून येणाऱ्या सैनिकांना विक्रमने आपल्या तलवारीने यम-सदनाला पाठविले. मार्तण्डच्या सैनिकांना मोठं आश्चर्य वाटलं की हे तलवारीचे वार कुठून होत आहेत? ते जाणून घेण्यासाठी काही सैनिक पुढे आले, विक्रमने त्यांची ही तीच गत केली. मग बाकीचे सैनिक अमळ घाबरून मागे हटले.

राजा मार्तण्डला ही बातमी मिळाली, तेव्हा त्याला ही आश्चर्य वाटलं. पुलाखाली गुप्तपणे उभे राहून आपल्या सैनिकांना ठार करणाऱ्या या योद्धयांचा व्यूह मोडून टाकायचे त्याने अनेक प्रयत्न केले. नदीत पोहून इकडे येण्याचे वा छोटया नावात बसून नदी पार करण्याचे काहींनी प्रयत्न केले. पण ते जेव्हां नदीच्या मध्यापर्यंत येत तेव्हां झाडा-झुडुपांतून बाण येऊन त्यांच्या वर्मी लागत.

तिकडे पुलाचे रक्षण करणाऱ्या योद्धयांची स्थिति ही चिंताजनक झाली. कारण राजा मार्तण्डचे सैनिक शवां आडून चालत येत तलवारीचे वार वाचवू लागले. अशा रीतीने काही सैनिक पुढे चालून आले. तसेच खांबांच्या मागे लपून आपले कार्य करणाऱ्या काही योद्धयांना मार्तण्डच्या सैनिकांनी मारून टाकले.

आता विक्रमच्या लक्षात आलं की राजा मार्तण्डचे सैनिक प्राणांची पर्वा न करता असेच चढाई करीत राहिले तर पुलावर ते ताबा मिळवू शकतील. राजा मार्तण्ड पण आपल्या सैनिकांची या युद्धात आहुति द्यायला कचरणार नव्हता.

म्हणून आता विक्रमने आपल्या साथीदारांना आदेश दिला की त्यांनी कुऱ्हाडींचा



वापर क न पुलाचे खांब एक-एक करून तोडून टाकवेत आणि पूल मोडून पडेल तेव्हां माग ंनी आणखी मागे जावे. विक्रम सोडून बाकीच्या सर्वांनी पूल पाडायला सुरुवात केली. एक-एक खांब तोडत ते मागे जात राहिले. थोड्याच वेळात जवळ जवळ सारा पुल ध्वस्त होऊन नदीत वाहून गेला.

विक्रमचे सर्व साथीदार आता नदीच्या त्या बाजूला पोचले. पण राजा मार्तण्डच्या सैनिकांनी विक्रमला बन्दी बनविले नि ते त्याला कैद्यांच्या शिबिरात घेऊन गेले.

त्या रात्री राजा मार्तण्ड व त्याचे काही अधिकारी आपल्या पडावावर हात शेकत गप्पा-गोष्टी करीत बसले होते. काही सैनिक बन्दी विक्रमाला तेथे घेऊन आले. शेकोटीच्या ज्वाळांच्या प्रकाशात विक्रम एखाद्या अद्‌भुत वीरासारखा चमकला.

विक्रम वीरोचित वाणीने गरजला— "मी भ्याड माणूस नाही. पळून जाणार नाही. मला बंधनातून मुक्त करा."

"खांबांच्या आड उभे राहून आमच्या सैनिकांचा वध करणारा तू शूर, वीर, धाडसी कसा म्हणून घेशील स्वतःला?" राजा मार्तण्डने सवाई गरजून विचारले.

विक्रमने जरा ही न घाबरता विचारले— "अधर्म युद्धाचे सुद्धा काही नियम असतात होय?"

"माझं युद्ध काय अधर्म युद्ध आहे होय?"

"शंभर टक्के अधर्म युद्ध! आमच्याशी युद्ध सुरू करण्यापूर्वी तुम्ही काही घोषणा केली होती का?"

"अराजक देशाबरोबर युद्ध करण्यासाठी घोषणा करण्याची काय जरूर आहे?"

"आमच्या देशात प्रजाच राजा आहे! आमचा देश प्रजातंत्र आहे."

"प्रजातंत्र हे काही राज्य होऊ शकत नाही. ते टिकूच शकणार नाही!"

"आम्ही आमचं राज्य टिकवणार आहोत. मला बंधनमुक्त करा. मला तुमच्याशी काहीं बोलायचंय!" विक्रम म्हणाला.

राजा मार्तण्ड ने विक्रमला बंधनांतून मुक्त करून आपल्या जवळ बसायला सांगितले. मग तो त्याला म्हणाला— "मी तुझ्या देशाची सर्व प्रजा चुटकी सरशी नष्ट करून टाकीन! तुझ्या सारख्या भ्याड माणसाची मी मुळिच पर्वा करीत नाही, समजलास? जोपर्यंत तुमच्या देशाचा कोणी राजा नाही, तोपर्यंत मी या देशाला राज्य म्हणून कधीच मान्यता देणार नाही. माझ्या विशाल सैन्यापुढे तुमचा देश किती दिवस टिकू शकणार आहे, हे तू आता पाहशीलच!"

"माझ्या देशात माझ्या सारखे नि माझ्याहून अधिक पराक्रमी लोक अनेक आहेत. देश-प्रेम त्यांच्या रक्ताच्या कणाकणात सामावलं आहे. ते नुसते वेतनभोगी सैनिक नाहीत हे आपण लक्षात घ्यावे. ते प्राण पणाला लावून आपल्या देशाचे संरक्षण करतील. त्यांच्या साहसाचा एक नमुना मी आत्ताच आपल्याला दाखवतो." असे म्हणत विक्रमने आपला डावा हात शेकोटीतून निघणाऱ्या ज्वाळात धरला.

दुसऱ्याच क्षणी त्याचा हात जळू लागला. तरी पण त्याने आपला हात मागे घेतला नाही. जळणाऱ्या हाताकडे पहात विक्रम म्हणाला—"आम्ही साहसी शूर वीर आहोत. आपण आमचे हाल-हाल करून आम्हाला पराभूत करू शकणार नाही. आपल्या प्रजातंत्र राज्यासाठी आम्ही मोठ्यात मोठा त्याग अत्यन्त आनन्दाने करू. प्रजातंत्र राज्यच आदर्श राज्य! राजशाहीचे दिवस आता संपुष्टात आले आहेत. एक दिवस असा येईल, तुमचं राज्य ही प्रजातंत्र होईल!"

विक्रमचे साहस व आत्मविश्वास पाहून राजा मार्तण्डला मोठे आश्चर्य वाटले. त्याने ताबडतोब विक्रमला बंधनमुक्त केले. आणि आपल्या प्रचण्ड सैन्यासह तो राजधानी कडे परत निघाला.





# मन्त्र्याची नीति

कोणे एके काळी मगध देशावर राजा चन्द्रसेन राज्य करत असे. त्याला चार पुत्र होते. गुरुकुलात जेव्हां त्यांचे शिक्षण पूर्ण झाले, तेव्हां राजाने त्यांना आज्ञा दिली, की पुढील एक वर्षभर मन्त्री-महाशयांजवळून राजनीतीचे सर्व शिक्षण घेऊनच त्यांनी परत यावे. मन्त्र्याला जेव्हां ही बातमी समजली तेव्हा राजा चन्द्रसेनला भेटून तो म्हणाला—"महाराज! राजकुमारांनी सर्वच विद्यांचा अभ्यास गुरुकुलात पूर्ण केला आहे; अन् तरी सुद्धा राजनीतीबद्दलचे काही बारकावे जाणण्याची जर गरज असेल, तर ते शिक्षण त्यांना आपणच देणे उचित होईल. मगध-राज्याच्या मन्त्र्याचे काम राजवंशातल्या लोकांना योग्य सल्ला देणं, त्यांना विद्या शिकवणं नव्हे!"

चन्द्रसेन यावर हसून म्हणाला—"मन्त्री-महाशय, आपणाला राजनीतीचं जितकं ज्ञान आहे, त्यातला कितीसा भाग मला माहीत आहे? राजकुमारांना राजनीतीचं ज्ञान द्यायला माझ्यापेक्षा आपणच जास्त समर्थ आहात."

तरीही राजकुमारांना राजनीतिचे शिक्षण देण्याचे त्याने मान्य केले नाही. तो म्हणाला—"महाराज, राजनीति ही काही उपदेशाने प्राप्त होणारी वस्तु नव्हे. आता राजनीति या विषयावर राजकुमारांचा वेळ व्यर्थ घालवू नका. माझा मुलगा त्यांना सर्व प्रकारचे सहाय्य करील."

मन्त्र्याची सूचना ऐकून राजा चन्द्रसेन म्हणाला—"मन्त्रीमहाशय, मला आपल्या मनातली गोष्ट तुम्हाला सांगायची आहे. राजकुमारांच्या प्रतिभेची परीक्षा करून, त्यांच्यापैकी राज्याचा उत्तराधिकारी बनायला कोण अधिक योग्य आहे, याचा निर्णय घेऊन तुम्ही मला तो सांगावा.

"वसुंधरा"



राजनीतीचा बहाणा करून मी मुख्यतः यासाठीच राजकुमारांना तुमच्याकडे पाठवत आहे."

"पण महाराज, राजकुमारांपैकी ज्येष्ठ असा धर्मसेनच राज्याचा अधिकारी आहे. आपल्या देशाची ही परंपराच आहे. ती तोडणे उचित होणार नाही." मन्त्री म्हणाला.

क्षणभर विचार करून यावर राजा म्हणाला—"परंपरेच्या तत्त्वावर, योग्यतेची उपेक्षा करणे मला आवडत नाही. अनेक पिढ्यांपासून आमच्या घराण्यात एकच पुत्र जन्मत आलेला आहे, म्हणून आजपर्यंत आमच्या पूर्वजांसमोर हा प्रश्न कधी उभा राहिलाच नाही, पण आता माझा असा संकल्प आहे की, आपल्या चार पुत्रांपैकी जो अधिक योग्य असेल त्याच्या हाती राज्य सोपवून मी जनतेचं कल्याण साधावं. यात मला तुमची मदत हवी."

राजाच्या या बोलण्यावर मंत्री काहीच उत्तरला नाही. केवळ थोडेसे हंसून तो गप्प राहिला. हे राजाला तितकेसे रुचले नाही. त्याने मन्त्र्याला विचारलें—"तुमच्या या हंसण्याचं कारण काय बरं?"

"महाराज, आपलं बोलणं मला जेव्हां सयुक्तिक वाटत नाही, तेव्हा मला हंसू येतं. फार मनावर घेऊन आपण माझ्या हंसण्याचं कारण विचारू नये, आपल्याला त्यामुळे वाईट वाटेल, अन् ते मला आवडणार नाही." मन्त्री म्हणाला.

तरी सुद्धा हंसण्याचे कारण जाणून घेण्यासाठी राजा हट्टच धरून बसला. शेवटी नाइलाजाने मन्त्र्याने सांगितले—"प्रभु, युवराज धर्मसेनचं माझी मुलगी त्रिपुरसुन्दरी हिच्यावर प्रेम आहे. रूप, गुण आणि लावण्य याबाबतीत कोणत्याही देशाच्या राजकुमारीशी तिची तुलनाच होऊ शकणार नाही. मग आता काय परंपरा व संप्रदाय सोडून, केवळ योग्यतेच्या जोरावर आपण माझ्या मुलीचा 'सून' म्हणून स्वीकार कराल?"



मंत्र्याचे बोलणे ऐकून राजा चांगलाच गरम झाला, तरीही आपल्या रागावर ताबा ठेवून तो म्हणाला–"आपल्या मुलीच्या योग्यतेचा निर्णय तुम्ही नाही, मी करायला हवा."

यावर पुन्हा एकदा हंसून मन्त्री गप्प झाला. राजाने पुन्हा त्याला हंसण्याचे कारण विचारले. मन्त्री म्हणाला–"महाराज, आपल्या पत्नीची निवड करायचा हक्क प्रत्येक पुरुषाला असायला हवा. धर्मसेनची त्रिपुरसुंदरीशी विवाह करायची इच्छा आहे. या गोष्टीला विरोध करायचा हक्क आपणापेक्षा माझाच अधिक आहे, कारण राजकुमारांपैकी राजा बनण्याची योग्यता कोणात आहे, याचा निर्णय आपण करू शकला नाहीत. आपण ती जबाबदारी माझ्यावर सोपवत आहात. राजाच्या बाबतीत जो माणूस निर्णय घेऊ शकतो, तो राणीच्या बाबतीतही योग्यायोग्य काय, हे नाही ठरवू शकणार ?"

चन्द्रसेन जरा वेळ विचारात पडला. नंतर तो म्हणाला–"तुमचं म्हणणं बरोबर वाटतंय मन्त्री महोदय ! धर्मसेनचं त्रिपुरसुन्दरीवर प्रेम असेल, तर हा विवाह मीच स्वत: घडवून आणीन. या बाबतीत कोणतीही शंका मनात न बाळगता, आता आपण राजकुमारांपैकी राजा बनायची लायकी कोणात आहे, हे ठरवावे." या वेळीही मन्त्री पुन्हा हंसला.

"माझी चित्तशुद्धि झाल्याबद्दल अजून तुम्हाला खात्री वाटत नाही का ? तुम्ही उगीचच हंसत का आहात ?" राजा चन्द्रसेनने अस्वस्थ होत विचारले.

"महाराज, धर्मसेन माझा जावई बनत असताना, मी राजाची योग्यता ठरवताना दुसऱ्या कोणाची निवड करीन यावर आपला विश्वास बसूच कसा शकतो ?" मन्त्र्याने विचारले.

"पण तुमच्या निस्वार्थी बुद्धीवर माझा विश्वास आहेना. तुमच्या बाबतीत माझ्या तरी मनात कुठलीच शंका नाही." राजाने ग्वाही दिली.

"मग ऐकाच तर माझा निर्णय. अलिकडे धर्मसेन बऱ्याच दिवसांपासून माझ्या मुलीवर प्रेम करत आहे; म्हणूनच मी मोठ्या सतर्कतेने त्याच्यावर लक्ष ठेवत आलो आहे. माझ्या मनाने जेव्हा हे पक्कं ठरवलं, की राजा बनायला धर्मसेनच सर्वस्वी योग्य आहे; तेव्हाच या दोघांच्या विवाहाचा प्रस्ताव मी आपणासमोर मांडला." मन्त्री म्हणाला.

यावर चकित होऊन राजा म्हणाला–"मला असं कधीही वाटलं नव्हतं की तुमचं धोरण असं पक्षपातीपणाचं असेल ! आपल्या स्वत:च्या स्वार्थासाठी तुम्ही माझ्या आदर्शांच्या कल्पनेची पायमल्ली केली आहे."

आताही मन्त्री पुन्हा हंसून गप्प झाला.

आता मात्र राजाने खवळून विचारले–"तुमचं हे वेळोवेळी हसणं मला मुळीच आवडत नाहीय ! शेवटी तुमची काय इच्छा आहे, ती स्पष्टपणे सांगून टाका ना."

मन्त्री यावर नम्रपणे म्हणाला–"महाराज, आपल्या 'आदर्श' या कल्पनेचा अर्थ माझ्या लक्षात येत नाहीय. केवळ योग्यता असलेल्या व्यक्तीलाच राज्याभिषेक करायची आपली इच्छा असेल तर आपण केवळ चार राजकुमारांचीच परीक्षा घ्यायची गोष्ट का करता ? सर्व



प्रकारची योग्यता असणारे लोक आपल्या देशात काय कमी आहेत ? आपल्या पुत्रांपैकी कोणाला तरी राज्याभिषेक झाला पाहिजे या परंपरेचं पालन करत असतानाही, आपण परंपरेचं पालन करत नाही, आपण आदर्शवादी आहोत असं कसं मानता? आपण जसे आपल्या मुलांपैकीच एकाला राजा बनवू इच्छिता, तसंच मीही जर माझा जावईच राजा व्हावा अशी इच्छा केली तर मात्र ती चूक समजता आपण! तेव्हां, आता आपणच सांगा की आपल्या या दृष्टिकोनाला मी हंसावं, नाहीतर काय करावं?" मन्त्र्याने आपला विचार राजासमोर मांडला.

मन्त्र्याचे हे विचार ऐकल्यावर आपण घेत असलेल्या निर्णयातील दोष राजाच्या लक्षात आला. मग परंपरा मोडण्याचा आपला विचार राजाने बाजूला सारला आणि मन्त्र्याला विचारले–"तुम्ही नीट स्पष्ट सांगा, खरोखरच धर्मसेन राजा बनायला योग्य आहे का?"

"महाराज, एकाद्या राजाला समर्थ मन्त्री, शक्तिशाली परिवार, विश्वासपात्र नोकर, योग्य साथ देणारी पत्नी आणि राजभक्ति असणारी प्रजा मिळाली तर तो राज्य शासन करायला योग्य बनतो. धर्मसेन सिंहासन ग्रहण करायला योग्य असाच आहे." मन्त्र्याने आपले मत दिले.

मन्त्र्याची ही सूचना राजाने लगेच मान्य केली. मन्त्री पुन्हा हंसून म्हणाला– "महाराज, आता मी का हंसलो, हे मात्र मला विचारू नका हं!"

मन्त्र्याच्या बोलण्यातले मर्म जाणून चन्द्रसेन हंसून म्हणाला–"मन्त्रीवर, आता आपणही मान्य कराल की राजनीतिपेक्षा मन्त्रीनीतीच श्रेष्ठ असते! राजनीतीने तर आपल्या मुलीला राणी बनवले आहे! आपल्यासारख्या समर्थ व्यक्तीचा जावई बनणाऱ्या धर्मसेला या राज्यात काहीही कमी पडणार नाही." असे म्हणून राजाने तावडतोब धर्मसेनचा विवाह आणि राज्याभिषेक या दोन्हीची व्यवस्था केली.



## निसर्गातील आश्चर्यें :

### मधमाशांचे परिश्रम



एक पौण्ड मध जमविण्यासाठी मधमाशा सुमारे ४० लाख फुलातून मकरन्द संग्रहित करतात.



### उलटा पोहणारा मासा

आफ्रिकेतील कॅट- फिश (सिनो डोन्टिस बाटनसोडा) मासा उलटा पोहतो. अशा प्रकारे पोहण्यामुळे पाण्याच्या पृष्ठभागावरील खाद्य तो अधिक सहजपणे मिळवू शकतो.

### लांब कान



वालुकामय प्रदेशातील सशांचे कान साधारण सशांपेक्षा अधिक लांब असतात. या लांब कानात नसा अधिक असतात, त्या शरीर थंड ठेवण्यासाठी उपयोगी पडतात.

# सत्तावीस वर्षां नंतर सूर्योदय



रंगभेदाला विरोध करण्यासाठी संघर्ष करणारे दक्षिण आफ्रिकेच्या राष्ट्रीय स्वतंत्रता आंदोलनाचे महान नेता नेल्सन मंडेला शेवटी सत्तावीस वर्षे व सात महिन्यांच्या दीर्घ कारावासातून मुक्त झाले. दक्षिण आफ्रिकेतील गोऱ्या सरकारने आजपर्यंत रंगभेदाची नीति अवलंबिली, परंतु जगांतील बदलत्या राजनैतिक हवेच्या प्रवाहात ती टिकू शकली नाही आणि म्हणून हा निर्णय घ्यावा लागला. आज सारे जग रंगभेदाकडे तिरस्काराने पाहते आणि म्हणून रंगभेदी सरकार नष्ट करण्याचे उपाय शोधत आहे. जनतेत मंडेला बाबत भक्ति-भाव, श्रद्धा, गाढ प्रेम अशा रीतीने उफाळून आले आहे की लोक मंडेलाच्या मुक्तीला मानवतावादाचा प्रचंड जय मानू लागले. आज नेल्सन मंडेला दक्षिण आफ्रिकेचे राष्ट्र-पिता बनले आहेत.

आफ्रिका खंडाच्या दक्षिणी टोकाकडील भू-भागालाच दक्षिण आफ्रिका म्हणतात. त्याचे चार भाग आहेत—केप ऑफ गुड होप, नेटाल, ट्रान्सवाल आणि ऑरेंज फ्री स्टेट. या सर्व भागांवर गोऱ्यांचे राज्य होते. सन १९६० मध्ये दक्षिण आफ्रिकेला स्वातंत्र्य मिळाले. येथील राजधानी आहे प्रिटोरिया. या देशाची लोकसंख्या तीन कोटींहून अधिक आहे व क्षेत्रफळ आहे १२,२१,०३७ चौरस किलोमीटर.

जगात हाच एक देश आहे जिथे सोने आणि हिरे विपुल प्रमाणात मिळतात. पण येथील राज्य-संचालन मात्र अधर्म आणि

अन्यायाने कलंकित झालेले आहे. गोऱ्या लोकांची संख्या कमी असली तरी येथील गौरधार्जिण्या सरकारने गोऱ्यांना अनेक विशेष अधिकार दिलेले आहेत. काळे लोक संख्येने अधिक असले तरी त्यांच्यावर मात्र अनेक बंधने लादलेली आहेत. या रंगभेदाच्या विरोधासाठी जनतेने प्रचंड चळवळ सुरू केली. जगातील सर्वांना या चळवळीबद्दल सहानुभूति आहे. नेल्सन मंडेला 'आफ्रिकन नॅशनल काँग्रेस' चे सूत्रधार होते आणि त्यांनी धैर्याने मुक्ति-संग्राम चालवला. म्हणून गोऱ्या सरकारने त्यांना सत्तावीस वर्षे कैदेत ठेवले आणि शेवटी ११ फेब्रुवारी रोजी कारावासातून मुक्त केले. मंडेला जेव्हा कैदेत होते, तेव्हा त्यांची पत्नी विनी हिने चळवळ चालू ठेवली.

आज गोऱ्या सरकारला कळून चुकलं की काळ्या लोकांवर अत्याचार करण्याचा उद्योग बंद करायची वेळ आलेली आहे. रंगभेदी सरकार विरुद्ध तिरस्काराची ही लाट दक्षिण आफ्रिकेपुरती मर्यादित राहिली नाही, तिने एका आंतरराष्ट्रीय चळवळीचे रूप ग्रहण केले. सर्व दिशांनी जोरदार विरोध होऊ लागला, तेव्हा दक्षिण आफ्रिकेचे अध्यक्ष एफ्. डब्ल्यू. डी. क्लार्क जागृत झाले आणि त्यांनी आपली परंपरा सोडून मंडेलांना मुक्त करण्याचा निर्णय घेतला. सध्याची एकूण परिस्थिति पाहता क्लार्क साहेबांनी कोणत्या उद्देशाने मंडेलांना मुक्त केले हे निश्चितपणे सांगता येणार नाही. दक्षिण आफ्रिकेतील हा नव्या युगाचा प्रारंभ कितपत टिकून राहील हे काळच ठरवील. आपापसातील सद्भावना वाढीस लागण्यात, तसेच काळ्या व गोऱ्या जमातीत नि क्लार्क आणि मंडेला यांच्यात शांतिपूर्ण सुसंवाद स्थापित व्हावा अशी आपण आशा करू या.





# लोकेशची अडचण

विश्रामपुरमधे एक व्यापारी रहात असे. त्याचे नाव होते लोकेश. साठ वर्षांचा होता होता त्याला आपल्या कामधंद्यातून सुट्टी मिळाली, कारण आता त्याचा मुलगा केशव सर्व कामधंदा छान संभाळू लागला होता. लोकेशला आता सगळा आरामच आराम होता!

घरात बसून वेळ काढणे लोकेशला जड जाऊ लागले. म्हातारपणामुळे त्याची बुद्धी नाठी झाल्यासारखी झाली अन् तो काहीतरी बडबडत राहू लागला. बायको, मुले अन् सुना यांना आता तो त्रास देऊ लागला.

दिवसभर बायको-सुनांकडून निरनिराळे पदार्थ बनवून घेऊन तो आपल्या जिभेचे चोचले पुरवून घेऊ लागला. पोटभर खाऊन दिवसाच तो चांगला घोरत पडू लागला. दिवसभर अशा झोपा काढल्यावर लोकेशला रात्री झोप येईनाशी होऊ लागली.

रात्री कोणी आरामात झोपलेले दिसले की लोकेशला त्यांचा द्वेष वाटू लागला. बिचारा एकटा एकटा जागून करील तरी काय? मग गाढ झोपलेल्या आपल्या बायकोला उठवून तो विचारी–"अग, दुधाच्या पातेल्यावर झाकण ठेवलंस ना नीट?" अशाच तऱ्हेने तो आपल्या मुलालाही झोपेतून उठवून उगाच काहीबाही विचारत राही–"कायरे! सुनबाई काय करत आहे?"

रात्री चांगले गाढ झोपलेल्या लोकांना असे मधेच उठवून भलते-सलते प्रश्न विचारल्यावर ते बिचारे रागाने लाल होत. पण घरातला सर्वात वयस्क, अनुभवी म्हातारा होता न तो! त्यामुळे आपला राग दाबून, पण जरा कडक आवाजात

सिधु देशपांडे



त्यांनी लोकेशला सांगून टाकलं की–"यापुढे असं आम्हाला रात्री-बेरात्री उठवून आमची झोप खराब करायची नाही!"

रात्री झोपही येत नाही, इतर कुणाला उठवायचीही मनाई; नाहीतर काही-बाही बोलण्यात तरी वेळ घालवता आला असता! त्यामुळे कंटाळून एका रात्री लोकेश घराबाहेर पडला. निर्मनुष्य गल्ल्या-गल्ल्यांमधून फिरत तो तलावाजवळ पोचला. तेथे एक चिंचेचे झाड होते, त्याच्याखाली कोणीतरी जोरजोरात घोरत पडलेले होते.

ते दृश्य पहाताच लोकेशच्या मनात पुन्हा द्वेष जागा झाला. आपल्या घरात चांगली मऊमऊ गादी असूनही आपल्याला झोप येत नाही, अन् हा माणूस अंथरायला काही नसूनही खडबडीत जमिनीवर इतका आरामात कसा झोपू शकतो?

लोकेशने त्या व्यक्तीच्या पाठीवर थापटत त्याला विचारले–"कोण आहेस बाबा तू? इतक्या आरामात इथे कसा काय झोपला आहेस!"

झोपलेला माणूस घाबरतच उठून बसला आणि चवळ जाचपडून त्याने सोटा उचलून हातात घेतला. इतके केल्यावर त्याला जणू बळ आले, त्याने एकदम खेकसून विचारले–"कोण आहेस तू? कोणी चोर-डाकू की पिशाच्च?"

सोट्याकडे पहात बिचकत बिचकत लोकेश उत्तरला–"मी कोणी चोरही नाही न् भूत-पिशाच्चही नाही. मला एक विचित्र रोग जडलाय–झोप न येण्याचा रोग! घरात सगळीजणं मजेत झोपतात; मी कुणाला उठवलं तर रागावतात माझ्यावर ते. तूच सांग बाबा मला, की करावं तरी काय? म्हणून असा चालत या आडवेळी इथे आलो आहे; आता स्वतःबद्दल सांग बरं तू?"

यावर तो माणूस म्हणाला–"मी रात्री गावात पहारा देण्याचं काम करतो. माझं नाव गबडू. दिवसभर घरातलं कामकाज; एक क्षणभरही उसन्त मिळत नाही मला! नातवंडं जराही डोळा लागू देत नाहीत पहा दिवसा! मी तरी काय करू? म्हणून पहारा करता करता मी मधे-मधे असा झोपतो."

लोकेशने जरा वेळ विचार करून म्हटले–"हे पहा गबडू, तुला दिवसा झोपता येत नाही. अन् मला रात्री झोप येत नाही, तेव्हा आता वेळ काढण्यासाठी आपण फरंमरं खेळू या. छान चांदणं आहे नं? प्रकाशही भरपूर आहे."

"फरंमरं खेळायला तर मला सुद्धा आवडतं, पण मग पहारा कोण करील? कुठे चोरी-बिरी झाली तर उगीच माझ्या नोकरीवर गदा येईल नं? तेव्हा माझं एक ऐक, आपण दोघं इथं बसून फरंमरं खेळू या; पण मधेमधे माझ्या ऐवजी तू एकदा गावात फेरी मारून पहारा द्यायचा. त्या वेळात मी थोडा वेळ झोप काढू शकेन. तुझी करमणूक होईल, अन् माझंही काम साधेल. काय, आहे कबूल?" पहारेकरी गबडूने विचारले.

लोकेशने हे म्हणणे मान्य केले आणि दोघेही त्या झाडाखाली अड्डा जमवून बसून फरंमरं खेळू लागले. थोड्या वेळाने जांभई देत गबडू म्हणाला–"आता मला झोप येत आहे." आणि तिथेच जमिनीवर आडवा पडून तो झोपून गेला.

आता गबडूचा सोटा उचलून लोकेश पहाऱ्यावर निघाला. अशा तऱ्हेने रोजच लोकेश घरातून निसटून जायला लागला.





तो थोडा वेळ गबडूशी खेळे अन् मग सोटा घेऊन गबडूच्या कामावर गल्ल्या-गल्ल्या फिरे. लोकेशच्या मुलाच्या केशवच्या मनात एकदा त्याच्याबद्दल काही शंका आली आणि एका रात्री पित्याच्या मागे लपत-छपत जाऊन रात्री तो काय काय करतो, हे पाहून घेतले.

मध्यरात्री लोकेश घरातून बाहेर पडला, तलावाकाठच्या चिंचेखाली थोडा वेळ गबडूशी फरमरं खेळला अन् मग गबडूचा सोटा उचलून गावच्या गल्ली-बोळातून पहारा देत फिरू लागला. पहाट होता होता सोटा पुन्हा गबडूच्या हाती सोंपवून हळूच घरी येऊन पोचला–हा सर्वच उद्योग त्याला दिसला.

त्या रात्री केशवला झोपही नीट लागली नाही. पण बापाच्या या उद्योगाबद्दल तो आपल्या आईजवळ, किंवा बायकोजवळही काहीच बोलला नाही. पण तो मनातल्या मनात बापाचं हे वागणं कसं बदलावं याचा मात्र विचार करत राहिला.

याच परिस्थितीत एक दिवस केशवचा मामा–गोस्वामी हा पाहुणा म्हणून आला. तेव्हा आपल्या मामाला केशवने सर्व हकिकत सांगून त्याचा सल्ला विचारला.

यावर हसत हसत गोस्वामी म्हणाला– "ही काही मोठी अवघड गोष्ट नव्हे. तुझ्या बापाला सुधारायचं काम माझ्याकडे लागलं, आज रात्री मी फाटकातच खाट टाकून झोपतो. माझ्याजवळ एक सोटाही ठेव. पहाट होता-होता लोकेश परत आला, की काय होईल ते तू स्वतःच जवळपास लपून राहून पहा."

आपल्या मामाचे सांगणे मानून केशवने मामाच्या म्हणण्याप्रमाणे सर्व व्यवस्था केली.

त्या रात्री आपल्या मनासारखं सगळं करून–म्हणजे गबडूशी फरमरं खेळणे, गल्ली-बोळातून सोटा हाती घेऊन पहाऱ्यासाठी फिरणे वगैरे सर्व करून झाले आणि लोकेश घरी आला, तेव्हा बाहेर खाटेवर बसलेला गोस्वामी म्हणाला– "काय दाजी, गबडू पहारेकऱ्याला सोटा परत करायला विसरलात वाटतं? हा पहा सोटा!"

"कोण गबडू? कसला सोटा? काय म्हणतोस काय तू?" आपला घाबरटपणा लपवायचा प्रयत्न करत लोकेश बोलला.

यावर खो खो हसत गोस्वामी म्हणाला– "हे पहा, तुम्ही रात्री गबडूशी फरमरं खेळता अन् मग गल्लीबोळातून पहारा देत फिरून येता, हे रहस्य तुमच्या केशवला माहीत आहे, अन् आता मलाही कळलं आहे. गावातल्या आणखी कोणाला या गोष्टीचा पत्ता लागला तर ते आपसात कुजबूज करतील अन् मग गावभर नाचक्की होईल तुमची."

"हो, तुझं म्हणणं मान्य आहे मला. पण माझं कोण ऐकणार? रात्री मला झोप येत नाही. मग रात्रभर मी कसा वेळ काढू? काय करू, तूच सांग तर?" लोकेशने विचारले.

"ऐका सांगतो, दिवसभर तुम्ही झोपून रहाता. म्हणूनच रात्री झोप येत नाही तुम्हाला. त्यापेक्षा दिवसा काही काम करा न! तुमच्या व्यवसायातलं एकादं लहान-मोठं काम सांभाळा, घरातल्या मुलांबरोबर खेळा, त्यांना खेळवा. घरातलं एकादं काम करा! तुमच्या मुलाच्या डोक्यावरचाही थोडा भार हलका होईल, त्यालाही बरं वाटेल यामुळे! दिवसा काम केल्याने तुम्हाला जो थकवा येईल, त्यामुळे तुम्हाला रात्री झोप चांगली येईल, तुमची अडचणही दूर होऊन जाईल पहा. मीही आता थोडे दिवस इथेच राहीन. मीही पाहीन की असं केल्यावरही झोप कशी येणार नाही ते!"

हे बोलणे लोकेशला आवडले. त्याच दिवसापासून त्याने आपला नवा कार्यक्रम आखला. मग पहातो मला झोप कशी येत नाही ते! आता दिवसभर कष्ट करून लोकेश बिचारा चांगलाच थकून जाई अन् रात्री अंथरुणाला पाठ लागताच तो घोरू लागे. रात्रीच्या झोपेची त्याची तक्रार दूर झालेली पाहून केशव व गोस्वामीही खूष झाले!



# यशाची लालसा

सोनपुरचा राजा मोठा विनोदी नि हास्यप्रेमी होता, तसाच तो फार हुशार ही होता.

एकदा त्याने आपल्या राज्यात दवंडी पिटवली. घोषणा अशी होती–"ज्याला यशाची मुळिच लालसा नाही, त्याने अमुक दिवशी दरबारात यावे. त्याचा सत्कार केला जाईल."

ज्याला यशाची लालसा नाही त्याचा सत्कार करण्याचा दिवस आला. या सत्कारासाठी काही लोक दरबारात हजर झाले. त्यांच्याकडे पाहून राजा विनोदाने म्हणाला–"बरं, तर मग तुम्ही सर्वजण या सत्कारासाठी आपल्याला योग्य समजता हं? याच्या मागे तुमची यशाची लालसाच नाही का? म्हणून मी तुमच्या पैकी कोणाला ही या सत्कारासाठी योग्य समजत नाही! तुम्ही आता जाऊ शकता."

त्यांच्यातील प्रमोद नावाचा एक चालू माणूस पुढे आला नि राजाला म्हणाला–"महाराज, दुसरा कोणी या सन्मानाला योग्य आहे की नाही हे मला माहीत नाही! पण स्वतः बद्दल मात्र मी म्हणू शकतो की मी या सन्मानाला सर्वथैव योग्य आहे. माझ्या मनात यशाची लालसा अगदी मुळिच नाही!"

राजाने विचारले–"असं असेल तर सत्कारासाठी इथे आलास कशाला?"

यावर प्रमोदने उत्तर दिलं–"प्रभु, याचं एक कारण आहे. माझ्या गावातील लोकांनी अनेक वेळा माझा सत्कार करण्याचा घाट घातला. पण मी तो धुडकावून लावला, कारण मला यशाची लालसा यत्किंचित ही नाही. सत्काराचा अव्हेर करणारा म्हणून आपो आपच मला मिळालं यश! आता मी सम्मान स्वीकारला नाही तर माझं यश आणखी वाढणार नाही का?"

प्रमोदच्या चातुर्यावर राजा खुश झाला नि त्याने सत्कार-समारंभ घडवून आणला.





# डाकू युवराज

[८]

[कारस्थान करून वीरसिंह सुमेधच्या सिंहासनावर बसला खरा, पण तो सुखासमाधानाने राहू शकत नव्हता. ज्या बुरखाधारी व्यक्तीने वसन्तला वाचवले, तो कोण होता हे काही त्याला समजू शकले नाही. कोण केव्हा बंड करून उठेल, याची भीती त्याच्या मनात कायम घर करून होती. या भीतीमुळे तो जनतेला अधिकच छळू लागला. पुढे वाचा–]

जसजसा काळ जात राहिला, तसतशी वीरसिंहच्या मनात, आसपासची राज्ये जिंकण्याचा विचार डोके वर काढू लागला! या इच्छेमुळे जणू त्याची विचार-शक्तीच नाहीशी झाली! त्याने आपल्या सरदारांना समक्ष बोलवून त्यांच्यापुढे आपली ही इच्छा प्रकट केली. आसपासची राज्ये जिंकण्याचे स्वप्न त्याचे हे सरदारही बाळगून होतेच, त्यामुळे त्या त्या राज्यातली धन-संपत्ति लुटण्याची संधी त्यांना मिळणार होती. वीरसिंह बरोबरच त्यांचाही ह्यात व्यक्तिगत लाभ होणार होता, त्यामुळे ते लोभी सरदार एकदम खूष झाले!

वीरसिंहच्या कळपातील खास सरदार खूपच खूष झाले!

वीरसिंहच्या कळपात खास सरदार होता कपालकंठ. त्यालाच वीरसिंहने आपला सेना-पति नेमले. दुसऱ्या दिवशी रात्री आपल्या-



कडे बोलावून वीरसिंहने एकांतात त्याला विचारले–"मला वाटतं, आता आपण शेजारची राज्यं जिंकायला सुरुवात करावी. कसा वाटतो माझा हा विचार तुला?"

"मी पूर्वीच याबद्दल विचार करून ठेवला आहे. आपली सुरुवात अमृतपुरीपासूनच व्हायला हवी. त्याचं एक कारणही आहे. अमृतपुरीचा राजा सत्यसेन हा राजा शांतिदेव याचा मामा आहे. तो आपणावर फार जळत असतो." कपालकंठ उत्सुकतेने बोलत राहिला.

वीरसिंहला कपालकंठचे हे बोलणे फार आवडले. तो म्हणाला–"मला हेरांकडून कळलंय की सत्यसेन हल्ली आजारी आहे, ही तर आपल्याला चांगली संधी आहे. तेव्हा आता लवकरच युद्धाची जय्यत तयारी कर. हां, आणि नदी पार करण्यासाठी आतापासूनच पुरेशा नावा बांधायला सुरुवात करायची आज्ञा दे."

यावर हसत हसत कपालकंठ म्हणाला–"आपण कशाची काळजी करू नये महाराज!"

मिनिटभर गप्प राहून वीरसिंह पुन्हा म्हणाला–"अच्छा, हे बघ कपालकंठ, नदी पार करण्यासाठी सैन्य किती दिवसात तयार ठेवू शकशील?"

यावर जराही विचारात न पडता सेनापती तत्परतेने म्हणाला–"महाराज, आपली इच्छा असेल तर आपण उद्या रात्रीच नदी ओलांडू शकू! सर्व तयारी आहेच."

एकदम आनन्दून वीरसिंह यावर म्हणाला–"अरे, असं असेल तर आपण परवा रात्रीच निघू या. मला फार आनन्द वाटतोय, की माझं मन ओळखून तू अगोदरच सर्व तयारी करून ठेवली आहेस. अमृतपुरी जिंकून आपण जेव्हा परत येऊ, तेव्हा मी तुझा चांगला सत्कार करीन. सेनापती असावा तर असा!"

"महाराज, आपली विचारशक्ति तर अजबच आहे! आपण खूप बुद्धिमान आहात. परवा जेव्हा अचानक जाऊन आपलं सैन्य अमृतपुरीला वेढा घालील, तेव्हा अमृतपुरीतले लोक हैराण होऊन जातील! सकाळ उजाडता उजाडता ते राज्य आपल्या हाती पडेल महाराज!" कपालकंठ उत्साहाने उतावळा झाला होता.

नव्या सेनापतीच्या उत्साहामुळे वीरसिंह खूप आनन्दून गेला व त्याची पाठ जोराने थोपटली. कपालकंठलाही स्वर्ग दोन बोटे उरला असे वाटले. मोठ्या अदबीने वीरसिंहला मुजरा करून तो तेथून निघून गेला.

त्याच रात्री कपालकंठने सर्व सरदारांना बोलावून घेतले आणि त्यांना वीरसिंहचा विचार बोलून दाखवला. तेही सर्वजण फार प्रसन्न झाले हे ऐकून! त्यांना माहीत होते की अमृतपुरीचे सैन्य आपल्या सैन्यापुढे फारसा टिकाव धरू शकणार नाही. दुर्बळ लोकांना सतावण्यात दुष्ट लोकांना नेहमीच आनन्द वाटत असतो. या लढाईनन्तरच्या लूटमारीत आपल्याला व्यक्तिगत खूप फायदा होईल, खूपशी धनदौलत हाती लागेल या विचाराने ते सर्वजण आनन्दित झाले. सर्वांनी मिळून हल्ला कसा करावा वगैरेबद्दल योजना बनवली. नंतर कपालकंठ म्हणाला–"आता या क्षणापासून आपण युद्धाच्या तयारीला लागू या. पण लक्षात



ठेवा, ही खबर अगोदर कुठे बाहेर फुटली तर मात्र तुम्हापैकी कोणीही वाचणार नाही; नीट सावध रहा."

पण याचा काही उपयोग झाला नाही. त्यांच्यातला एक सरदार तेथून सरळ दारूच्या गुत्त्यावर पोचला. दारूच्या नशेत तो काहीबाही बरळू लागला. दारूबाजांची तर ही सवयच असते नं!

गुत्याच्या मालकाला तो म्हणू लागला–"चांदीची पन्नास नाणी तुला द्यायला माझ्याकडून काही दिवस उशीर होत आहे ना? आता बघ, मी परत येईन ना, तेव्हा चान्दीचीच काय; पण सोन्याची पन्नास नाणी देईन बघ तुला!"



त्याच्या बोलण्याने मालक चमकलाच! त्याने आश्चर्याने विचारले–"अरे पण जाणार आहेस कुठे? कुठून आल्यावर देणार आहेस सोन्याची नाणी मला?"

"ए, जोरात बोलू नकोस हं! एक गुप्त गोष्ट आहे. मी नदी पार करून जाईन ना, तिथून आल्यावर देईन बघ! समजलं? आता जास्त काही बोलू नकोस." उत्तरादाखल सरदार म्हणाला.

पण मालकाने विचारलेच–"ठीक आहे. पण परत केव्हा येशील?"

"उद्यानन्तर कधीही! कारण हल्ला तर होणार उद्या रात्रीच." सरदार हसत बोलला.

गुत्त्याच्या उंबरठ्याजवळच बसलेला एक तरूण हे सर्व लक्षपूर्वक ऐकत होता. पण मालकाच्या किंवा सरदाराच्याही ते लक्षात आले नाही. तो तरूण भिकाऱ्यासारखा दिसत होता, पण त्याच्या डोळ्यात एक साहसी व बुद्धिमानीची चमक होती! हा होता आपला वसन्त! तो अलीकडे अमृतपुरीत रहात होता, पण सुमेध राज्यात वेष बदलून वारंवार फेरफटका करीत असे तो! आणि आपल्या सारख्या साहसी व बुद्धिमान तरुणांना आपल्या पक्षात घेण्याचे काम करीत असे. जनतेचे कल्याण व्हावे म्हणून वीरसिंहचे शासन हाणून पाडायचा त्याचा विचार होता. ते कसे हाणून पाडावे याचाच तो सदासर्वदा विचार करत असे. अजून पर्यंत त्याला योग्य मार्ग सापडत नव्हता. बुरखाधारी व्यक्तीने त्याची मृत्युदंडातून सुटका केल्यापासून त्याचा बुरखाधारीवर चांगलाच विश्वास बसला होता.

कधीकधी तो बुरखाधारी वीर म्हणे–"भोळ्याभाबड्या अन् निरपराध जनतेचं वीरसिंहपासून आपल्याला रक्षण करायला हवं, परंतु असं करताना आपण कोणाचीही हिंसा नाही करायची. वीरसिंहाचा सरदार असो, की मामुली शिपाई असो–त्यांना आपण मारायचं नाही, कारण त्या बिचाऱ्यांना आपापल्या अधिकाऱ्यांच्या आज्ञेचं पालन करावं लागतं. हां, पण जर कोणी अबोध जनतेला किंवा स्त्रियांना त्रास देत असेल, तर मात्र आपण त्यांची गय करायची नाही, त्यांना योग्य शिक्षा द्यायलाच हवी."

बुरखाधारी खरोखरीचा कोण आहे, हे ओळखण्यासाठी वसन्तने खूप प्रयत्न केला, पण त्याला ते जमले नाही. वसन्तने एकदा स्वतः त्याला विचारले, तेव्हा तो वीर म्हणाला–"वेळ आली की प्रत्येक गोष्ट आपोआपच कळू लागते. तोपर्यंत वाट पहाणं हेच शहाणपणाचं असतं." त्या आवाजातल्या दृढतेमुळे वसन्त गप्पच झाला.

आता वसन्त हळूच गुत्त्याबाहेर पडला. समोर काळाकुट्ट अंधार पसरलेला होता. तिथेच एका खांबाला सरदाराचा घोडा बांधलेला होता. आत सरदार व गुत्त्याचा मालक अजून बोलण्यातच गुंतलेले आहेत अशी खात्री करून वसन्त घोड्याकडे वळला. त्याने फुरफुर किंवा खिंकाळू नये म्हणून तोंडाने हळूच प्रेमाचा आवाज करत व त्याच्या पुठ्ठ्यावरून प्रेमाने हात फिरवत वसन्तने त्याची दोरी सोडली अन् पट्कन त्यावर स्वार होऊन त्याने घोड्याला टाच दिली.

वसन्तला घेऊन घोडा मुकाट्याने सरपट धावत निघाला, तासभराच्या दौडीनन्तर



वसन्त सुखरूप नदीच्या किनाऱ्यावर पोचला. घोड्याला तिथेच सोडून वसन्त नदीच्या पाण्यात शिरला. प्रवाहाला वेग फारसा नव्हता अन् पाणीही उथळच होते. एका तासाच्या आतच वसन्तने नदी पार केली, अन् पैलतीरावरल्या अमृतपुरीत पाय ठेवला त्याने.

अमृतपुरी तसं एक छोटंसंच नगर होते. तेथली जनताही शान्तिप्रेमी होती. सर्वजण शांतपणे झोपलेले होते. वसन्त सरळ मन्त्र्याच्या दारी पोचला अन् त्याने दरबानाला सांगितले की–"मला तावडतोब काही महत्त्वाच्या कामासाठी मन्त्री महाराजांची भेट हवी." मन्त्री जागाच होता.



त्याने वसन्तच्या आवाजातली भीती ओळखली व दरबानाला त्याला ताबडतोब आत पाठवण्याची आज्ञा दिली. त्यामुळे काहीही अडचण न येता वसन्त थेट मन्त्र्या-समोर जाऊन पोचला.

वसन्तने ताबडतोब वीरसिंहाच्या हाल-चालीची व योजनेची बितंबातमी मन्त्र्याला सांगितली. मन्त्री सावध झाला अन् त्याने आपल्या सेनापतीला बोलावून घेतले. ते दोघेही मिळून राजाकडे गेले.

आजारी असलेल्या सत्यसेनने मन्त्र्याच्या तोंडून राज्यावर हल्ल्याची बातमी ऐकली अन् तो दचकूनच गेला. दुःखाने तो म्हणाला–"माझी मुलगी अन् जावई मला सोडून तर गेलेच. अन् माझं राज्यही जाणार असं वाटू लागलंय मला!"

यावर सेनापती दृढनिश्चयी आवाजात राजाला म्हणाला–"आपण असे हताश का होता महाराज? माझ्या शरीरात रक्ताचा अखेरचा थेंब असेपर्यंत मी राज्याचे रक्षण करत राहीन."

सत्यसेन तरीही म्हणाला–"सेनापति, तुमची राजभक्ति कशी आहे हे मला माहीत का नाही? पण सुमेधच्या तुलनेत आपले सैन्य कमी अन् दुर्बळ आहे. यापेक्षा तू नदीकिनारी जा अन् शत्रु पोचताच त्यांच्याशी तह कर. आपसात मिटू शकलं तर उगीच आपल्या लोकांचं रक्त कशाला सांडायचं? आपण त्यांना खंडणीही कबूल करू; तू सांग त्यांना तसं."

मन्त्री अन् सेनापति यावर थोडा वेळ गप्पच झाले. नंतर मन्त्री म्हणाला–"प्रभू, आम्ही आपल्या आज्ञेचं पालन करू. मलाही असंच वाटतंय की सध्या तरी आपला विचारच ठीक आहे. पण त्यांनी आपला प्रस्ताव मानला नाही तर? मग तर लढाई करावी लागेल ना?"

राजा काय बोलणार? सर्वांचीच अंतःकरणे जड झाली होती!

ठरलेल्या योजनेप्रमाणे त्या रात्री वीर-सेनचे सैन्य सुधारा नदीच्या किनारी

पोचले. सर्व हत्यारे नावांवर चढवली गेली अन् काही सरदारही नावांवर चढले. नंतर बाकी सैनिकांना उद्देशून कपालकंठ म्हणाला–"आता तुम्ही सर्वजण नदीत उतरा आणि पोहून पैलतीरावर पोचा."

जवळच असणारा वीरसिंह कपालकंठच्या कार्यचातुर्याचे मनातल्या मनात कौतुक करत होता. तो नंतर स्वतः एका नावेत बसला. सर्व नौकांचा जथ्था आता नदी पार करू लागला.

नदीच्या पलीकडे उभी असलेली सेना दिसू लागली. वीरसिंह आला तर त्याच्याशी बोलणी करून तह करण्यासाठी अमृतपुरीचा मन्त्री तयार होऊन बसला होता.

पण त्याच वेळी अचानक नदीचे पाणी चढू लागले. रात्री बहुधा नदीच्या वरच्या प्रवाहात जोरदार वृष्टि झालेली असावी. त्या भयानक पुराने सुधारेचं पाणी क्षण-क्षणाला वाढू लागले अन् प्रवाहानेही एकदम वेग धरला. वीरसिंहचे लोक ओरडूआरडू लागले. त्यांच्या ओरडयाने आसमन्त भरून गेला. नावाही प्रवाहाच्या वेगाबरोबर वाहून जाऊ लागू लागल्या. शेवटी त्या उलटल्या. त्यावरचे लोक व पोहणारे सैनिक घाबरून घाबरून कसेबसे जीव वाचवायचा प्रयत्न करू लागले. प्रत्येकाला आपलाच जीव प्यारा! कोण कुणाचा जीव वाचवू पहाणार? अशातच किती सैनिक बुडून मेले अन् किती धारेला लागून वाहून गेले, याचा पत्ताच लागला नाही. वीरसिंह आणि कपालकंठ कसेबसे संकटातून वाचले होते. आणि थोड्या वेळाने सर्व वातावरण आपोआप शान्त झाले.

या आस्मानी सुलतानीची हकीकत ऐकून अमृतपुरीचा राजा सत्यसेन मात्र खूश होऊन गेला! तो म्हणाला–"देवानेच आमची संकटातून सुटका केली, पण यापुढे मात्र आपल्याला संकटाला तोंड द्यायला नेहमी तयार असले पाहिजे. आपल्याला आपल्या सैन्याचे संगठन केले पाहिजे.

मन्त्री म्हणाला–"हां प्रभु! याची व्यवस्था मी ताबडतोब करतो." (क्रमशः)



## गुलामीच्या बेड्या

राजा विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडापाशी गेला, झाडावरून प्रेत खाली उतरवले नि आपल्या खांद्यावर टाकून नेहमी प्रमाणे मुकाटयाने स्मशानाकडे चालू लागला. प्रेतात वास करणारा वेताळ राजाला म्हणाला–" राजन्, अर्ध्या रात्री या बीभत्स व भयानक स्मशानात आपण जे कठोर परिश्रम करीत आहात, ते पाहून मला मोठं आश्चर्य वाटतं! मनात एक शंका ही येते की राज्यकारभाराचं काम विश्वासाने कोणावर तरी सोपवून आपण इथं आला आहात. राज्य-संचालनाचा भार ज्याच्या वर विश्वासपूर्वक आपण सोडला आहे, त्यानं दगा दिला तर? अनेक वर्षांपूर्वी एका राजापुढे अशीच समस्या निर्माण झाली. त्या राजाचं नाव होतं शत्रुजित. त्या वेळी त्या राजाने काय केलं हे मी तुम्हाला

## वेताळाच्या गोष्टी



सांगतो. गोष्ट ऐकून तुमचो थकावट ही थोडी दूर होईल." असं म्हणून वेताळ विक्रमादित्य राजाला गोष्ट सांगू लागला.

प्राचीन काळची गोष्ट आहे. शत्रुजित नावाचा एक राजा होता. तो विशालपुर देशावर शासन करी. शत्रुजितच्या मनात नित्य प्रजेच्या कल्याणाचे विचार असत. राज्याकांक्षा त्याच्या मनांत मुळिच नसे. त्याने आपलं राज्य शंभर भागात विभागलं. एकेका भागावर एक एक अधिकारी नेमला. या अधिकाऱ्यांना पूर्ण स्वातंत्र्य दिलं.

बरेच दिवस कोणी काही तक्रारच आणली नाही. कोणी वादी आला नाही. म्हणून राजा शत्रुजित समजला की आपल्या राज्यात सर्वत्र आबादी-आबाद आहे.

अशी काही वर्षे गेली. एक दिवशी शरदिज नावाचा एक माणूस राजाकडे आला नि तक्रार करू लागला–"महाराज, आपण राज्याचे शंभर भाग केलेत आणि त्यांवर शंभर अधिकारी नेमलेत! हे सर्व अधिकारी बेइमानी नि भ्रष्टाचारी होऊन गेलेले आहेत."

हे सर्व ऐकून शत्रुजितला आश्चर्य वाटलं. त्याने शरदिजला विचारलं–"तुझ्यावर काय अन्याय झाला बरं?"

"प्रभु, मी ज्या भागात रहातो, तिथला अधिकारी आहे वीरसिंह. तो एक नंबरचा लाचखोर आहे. त्याला काही रुपयांची लाच दिली की कुठल्या ही नालायक माणसाला चांगली नोकरी मिळू शकते." शरदिजने राजाला वस्तुस्थिति सांगितली.

"बरं, पण तुझ्यावर काय अन्याय झाला हे तर सांगशील अगोदर?" राजा शत्रुजितने विचारले.

"महाराज, भ्रष्टाचाऱ्यांना जागच्या जागी पकडण्याचं काम वीरसिंहाने माझ्या-कडे सोपवलं होतं. मी भ्रष्टाचाऱ्यांना पकडलं म्हणून नोकरी गमावून बसलो." शरदिजने राजाला सांगितलं.



राजाने विचारले–"मग तुला आपली नोकरी परत मिळवून देऊ का?"

"नको महाराज, काही ना काही काम करून मी राजधानीत आरामात राहू शकतो. नोकरी करण्याची मला मुळिच इच्छा नाही. एकदा स्वतः आपण जाऊन आपल्या डोळ्यांनी वीरसिंहाचे प्रताप पहावेत. हेच आपल्याला सांगायला मी इथं आलो आहे." शरदिज म्हणाला.

दुसऱ्याच दिवशी शत्रुजित वीरसिंहाकडे जायला निघाला.

वीरसिंह मोठ्या अदबीने राजाचा आदर-सत्कार करू लागला. तेव्हां शत्रुजित त्याला म्हणाला–"हे बघ वीरसिंह, तुझ्या आतिथ्यासाठी मी इथं आलो नाही. प्रजेची सुख-दुःख पाहण्यासाठी मी आलो आहे. तशी आपल्या भागात घोषणा कर."

वीरसिंहाने तसे जाहीर केले. राजाला भेटण्यासाठी अनेक लोक येऊं लागले. एका शेतकऱ्याने राजाला सांगितलं–"महाराज, माझी दहा एकरांची शेती आहे. नियमानु-सार द्यावयाच्या करा व्यतिरिक्त वीरसिंह माझ्याकडून वीस पोती धान्य वसूल करतो. अशी दहा वर्षे झाली. मला दोनशे पोती धान्य परत मिळवून देण्याची कृपा कराल?"

एक मुलीचा बाप राजाकडे आला नि निवेदन केलं–"प्रभु, माझ्या मुलीला एक



स्थळ सांगून आलं. हुंडा म्हणून मी एक हजार रुपये दिले, तर विरसिंहाने मला धमकावलं–'हुंडा देण्याच्या अपराधा बद्दल तुला तुरुंगात का डांबू नये?' मी त्याला पाचशे रुपये दिले नि मग माझ्यावरचं संकट टळलं. हुंडा दिल्याशिवाय मुलींची लग्न होत नाहीत. आणि आता तर हुंड्याबरोबरच वीरसिंहाला ही छानशी रक्कम द्यावी लागते. आपणच आमचं रक्षण करा माय-बाप या वीरसिंहाच्या कचाट्यातून."

एका मुलाच्या बापाने राजाला सांगितलं-"महाराज, मी आपल्या मुलाच्या लग्नात हुंडा घेऊ इच्छित नव्हतो. पण या वीर-सिंहाने मला तसं ही करू दिलं नाही.



त्याने मला हुंडा घ्यायला भाग पाडलं नि त्यातील अर्धी रक्कम माझ्याकडून जबरदस्तीने वसूल केली."

व्यापारी पाळी पाळीने मोठ-मोठ्या रकमा वीरसिंहाला देत होते. वीरसिंह स्वतः मातबर व्यापाऱ्यांकडून भल्या मोठ्या रकमा मागून घेत असे. कलाकार मंडळी नृत्य-गायन वा अन्य मनोरंजनाचे कार्यक्रम वीरसिंहासाठी फुकट सादर करीत. जिकडे पहावे तिकडे अत्याचार नि भ्रष्टाचाराचा सुळसुळाट होता!

हे सगळं ऐकून राजा शत्रुजितला मोठं आश्चर्य वाटलं. त्याने लगेच काही कर्मचाऱ्यांना बोलवलं आणि म्हटलं—

"वीरसिंहाने तुम्हाला नोकरी दिली खरी! पण पगार म्हणून तुम्हाला जो पैसा मिळतो ते प्रजेचं धन आहे. तुम्ही लोक प्रजेवर अन्याय करीत आहात. इथे जो अन्याय व अंदाधुंदी चालली आहे, त्याबाबत तुम्ही मला काही ही सूचना दिली नाहीत, हे बरोबर आहे का? तुमचं काय म्हणणं आहे या बाबतीत?"

सर्व जण माना खाली घालून क्षण भर गप्प बसले. नंतर त्यांनी राजापुढे आपली बाजू मांडली—"महाराज, आपण वीरसिंहाला सर्वाधिकार दिलेत. त्याने काही ही केले, तरी त्याच्या विरुद्ध कोण काय करणार? त्याचं म्हणणं ऐकलं नाही म्हणून बिचाऱ्या शरदिजला आपली नोकरी गमवावी लागली. राज्याचा हा भागच सोडून जावं लागलं त्याला! त्याच्या इतकं धैर्य नि धाडस आमच्यात नाही, आम्ही मूग मिळून सर्व काही पहात राहिलो झालं मुकाटयाने!"

शत्रुजितने सर्वाधिकारी वीरसिंहाला बोलवून घेतलं. स्वतः ज्या सर्व तक्रारी ऐकल्या, त्या सर्व सांगून राजाने विचारले—"आता सांग, तुझं काय म्हणणं आहे या सर्वांवर?"

वीरसिंहाने उत्तर दिले—"महाराज, सर्व लोक माझ्या विरुद्ध बोलत असतील, तर मी हे सर्व नाकबूल कसं करू? मला एक वर्षाची मुदत द्या. मी स्वतःला सुधारून घेईन, कृपा करून मला एक संधि द्यावी आपण."

सर्वांनी राजाला विनवले की वीरसिंहाला मुळिच मुदत देण्यात येऊ नये. तरी पण ते न ऐकता राजा शत्रुजितने वीरसिंहाला एक वर्षाची मुदत दिली आणि तो आपल्या राजधानीकडे निघून गेला.

या एक वर्षाच्या मुदतीचा वीरसिंहाने संपूर्णपणे दुरुपयोग केला. त्याने आपल्या वर्तनात थोडा ही बदल केला नाही. ज्या लोकांनी राजाकडे त्याच्या विरुद्ध तक्रार केली, त्या सर्वांवर चांगलाच सूड उगवला त्याने. हे सर्व लोक प्रतिकारार्थ सज्ज होऊन उठले. त्यांनी आपल्यापैकी काहींना आपला प्रतिनिधि बनवलं नि राजा शत्रुजितकडे त्यांना पाठवून दिलं. प्रतिनिधींनी जाऊन राजाला सांगितलं—"आम्हांला खरोखरीचा श्रेष्ठ व सुविचारी असा सर्वाधिकारी पाहिजे. आपण तावडतोब अशा एकाद्या अधिकाऱ्याची आमच्या भागात रवानगी करावी. तसेच या भ्रष्ट वीरसिंहाला चांगली कडक शिक्षा व्हावी."

राजा शत्रुजितने वीरसिंहाला कसली ही कठोर शिक्षा दिली नाही. फक्त त्याला अधिकार-पदावरून दूर केलं. त्याच्या



जागी नवीन अधिकारी म्हणून शरदिजची नेमणूक केली.

वेताळाने आपली गोष्ट संपवली आणि राजा विक्रमादित्याला विचारलं—"राजन्, शत्रुजितने वीरसिंहाला काही ही शिक्षा केली नाही हे थोडं असंगत नाही वाटत आपल्याला? शरदिजने तक्रार केली म्हणून वस्तुस्थिति जाणून घेण्यासाठी राजा शत्रुजित निघाला. तिथं वीरसिंहाबद्दल एक काय अनेक तक्रारी त्याला ऐकायला मिळाल्या. कित्येक लोकांनी वीरसिंहाच्या अत्याचाराच्या अनेक कहाण्या राजाला ऐकवल्या. तरी सुद्धा राजाने विक्रमसिंहाला एक वर्षाची मुदत दिली. या अवधीत

वीरसिंह तक्रार करणाऱ्या लोकांवर सूड घेईल हे काय राजाला माहीत नव्हतं? शेवटी वीरसिंहाला केवळ आपल्या अधिकारावरून दूर करून शत्रुजित गप्प बसला. त्याने वीरसिंहाला कडक शिक्षा का केली नाही? या माझ्या प्रश्नांची उत्तरं माहीत असून ही जर तुम्ही न दिलीत तर तुमचं डोकं फाटून त्याचे शतशः तुकडे होतील!"

राजा विक्रमादित्याने उत्तर दिलं– "शत्रुजितने जे काही केले त्यात असंगत असं मला तर काही दिसत नाही! केवळ प्रजेच्या कल्याणासाठी शरदिजने राजाकडे तक्रार केली होती. स्वतःच्या फायद्याचा उद्देश त्याच्या मनात मुळीच नव्हता. म्हणूनच त्याच्या सांगण्याचा पडताळा पाहण्यासाठी राजा शत्रुजित वीरसिंहाकडे आला होता. लोकांनी फक्त आपल्यावर झालेल्या अन्यायाची गोष्ट राजाला सांगितली. राजा आपण होऊन त्यांच्याकडे आल्यावर लोकांनी आपलं तोंड उचकटलं. त्यांच्या कल्याणासाठी शरदिजने प्रयत्न केला, पण या लोकांनी त्याला जरा सुद्धा मदत केली नाही. यावरून राजाच्या लक्षात आलं की सगळे भेकड आहेत, संधिसाधु आहेत. म्हणून राजाने असा विचार केला की जनतेत चेतना आली पाहिजे. मगच त्याने वीरसिंहाला एक वर्षाची मुदत दिली. यानंतर जे काही घडलं ते राजा शत्रुजितच्या अंदाजाप्रमाणे घडलं. गुलामीच्या बेड्या कोणी बाहेरून येऊन तोडील असं समजणं चुकीचं आहे. या बेड्यांना तोडून टाकण्याचं काम गुलामांनीच केलं पाहिजे. हे रहस्य लोकांना फार उशीरा कळलं. लोकांच्या या भेकड वृत्तीने वीरसिंहाला दुष्ट बनवलं होतं. अशा माणसाला त्याच्या पदावरून दूर करणे ही एक कठोर शिक्षाच आहे. प्रजेवर अत्याचार करणाऱ्या वीरसिंहाला ही शिक्षा म्हणजे जिवंतपणी मरण नव्हे का?"

राजाच्या उत्तराने वेताळाचे समाधान झाले. मग तो प्रेतासह अदृश्य झाला नि झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





## पोपटाचे बोल

एक होती म्हातारी. धन-संपत्ति पुष्कळ होती तिच्याजवळ. पण एका नातीशिवाय आपलं म्हणावं असं कोणी नव्हतं तिचं. तरीही म्हातारी नातीचे मुळीच लाड करीत नसे; कडक शिस्तीत वाढवत असे ती नातीला!

नातीला घर म्हणजे तुरुंगच वाटे! एवढ्या मोठ्या घरात त्या लहान जिवाला फक्त आजी अन् एक पाळलेला पोपट तेवढा पहायला मिळे, कंटाळून जाई बिचारी! पण आजीच्या भीतीने ती काही बोलूही शकत नसे. म्हातारी जेव्हा काही कामासाठी बाहेर जाई, तेव्हा मात्र नातीचा राग खूप उफाळून येऊन बोलका होई. भान न राहून ती कडक आवाजात म्हणे– "देवा! ही म्हातारी मेली झटपट तर!"

म्हातारीच्या गैरहजेरीत हेच शब्द नात अनेकदा उच्चारी अन् आपला राग हलका करी. पण घरातल्या पोपटाने मात्र ते शब्द नेहमी नेहमी ऐकून चांगले पाठ केले. एक दिवस म्हातारीच्या समोरच पोपट म्हणाला–"देवा! ही म्हातारी मेली झटपट तर!"

पोपटाचे हे बोलणे ऐकून म्हातारीने डोळे वटारले! पोपटाला हे शब्द शिकवले तरी कोणी? खूप विचार केला तिने. पण आपल्या नातीबद्दल मात्र तिला मुळिसुद्धा शंका आली नाही; कारण म्हातारीसमोर तर ती कधी 'ब्र' ही काढत नसे.

एक दिवस म्हातारीशी गप्पा मारायला शेजारची एक म्हातारी आली. दोघीजणी बसून काही-बाही बोलत बसल्या. तिथेच पोपटाचा पिंजराही टांगला होता. त्याला वाटलं आपणही बोलावं काही तरी. तो म्हणाला–"देवा! ही म्हातारी मेली झटपट तर!"

ते ऐकताच शेजारची म्हातारी पांढरीच पडली! एक शब्द सुद्धा बोलू शकेना ती! एकाएकी जणू तिची वाचाच गेली! काही न बोलता ती एकदम उठून निघून गेली तेथून! म्हातारीला हा अपमानच वाटला आपला! पोपटाचं बोलणं सुधारण्याबद्दल तिने खूप विचार केला. त्याच गल्लीत रामशास्त्री नावाचा एक पंडित रहात असे. त्याच्या घरीही एक पोपट होता पाळलेला. म्हातारीला वाटलं की, पोपटांच्या बाबतीत पंडिताला खूप माहिती असेल.

त्याच दिवशी म्हातारी गेली रामशास्त्रीकडे, अन् म्हणाली–"शास्त्रीबुवा, माझा पोपट काही चांगलं बोलत नाही. कोणी आलं अन् पोपट वेडंवाकडं बोलला तर बरं नाही वाटत नं! तेव्हा तो चांगलं बोलेल असा काही उपाय सुचवा नं!"

यावर हसून पंडित म्हणाला–"हे तर मोठं सोपं काम आहे! आमचा पोपट खूप चांगले शब्द बोलतो. त्याला एकही वाईट शब्द माहीत नाही. दोन-तीन दिवस आमचा पोपट तुझ्या पोपटाबरोबर राहिला, तर त्यालाही काही चांगलं बोलता येईल. घेऊन जा आमचा पोपट थोडे दिवस, अन् त्याला तुझ्या पोपटाच्या पिंजऱ्यातच ठेव."

म्हातारीने पंडिताचे आभार मानले अन् पंडिताचा पोपट घेऊन ती घरी परतली. तिने पंडिताचा पोपट आपल्या पोपटाबरोबर ठेऊन दिला. अन् मगच सुटकेचा श्वास सोडला!

इतक्यात नव्या पोपटाला पाहून म्हातारीचा पोपट डोळे मिचकावून बोलला–"देवा! ही म्हातारी झटपट मेली तर!"

यावर पंडिताचा पोपट ताबडतोब बोलला–"तथास्तु!"

रागाने म्हातारी लाल झाली! अन् चिडून तिने पिंजरा उघडला! पोपट बाहेर पडून उडून जाऊ लागले, तर म्हातारी म्हणाली–"जा मरा मेल्यांनो, निर्लज्ज कुठचे!"



चांदोबा पुरवणी–१८

# ज्ञानाचा खजिना

## तो कोण?

प्राचीन काळची गोष्ट आहे. मदुरा नगरीत एक स्वरूप-सुंदर राजनर्तकी रहात असे. नगरातील मोठ-मोठे शेठसावकार तिच्या घरी येत.

एकदा राजनर्तकी आपल्या महालाच्या सज्ज्यात उभी होती. एक तरुण भिक्षु राजनर्तकीच्या महालासमोर कोणाशी तरी बोलत उभा होता. नर्तकीने त्या तरुण भिक्षूला पाहिलं. त्याचं रंग-रूप नि बोलण्याची शैली तिला फार आवडली.

त्या रात्री तोच तरुण भिक्षु नर्तकीच्या महाला बाहेर एका वृक्षाखाली विश्रांति घेत होता. नर्तकीने त्याला पाहिलं. त्या भिक्षूला बोलवण्यासाठी तिने आपल्या एका सेविकेला पाठवलं. त्याच सेविकेच्या हातीं भिक्षूने प्रतिसंदेश पाठविला–"जरूर येईन, पण इतक्या लवकर नाही. अजून ती वेळ आलेली नाही."

ही घटना घडून बराच काळ लोटला. त्या नर्तकीवर चोरीचा आळ आला. तिचे दोन्ही हाथ कापून, तिला मदुरा नगरीच्या बाहेर हाकलून देण्यात आलं. या स्थितीत तरूण भिक्षु विचारपूस करण्यासाठी तिच्याजवळ आला. तरूण भिक्षूने शोक-विव्हल नर्तकीचं मस्तक आपल्या मांडीवर घेतलं नि म्हणाला–"तुझ्या जवळ येण्याची माझी वेळ आता आली आहे." मग त्या युवक भिक्षूने आपल्या अमृत वाणीने तिला सान्त्वना दिली. तिच्या मनाला शांतता मिळाली. नंतर नर्तकीने शांततापूर्वक प्राण सोडला.

या सुप्रसिद्ध कथेतील तो युवक भिक्षु कोण? ही नर्तकी कोणती?

[पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. इसवी सन पूर्व चौथ्या शतकात एका परदेशी यात्रेकरूने भारताचा प्रवास केला आणि जे अनुभव आले ते पुस्तक रूपाने लिहून ठेवले आहेत. हा परदेशी कोण?
२. सम्राट अशोकाचा एक संदेशवाहक जेव्हा श्रीलंकेत पोचला होता, तेव्हा तेथे कोण राज्य करीत होता?
३. हा संदेशवाहक कोण? तो कोणत्या साली तेथे पोचला?
४. या संदेशवाहकानंतर जो दुसरा संदेशवाहक श्रीलंकेत पोचला, त्याचं नाव काय होतं?
५. दुसरा संदेशवाहक आपल्या बरोबर जो अनमोल उपहार घेऊन गेला होता तो कोणता?

[पान ३६ पहा]




भारत : तेव्हा आणि आता

# नालंदा विश्वविद्यालय

तक्षशिला आणि नालंदा या प्राचीन विश्वविद्यालयांमुळे आपल्या देशाचं नाव जगभर प्रसिद्ध झालं. आजच्या बिहार राज्यांतील पाटणा शहराच्या दक्षिण दिशेला ९० कि.मि. अंतरावर बडगाव नावाचं एक गाव आहे. इथे प्राचीन नालंदा विश्वविद्यालयाचे अवशेष पहावयास सापडतात.

याच ठिकाणी सिद्धार्थाने आपल्या अहिंसेच्या सिद्धांताचा बरेच दिवस प्रचार केला. म्हणून हा प्रदेश फार पवित्र मानला जातो. सम्राट अशोकानें इथे एक बौद्ध-स्तूप बनविला होता. महावीर काही काळ इथं राहिले होते. दहा हजार विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची व्यवस्था करणाऱ्या या महान् विश्वविद्यालयाची स्थापना कोणी केली हे अजून माहीत झालेलं नाही.

सुप्रसिद्ध चीनी प्रवासी ह्यू-एन्-त्संगने इसवी सनापूर्वी सातव्या शतकात या विश्वविद्यालयाला भेट दिली. येथील विद्यार्थ्यांची शिस्तप्रियता आणि ज्ञानलालसा यांची प्रशंसा या प्रवाशाने आपल्या पुस्तकात केलेली आहे. पाचव्या शतकात गुप्त वंशातील सम्राट नरसिंह गुप्त बालादित्याने नालंदा मध्ये एक सुंदर मंदिर बांधलं आणि त्या मंदिरात बुद्ध भगवानांची ८० फुट उंचीची मूर्ति प्रतिष्ठापित केली असं ह्यू-एन्-त्संगने लिहिलं आहे. ह्यू-एन्-त्संगने जेव्हा या विश्वविद्यालयाला भेट दिली, तेव्हा शिलाभद्र नावाचे एक महान पंडित येथील कुलपति होते.

तिबेट, चीन, इंडोनेशिया या देशातून आणि विशेषत: जावा सारख्या देशांतून अनेक विद्यार्थी नालंदा विश्वविद्यालयात शिक्षणासाठी येत असत.

या विश्वविद्यालयाचं एक वैशिष्ठ्य असं होतं की येथील ग्रंथालयाचा व्याप तीन इमारतींभर पसरलेला होता नि प्रत्येक इमारत नऊ मजल्यांची होती. असं सांगतात की त्या काळी जास्तीत जास्त पुस्तके इथेच उपलब्ध होत.

एवढं मोठं विश्वविद्यालय काळाच्या उदरात कसं गडप झालं हे समजत नाही. काही पुराव्यांचे आधारे असं वाटतं की हे विश्वविद्यालय भयंकर अग्नि-प्रकोपाच्या तडाख्यात सापडलं असावं. ही आग कशी लागली असावी ? विदेशी आक्रामकांनी ते नष्ट केलं असावं असाही संभव आहे.

आज नालंदाचे ध्वंसावशेष मात्र दिसतात आणि आपल्या उज्ज्वल भूत काळाची आठवण करून देतात. या ध्वंसावशेषात एक विशाल बौद्ध-स्तूप दिसतो नि त्याच्या मागे दृष्टीस पडतात राजगीरचे डोंगर !



### सायकलची कथा

सायकल नि मोटर-कार यांपैकी तुम्हाला कोण आवडते ? सर्वजण कारच अधिक पसंत करतात. पण सायकलीची ही आपली काही विशेषता आहे. अनुभवी लोक सांगतील की बेताच्या अंतराच्या सफरीसाठी सायकलच उत्तम ! आज जगात ८० कोटी सायकली आहेत. आणि दररोज सायकलींची मागणी वाढतच आहे. सायकल वर प्रवास केला की शरीराला आपोआप व्यायाम होतो. सायकलीमुळे आसपासचे वातावरण दूषित होत नाही. गर्दीच्या रस्त्यांवर ही सायकल वेगाने चालवता येते. म्हणून बेताच्या अंतरावर लवकर पोंचायचे असेल तर सर्वात उत्तम सायकलच !

## चांदोबाच्या बातम्या



### खेड्यात प्रचलित इलाज

आज ही खेड्यांतून जडी-बूटी नि पानांचा रस यांचा औषध म्हणून उपयोग केला जातो. या ग्रामीण औषधींकडे आज मोठमोठ्या आंतर्राष्ट्रीय चिकित्सा-संशोधन करणाऱ्या संस्थांचे लक्ष आकर्षित होत आहे. आधुनिक चिकित्सा आजकाल फार खर्चाची होत चालली आहे, त्यामुळे सामान्य जनतेला ती परवडत नाही. चिकित्सा शास्त्रातील तज्ज्ञ मंडळींना आता हे पटू लागले आहे की जरी या ग्रामीण औषधींकडे अलिकडे लोकांचे दुर्लक्ष झाले असले, तरी अनेक वेळी हे ग्रामीण इलाज फार उपयुक्त ठरतात.

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. भारताच्या प्राचीन राजवंशांचं विवरण कोणत्या पुराणात आहे?

२. 'सारे जहाँ से अच्छा' या कवितेचा कवि कोण?

३. भारताच्या एका राजनैतिक नेत्याने रामायण आणि महाभारत सोप्या भाषेत संक्षिप्त स्वरूपात लिहिले आहे. तो नेता कोणता?

४. अंकगणित व बीजगणितावर लिहिलेल्या प्राचीन ग्रंथाचे नाव काय? त्याचा लेखक कोण?

५. इंग्रजी भाषेत किती शब्द आहेत?

## उत्तरावली

**तो कोण?**

उपगुप्त ; वासवदत्ता.

**तुम्हाला माहीत आहे?**

१. ग्रीस देशाचा मेगॅस्थनीस.
२. देवानांप्रिय तिस्सा नावाचा राजा.
३. अशोकाचा मुलगा महेन्द्र; इ.पू. २५१ मध्ये.
४. अशोकाची मुलगी संघमित्रा.
५. बोधिवृक्षाचे कलम.

**साहित्य**

१. मत्स्यपुराण.
२. मुहम्मद इक्बाल.
३. सी. राजगोपालाचारी.
४. लीलावती भास्कराचार्य.
५. सुमारे ३,००,००० शब्द.



# तीन परीक्षा

[ मागील अंकावरुन पुढे ]

कृष्णवर्मा रात्र भर चालत राहिला नि दुसऱ्या दिवशी दुपार पर्यंत कौमुदी देशाच्या पूर्वेकडील जंगलात पोचला. त्या जंगलात एका ठिकाणी खूप मोठं एक चंदनाचं झाड त्याला दिसलं. त्या झाडाखाली दोन सापांनी लपेटलेली एक दगडाची मूर्ति त्याला दिसली. कृष्णवर्मा लक्षपूर्वक आसपास पाहू लागला.

त्याने आपल्या घोड्याला एका बाजूला उभं केलं, म्यानातून तलवार काढली आणि त्या मूर्तिकडे तो जाऊ लागला. इतक्यात मागून एक आवाज त्याने ऐकला—"थांबा!"

आश्चर्याने कृष्णवर्माने मागे वळून पाहिलं. नुकत्याच मिशा फुटलेल्या एका तरुणाने कृष्णवर्माला नमस्कार केला नि तो त्याच्या जवळ आला.

कृष्णवर्माने आश्चर्यचकित होऊन विचारलं—"तू कोण?"

यावर नतमस्तक होऊन तो तरूण म्हणाला—"ज्याच्यासाठी तुम्हाला इथं यावं लागलं, तो तर मी!"

हे उत्तर नि त्याच्यातील स्वराचे मार्दव पाहून कृष्णवर्माने तिला ओळखले, आणि अमळ संशयपूर्वक विचारले-"राजकुमारी?"

"होय, मीच राजकुमारी ज्योत्स्ना! मंजूषेवरील काढलेल्या चित्रांच्या साह्याने आपण बरोबर यथास्थान आलात. तिसऱ्या परीक्षेत ही अशा रीतीने तुम्ही पास झालात. आता चला." राजकुमारी म्हणाली.

ज्योत्स्ना एका झाडाखाली बसली. आपल्या पदरात बांधून ठेवलेलं एक जुनं ताडपत्र तिने काढलं. आणि म्हणाली—"माझा तुमच्यावर विश्वास आहे. दिलेला शब्द तुम्ही परत घेणार नाही हे मी जाणते.

भानुमती साबळे



पिढयान् पिढया आमच्या कुटुंबाशी संबंधित ताड-पत्रांवर लिहिलेला एक ग्रंथ आहे. त्याचं हे एक पान आहे. याबाबत काही महत्त्वाचं आपल्याला सांगायचं आहे मला."

आणि मग ज्योत्स्ना पुनः सांगू लागली– "गोष्ट फार जुनी आहे. शेकडो वर्षापूर्वीची. आमच्या देशात एक राजा होऊन गेला–हैहयवर्मा. तो मोठा वीर-पराक्रमी होता, नि राजनीतिज्ञ पण! त्याला मंत्र-तंत्र विद्या ही अवगत होती.

दुर्भाग्याची गोष्ट अशी की त्याचा मुलगा अजेयवर्मा निघाला बुद्धू नि मूर्ख शिरोमणी! हैहयवर्माला धास्ती वाटू लागली की मोठ्या परिश्रमाने जी राज्ये आणि संपत्ति त्याने मिळविली, मुलाच्या राज्यात ती सर्व नष्ट होणार! म्हणून त्याने बरीच संपत्ति व मंत्र-तलवार एका सुरक्षित जागी लपवून ठेवली. जादू-विद्येच्या आपल्या गुरूच्या मदतीने त्याने त्या ठिकाणी जादूचा पहारा ठेवला.

पण त्या पहाऱ्या बाबत अथवा ती संपत्ति परत मिळविण्याचं रहस्य त्याने कोणाला ही सांगितलं नाही. तरी पण या सर्व गोष्टीची माहिती या ताडपत्रावर लिहिलेली आहे. ती अशी–'सर्व संपत्ति मी कौमुदी देशाच्या पूर्वेकडे लपवून ठेवलेली आहे. सर्पांनी लपेटलेल्या दगडाच्या मूर्तीवरून ती जागा ओळखता येईल. ती अपार संपत्ति नि मंत्र-खड्ग मिळविण्यासाठी मी योजलेला जादूचा पहारा हटवून त्या जागी पोंचण्यासाठी मंत्र-तंत्राचे ज्ञान असण्याची मुळीच आवश्यकता नाही. फक्त चिंतनशक्ति नि कुशाग्र बुद्धि असली म्हणजे बस. साहसी, बुद्धिमान आणि धार्मिक वृत्तीच्या माणसाला ही सर्व संपत्ति प्राप्त करणं सहज शक्य आहे!' आमच्या वंशाचा असा नियम आहे की हे ताड-पत्र केवळ राजानेच वाचावं.

हैहयवर्माला जे भय वाटत होतं ते बरोबरच ठरलं. अजेयवर्मा आणि नंतरच्या राजांनी फारच गलथानपणे राज्य चालवलं. त्यामुळे मांडलिक राजे बंडखोर बनले.



त्यांनी आपलं स्वातंत्र्य घोषित केलं. एवढंच नाही तर काही राजांनी कौमुदी राज्याच्या काही भागावर हल्ला करून ते भाग आपल्या राज्यात सामिल केले. हैहयवर्माने आपली सारी संपत्ति मोठ्या रहस्यपूर्ण पद्धतीने लपवून ठेवली होती, त्यामुळे तीबाबत मात्र कुणाला काही कळू शकले नाही. आमच्याच वंशातील दोन-तीन राजांनी ही संपत्ति मिळविण्याचा प्रयत्न केला, पण त्यांना काही मिळू शकले नाही. सापांनी वेढलेली ही मूर्ति दूर हटविण्याचा काहीं राजांनी प्रयत्न केला. त्यांची कल्पना होती की खाली एकादा भुयारी मार्ग असेल. पण ही मूर्ति एक इंच भर इकडे-तिकडे सारण्याचे त्यांना जमले नाही.

माझ्या वडिलांना मुलगा नव्हता, मीच त्यांची एकुलती एक मुलगी. म्हणून हे ताड-पत्र वाचण्याची मला संधि मिळाली. ते वाचून मी ही इथे आले, ही सर्प-मूर्ति पाहिली. मला समजत नाही की हा खजिना कसा मिळवावा.

तुमची योग्यता नि चिंतन-शक्ति लक्षात घेऊन माझा तुमच्यावरील विश्वास पक्का झाला. माझी खात्री आहे की हे अशक्य काम तुम्ही सहज करू शकाल! खजिना मिळेल न मिळेल, पण माझी इच्छा आहे की ते मंत्र-खड्ग तुम्हाला मिळावे.



म्हणून माझं लग्न जेव्हां राजनैतिक समस्या झाली, तेव्हां मी तिला तीन परीक्षांच्या स्वरूपात बदलून टाकलं आणि या मंजूषेवर ती चित्रांकित केली. जेव्हा माझ्या हेरांनी मला सांगितलं की तुम्ही एकटेच घोड्यावर बसून इकडे निघालात, तेव्हां मला वाटलं की आपल्याला रहस्य समजलं आहे. तुम्ही कोणत्याही संकटात पडू नये असं पाहणं हे मला आपलं कर्तव्य आहे असं वाटलं. म्हणून मी आपल्या मागोमाग निघाले. जादूने भरलेली ही समस्या आहे. कोणास ठाऊक पुढे आणखी काय काय वाढून ठेवलंय! आता या शेवटच्या क्षणी मला वाटू लागलंय की मी तुम्हाला प्रोत्साहन देऊन



एखाद्या अज्ञात संकटाशी तोंड द्यायला लावीत आहे." कृष्णवर्माला हे सर्व सांगत असताना ज्योत्स्ना भयभीत झालेली दिसत होती.

ही गोष्ट ऐकून कृष्णवर्मा हसला. ज्योत्स्नाला त्याने सांगितले–"असं बघ राजकुमारी, या खजिन्यावर जादूचा पहारा असला, तरी तो मिळविण्यासाठी जादू-विद्येचं ज्ञान आवश्यक नाही हे हैहयवर्माने स्पष्टपणे सुचविले आहे न? ते तू विसरत आहेस. याबाबतीत भिण्याचे काहीच कारण मला तरी दिसत नाही. तू अकारण काळजी करीत आहेस. मी प्रयत्न अवश्य करीन. माझी विचार-शक्ति आणि शारीरिक बलाचा मी संपूर्ण उपयोग केल्यावर यश मिळो वा न मिळो, मला त्याची पर्वा नाही. चल." कृष्णवर्मा सापांनी वेढलेल्या त्या मूर्तीजवळ गेला आणि बारकाईने तिचे निरीक्षण करू लागला.

थोडा वेळ मूर्तीचे निरीक्षण केल्यावर कृष्णवर्मा एकदम म्हणाला–"ज्योत्स्ना, बघ, या इथे बघ बरं!" मूर्तीच्या वरच्या भागात जिथे त्या सापांच्या जोडप्याचे फणे एकमेकांसमोर आले होते, त्या जागी तो पहात होता. ज्योत्स्नाने पण पाहिलं. तिथं मधली दोन इंचांची जागा विशेष उभारलेली दिसत होती.

"होय, याच जागेत काही तरी विशेष असलं पाहिजे जरूर!" ज्योत्स्ना म्हणाली.

कृष्णवर्मा म्हणाला–"निःसंशय! इथं थोडा प्रयत्न करून पाहिला पाहिजे. त्याने ज्योत्स्नाला जरा बाजूला व्हायला सांगितलं. हातात धनुष्यबाण घेतला, बाणाचा असा नेम धरला की बाण बरोबर त्या गोल जागेच्या मध्यावर जाऊन लागावा. त्याने बाण सोडला नि तो ठीक आपल्या लक्ष्यावर जाऊन आपटला.

दुसऱ्याच क्षणी तिथं प्रखर प्रकाश पसरला. एक भयानक आवाज ऐकू आला. सर्पांनी लपेटलेली ती मूर्ति एकदम अदृश्य झाली. तिथं एक भुयार दृष्टीस पडलं आत उतरण्याच्या पायऱ्या दिसू लागल्या.



अशा रीतीने कृष्णवर्माचा प्रयत्न आता यशस्वी झाला होता. या यशामुळे दोघांना ही अत्यन्त आनन्द झाला. पुढे कृष्णवर्मा नि मागे ज्योत्स्ना असे दोघे जण त्या भुयारात उतरून गेले. पायऱ्या उतरून गेल्यावर एक अरुंद वाट दिसली त्यांना. त्या रस्त्याने पुढे गेल्यावर कृष्णवर्मा आणि ज्योत्स्ना एका खुल्या मैदानात पोचले.

त्या मैदानाच्या मध्यभागी एक सरोवर होतं. त्या सरोवरात सर्वत्र सुवर्ण-कमळे विखुरलेली होती. आसपासचा सर्व परिसर मोठा नयनरम्य दिसत होता. तलावाच्या मध्यभागी एक श्वेतकमळ फुललेलं होतं. सरोवराच्या उजव्या बाजूला एक विशाल वृक्ष होता. या वृक्षाच्या चौफेर एक दगडी चबुतरा बांधलेला होता. या चबुतऱ्यावर दोन कलश ठेवलेले होते, आणि त्यांच्यावर झाकणं घातलेली होती.

हे सर्व पाहून ज्योत्स्ना म्हणाली–"असं वाटतं की इथं ही काही रहस्य लपलेलं आहे!"

कृष्णवर्मा म्हणाला–"मला ही असंच वाटतंय. अभूतपूर्व वस्तु सहज बऱ्या हाती लागतील!" थोडा विचार करून तो पुन्हा म्हणाला–"कदाचित् ही सोन्याची कमळं असतील. धन-संपत्तिचा खजिना! ते श्वेत-कमळ असेल जादूची तलवार!



तिथपर्यंत कसं पोचायचं याचं रहस्य या कलषांत लपवून ठेवलं असेल हैहयवर्माने!"

मग तो सरळ त्या झाडापाशी गेला. दोन्ही कलषांची झाकणं त्याने उघडली, एका कलषात निरनिराळी स्वादिष्ट पक्वान्नं भरलेली होती, त्यांचा सुवास दरवळत होता वातावरणात! दुसऱ्या कलषात तांदूळ भरलेले होते.

कृष्णवर्माने त्या दोन्ही कलषांकडे पाहिले, अमळ विचार केला नि तो झाडाच्या मागे गेला. तिथे त्याला दिसल्या दोन चुली, दोन भांडी नि दोन लाकडं! ज्योत्स्नाकडे वळून तो म्हणाला–"पाहिलंस ना? खजिन्यासाठी जे इथे येतील, त्यांच्या



बुद्धीची ही खास परीक्षा आहे. अनोळखीच्या ठिकाणी गेलं म्हणजे शिजवून तयार ठेवलेलं अन्न खाऊ नये." मग तांदूळ भरलेला कलष हातात घेऊन तो सरोवराकडे निघाला.

कलष आपल्या हाती मागत ज्योत्स्ना म्हणाली–"मला द्या तो. मी तांदूळ धुवून आणते."

पण कृष्णवर्माने हे काम तिला सोपविले नाही.

"नाही, हे काम मीच करीन. या सरोवरात ही काही रहस्य लपलं असण्याची शक्यता आहे. तू इथंच थांब." असं सांगून कृष्णवर्माने एक आणखी रिकामं भांडं आपल्या हातात घेतलं आणि तो सरोवराकडे निघाला. रिकाम्या भांड्यात त्याने सरोवरातील पाणी घेतले नि त्या पाण्याने तांदूळ धुण्याचा प्रयत्न तो करू लागला.

पण पाहता पाहता तांदूळाचा स्पर्श होताच पाणी गरम होऊ लागलं. तांदुळांबरोबर संपूर्ण भांडं असं काही गरम झालं की ते धरून ठेवणं ही कठिण झालं. अशा स्थितीत कृष्णवर्माने ते भांडं दिलं सोडून सरोवरात.

भांडं जसं सरोवरात पडलं, लगेच ते जादूचं सरोवर अदृश्य झालं. तिथे हिरे-मोत्यांच्या राशी दिसू लागल्या. ज्योत्स्ना नि कृष्णवर्मा आश्चर्य आणि आनंदाने त्या धनराशींकडे पाहू लागले. एकदम त्यांना जादूच्या तलवारीची आठवण झाली, कारण ती तिथं दिसत नव्हती. आता खजिना सापडल्याचा आनंद संपुष्टात आला नि ते दोघे ही जादूची तलवार शोधू लागले.

फार शोध न करता, त्या रत्न-राशीत त्यांना चमकती कमळ दिसली. पण ही बहुधा जादूची तलवार नसावी.

ज्योत्स्ना म्हणाली–"आता पर्यंत स्वर्ण-कमळाच्या हिरे-मोत्यांच्या राशी आपण बनवू शकलो, आता या श्वेत-कमळांतून जादूची तलवार कशी बरे काढता येईल?"

कृष्णवर्माने या प्रश्नाचं काही उत्तर दिलं नाही. तो त्या श्वेत-कमळाजवळ गेला. हातात धरून कमळ त्याने जोरात उपटलं. ते फूल झालं अदृश्य नि तिथं एक राक्षस दिसू लागला!

कृष्णवर्मा आणि ज्योत्स्ना तलवारीच्या ऐवजी राक्षसाला पाहून आश्चर्यचकित झाले. राक्षसाने विकट हास्य करीत प्रश्न विचारला–"राजकुमार, तुला खजिना तर मिळाला! तो घेऊन जाण्याचं टाकून मला अशा रीतीने बोलवण्यात काय बरे तुझा उद्देश आहे?"

कृष्णवर्माने गंभीरपणे राक्षसाला सांगितलं–"मी जर धनलोभी राजकुमार असतो, तर माझ्याकडे तू तुच्छपणे पहाणं योग्यच होतं. पण मी तसा नाही. मी संपत्तिसाठी मरणारा लोभी माणूस नाही. ती जादूची अद्भुत तलवार मला पाहिजे, आणि मी ती प्राप्त केल्याशिवाय राहणार नाही."

हे बोलणं ऐकून खदखदा हसत राक्षस म्हणाला–"लोभ आणि स्वार्थ या काही वाईट गोष्टी नाहीत. त्या माणसात प्रगति घडवून आणतात. राजधर्म जाणणाऱ्या सर्वोत्तम माणसालाच ती तलवार मिळू शकेल. युद्धाच्या वेळी उपयोगी पडणाऱ्या त्या तलवारीत अशी काय विशेषता आहे? पैशाने मिळत नाही असं काय आहे या जगात? माझं ऐकशील तर खजिना घे नि आल्या वाटेने परत जा."



कृष्णवर्माने मंद-स्मित केलं आणि म्हणाला–"तुझं म्हणणं मला मुळिच पटत नाही. जरा नीट ऐक. माझ्या उत्तरांतून मी राजधर्मच निभावीत असल्याचं तुझ्या लक्षात नाहीं आलं? प्रगति होते सतत परिश्रम करण्याने, धन संपत्तीने नव्हे. या सर्वत्र पसरलेल्या निसर्गा द्वारे परमेश्वराने मनुष्याला आवश्यक ते अन्न नि पाणी दिलेले आहे. जेव्हा निसर्ग अन्न-पाणी देणार नाही, तेव्हां वेड्यासारखे लोक ज्या संपत्तीच्या मागे लागतात ती संपति माणसाची तहान-भूक भागवू शकेल का? म्हणून निसर्गातील हा मूळ श्रोत कायम ठेवणं, सशक्त माणसांच्या तावडीतून दुर्बलांना

वाचवणं हाच तर राजधर्म नाही का? दुष्ट शक्तींपासून जनतेचं रक्षण करणं हाच राजाचा धर्म. म्हणूनच राजाला दंड-दमन नीतीचा अवलंब करावा लागतो. म्हणून राजाला आपल्या कर्तव्याचे पालन करण्यासाठी तलवारीचाच अधिक उपयोग आहे."

कृष्णवर्मांचे उद्‌गार ऐकून राक्षसाच्या मनात त्याच्याबद्दल आदर निर्माण झाला. त्याला नमस्कार करून राक्षस म्हणाला– "राजकुमार, तुझ्यासारख्या सर्वोत्तम व धार्मिक प्रवृत्तीच्या माणसाची मी अनेक दिवस वाट पहात आहे. ही घे अद्‌भुत महिमाशाली मंत्रबद्ध जादूची तलवार! या तलवारीचं नाव चन्द्रहास." राक्षसाने हवेत हात फिरवला आणि आपल्या हातात आलेली तलवार कृष्णवर्मांला दिली. मग त्याने कृष्णवर्माला सांगितलं–"राजकुमार, ज्याच्या हातात ही जादूची तलवार असेल, त्याचा कधी ही पराजय होणार नाही. ही जादूची तलवार आणि अपार संपत्ति यांच्या साह्याने तू आपल्या प्रजेला सुखी कर."

एवढं सांगून राक्षस अदृश्य झाला. ज्योत्स्नाच्या हाती ती तलवार देण्यासाठी हात पुढे करीत कृष्णवर्मा म्हणाला– "ज्योत्स्ना, तुझी तिसरी परीक्षा ही संपली आता. तुझ्या वंशाच्या पूर्वजांचा अपूर्व ठेवा असलेली ही तलवार राहू दे तुझ्या हाती. घे ही!"

पण ज्योत्स्नाने तलवार आपल्या हातात घेतली नाही. गोड हसत ती कृष्णवर्माला म्हणाली–"हे पहा, परीक्षेत उत्तीर्ण होऊन जो पुरस्कार तुम्हाला मिळाला आहे, त्याच्यावर फक्त तुमचाच अधिकार आहे. त्या अधिकारावर मी का बरे आक्रमण करावे?"

कृष्णवर्मा पण संतोषपूर्वक हसला. दोघे ही राजधानीत परत आले. चन्द्रकान्त राजाने आपल्या मुलीच्या तोंडून सर्व हकीगत कौतुकाने ऐकली नि तो अत्यंत प्रसन्न झाला. लवकरच एका सुमुहूर्तावर ज्योत्स्ना नि कृष्णवर्मा यांचा विवाह-समारंभ मोठ्या थाटात साजरा झाला.





## श्रीजगन्नाथचा इतिहास

**त्या** रात्री संधि मिळताच ललिताने आपल्या वडिलांना सांगून टाकलं की आपल्या पतीची लेण्यांतील परमेश्वराला एकदा पाहण्याची इच्छा आहे.

विश्वावसूने अमळ रागाने मुलीकडे पाहिले, पण तो काही बोलला मात्र नाही.

ललिता थोडा वेळ काही बोलली नाही, मग म्हणाली–"पिताजी, मी आपली एकुलती एक मुलगी आहे ना! ज्या परमेश्वराची तुम्हीं पूजा करीत आहात, तुमच्या नंतर ती पूजा कोण करणार बरं? आपला जावई असल्यामुळे ती जबाबदारी विद्यापतीची नाही का? असं असेल तर माझ्या पतीला त्या परमेश्वराचं दर्शन घडवण्यात चूक काय आहे?"

विश्वावसूने विचारले–"मुली, तुझा नवरा आपल्या बरोबर या जंगलात कायमचा राहील असा तुला विश्वास वाटतो?"

"पिताजी, जर तुम्ही त्याला आपला मुलगा मानलंत आणि त्याच्यावर प्रेम केलंत तर तो इथं न राहता कोठे बरं जाईल?" ललिताने वडिलांना विचारलं.

मुलीच्या डोक्यावर प्रेमाने हात फिरवीत विश्वावसु म्हणाला–"असं बघ, विद्यापतीं इथल्या पेक्षा निराळं वातावरण, आचार-व्यवहार नि संस्कृतीत वाढला आहे हे तू जाणतेसच. ठीक आहे. तुझ्या संतोषासाठी मी तुझी ही इच्छा पूर्ण करीन."

परमेश्वराच्या पूजेची जबाबदारी दुसऱ्या कोणावर सोंपवण्याच्या वेळीच त्या लेण्याचा

रस्ता कुणाला दाखवणं शक्य होतं, तोपर्यंत तो गुप्त ठेवण्याचा एक नियम होता. या नियमाचं उल्लंघन करणं योग्य नाही म्हणून विश्वावसूने सांगितलं की विद्यापतीच्या डोळ्यांवर एक पट्टी बांधण्यात येईल. विद्यापतीने ही अट मान्य केली.

दुसऱ्या दिवशी नेहमी प्रमाणे विश्वावसु सूर्योदयापूर्वी एक तास आंथरुणातून उठला आणि तयार झाला. नंतर विद्यापतीच्या डोळ्यांवर एक काळी पट्टी बांधली आणि त्याचा उजवा हात पकडून त्याला रस्ता माहीत न होईल अशा रीतीने विश्वावसु लेण्याकडे जायला निघाला.

विद्यापतीने अगोदरच आपल्या डाव्या हाताच्या मुठीत थोडी मोहरी घेतली होती. ती रस्त्यात थोडी टाकत तो चालू लागला. अशा रीतीने लेण्याच्या रस्त्यावर विद्यापतीने सर्वत्र थोडी थोडी मोहरी विखरून टाकली.

एका ठिकाणी विश्वावसु थांबला. त्याने विद्यापतीला सांगितलं—"आपण लेण्यापाशी पोचलो आहोत आता. अमळ वाकून लेण्यात प्रवेश करायचा हं. चल." आत गेल्यावर विश्वावसूने विद्यापतीच्या डोळ्यांवरील पट्टी सोडून टाकली.

विद्यापतीने डोळे उघडून पाहिलं. चारी बाजूंना अंधारच अंधार! हळू हळू थोडं दिसू लागलं. अस्पष्ट! लेण्याच्या मध्यभागी एक दगडाचा चौथरा होता. त्यावर विद्यापतीची दृष्टि खिळली. विश्वावसूने त्या चौथऱ्यावर काही फुलं वाहिली.

एकदम त्या लेण्यात निळ्या रंगाचा प्रकाश पसरू लागला. थोड्याच वेळात बांसरी वाजवणाऱ्या श्रीकृष्णाची प्रतिमा विद्यापतीला तिथं दिसली. आनंद आणि आश्चर्याने विद्यापती भावविह्वल झाला. त्याच्या तोंडातून शब्द उमटला—"वाह्वा!"

विश्वावसूनें विद्यापतीच्या पाठीवर हात ठेवीत विचारलं—"काय झालं बेटा!"

आता विद्यापति शुद्धीवर आला, पण काही बोलला मात्र नाही. गप्पच राहिला.

विश्वावसूच्या लक्षात आलं की आपल्या भावोद्‌गाराचं कारण विद्यापती सांगू इच्छित नाही. म्हणून विश्वावसूने पुन्हा आपला प्रश्न विचारला. गुहेपर्यंत येताना विद्यापतीच्या डोळ्यावर जशी पट्टी बांधली होती, तरी विश्वावसूने पुन्हा पट्टी बांधली. पतीला पाहताच ललिताने विचारलं—"काय दिसलं तुम्हाला गुहेत?"

विद्यापति दु:खाने म्हणाला—"सर्वत्र अंधार पसरलेल्या गुहेत मला काय दिसणार? मी काहीच विशेष असं पाहिलं नाही."

गुहेत जे अलौकिक नि अद्‌भुत दृश्य त्याने पाहिलं होतं. त्या बाबत आपली पत्नी ललिता हिच्याशी बोलणं विद्यापतीला इष्ट वाटलं नाही. ते रहस्य आपल्या मनात साठवून ठेवणं ही त्याला मोठ्या कष्टाचं झालं. अशा विशेष परिस्थितीचा अनुभव अजून पर्यंत कधी त्याला आलेला नव्हता.

इन्द्रद्युम्न महाराजांनी दैवी प्रेरणेने भावी पिढ्यांच्या कल्याणासाठी एक महत्कार्य







अंगिकारलं आणि एक मोठी जबाबदारी माझ्या वर सोपविली. महाराजांच्या आज्ञे-वरून एक दैवी कार्य संपन्न करण्यासाठी मी स्वत: निघालो होतो, पण वाटेत थांबलो नि ललिताशी लग्न केले. म्हणून गुहेतील अनुभवाबाबत ललिताशी बोलण्याऐवजी सोपवलेले कार्य पूर्ण करणे अधिक महत्वाचे– विद्यापतीच्या मनात असे काही विचार आले.

हे रहस्य ललिताला न सांगितले, तर कदाचित् आपली समस्या लवकर सुटेल असे विद्यापतीला वाटले. विश्वावसु ज्या मूर्तीची पूजा करीत आहे ती श्रीकृष्णाची आहे हे विद्यापतीला समजलं. त्याने बेत केला की ही श्रीकृष्णाची मूर्ती घेऊन राजधानीला जायचं. लगेच त्याच्या मनात आणखी-ही एक विचार आला की ज्या विश्वावसूने आपणावर इतका विश्वास ठेवला, त्याच्याशी हीं प्रतारणा तर नाही ना होणार? असा दुष्टपणा करणं योग्य होईल का?

अशा रीतीने विद्यापति धर्म-अधर्म नि बरं-वाईट याबाबत बराच वेळ विचार करीत राहिला. एक विचार त्याच्या मनात असा ही आला की विश्वावसूने खरोखरीच त्याच्यावर विश्वास ठेवलाच नव्हता. अन्यथा गुहेपर्यंत जाण्यासाठी त्याच्या डोळ्यांवर पट्टी बांधण्यात आली नसती. असं असेल तर गुहेतून परमेश्वराची मूर्ति घेऊन जाण्यात अधर्म कसला?

याप्रमाणे दिवस भर विद्यापति विचार करीत राहिला. मनात तो थोडा सचिन्त ही होता. याच विचारांनी त्याला रात्री झोप ही येईना. पण केवळ विचार करीत राहून समस्या थोड्याच सुटतात?

विद्यापती मध्ये झालेला बदल पाहून ललिता उदास झाली. विद्यापतीच्या उदासीनतेचं कारण काय असावं याबाबत ती विचार करू लागली. त्याचं मन शहरातल्या सुख-सोयींकडे अधिक आकर्षित होत आहे का? आपल्याशी विवाह करून त्याला पश्चात्ताप तर झालेला नाही? खरी



गोष्ट जाणून घेण्यासाठी एक दिवशी ललिताने विद्यापतीला विचारलं–"नाथ, आपण का बरे असे दुःखी-कष्टी आहात?"

"शहरातील सुख-सोयी इथं नाहीत याचं मला जरा ही दुःख नाही. राजधानीत राहणाऱ्या आपल्या आई-वडिलांना सोडून मी इथं आलो. आता बरेच दिवस झाले. माझ्याबद्दल काही वार्ता न कळल्यामुळे ते काळजी करीत असतील. मुलगा या नात्याने माझे कर्तव्य नाही का की एकदा जाऊन आपल्या वृद्ध आई-वडिलांची खबर घ्यावी? तुला सोडून जाणं ही मला भावत नाही. बरं, तुला घेऊन गेलो तर तेथील सर्व लोक मोठ्या विचित्रपणे तुझ्याकडे पाहतील! आणि शिवाय तुझ्यावर एवढं प्रेम करणारे तुझे वडील तुझ्या विरहाने येथे सुखाने राहू शकतील का?" विद्यापतीने विचारले.

ललिता म्हणाली–"जोपर्यंत माझ्यावर तुमचं प्रेम आहे, तोपर्यंत मला कसली हीं काळजी नाही. लोक माझ्याविषयी काय म्हणतील–याची मला पर्वा नाही." थोडा वेळ गप्प राहून डोळे पुशीत ललिता सांगू लागली–"माझी तुमच्या बरोबर येण्याची खूप इच्छा आहे, पण आले तर वडिलांची देखरेख कोण करणार याचीच मला काळजी लागून राहिली आहे."

"तुला काळजी वाटणे साहजिकच आहे. वडिलांना असं एकटं सोडून तू माझ्या बरोबर येणं योग्य होणार नाही. म्हणून तू इथंच रहा. तू परवानगी दिलीस तर मी आपल्या आई-वडिलांची एकदा भेट घेऊ इच्छितो. मी लवकरच परत येईन याबाबत तुला शंका नको." विद्यापतीने आश्वासन दिले.

आपला उदास चेहरा वर करीत ललिताने विचारले–"खरंच? तुम्ही नक्की परत याल?"

"तुला टाकून मी एकटा कसा राहू शकेन?" विद्यापति म्हणाला. ललिताला आश्वासन मिळालं.



"असं असेल तर तुम्हीं जाऊ शकता. लवकर परत यायचं हं! माझ्या सासू-सासऱ्यांना आपण सांगा की त्यांचे आशीर्वाद प्राप्त करण्याच्या शुभ दिवसाची मी वाट पहात आहे." ललिताने विनवणी केली.

आपल्या पतीच्या इच्छेबाबत ललिताने वडिलांशी बोलणे केले. विश्वावसूने ही त्याला आपली संमति दिली.

विश्वावसूला विद्यापतीचे हे विचार योग्यच वाटले. जावयाच्या परतीच्या प्रवासासाठी एक छान घोडा सजविण्यात आला.

विश्वावसु आणि ललिता यांचा निरोप घेऊन विद्यापति घोड्यावर बसला नि राजधानीकडे निघाला. ललिताने साश्रु नयनांनी विद्यापतीला रवाना केले.

काही दिवसांपूर्वी गुहेकडे जाताना गुप्त रीतीने जी मोहरी विद्यापति रस्त्यात टाकत गेला, ती त्या त्या ठिकाणी आता उगवून आली होती. त्या खुणांच्या साह्याने लेण्याचा रस्ता विद्यापतीला स्वच्छ दिसला. आणि तो सहज त्या गुहेजवळ पोंचू शकला. गुहेच्या प्रवेश-द्वारी मोठमोठे दगड ठेवलेले होते.

विद्यापति घोड्यावरून खाली उतरला. अत्यंत सावधपणे त्याने गुहेत प्रवेश केला. मनातल्या मनात त्याने परमेश्वराशी क्षमा-याचना केली–"भगवन्, आपणावर संपूर्ण विश्वास ठेवून मला जे श्रेष्ठ वाटतं ते कर्तव्य मी करणार आहे. काही अपराध घडला तर आपणच मला क्षमा करायची! दुसरं कोण माझं संरक्षण करणार?" नंतर दगडी चौरंगावर ठेवलेली ती छोटी दगडी मूर्ति त्याने आपल्या हातात उचलली आणि आपल्या डोळ्यांनी तिला स्पर्श केला. मग ती मूर्ति आपल्या पिशवीत घालून तो गुहेच्या बाहेर आला, नि घोड्यावर स्वार झाला.

विद्यापतीला राजधानीचा रस्ता बरोबर माहीत नव्हता. तरी पण परमेश्वरावर विश्वास ठेवून त्याने घोड्याला टाच दिली. विद्यापतीला बरोबर घेऊन घोडा दौडू लागला.

(पुढील अंकांत समाप्त)



# चाणाक्षपणा

विजयपुरीच्या दरबारातला रामदेव, मोठा जादूगार होता. आणि त्याचबरोबर चाणाक्षही होता तो! एकदा राजाने राजघराण्यातील उंची वस्तूंच्या प्रदर्शनाचे आयोजन केले. सर्व जनतेलाही सर्व पहाण्याची संधि मिळाल्याचा आनन्द लुटता यावा अशी त्याची इच्छा होती. रामदेवही आपला मित्र हरीश याला घेऊन ते प्रदर्शन पहायला गेला.

तेथील पहारेकऱ्यांची नजर चुकवून हरीशने हळूच एक नवलाख हार आपल्या खिशात टाकला. पण हरीशच्या नजरेतून हा प्रकार सुटला नाही; तो ते पाहून मनात चांगलाच चरकला! चोरी उघडकीस आणावी तर प्रिय मित्र कैदेत जाणार! अशा ऐन मोक्यावर रामदेवची बुद्धि मोठ्या चाणाक्षपणे काम करी; त्याबद्दलच तो खूप प्रसिद्ध होता.

दरबारी जादूगार रामदेवने प्रदर्शन पहायला लोकांना आव्हान करून म्हटले—"भाईबंदांनो! मी आत्ता तुम्हाला एक जादू करून दाखवतो पहा. मी यातून एक नवलाख हार नाहीसा करून आपल्या मित्राच्या खिशातून बाहेर काढून दाखवतो!" इतके बोलून त्याने आपला हात हवेतून एकदा फिरवल्यासारखा केला आणि आपला दोस्त हरीश याच्या खिशातून हार बाहेर काढला! लोकांनीही चकित होऊन टाळ्या वाजवल्या.

दोस्त हरीशचे तर शरमेने पाणी-पाणी झाले! पण चाणाक्षपणाने रामदेवने ज्या खुबीने आपल्याला वाचवले, ते पाहून त्याने मनातल्या मनात रामदेवची खूप तारीफही केली.





# म्हाताऱ्याची हुशारी

खूप जुनी गोष्ट आहे. ग्रीस देशात एक म्हातारा-म्हातारी रहात असत. एके दिवशी म्हातारा आपल्या बायकोला म्हणाला—"अग, आज पैशांची फार गरज आहे. आपली गाय बाजारात विकून ये. मीच गेलो असतो, पण माझा पाय लचकला आहे, चालता नाही येणार मला."

गाय हाकत हाकत म्हातारी निघाली बाजाराकडे. रस्त्यात म्हातारीला तीन चोरांनी हेरले, गाय खूपच आवडली त्यांना! म्हातारी गाय विकायला चालली आहे हे ही ताडलं त्यांनी. आता ती गाय स्वस्तात कशी मिळवायची याबद्दल एक योजना बनवली चोरांनी.

त्यातला एकजण म्हातारीला गाठून म्हणाला—"आजी, ही बकरी विकायलाच चालवली आहे ना?"

"अरे वेडा कुठला! समोर गाय दिसते आहे, अन् बकरी म्हणतोस तिला?" त्याच्यावर रागावत म्हातारी म्हणाली.

चोराने डोळे चोळून चोळून साफ केल्यासारखं करून गायीकडे तीन-चारदा बारकाईने पाहिले; आणि पुन्हा म्हटले—"आजी, रामाची शप्पथ! मी खोटं नाही बोलत! ही तर बकरीच आहे. तीस रुपयाला द्यायची असली तर बघा, मीच घेईन विकत ही."

म्हातारी पुढे निघाली, तेव्हा पाळी पाळीने दुसऱ्या व तिसऱ्या चोरांनी ही तिला गाठले. गायीला बकरी म्हणून त्यांनी म्हातारीशी सौदा करायचा घाट घातला. म्हातारीचा आपल्यावरील विश्वास उडाला.

म्हातारीने अशा तऱ्हेने गाय बकरीच्या किमतीत विकून टाकली अन् घरी जाऊन

ग्रीसमधील लोककथा



म्हाताऱ्या नवऱ्यापुढे सगळा पाढा वाचला. विक्रीबद्दलच्या चोरांचं वर्णनही तिने अगदी बरोबर सांगितले, त्यावरून तीन्ही ठक आपल्या शेजारच्याच गावचे आहेत, हे म्हाताऱ्याने बरोबर ओळखले. म्हातारा बायकोला म्हणाला–"व्हायचं ते झालं, तू आता काळजी करू नकोस. पुढचं सगळं मी घेतो सांभाळून."

म्हातारा नंतर बाहेर गेला. एकाच प्रकारचे दिसणारे दोन ससे तो बाजारातून घेऊन आला. एक ससा त्याने घरात टोपल्याखाली झाकून ठेवला, आणि दुसरा ससा आणखी एका टोपल्यात घालून बरोबर घेऊन तो बाहेर पडला. जाताना बायकोला त्याने सांगितले–"अग, आज आपल्याकडे जेवायला पाहुणे येतील. पुरणाच्या पोळ्या, बदकाचं तळलेलं मांस आणि भजी असा स्वयंपाक तयार ठेव. घरी परत आल्याबरोबर मी तुला विचारीन कि आज स्वयंपाक काय काय केला आहेस? तेव्हा तू लगेच उत्तर दे, की सशाहाती तुम्ही निरोप दिल्याप्रमाणे सर्व तयार आहे." म्हातारीला नीट सर्व समजावून सांगून म्हातारा निघून गेला.

तो जेव्हा शेजारच्या गावी पोचला तेव्हा ते तिघेही चोर त्याला गुत्यात दिसले. तिघंही खूप पिऊन तर्र झालेले होते. म्हाताऱ्याला पाहून त्यांनी ओळखले आणि थट्टा करण्याच्या सुरात म्हणू लागले–"अरे म्हाताऱ्या, तुझ्या बायकोला गाय आणि बकरी यांच्यातला फरकही समजत नाही बरं का!"

"अरे काय करू मुलांनो! तिचं तर अलिकडे डोकंच फिरलंय जसं काही! हां, पण स्वयंपाक मात्र अजूनही झकास बनवते हं ती!" म्हातारा म्हणाला.

"चला, येवढं तरी चांगलं आहे ना!" एक चोर म्हणाला.

काहीतरी विचारात पडल्यासारखे करीत म्हातारा स्वतःशीच बोलू लागला–"आज काय बरं स्वयंपाक करायला कळवावं?....हां...भजी, पुरणाच्या पोळ्या अन् बदकाचं तळलेलं मांस वा! काय मजा येईल जेवायला!" नंतर टोपल्यातनं ससा बाहेर काढून तो त्याला म्हणाला–"हे बघ ससा, लवकर घरी जा, अन् मालकिणीला सांग की, आज पुरणपोळी, भजी आणि तळलेलं बदकाचं मांस तयार ठेव." सशाला असा निरोप सांगून म्हाताऱ्याने त्याला सोडून दिले.

बापरे! टणाटण उड्या मारत क्षणार्धात ससा तिथून नाहीसा झाला! ते पाहून चोर तर दचकलेच! एकाने म्हाताऱ्याला विचारले–"तो ससा काय खरोखरच तुझ्या घरी जाऊन म्हातारीला निरोप देईल?"

"हां, हां! देईल तर! इतकासा छोटा होता ना, तेव्हापासून माझ्या अंगाखांद्यावरच वाढला आहे तो! असली सगळी कामं तर तोच करतो ना रोजच्या रोज! आज तुम्ही तिघंही चला माझ्याबरोबर. आमच्याच घरी जेवा आज. म्हणजे कळेल तुम्हाला मी म्हणतो ते बरोबर आहे की नाही. मग तर बसेल विश्वास? चला तर!" म्हाताऱ्याने आग्रहच धरला.

तिघं चोरही निघाले खरं काय ते पहायला. खरं असेल तर चांगलं जेवायलाही मिळेल. घरी पोचल्या बरोबर म्हाताऱ्याने विचारले–"स्वयंपाक काय केला आहेस?"



"सशाच्या हाता जे जे करायला कळवलं होतं, ते सर्व बनवलंय मी!" म्हातारी उत्तरली.

म्हातारीने नंतर चारी जणांना जेवण वाढले. म्हातारा म्हटल्याप्रमाणेच सर्व पदार्थ तयार होते. चोर आपसात कुजबुजू लागले. नन्तर तो ससा आपल्याला विकावा, अशी ते म्हाताऱ्याला गळ घालू लागले.

"ए! माझा लाडका ससा मी का म्हणून विकीन? नाही रे बाबा, मी नाही विकणार त्याला!" म्हातारा म्हणाला.

यावर चोरांनी सशाची किंमत हजार रुपयांपर्यंत वाढवली. तरी म्हातारा

आपलंच म्हणणं धरून बसला. मग म्हातारी मधेच नवऱ्याला म्हणाली—"अहो, पहा, पोरांचं मन गेलंय सशावर. विकून टाका नं त्यांना! तुम्हालाही पैशाची अडचण आहे ना?"

आता म्हातारा चोरांना म्हणाला—"अरे आमची गाय जशी बकरी बनली, तसं सशाचं काही झालं तर?" चोर म्हणाले—"तसं काही होणार नाही बरं बाबा!"

इतकं बोलून झाल्यावर हजार रुपये घेऊन म्हाताऱ्याने टोपल्याखाली झाकलेला ससा त्यांना देऊन टाकला.

ससा घेऊन चोर निघाले आपल्या गावाकडे, वाटेत त्यांना वाटले की आपणही आपापल्या घरी निरोप पाठवून आपल्या बायकांना काय काय तयार ठेवावं, हे कळवू या. तिघांनीही सशाला आपले निरनिराळे बेत सांगितले अन् सोडून दिले त्याला. ससा एकदम अदृश्य झाला!

तिघंही आपापल्या घरी गेले तेव्हा त्यांना कळलं की, सशाने निरोप दिलाच नाही! मग तिघंही त्याच पावली पुन्हा म्हाताऱ्याकडे गेले. अन् लागले तणतणायला.

म्हाताऱ्याने त्यांना विचारले—"अरे, पण सशाला पाठवताना तुम्ही त्याला चांगलं कुरवाळलं होतं की नाही?"

चोरांनी नम्रा मान हलवत म्हटले—"नाही बाबा!"

"हां, मग नक्कीच सशाचं मूठभर हवेत रूपांतर झालं असलं पाहिजे बघा!" म्हातारा म्हणाला.

"काय? हवेत रूपान्तर? शुद्धीत आहेस न म्हाताऱ्या?" चोरांनी विचारले.

यावर हसत म्हातारा म्हणाला—"पहा बाबा पोरांनो, येवढी मोठी गाय बदलून बकरी झाली, तर सशाची हवा झाली असेल यात काय नवल?"

आता चोर समजून चुकले की म्हाताऱ्याने चांगला सूड घेतला आहे! अन् एवढंसं तोंड करून तिथून निघून गेले!





# नुकसान-भरपाई

सुरकुलवाडीत एक कोंडिबा नावाचा माणूस रहात असे. आपल्या परसात त्याने एक गुळवेल लावली. मोठ्या प्रेमाने तो तिची देखरेख करी. मधून मधून खत घाली, वेळे वर पाणी देई. वेल खूप परसली थोड्याच दिवसात. शेजारच्या घराच्या भिंतीवर ती वेल चढली.

शेजारी एक शेतकरी रहात असे. त्याचं नाव भीमल. तो चांगला लठ्ठ आणि श्रीमंत होता. भीमलची बकरी भिंतीवर चढली नि तिने गुळवेलीची काही पाने खाल्ली. योगायोगाने कोंडिबाने ते पाहिले. त्याने दगड फेकला नि बकरीला हुसकाऊन लावलं. भीमलकडे जाऊन याबाबत तक्रार ही केली. आणि वर त्याला सुचवलं की त्याने आपल्या बकरीला घरात एखाद्या खुंट्याला बांधून ठेवावं, नाहीतर जंगलात चरायला पाठवावं.

भीमलला कोंडिबाचा राग आला, पण तो काही बोलला नाही. यानंतर ही तीन-चार वेळा बकरी आली, कोंडिबाने सबूरीनं तिला हाकलून दिलं.

एक दिवशी सकाळी भीमलची बकरी आली आणि तिने सारी गुळवेल फस्त केली. हे पाहून कोंडिबाला अनावर राग आला. त्याने उचलली कुऱ्हाड आणि फेकली बकरीच्या दिशेने. कुऱ्हाड बकरीच्या डोक्यावर पडली, आणि ती तिथेच व्याकुळ होऊन मेलेली पाहून कोंडिबाला फार दुःख झालं!

भीमलला आपली बकरी मेल्याची वार्ता समजली. तो लगेच कोंडिबाच्या घरी आला. मिशांवर ताव देत म्हणाला—"तुला माहीत आहे माझी बकरी चांगल्या जातीची होती. शंभर रुपये मोजून मी तिला खरेदी केलं होतं. आता माझी नुकसान-भरपाई कर."

रंगराव कुलकर्णी



कोंडिबा दहा रुपये नुकसान-भरपाई द्यायला तयार होता. फार तर बकरीच्या बदली बकरी द्यायला त्याची हरकत नव्हती. पण भीमल आपलीच मागणी धरून बसला. त्याला शंभर रुपये नुकसान-भरपाई पाहिजे होती.

कोंडिबाला भीमलचा खूप राग आला. त्याने साफ सांगून टाकलं–"असशील मोठा मान्यवर शेतकरी! मला नाही त्याची परवा! दहा रुपयांहून जास्त एक फुटकी कवडी देणार नाही मी तुला. काय करायचंय ते कर."

भीमल तडक गावच्या जमीनदाराकडे गेला. कोंडिबाच्या कुऱ्हाडीने कशी त्याची बकरी मेली हे त्याने सांगितले. आणि विनंती केली की त्याला शंभर रुपये नुकसान-भरपाई मिळवून द्यावी.

सुरकुलवाडीचा जमीनदार होता शंकेखोर. कोणाचा दोष आहे नि कोण निर्दोष आहे हे ताबडतोब त्याच्या लक्षात येत नसे. कोणी त्याच्याकडे येऊन काही सांगू लागला की त्याला ते सगळं खरं वाटायचं. एवढ्या-तेवढ्या गोष्टीला तो घाबरून असे.

भीमलची तक्रार ऐकून जमीनदाराने कोंडिबाला आपल्याकडे बोलवून घेतले.

कोंडिबा म्हणाला–"मी काही जाणून-बुजून बकरीला मारलं नाही. माझी सगळी गुळवेल तिने खाऊन टाकली म्हणून मी तिच्यावर कुऱ्हाड फेकली. ती नेमकी तिच्या डोक्यावर पडली नि मेली बिचारी!"

"चूक तुझी आहे न? मग आता नुकसान-भरपाई कर." जमीनदाराने न्याय दिला.

कोंडिबा म्हणाला–"माझी काय बरं चूक झाली? मी गुळवेल लावली नसती, तर बकरी आली नसती, नि अशा रीतीने ती मेली नसती. जे काही घडलं त्याचं कारण आहे ही सिची गुळवेल!"

"बरोबर आहे तुझं म्हणणं! तू ही वेल लावलीसच का?" जमीनदाराने विचारले.



कोंडिबाने थोडा विचार केला. आणि मग म्हणाला–"समोरच्या घरात राहणारा केसर एकदा माझ्याकडे आला. आणि त्याने मला गुळवेलीचं बी दिलं. मग मी ते माझ्या परसात लावलं. आपणच सांगा माझी काय बरं चूक आहे यात?"

आता जमीनदाराला वाटलं की खरा दोषी आहे केसर. त्याने केसरला बोलवलं.

भीतीने केसर थर थर कापू लागला.

"मला समजलं की तू कोंडिबाला गुळवेलीचं बी दिलंस! खरं खरं सांग तू दिलंस की नाही बी?" जमीनदाराने दरडावून केसरला विचारले.

केसरने कबूल केलं. तो म्हणाला–"ही गोष्ट तर खरी आहे. मी दिलं बी."

"मग बघ, तु त्याला बी दिलंस. त्याने ते आपल्या परसात लावलं. वेल भिंतीवर पसरली आणि भीमलच्या बकरीने ती खाल्ली. कोंडिबाने तिच्यावर कुऱ्हाड फेकली नि बिचारी बकरी मेली. तू जर बी दिलं नसतंस, तर हे सगळं घडलं नसतं. चूक तुझी आहे. आहे की नाही?" जमीनदाराने केसरला विचारलं.

हे सर्व ऐकून केसर चांगलाच घाबरला. जरा सावरून म्हणाला–"हुजूर, मला तर यात माझा जरा सुद्धा दोष दिसत नाही. सगळा दोष त्या धनेश्वरचा आहे!"



"धनेश्वर? तो कोण?" जमीनदाराने विचारले.

केसरने सांगितलं–"तो आहे या गावा-तला एक छोटा वैद्य. एकदा माझ्या अंगाला खाज सुटली, म्हणून मी धनेश्वरकडे गेलो. मला भूक ही लागत नसे. त्याने मला गुळवेलीचं बी दिलं आणि सांगितलं की तू गुळवेलीचं सत्त्व खाल्लंस तर तुझी तब्येत छान सुधारेल. त्या बीपैकी काही मी कोंडिबाला दिलं. मला वाटलं, त्याला ही गुळवेलीच्या सत्वाचा उपयोग होईल. यात मी काय बरं अपराध केला? तेव्हां या सगळ्याचं मूळ आहे धनेश्वर!"



केसरचं म्हणणं जमीनदाराला पटलं. त्याने लगेच धनेश्वरला बोलवून घेतलं. जमीनदार कसा एक नंबरचा लहरी आहे हे धनेश्वरला चांगलं माहीत होतं. तो धावत-पळत जमीनदाराकडे येऊन हजर झाला.

धनेश्वरला पाहताच जमीनदाराने त्याला धमकी दिली–"का रे धनेश्वर, हे तू काय केलंस? केसर तुझ्याकडे आला तर त्याला औषध द्यायचं टाकून तू गुळवेलीचं बी का दिलंस? गुळवेल परसांत लावून तिचं सत्त्व तू त्याला का खायला सांगितलंस?"

धनेश्वरच्या लक्षात येईना की त्याने केलं त्यात बिघडलं काय? त्याने जमीनदाराला विचारलं–"मग यात कुणाचं काय नुकसान केलं मी हुजूर?"

"नुकसान अवश्य झालं. असं बघ, तू केसरला जे बी दिलंस त्यांतल काही त्याने कोंडिबाला दिलं. कोंडिबाने हे बी परसात लावलं, एक वेल उगवली. ती चांगली वाढली-पसरली. भीमलच्या बकरीने ही वेल खाऊन टाकली. कोंडिबाने रागाच्या भरात बकरी वर कुऱ्हाड फेकली, ती जमिनीवर पडली नि तडफडून मेली. भीमलचं म्हणणं असं आहे की त्याने शंभर रुपये खर्चून ही बकरी खेडच्या बाजारातून आणली होती. आता भीमलला नुकसान-भरपाई कोण देणार? तू जर केसरला ते बी दिलं नसतंस तर हे सगळं घडलं नसतं. मग दोषी तूच नाहीस का?" जमीनदाराने विचारलं.

हे सगळं ऐकून धनेश्वरला आपल्यावर वज्र-पात झाल्यासारखं वाटलं. यात सारा अपराध भीमलचाच होता. त्याने आपल्या बकरीला खुंटाला बांधून ठेवलं असतं तर हे सगळं न घडतं! स्वतः अपराध करून हा भीमल नुकसान-भरपाई मिळवण्याच्या प्रयत्नात आहे. जमीनदार कसा लहरी माणूस आहे हे कोंडिबा नि केसर यांना चांगलं माहीत होतं. म्हणून शिताफीने धनेश्वरला दोषी ठरवण्याच्या प्रयत्नात होते. धनेश्वरला एक नामी युक्ति सुचली.

धनेश्वरने जमीनदाराला समजाऊन सांगितलं–"हुजूर, काही साधारण औषध दिलं तर आजार बरा होतो. पण गुळवेलीचं सत्त्व हे असं रामबाण औषध आहे की त्याने अनेक रोग समूळ नाहिसे होतात. केसरला कायम उपयोगी पडेल अशी गुळवेल घरच्या घरी असावी असा विचार करून मी त्याला ते बी दिलं. गुळवेलीचा केवळ त्यालाच नाही अनेकांना उपयोग होईल असा मी विचार करून वैद्य म्हणून माझं कर्तव्य पार पाडलं. मी या गावात वैद्य बनून येऊन राहिलो, त्यामुळे हा सर्व अनर्थ घडला. अन्यथा भीमलचं हे नुकसान झालं नसतं! जे काही झालं त्याचं मला दुःख आहे. पण याला माझा नाइलाज आहे."

जमीनदार पुन्हा मोठ्या विचारात पडला. धनेश्वर जे काही सांगत होता ते जमीनदाराला पटलं. मग त्याने धनेश्वरला विचारलं–"ठीक आहे. मग तुला वैद्य बनून या गावात का बरं रहावं लागलं?"

यावर धनेश्वर म्हणाला–"हुजूर, आपण अगदी योग्य प्रश्न विचारलात मला! यात माझ्या बिचाऱ्याचा काहीच दोष नाही. मी आपल्या गुरूकडे वैद्यकी शिकत होतो. एकदा आपले पिताश्री श्री. जगन्नाथजी माझ्या गुरूकडे आले नि म्हणाले–'सध्या सुरकुलवाडीत एक ही वैद्य राहिला नाही.



लोकांची यामुळे फारच गैरसोय होत आहे!' त्यावेळी भीमलचे वडील बरेच आजारी होते. आपले वडील नि भीमलचे वडील हे चांगले दोस्त होते. हे आस-पासच्या गावातील सर्वांना चांगलं माहीत आहे. आपण स्वतः ही हे जाणताच नाही का?"

"हो हो, अवश्य! त्यांच्या दोस्तीच्या गोष्टी आज ही लोक सांगत असतात." जमीनदार आनंदाने म्हणाला.

"हुजूर, ती मैत्री आपण विसरला नाहीत! आपली स्मरण-शक्ति फार चांगली आहे!" धनेश्वरने जमीनदाची तोंड भरून स्तुति करायला सुरुवात केली.

जमीनदाराला खूप आनन्द झाला. पण त्याने धनेश्वरला विचारलं–"हे सगळं सोडून मूळ मुद्यावर तर येशील?"

"होय, तेच तर मला आपल्याला सांगायचंय! आपल्या वडिलांची अडचण माझ्या गुरुजींनी जाणली आणि रोग्यांची सेवा करण्यासाठी मला दिलं इथं पाठवून नि काय! तुमच्या पिताजींची विनंती आणि भीमलच्या पिताजींचा आजार या दोन कारणांमुळे मला असं इथं येऊन रहावं लागलं. म्हणून नुकसान-भरपाई त्या दोघांनी द्यावी हेच न्यायाचं होईल." धनेश्वर मूळ मुद्यावर आला.

धनेश्वर वैद्याचं म्हणणं जमीनदाराला योग्यच वाटलं. म्हणून जमीनदाराने असा निष्कर्ष काढला की खरे अपराधी आहेत त्याचे वडील नि भीमलचे वडील! मग जमीनदार वैद्याला म्हणाला–"हे बघ धनेश्वर आता मला वस्तु-स्थितीची कल्पना आली. खऱ्या पुढे खोटं टिकूच शकत नाही असं म्हणतात ते खरं! तेच इथं सिद्ध झालं. जे घडलं त्यात तुझा दोष काहीच नाही. माझ्या नि भीमलच्या वडिलांचाच खरं म्हणजे संपूर्ण दोष आहे. पण त्यांच्या-पैकी कोणी आता जिवन्त नाही. त्यांच्या-कडून भरपाई कशी वसूल करता येणार?"

धनेश्वरच्या आतां कोठं जिवात जीव आला. तो जमीनदाराला म्हणाला–"हुजूर, आपण ही आपल्या वडिलांप्रमाणे फार हुशार आहात खरोखर! मेलेले लोक नुकसान-भरपाई कशी करणार?"

यावर जमीनदार भीमल वर चांगलाच गरजला–"जे काही घडलं त्याचं मूळ कारण तूच! शेळ्या-मेंढ्या पाळण्याची तुझी योग्यता नाही खरं म्हणजे. इथून पुढे हे काम सोडून दे झालं! नाही तर तुला या गावातच मी राहू देणार नाही समजलं?"

हा निर्णय ऐकून सगळे खुश झाले. भीमलला मात्र फार दुःख झालं. नुकसान-भरपाई न होताच हे सगळं प्रकरण अशा रीतीने संपलं.





## अद्भुत फुले

मलेशियात सीताफळासारखी दिसणारी एक विचित्र जातीची झाडे आहेत. त्यांना इतर झाडांप्रमाणे फांद्यांवर फुलं येत नाहीत, झाडाच्या बुंध्याला आणि त्यांपासून निघणाऱ्या फांद्यांच्या मुळाशी फुले येतात.

## अतिशय खारट पाणी



जगातील अतिशय खारट पाण्याचं सरोवर आहे जिबोटीचं 'लेक अस्साल'! याचं पाणी समुद्राच्या पाण्याच्या दसपट खारट आहे. म्हणून या पाण्यात मासे जिवंत रहात नाहीत. हा तलाव समुद्र सपाटीहून ५१० फुट खाली आहे. संपूर्ण आफ्रिका खंडात हाच एक तलाव समुद्र सपाटीच्या खाली आहे. आणि जगांतील या प्रकारच्या तलावात हा तिसऱ्या नंबरचा आहे.

## विशाल वारुळे



ऑस्ट्रेलियातील पांढऱ्या मुंग्या मोठ-मोठी वारुळे बनवतात. ही वारुळे २० फुट उंच नि १०० फुट रुंद असतात.

# काश्मीरची समस्या: खरं काय नि खोटं काय?



आपल्या पुराणात असा उल्लेख आहे की कश्यप मुनीच्या नावावरून 'काश्मीर' हे नाव झालं.

प्राचीन भारतात अनेक छोटी छोटी राज्ये होती. या राज्यांवर अनेक लहान-मोठे राजे राज्य करीत. निरनिराळी राज्ये

असली तरी ती सर्व भारताचे अभिन्न अंग समजली जात.

भारताच्या स्वातंत्र्य-संग्रामाच्या शेवटी महंमद अली जिन्ना यांच्या नेतृत्वाखाली 'मुस्लीम लीग' ने मुसलमानांच्या संपूर्ण स्वायत्त राष्ट्राची मागणी केली. लोकांना हे माहीत नाही की आमच्या देशाचे पालक ब्रिटिश सरकारने जिन्नांना भडकवलं होतं. त्यांनी देशाच्या फाळणीबाबत हट्ट धरला. त्या काळी अनेक मुसलमान पुढाऱ्यांचा सुद्धा असा विचार होता की धर्माच्या आधारा वर देशाची फाळणी करणं योग्य नाही. तरी पण जिन्नांच्या आग्रहास्तव पाकिस्तान भारतापासून अलग झाला.

त्या काळी जम्मू-काश्मीर वर महाराजा सर हरिसिंह यांचे राज्य होते. ते असे दुविधेत पडले की आपण कोणाच्या बाजूला जावे? याच वेळी पाकिस्तानने काही पहाडी लोकांना काश्मीर वर आक्रमण करण्यासाठी भडकावलं. काश्मीरची अधिकतर जनता मुस्लिम होती नि शेख अब्दुल्ला त्यांचे पुढारी होते. शेख अब्दुल्लांच्या सल्ल्याने महाराजा हरिसिंहांनी भारताशी निगडित राहण्याचा निर्णय घेतला. यानंतर भारत सरकारने आपली सेना पाठवून आक्रामकांना पळवून लावले. पण तोपर्यंत आक्रामकांनी काश्मीरचा काही भूभाग आपल्या अधिकाराखाली आणलेला होता. नुकताच स्वतंत्र झालेला भारत शांतिप्रिय देश होता, म्हणून हल्लेखोरांना पळवून लावण्यासाठी युद्ध करून रक्ताच्या नद्या वाहवण्याची त्याची इच्छा नव्हती. म्हणून भारताने याबाबतीत संयुक्त राष्ट्र-संघाच्या सुरक्षा परिषदेकडे न्यायाची मागणी केली.

या आक्रांत प्रदेशाचं पाकिस्तानने नाव ठेवलं 'आजाद काश्मीर'! येथील बहुसंख्य जनता अशिक्षित व गरीब होती.

एक गोष्ट स्पष्ट झाली की धर्माच्या आधारा वर देशाची वाटणी करणं निरर्थक आहे. 'बंगला देश'ची जनता पण मुसलमानच आहे. तरी पण तो देश पाकिस्तानपासून अलग झाला. पाकिस्तानशी तुलना केली तर आपल्या देशातच मुसलमान अधिक आहेत. पण या वस्तुस्थितीकडे अनेकांचं लक्षच जात नाही. बरेच लोक आज काश्मीरी जनतेच्या मनात नसल्या आशा निर्माण करीत आहेत. लोकांचे अपहरण आणि कत्तल करणाऱ्या आतंकवादी व विभाजनधार्जिण्या लोकांना प्रशिक्षण देऊन राज्यात अशांतता माजवीत आहेत. उपद्रवी लोकांच्या या सर्व कारवाया आहेत.

यामुळे आज काश्मीरला अनेक समस्या व संकटांशी सामना द्यावा लागत आहे.



# दोन भाऊ

सुमपुरी राज्यावर कीर्तिसेन नावाचा राजा राज्य करीत असे. तो मोठा शूर व पराक्रमी होता, आणि तरी सुद्धा फार शांतिप्रिय होता. त्याच्या राज्यात जनता सुखाने नांदत असे. कीर्तिसेनच्या पत्नीचं नाव होतं प्रियंवदा. अजून पर्यंत आई बनण्याचं तिच्या भाग्यात नव्हतं. पुष्कळ व्रत-वैकल्ये तिने केली. पण कशाचा काही परिणाम झाला नाही. मूल-बाळ नसल्यामुळे ती नेहमी दु:खी - कष्टी असे.

शेवटी राणी प्रियंवदेने राजाला समजावलं आणि दुसरं लग्न करायला भाग पाडलं. स्वयंप्रभा नावाच्या एका राजकुमारीशी राजा कीर्तिसेनने लग्न केले. काही दिवस गेले नि स्वयंप्रभा माता झाली. तिला एक मुलगा झाला. राजाला फार आनन्द झाला. त्याने राजकुमाराचं नाव ठेवलं विजय. काही दिवसांनंतर मोठी राणी प्रियंवदाला ही दिवस राहिले. तिला ही एक मुलगा झाला. त्या मुलाचं नाव ठेवलं आदित्य.

काल-चक्र चालत राहिलं. विजय नि आदित्य मोठे झाले. गुरुकुलात राहून दोघे भाऊ विद्याध्ययन करू लागले. दोघांनी सर्व विद्या शिकून घेतल्या. विशेषत: क्षत्रियोचित क्षात्र-विद्यात दोघे ही खूप तरबेज झाले. गुरुकुलांतील त्यांचे विद्याध्ययन संपले. गुरुजींचे आशीर्वाद ग्रहण करून दोघे भाऊ गुरुकुलांतून निघाले आणि राजधानीत पोचले. दोन्ही मुलांना भेटून राजा कीर्तिसेनला खूप आनन्द झाला. अनेक विद्या व कलात राजकुमारांची गति पाहून राजा अत्यन्त प्रसन्न झाला.

राजा कीर्तिसेन आता वृद्ध झाला होता. राजापुढे एक समस्या उभी राहिली. दोन

नारायण भावे



राजकुमारांपैकी कुणाला आपल्या गादीवर बसवावं? मोठ्या राणीच्या मुलाला राजा बनवणं ही राज-परिवाराची परंपरा होती. पण मोठ्या राणीचा मुलगा आदित्य विजय पेक्षा वयाने लहान होता.

ही समस्या कशी सोडवावी हे राजा कीर्तिसेनला समजेना. त्याच सुमारास हिमगिरि राज्याचा राजा सहस्राक्ष सुमपुरीवर आक्रमण करण्याच्या तयारीत होता. सहस्राक्ष मोठा बलशाली होता, कीर्तिसेन वृद्ध होता, युद्ध करण्याची ताकत त्याच्यात नव्हती. कीर्तिसेनचे दोघे ही मुलगे शूर-वीर होते, पण अजून लहान होते. म्हणून आपल्या मुलांना युद्धावर पाठवावं की नाही याबाबत कीर्तिसेन विचार करू लागला.

त्या दिवशी संध्याकाळी राजा कीर्तिसेन युद्धाबाबत राजकुमारांशी बोलणी करीत होता. इतक्यात एका द्वारपालाने येऊन राजाला खबर दिली—"महाराज, आपणास भेटण्यासाठी मंत्रपाल नावाचा एक पंडित आला आहे!"

मंत्रपालाला आत घेऊन येण्याबाबत राजाने द्वारपालाला आदेश दिला. थोड्याच वेळात मंत्रपाल तेथे येऊन पोचला. त्याने दोन्ही राजकुमारां कडे पाहिलं नि म्हणाला—"विजयी भव!"

राजा कीर्तिसेनने मंत्रपालाच्या धीरोदात्त चेहऱ्याकडे एकदा पाहिलं आणि म्हटलं—"पंडितजी, बलशाली शत्रूशी सामना करण्याची वेळ आलेली आहे. आपल्या या आशीर्वादाने माझे धैर्य अमळ वाढत आहे!"

मंत्रपालाचा चेहरा अधिक गंभीर झाला.

मंत्रपालाने राजाला आश्वासन दिले—"महाराज, शक्तिरूपिणी नावाचा एक मंत्र मला माहीत आहे. या मंत्राच्या साह्याने एका माणसांतील शक्ति दुसऱ्या माणसात संचारित करता येते. असं केलं तर दुसरा माणूस प्रचंड शक्तिशाली बनतो. अर्थात् हे काम करण्यासाठी शक्ति देणाऱ्याची तयारी असायला हवी. तसेच या दोन माणसात



रक्ताचं नातं असलं पाहिजे. काम झाल्यावर दुसऱ्या माणसात संचारलेली शक्ति पुन्हा पाहिल्यात आणता येते. या मंत्राच्या साह्याने आपणास या युद्धात जय मिळविता येईल.

यावर कीर्तिसेन मंत्रपालाला म्हणाला—"पंडितजी, आपल्या मनात जे काही आहे ते अधिक स्पष्टपणे सांगू शकाल?"

गोड हसून मंत्रपाल म्हणाला—"महाराज, क्षात्र धर्मानुसार आपल्या दोन्ही राजकुमारांनी सहस्राक्षाशी युद्ध करणं योग्य नव्हे ना? म्हणून कोणी तरी एकच शत्रुशी लढेल. सहस्राक्ष तर मोठा शक्तिशाली आहे. तेव्हां मी असा विचार करतो आहे की एकाच राजकुमारात दोघांची शक्ति एकवटावी. माझ्या मंत्राच्या मदतीने हे काम करता येईल. शत्रूशी सामना करील एकच राजकुमार, पण त्याच्यात दोन्ही राजकुमारांची शक्ति असेल. यामुळे युद्धात आपणास जय निश्चित मिळेल. तसेच आपल्या मुलाचं खूप नाव होईल. आपल्या राज्याची प्रतिष्ठा वाढेल सर्वत्र!"

यावर राजा कीर्तिसेन म्हणाला—"पंडितजी, तुमचा विचार तर छान आहे! तसंच करू या."

पण असं करायला आदित्य मात्र तयार नव्हता. तो म्हणाला—"असं केलं तर दगा-



फटका केल्यासारखं होईल. अशा रीतीने छळकपट करून शत्रु वर विजय मिळवणं खऱ्या शूराला शोभत नाही. विजयची शक्ति घेऊन सहस्राक्षावर जय मिळवणं मला पसंत नाही. असं करून जे नाव मिळेल, त्यात मला आनंद नाही मिळणार!" हे सांगत असताना आदित्यच्या स्वरात संपूर्ण उत्साह व धैर्य यांचं प्रदर्शन होत होतं.

"आदित्य, संकट-काळी युक्तीने काम करण्यात वाईट काय बरे? यात दगा-फटका कसला? आपण जे काही करणार आहोत, ते युक्तीचं काम आहे! राजा-महाराजात राजनीति असलीच पाहिजे.



राज्याचं संरक्षण करणं आपलं कर्तव्य नाही का? ती आपली जबाबदारी पार पाडण्यासाठी आपण जे काही करू, तो आहे राजधर्म!" विजयने शांतपणे आपला विचार सांगितला.

राजा कीर्तिसनने आपल्या मोठ्या मुलाला विचारलं–"विजय, जर तुझ्या धाकट्या भावाने आपली शक्ति तुला दिली, तर तू शत्रू बरोबर लढाई करायला तयार आहेस ना?"

विजयने याला मान्यता दिली. तेव्हा आदित्य म्हणाला–"शूर वीर लढाईत प्राण गमवील, पण आपली शक्ति दुसऱ्याला द्यायला कधी तयार नाही होणार!"

यासाठी काही तरी दुसरा उपाय शोधून काढला पाहिजे असं आदित्यने सुचवलं. मंत्रपालाने मधेच पडून सूचना केली–"राजकुमारांनो, वादविवाद करीत बसण्याची ही वेळ नव्हे. तुम्हा दोघांपैकी एकाने आपली शक्ति वडिलांना दिली, तर राजा स्वतः शत्रूशी युद्ध करील."

विजयने हे ही मान्य केले. पण आदित्यला हे पसंत नव्हते. शेवटी त्याने विजयला आपली शक्ति देणे कबूल केले, पण असे करण्यापूर्वी मंत्रपालाशी एकांतात काही बोलण्याची इच्छा प्रकट केली.

मंत्रपाल नि आदित्य यांनी एकांतात बोलणी केली. मग मंत्रपालाने आपल्या मंत्राच्या मदतीने आदित्याची शक्ति विजयच्या शरीरात संचारित केली. आता दुप्पट शक्तिशाली विजय सहस्राक्षाशी युद्ध करायला निघाला. युद्धात विजयने सहस्राक्षाचा पराभव केला. विजयने या युद्धात जो पराक्रम गाजवला, त्याची सर्वांनी तोंड भरून स्तुति केली.

युद्धात यशस्वी होऊन विजय परत आला. राजाने मंत्रपालाला निरोप पाठवला की आदित्याची शक्ति त्याला पुन्हा परत देण्याची उपाय-योजना करावी. पण मंत्रपाल कुठे गेला याचाच मुळि पत्ता लागेना!



कीर्तिसेनने बराच गंभीर विचार केला नि आदित्याला राज्याभिषेक करण्याचा निर्णय घेतला. हा निर्णय समजल्यावर विजय वडिलांना म्हणाला–"पिताजी, मी एकटा शत्रूशी लढलो आणि विजय संपादन केला! आणि आता आपण राजा मात्र आदित्यला बनविणार आहात, हे मी कसं बरं मान्य करू? आदित्य शक्तिहीन नि दुबळा आहे हे आपण विसरत आहात. तरी पण आपण त्यालाच राजा बनवू इच्छित असाल, तर आम्हा दोघात द्वंद्व-युद्ध होऊ द्या. ज्याचा जय होईल त्याला राजा बनविले जावे! हेच न्यायोचित नाही का?"

विजय नि आदित्य हातात तलवारी घेऊन द्वंद्व-युद्ध लढले. या लढाईत आदित्य शक्तिहीन मुळिच वाटला नाही. अशा चलाखीने त्याने तलवार चालवली की विजयच्या हातातील तलवार हवेत उडून गेली. काही क्षणातच आदित्यने विजयला पराभूत करून टाकले. विजयला याचं फारच आश्चर्य वाटलं. शक्तिहीन आदित्यात एवढी शक्ति कुठून आली हे त्याला समजेना. निरुपायाने विजयने आपला पराभव कबूल केला आणि आदित्याने राजा व्हावे याला आपली स्वीकृति दिली.

आदित्याचा राज्याभिषेक झाला नि तो सुमपुरीचा राजा बनला.



राज्याभिषेक झाल्यानंतर एक दिवशी धाकट्या राणीने राजाला विचारले–"महाराज, आपण माझा पुत्र विजय याचा अधिकार डावलून आदित्यला राजा बनवलं म्हणून मी जरा ही असंतुष्ट नाही. माझ्या मनात ईर्ष्या आहे असा गैरसमज करून घेऊ नका. केवळ कुतूहल म्हणून विचारते. शत्रु सहस्राक्षाचा पराभव करून आपल्या राज्याचं संरक्षण करण्यासाठी आपली शक्ति विजयला देण्याचे आदित्याने सहजासहजी कबूल केले असं समजू नका. माझा मुलगा तर प्रत्येक वेळी प्रत्येक गोष्टीला संमति देत गेला. शक्तिरूपिणी मंत्रांच्या साह्याने मंत्रपालाने आदित्याची शक्ति तर

विजयला दिली, तरी सुद्धा आदित्यात आता इतकी ताकत कोठून आली? द्वंद्व-युद्धात त्याने विजयचा पराभव कसा केला? या प्रश्नांची उत्तरं मला तर सापडत नाहीत. याच्यामागे काय रहस्य आहे, हे आपण मला सांगू शकाल प्रभु?"

यावर कीर्तिसेनने मंद-स्मित केले. धाकट्या राणीचे समाधान करीत राजाने निवेदन केले–"जो खरा वीर असेल, त्याने आपल्या स्वतःच्या ताकतीवरच भिस्त ठेवली पाहिजे. मंत्र-तंत्राने मिळणाऱ्या शक्तिवर अवलंबून राहणे योग्य. नव्हे. कारण मंत्र-विद्या जाणणारा महात्मा नेहमीच आपल्या मदतीला कसा धाऊन येईल? म्हणूनच आदित्य म्हणाला होता की शत्रुशी लढण्यासाठी दुसरा काही मार्ग शोधला पाहिजे. शेवटी आपला मोठा भाऊ विजय याला आपली शक्ति द्यायला तो जेव्हा तयार झाला, तेव्हा त्याने मोठ्या विचार-पूर्वक काम केले. म्हणूनच त्याने मंत्रपालाशी एकांतात काही समलत करण्याची इच्छा प्रकट केली." अशा प्रकारे राजा आणखी काही सांगणार, एवढ्यात स्वयंप्रभेने मध्येच प्रश्न विचारून राजाला थांबवले.

राजाचं संपूर्ण निवेदन न ऐकताच स्वयंप्रभेने विचारलं–"मंत्रपालाचं पुढं काय झालं? आदित्याने मंत्रपालाशी एकांतात काय बरे बोलणे केले असावे?"

आपलं निवेदन पूर्ण करीत कीर्तिसेन म्हणाला–"आदित्याच्या मनात अगोदरच शंका होती की विजयला जेव्हा युद्धात जय मिळेल, तेव्हा त्याची बुद्धि भ्रष्ट होईल. म्हणून मंत्रपालाला एकांतात भेटून युद्धा-नंतर आपली शक्ति परत मिळविण्याचा मंत्र त्याने जाणून घेतला असावा. हे जर विजयला समजलं तर तो मंत्रपालावर सूड उगवेल, कदाचित तो त्याची हत्या ही करील. याच भीतीने मंत्रपाल घाबरून आपलं राज्य सोडून अन्यत्र निघून गेलेला असावा."

राजाचं हे निवेदन ऐकून स्वयंप्रभा हतप्रभ झाली आणि इथंच आपली गोष्ट ही संपली.






# डाकू युवराज

[९]

[पूर्वकथा–सत्यसेनच्या आजाराचा फायदा घेऊन वीरसिंहने अमृतपुरीवर हल्ला करायचे कारस्थान रचले. ती बातमी कळल्यावर सत्यसेनने त्याच्याशी तहाची बोलणी करावी असे आपल्या मन्त्र्याला सुचवले. पण वीरसिंहच्या नावा जेव्हा नदी ओलांडण्या साठी पाण्यात सोडल्या गेल्या, तेव्हा अचानक नदीला पूर आला आणि त्यात त्याचे सैन्य वाहून गेले.]

या 'आस्मानी सुलतानी' मुळे वीरसिंह तर अवाक् झाला. आणि नदी किनाऱ्यावर एकाद्या पुतळ्यासारखा उभाच राहिला! भीती व दहशतीमुळे नवा सेनापति कपाळ-कंठ थरथर कापू लागला! त्याची बोबडी वळून गेली! त्यांचे जे सैनिक आपले प्राण वाचवून प्रवाहांतून बाहेर येऊ शकले, ते वहात जाणारी शस्त्रे पकडून किनाऱ्यावर पाठवायच्या उद्योगाला लागले, तरीही कित्येक शस्त्रे वाहून गेलीच. काही शस्त्रे पलीकडील किनाऱ्यावरील अमृतपुरीच्या शिपायांच्या हाती लागली. त्याचप्रमाणे वाहून चाललेल्या काही सैनिकांनाही त्यांनी पाण्याबाहेर काढून वाचवले. नन्तर त्यांना युद्धकैदी म्हणून तुरुंगात पाठवले.

दुसऱ्या दिवशी राजा सत्यसेनने आपले सेनाध्यक्ष व इतर अधिकाऱ्यांना एकत्र बोलावून म्हटले–"शत्रूची जी हत्यारे



आपल्याला मिळाली आहेत तीं चांगली साफसूफ करून तयार ठेवा. आता आपण कोणाला भ्यायचे नाही! या पुरात वीरसिंहचे अनेक सैनिक मेले असतील, अन् त्यामुळे त्याचेही सैन्यबळ कमी झाले असले पाहिजे. पुन्हा आपले सैन्य मजबूत करून आपल्यावर हल्ला करायला यायला त्याला पुष्कळ वेळ लागेल. त्या अवधीत आपण आपलीही ताकत वाढवू या अन् युद्धाला तयार राहू या. युद्ध-कैदी म्हणून पकडलेल्या वीरसिंहाच्या सैनिकांना आता मुक्त करून टाका."

त्या रात्री मन्त्री, सेनाध्यक्ष आणि दोन पथक-प्रमुख गुप्त मसलतीसाठी राजा सत्यसेनला भेटायला आले, त्यावेळी सेनाध्यक्ष राजाला म्हणाला–"प्रभु, आपल्या सैनिकांनी ज्या शत्रु-सैनिकांना पुरातून वाचवले होते, त्यांच्यापैकी कोणीही परत वीरसिंह-कडे जाऊ इच्छित नाही."

थोडा विचार करून राजा सत्यसेन म्हणाला–"वीरसिंहने जेव्हा सुमेधवरच आक्रमण केलं, तेव्हा मी आजारी होतो; त्यांच्यासाठी काहीच करू शकलो नाही. सर्वच घडामोडी अगदी अचानक आणि वेगाने घडल्या. माझा जावई, मुलगी आणि नातू यांचं काय झालं, काहीच कळलं नाही. त्यांचा पत्ता लावायला हवा आपल्याला. वीरसिंहाचे जे शिपाई आपल्या सैन्यात येऊ इच्छितात त्यांना भर्ती करून घ्या. पण तत्पूर्वी प्रत्येकाची नीट पारख करून घ्या."

नन्तर मन्त्री पुढे होऊन म्हणाला–"महाराज, एक आणखी खुशखबर आहे! महाराज शान्तिदेव यांचा वृद्ध मन्त्री सर्व अडचणींवर मात करून आपल्या राज्यात येऊन पोचला आहे."

"असं? आपणा सर्वांना माहीतच आहे की हा मन्त्री मोठा गुणवान् आणि विवेकी आहे. आता आपल्याला हे ही कळून चुकलं की तो मारेकऱ्यांच्याही हातून सुटून जाण्याची ताकत असणारा साहसी माणूसही आहे." राजा म्हणाला.

"नाही, नाही; असं नाही महाराज. ऐन वेळी कोणी एका बुरखाधारी वीराने घोड्यावरून येऊन पहाता पहाता वीर-सिंहाने नेमलेल्या मारेकऱ्यांची कत्तल करून टाकली! आणि त्यानेच मन्त्र्याला आपल्या राज्यात पाठवून दिले. मन्त्र्याच्या मते तो बुरखेवाला दुसरातिसरा कोणी नसून......". मन्त्री असं काही बोलताबोलताच राजा सत्यसेन अधीरतेने एकदम पलंगावरून विचारू लागला–"कोण? कोण आहे तो बुरखेवाला? स्वतः राजा शान्तिदेव तर नाही? त्याच्या मन्त्र्याला आत्ता ताबडतोब बोलावून घ्या इथे. मला त्याच्याशी बोलायचंय!"

"हां महाराज, आत्ता बोलावतो. एक आणखीही ऐकून घ्या महाराज, सुमेध राज्याचा एक तरुण नागरिक वसंत यालाही याच बुरखेवाल्या वीराने वाचवले होते. वसंत आपल्या मनात राजा शान्तिदेवबद्दल अत्यन्त भक्ति आणि अपार गौरवाची भावना बाळगून आहे. तो दुष्ट वीरसिंहाची राजवट उलथून पाडण्याचे स्वप्नही बाळगून आहे. यासाठी सुमेधमधे हा गुप्त-रूपाने हिंडून तेथील तरुणांना आपल्या पक्षात वळवून घेण्याचं काम करत असतो.



वीरसिंहच्या आपल्यावरच्या हल्ल्याची बातमीही त्यानेच आपल्याला कळवली होती. त्याला आपण कशी मदत पोचवावी हे आम्हाला सुचत नाही महाराज!" मन्त्री म्हणाला.

राजा सत्यसेन पुन्हा जरा विचारात पडला आणि तो म्हणाला–"मन्त्रीवर, वीरसिंह तर पूर्ण राजपरिवाराचा सत्यानाश करायला टपला होता! त्या निमकहरामाने आपणावरही हल्ला करायचा प्रयत्न केला. तेव्हा आता वसन्तला आणि त्याच्या साथीदारांना मदत करणं हे आपलं कर्तव्यच आहे."

* * *



नदीच्या किनाऱ्यावर उभे असलेले वीरसिंह, कपालकंठ, सरदार आणि बाकी शिपाई उदास होऊन परत फिरले. त्यांच्या सैन्याची अपार हानि झाली होती. कपालकंठला समोर बोलावून वीरसिंह म्हणाला– "तू अगदीच मूर्ख आहेस. सर्वच जण निर्बुद्ध झाले आहात. पुराबद्दल कोणीच कशी सूचना दिली नाही?"

"या ऋतुत सर्वसामान्यपणे कधीच पूर येत नाही, महाराज! त्यामुळेच कुणाच्या मनातही आलं नाही असं काही होईल म्हणून! आपल्या दरबारी ज्योतिष्यानेही युद्धासाठी हाच मुहूर्त काढून दिला होता, पण पुराबद्दल त्यांनीही काही ओळखलं नाही!" कपालकंठ हताश होऊन म्हणाला.

"त्या नालायक ज्योतिष्याला फासावर चढवा. या साऱ्या नाशाला तोच कारण आहे." रागाने ओरडून वीरसिंहने आज्ञा दिली. वड्याचं तेल वांग्यावर निघतं ते असं!

"तो तर कुठं दिसतच नाहीये महाराज! आपलं सैन्य नदीकिनारी पोचलं, तेव्हा सर्वांच्या मागे तो ही होता इथेच! कळत नाही पुरात वाहून गेला, की जीव वाचवून अमृतपुरीला पळाला!" कपालकंठ म्हणाला.

"अमृतपुरी! अमृतपुरी!! आपल्याला तर ती यमपुरीच होणारसं दिसतंय!" दात ओठ खात वेड्यासारखा ओरडायलाच लागला वीरसिंह.

"असं नका म्हणू महाराज! नक्की जिंकू आपण ते राज्य! साहसी तरुण पाहून आपण त्यांना सैन्यात भरती करून घेऊ आणि पुन्हा नवीन हत्यारं जमवू. इतकं केलं की मग वेळ न घालवता तावडतोब अमृतपुरी जिंकून घेऊ, जरा धीर धरा महाराज." कपालकंठ आत्मविश्वासाने म्हणाला.

"आता कुठवर धीर धरू? हत्यारं जमवणार कशी?" वीरसिंहाने निराश सुरात विचारले.

"आपल्याजवळ पुरेसा पैसा असेल तर हत्यारं जमवणं कठीण नाही. दूर-दूरच्या प्रान्तातूनही ती मागवता येतील. सैन्यही तसंच येईल वाढवता." कपालकंठ धीर देत म्हणाला.

"ते सर्व खरं. पण आपल्याजवळ इतका पैसा तरी कुठे आहे? विहीरी खोदणं, रस्ते बनवणं, विद्यालयं आणि धर्मशाळा बांधणं वगैरे कामांसाठी शान्तिदेवने सारा खजिना रिकामाच तर केला होता. आता आपल्याला धन जमवायला काय करायला हवं?" वीरसिंहाने विचारले.

"महाराज, या वर्षी तर आपल्या राज्यात पीक-पाणी उत्तम झालंय. चन्द्रपुरीत धान्याला भाव चांगला आहे. आपल्याकडल्यापेक्षा त्यांच्याकडचा भाव चौपट जास्त आहे. तसेच तिथले भाले चांगले मजबूत असतात. आपल्या देशचं धान्य तिथे पाठवून आपण त्यांच्याकडून भाले घेऊ या." कपालकंठने सुचवले.

हा सल्ला ऐकून मात्र वीरसिंह प्रसन्न झाला! तो म्हणाला–"वा! काय कमालीचा छान सल्ला दिलास तू कपालकंठ! आपण शेतकऱ्यांकडून त्यांच्या पिकाचा अर्धा आणि जमीनदारांकडून पिकाचा तीन-चतुर्थांश हिस्सा कराच्या रूपात वसूल करू. आत्ताच माझ्या या आज्ञेची दवंडी पिटव आपल्या राज्यात." वीरसिंह उत्साहाने म्हणाला.



"होय महाराज, असंच करतो. प्रथम जमीनदारांकडून करवसुली करून घेऊ. आज सर्वप्रथम रघुनाथकडे पाठवतो लोकांना करवसुलीसाठी." असे म्हणून कपालकंठ तेथून निघाला.

रामपुरात रहाणारा रघुनाथ नावाचा जमीनदार मोठा धर्माचरणी होता. त्याची खूप जमीन होती, आणि भरपूर पीक येई त्याच्याकडे. गरजेच्या वेळी रामपूरची गरीब जनता त्याच्याकडेच जाऊन धान्य घेत असे आणि आपल्या सोयीप्रमाणे त्याचे पैसे देत असे, किंवा धान्याच्या बदली धान्य देत असे. अशा प्रकारची जनसेवा रघुनाथच्या घराण्यात पिढयान् पिढया चालत आली होती.



त्या दिवशी ऐन दुपारी रघुनाथच्या धान्याच्या कोठाराजवळ आपापल्या टोपल्या घेऊन कित्येक लोक धान्य उधार नेण्यासाठी उभे होते. त्याच वेळी राजाचा एक तरुण नोकर वीस शिपाई आणि पन्नास बैलगाड्या घेऊन तेथे धडकला. मोठ्या रुबाबात तो म्हणाला–"या सर्व धान्याचा तीन-चतुर्थांश भाग राजाला मिळायला हवा."

"का बरं?" रघुनाथने विचारले.

"का म्हणजे? तुम्ही हा इतका कर देणं लागता म्हणून!" अधिकारी म्हणाला.

"मी तर पुरा कर दिलेला आहे अगोदरच! माझ्या नावे बाकी काहीही नाही." रघुनाथ म्हणाला.

"हा अतिरिक्त कर आहे, हे धान्य आजच्या आज चन्द्रपुरीला जायला हवे." तरूण अधिकारी आणखीच ताठ होत म्हणाला.

"असं असेल, तर याच धान्याच्या भरंवशावर राहिलेल्या आमच्या गावातल्या लोकांचं काय होईल? त्यांनी कोणाच्या तोंडाकडे पहावं?" रघुनाथने विचारले.

"पण याच्या भरंवशावर राहायला सांगितलं कोणी त्यांना? हे आता त्यांचं नशीब!" अधिकारी उत्तरला.

आणि हातातल्या चाबकाने हवेत आवाज काढून लोकांना घाबरवत आपल्या शिपायांना त्याने आज्ञा दिली–"चला चला, आटपा लवकर. ही सगळी धान्याची पोती चढवा आपल्या गाड्यांवर!"

"आमच्या पोटावर नको मारू बाबा, दया कर आमच्यावर!" आर्त आवाजात गावचे लोक अधिकाऱ्याला विनवू लागले. पण काही उपयोग नाही झाला! त्या लोकांच्याच मदतीने धान्य गाड्यांमधे भरले गेले अन् गाड्या निघाल्या पश्चिमेकडे. लोक काही वेळ गाड्यांच्या मागे काकुळतीने बोलत येऊ लागलेले पाहून अधिकारी मनोमन खूश होत होता. पण अचानक त्याच्या मनात एक शंका आली–हे गावकरी असे गाड्यांच्या मागे मागे का बरे

येत आहेत ? यांच्यात कोणी एकादा बंडखोर तर नाही ? मग त्याने तलवार म्यानातून काढून हवेत फिरवत म्हटले–"आता तुम्ही सर्व लोक मुकाटयाने परत फिरा बरं!"

यावेळी गाडया एका डोंगराजवळील अरुंद रस्त्याने चालेल्या होत्या. इतक्यात गावकऱ्यांच्या त्या गर्दीतून एक तरुण जोरात ओरडला–"टाका!" दुसऱ्याच क्षणी घोडयावरच्या त्या अधिकाऱ्याच्या गळ्यात एक दोरीचा फास पडला! ही दोरी डोंगरावरच्या एका पुरुषभर उंचीच्या एका मोठ्या खडकामागून आलेली होती. दोरीबरोबरच अधिकारी घोड्यावरून घसरून खाली जमिनीवर पडला. इतक्यात ज्याने तो फास फेकला होता, तो तरुण भरकन खडकाआडून बाहेर आला. त्याच्या बरोबर आणखीही काही तरुण होते.

त्या साऱ्या जवानांनी तो तरुण अधिकारी आणि त्याचे सर्व शिपाई यांचे हात बांधले आणि ते त्यांना म्हणाले– "हे पहा! घाबरू नका आम्हाला. आम्ही तुम्हाला काहीही त्रास देणार नाही." नंतर त्या तरुणांनी सर्व पोती गाडयांतून खाली उतरवली आणि तिथल्या तिथेच सर्व धान्य त्या गावकऱ्यांना वाटून टाकले. गावकऱ्यांना त्यांनी धीर दिला–"तुम्ही वीरसिंहच्या लोकांना मुळीच घाबरू नका. ते कोंही वाकडं करू शकणार नाहीत तुमचं!"

मोठ्या आनन्दाने धान्य घेऊन गावकरी आपापल्या घराकडे निघून गेले.

नंतर प्रमुख तरुणाने आपल्या साथीदारांना, राजकर्मचारी व शिपायांना तेथील झाडांना बांधून ठेवायला सांगितले. झाडांना बांधलेल्या त्या सर्वांना उद्देशून तो तरुण म्हणाला–"आम्ही तुमच्या नेत्याला तुम्हाला इथे बांधून ठेवल्याबद्दल कळवू. तुम्हाला सोडवून नेण्याची व्यवस्था केली जाईल त्याच्याकडून! तुम्ही लोक जाऊन त्या कपालकंठला सांगा की आम्ही इथून जबरदस्तीने कोणालाही अन्न नेऊ देणार नाही." अशा तऱ्हेने त्यांना आव्हान देणारा तो तरुण होता वसन्त! (क्रमशः)



# कलेचा धन्दा

दृढनिश्चयी विक्रम पुन्हा त्या झाडाजवळ गेला. फांदीवर लटकलेले शव खाली काढून त्याने ते आपल्या खांद्यावर टाकले, आणि नेहमीप्रमाणे तो स्मशानाच्या दिशेने पावले टाकू लागला. तेव्हा त्याचे मौनभंग करण्याच्या इराद्याने प्रेतातील वेताळ म्हणाला–"राजा, अशा मध्यरात्रीच्या वेळी तू कोणत्या उद्देशाने ही सर्व धडपड करीत आहेस, ते मला मुळीच ठाऊक नाही. काही लोक आयुष्यभर एकादी विशिष्ट गोष्ट मिळवण्यासाठी धडपड करीत राहतात; पण फळ हाताशी आलं की त्याचा अस्वीकार करतात. मला शंका आहे, की तू अशांपैकीच तर एक नसशील? काही दिवसांपूर्वी नीलमपुरमधे असाच एक कलाकार रहात असे. मी त्याची गोष्ट आत्ता तुला सांगतो, ती ऐक. तुझा थकवाही कमी होईल त्यामुळे."

## वेताळाच्या गोष्टी

वेताळ गोष्ट सांगू लागला—

नीलमपुर एक लहानसे गाव होते. त्या गावात रामदेव नावाचा एक गरीब शिल्पकार रहात असे. त्याला एकदा कोणीतरी सांगितले की—"तुला राजाश्रय लाभला तर तुझं नशीब उघडेल." म्हणून रामदेव निघाला राजधानीकडे. पण रामदेव पडला एक भोळाभावडा खेडूत! अशा माणसाला सहजपणे काय, पण मोठ्या प्रयत्नानेही राजदर्शन मिळणें कठीण असते! रामदेवच्या बाबतीतही असेच घडले आणि खूप प्रयत्न करून रामदेव शेवटी बिचारा आपल्या गावी परतला.

रामदेव खरोखरच एक चांगला कलाकार होता. त्याच्या हातून बनणाऱ्या मूर्ति अतिशय रेखीव व सुन्दर असत. पण त्या गावात त्याच्या कलेचा पारखी किंवा भोक्ता ही कोणी नव्हता; त्यामुळेच मूर्ति विकल्या जात नसत. कधीकधी तर त्याला असे वाटे की इतक्या हाल अपेष्टा सोसण्याऐवजी आत्महत्या करणेच श्रेयस्कर!

अशातच एकदा दूरच्या एका गावच्या प्रमुखाचे आमन्त्रण त्याला मिळाले. रामदेव ताबडतोब जाऊन त्याला भेटला. तो प्रमुख त्याला म्हणाला—"हे पहा रामदेव, नुकतंच माझ्या ऐकण्यात आलं, की तू एक प्रतिभावान शिल्पकार आहेस आणि हलाखीत दिवस काढत आहेस. मला वाटतं, की तू माझ्यासाठी काही मूर्ति बनवून पाठवत रहा; मी तुला दरमहा पन्नास मोहोरा इतका पगार देत जाईन."

रामदेवने हसून ती गोष्ट कबूल केली. बुडत्याला काडीचा आधार! आता आपल्याला भुकेने मरायची वेळ येणार नाही अशा विचारानेच त्याने हा होकार दिला होता.

आता रामदेव रात्रंदिवस काम करू लागला. नेहमी काही नवनवीन कल्पना करून तो अनेक सुंदर मूर्ति घडवी; आणि तो गावप्रमुख आसपासच्या बाजारात त्या विकून खूप पैसे मिळवी. चांगले श्रीमन्त लोकच त्या खरेदी करीत असत. हळूहळू रामदेवच्या मूर्तींचा चांगला प्रचार होऊ लागला.

एकदा त्या प्रान्ताच्या एका जमीनदाराने रामदेवच्या मूर्तींबद्दल ऐकले आणि त्याने बनवलेल्या मूर्तीही प्रत्यक्ष पाहिल्या. त्याने ही रामदेवला आपल्याकडे बोलावून घेऊन म्हटले—"रामदेव, तो गावप्रमुख तुला फक्त पन्नास मोहोरा पगार देऊन तुझ्याकडून ज्या मूर्ति बनवून घेतो, त्या विकून तो तर खूपच पैसे मिळवतो. पण तुझा पगार वाढवावा, असं काही त्याच्या मनात येत नाही. यापुढे तू मूर्ति घडवून मला देत चल. मी तुला दरमहा शंभर मोहोरा देत जाईन."

रामदेवने हसून त्याला संमति दिली अन् आता त्याच्या मूर्ति जमीनदाराकडे जाऊ लागल्या.







जमीनदाराने मूर्तीपासून चांगलाच धनसंग्रह केला.

एके दिवशी त्या प्रान्ताच्या सामन्त राजाच्या कानी रामदेवची कीर्ति पोचली. आणि तो अधिक किंमतीने त्याच्या मूर्ति घेऊ लागला.

या मूर्ति तो राजा आपले दोस्त व बरोबरीच्या सामन्त राजांकडे भेटीदाखल पाठवत असे.

एकदा या सामन्त राजाने महसूला-बरोबरच सम्राट राजाकडे काही उत्तमात उत्तम अशा मूर्ती ही पाठवल्या. त्यातील कलाकौशल्य पाहून महाराजा अगदी मुग्ध होऊन गेला. त्याने तावडतोब एक सोन्याची पालखी रामदेवला आपणाकडे घेऊन येण्यासाठी पाठवली.

नेमक्या त्याच वेळी संतोष नावाचा एक गरीब तरुण रामदेवकडे आला आणि त्याने मोठ्या श्रद्धा-भक्तीने रामदेवच्या पायांना हात लावून नमस्कार केला. तो रामदेवला मोठ्या नम्रतेने म्हणाला– "मला थोडी थोडी मूर्तिकला येते. माझी इच्छा आहे की आपण मला आपला शिष्य म्हणून स्वीकारून माझ्यावर अनुग्रह करावा."

रामदेव त्याला म्हणाला–"मी आत्ता आपल्या महाराजांकडे निघालो आहे. तेथून परत आल्यावर आपण याबद्दल बोलू या." नंतर रामदेव सम्राट महाराजां-कडे गेल्यावर राजा त्याला म्हणाला– "रामदेव, तू एक महान शिल्पकार आहेस. मी तुझी 'दरबारी-शिल्पकार' म्हणून नेमणूक करणार आहे."

यावर रामदेव म्हणाला–"प्रभु, आपल्या सद्भावनेबद्दल मी आपला ऋणी आहे. पण आपण मला क्षमा करावी, मी आपलं उर्वरित आयुष्य आपल्या गावातच व्यतीत करू इच्छितो."

महाराज हसत त्याला म्हणाले–"हे पहा महाशिल्पी, तुमची जशी इच्छा असेल तसेच करा. मी देत असलेलं पारितोषिक घेऊन तुम्ही मला उपकृत करावं." इतके बोलून खूपसे धन देऊन व गौरव करून राजाने रामदेवची सन्मानाने पाठवणी केली.

राजाकडून मिळालेल्या धनाच्या साह्याने रामदेवने आपल्या गावात एक 'मूर्तिकला विद्यालय' उघडले; आणि संतोषला त्याने आपला पहिला शिष्य बनवले.

इतकी कहाणी सांगून वेताळ म्हणाला– "राजा, पार झाल्यानन्तर आपली नाव जाळून टाकण्यासारखाच प्रकार केला रामदेवने! गावप्रमुखापासून ते सामंतापर्यंत निरनिराळे मालक त्याने बदलले. हा त्याचा पराकोटीचा लोभीपणा नव्हे का? 'दरबारी शिल्पकार' या पदाची किंमतच त्याला न कळल्यामुळे त्याने असे केले? या शकांचं उत्तर माहीत असूनही तू न दिलंस, तर राजा, तुझ्या मस्तकाचे हजारो तुकडे होऊन पडतील."

यावर राजा विक्रम उत्तरला–"वेताळा, रामदेव लोभी नव्हता, अन् गर्विष्टही नव्हता. गावच्या प्रमुखापासून तो सम्राट महाराजापर्यंत जेव्हा जेव्हा, ज्याने बोलावले तेव्हा तेव्हा तो त्यांच्याकडे गेला ही गोष्ट खरीच! पण या लोकांनी त्याच्या कलेचा व्यापार करू इच्छिला. राजानेही रामदेव उत्तम मूर्तिकार असल्याचे पटल्यावरच त्याला दरबारी शिल्पकार बनवण्याचा घाट घातला. पण खऱ्या कलाकाराला खरा आनन्द तेव्हाच मिळतो, की जेव्हा एखादा खरा कला-प्रेमी त्याची प्रशंसा करतो. असा आनन्द रामदेवला संतोषचे बोलणे ऐकल्यावरच मिळाला. उगीचच इकडून तिकडे थपडा खात भटकणाऱ्या रामदेवला आपल्यासारखे आणखी कलाकार निर्माण करण्यातच कलाकाराला अपूर्व संतोष व तृप्ति मिळते हे सत्य उमजले; आणि त्याने 'मूर्तिकला-विद्यालय' स्थापन केले."

असे उत्तर देऊन राजा गप्प झाल्या-बरोबर वेताळ त्या प्रेतासह पुन्हा अदृश्य होऊन झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# हिशोब-खतावणी

शेठ राजीमल पक्का सावकार होता.

त्याचा सावकारीचा धन्दा मोठ्या प्रमाणावर चाले. त्याचा व्याजाचा हिशोब हरीश नावाचा एक कारकून पहात असे. एकदा तेथील जमीनदाराने हरीशला आपल्याकडे बोलावले आणि चांगल्या मोठ्या पगारावर त्याची तिथल्या दिवाणाचा कारकून म्हणून नेमणूक केली. त्यामुळे हरीशने राजीमलकडची नोकरी सोडून दिली.

आता राजीमलला हिशोब-खतावणी लिहायला कोणी लायक कारकून मिळेना! त्यामुळे शेठजींना एकीकडे सर्व देण्या-घेण्याचे काम संभाळावे लागे अन् दुसरीकडे हिशोबही लिहावा लागे. हा सर्व व्याप संभाळणे त्याला कठीण जाऊ लागले. याच काळात एकदा त्याचा जुना कारकून हरीश याने चन्दन आणि सोहन नावांच्या दोन तरुणांना कारकुनी कामासाठी शेठ राजीमलकडे पाठवले. दोघांना पाहून शेठजी म्हणाले–"मी तुम्हा दोघांना दोन वह्या देतो. नीट बारकाईने आपापल्या वह्या तपासून पहा दोघे ही. कुठे काही चूक असेल तर नीट पाहून मला सांगा."

इतके बोलून राजीमल आत गेला व दोन वह्या आणून दोघांच्या हाती एक एक देत तो म्हणाला–"उद्या संध्याकाळपर्यंत दोघेजणं आपापली वही नीट तपासून पाहून माझ्याकडे परत घेऊन या."

चन्दन आणि सोहन दोघांनीही होका-रात्मक माना हलवल्या आणि आपापली वही घेऊन ते तेथून निघून गेले. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी वह्या घेऊन ते शेठ राजीमलकडे परत आले.

जरासे हसून चंदनकडे पहात शेठजी म्हणाले–"काय रे, माझ्या हिशोबात कुठे काही चूक-बीक सापडली का तुला?"

शेठजींच्याकडे पहात चन्दन म्हणाला–"तसे तर सर्व हिशोब बरोबरच आहेत शेठजी तुमचे; पण चार कर्जदारांच्या बाबतीत आपण व्याज कमी घेतलंय आणि चुकून पाच लोकांकडून व्याज जास्तही घेतलंय."

आता सोहनकडे वळत शेठजींनी विचारले–"आणि तू सांग बरं, तुझ्या वहीची काय हकीकत आहे?"

"शेठजी मी जी वही बरोबर घेऊन गेलो, त्यातले हिशोब बरोबरच आहेत सर्व–फक्त तीन देणेकऱ्यांचे सोडून! या तिघांच्या बाबतीत आपली एक चूक झाली आहे." सोहन म्हणाला.

"माझ्याकडून, चूक? काय बरं चूक झाली?" आश्चर्याने शेठ राजीमलने विचारले.

"आपण देणेदारांकडून व्याज कमी घेतलंय शेठजी." सोहन म्हणाला.

"ओहो, असं झालं होय?" असे म्हणत राजीमल हसला. आणि पुन्हा चन्दनकडे वळून तो म्हणाला–"हे पहा चन्दन, तू आणखी दुसरीकडे कुठे काम बघ. कुठेच नाही मिळालं काम, तर आणखी काही दिवसांनी माझ्याकडे ये. मध्यंतरी मी हरीशला एकदा भेटेन. गैरसमज नको करून घेऊस. जा आता तू." चन्दन मुकाट्याने तिथून निघून गेला.



मंजूषा देशमुख

चन्दन निघून गेल्यावर शेठजींनी सोहनला विचारले–"अच्छा, मी तीन कर्जदारांकडून व्याज कमी घेतलंय ही गोष्ट तर खरीच; पण, चार कर्जदारांकडून मी जास्त व्याज घेतलंय, त्याचा हिशोबही आहेच की त्या वहीत. मग त्याबद्दल नाही काही बोललास तू? ते कसं नाही ओळखलंस तू?"

यावर सोहन हसला. तो म्हणाला–"शेठजी, चुकून जर व्याज जास्त घेतलं गेलं, तर काही नुकसान नाही ना? मग आपल्याला त्याची चिन्ता कशाला? कर्जदार घरी गेल्यावर पाहील हिशोब आपला-आपण, अन् चूक सापडली की धावत येईल आपल्याकडे विचारायला!"

"पण चूक त्याच्याही लक्षात नाही आली तर?" शेठ राजीमलने विचारले.

यावर सोहन हसत उत्तरला–"शेठजी, हिशोब चुकवताना देणेकरी कधीही गैरसावध नसतो. कर्ज चुकवायला येण्यापूर्वी हिशोब करून निघतो. अन् खरोखरच एखाद्या कर्जदाराला चूक नाही कळली, तर बिघडतं कुठे आपलं? जे व्याज जास्त वसूल होईल ते आपल्या फायद्यातच जाईल न? त्यामुळे चूक लक्षात येऊनही मी ती चूक मानली नाही. मला वाटतं माझा विचार आपणास ही योग्यच वाटेल."

"असं? मग मी व्याजात जे पैसे कमी वसूल केले त्याकडे मात्र का बोट दाखवलंस तू?" शेठजींनी विचारले.

"आपण जर चुकून व्याजाची वसुली कमी केली, तर नुकसान आपलंच होतं ना? असं झालं की नंतर कर्जदाराकडून ती नुकसानी वसूल करणं सोपं नसतं! म्हणून मी तावडतोब तिकडे तुमचं लक्ष वेधून घेतलं." सोहन म्हणाला.

या त्याच्या उत्तरावर शेठ राजीमल फार खुश झाला आणि सोहनच्या बुद्धिमानीची तारीफ करत हसत म्हणाला–"माझ्या जुन्या कारकुनाच्या तुलनेत तू कुठेही थोडासुद्धा कमी नाहीस बघ! उद्यापासूनच कामाला सुरुवात कर माझ्याकडे."





# ज्ञानाचा खजिना

## तो कोण?

नर्मदा नदीच्या उगमस्थानी एक मुनि रहात असे. अनेक वर्षे पुत्रप्राप्ति न झाल्यामुळे त्याने त्यासाठी शिवाची तपस्या केली. भगवान शंकराने त्याला प्रत्यक्ष दर्शन देऊन विचारले–"वत्सा, तुला सर्वसामान्य बुद्धीचा दीर्घायुषी मुलगा हवा, की केवळ बारा वर्षेच जगेल असा, पण कुशाग्र बुद्धीचा मुलगा हवा? नीट विचार करून सांग." मुनि उत्तरला–"चांगला बुद्धिमान मुलगाच हवा मला, भले तो दीर्घायुषी नसेल!"

मुनीला मुलगा झाला आणि तो आपल्या अपूर्व बुद्धीची चुणुक दाखवत दिसामाशी वाढू लागला, खूप वाखाणणी होऊ लागली त्याची. परन्तु मुनि मात्र उदास दिसू लागला. कारण विचारल्यावर मुनीने मुलाला शिवाच्या वरदाना-बद्दल सांगितले. ते ऐकून मुनिपुत्र एकान्त प्रदेशात बसून शिवाची तपस्या करू लागला. त्याचे आयुष्य संपले, त्या दिवशी यमदूत तेथे येऊन पोचले. पण तपस्येत सर्वस्व विसरलेल्या मुनिपुत्राला ते पाहूच शकले नाहीत. नंतर हा मुनिपुत्र दीर्घायुष्य प्राप्त करून घेऊन पुढे पुष्कळ वर्षे जगला.

हा मुनिपुत्र कोण?

[पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. अंटार्क्टिकाचा सर्व बर्फ वितळला तर काय होईल?
२. आपल्या सूर्यमंडळातील सर्व ग्रहांना आपल्यात सामावून घेऊ शकेल असा खूप मोठा ग्रह कोणता?
३. ऐंशी टक्के खऱ्याच निघतील अशा, वातावरणाबद्दलच्या सूचना चिनी शेतकरी कशा प्रकारे मिळवतात?
४. लंबकाच्या साह्याने घड्याळ चालवता येईल, याबद्दलचा शोध कोणी लावला?
५. अग्नीचा उपयोग माहीत नाही अशी जमात भारतात कुठे आहे?

[पान ३६ पहा]

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. सर आर्थर कॉनन डॉईल याचा व्यवसाय काय होता?

२. चैतन्य महाप्रभु यांच्या जीवनाबद्दलची माहिती कोणत्या पुस्तकात मिळते?

३. "हेलेन ऑफ ट्रॉय" कोण आहे?

४. जर्मन भाषेतील महान् काव्य कोणते?

५. 'सागा' शब्दाचा अर्थ काय?

## उत्तरावली

**तो कोण?**

मृकंड मुनींचा पुत्र मार्कंडेय.

**तुम्हाला माहीत आहे?**

१. समुद्रांची पातळी २४० फुटांनी वाढेल आणि जमिनीचा कमीत कमी चौथा भाग पाण्यात बुडेल.
२. गुरु.
३. बेडकांच्या डराव आवाजाने.
४. गॅलीलिओ.
५. अंदमान बेटांवर.

**साहित्य**

१. वैद्यकी.
२. कृष्णराज कविराज लिखित 'चैतन्य चरितामृत'.
३. होमरच्या 'द इलियड'ची नायिका.
४. गटेने लिहिलेले 'फाउस्ट्स्'
५. आइसलंड व नॉर्वेच्या लांबच लांब गद्य-गाथा.



# वशकरचे बोल

नीलमपुर शहरात धनपती नावाचा एक धनकुबेर रहात होता. त्याच्याजवळ पैसा-अडका इतका होता की, अनेक पिढ्यांनी नुसतं बसून खायचं म्हटलं तरी संपला नसता. पण इतका श्रीमन्त असूनही बिचाऱ्याला मूल-बाळ नव्हते. त्या काळजीने त्याची बायको मरून गेली आणि आता धनपतीही त्या दुःखाने झुरुन वाळत चालला होता.

याच काळात एकदा वशकर नावाचा एक महात्मा नीलमपुरला येऊन राहिला होता. तो मोठा त्रिकालज्ञानी माणूस होता. एके दिवशी धनपतीने ही मोठ्या आदराने वशकरला आपल्याकडे येण्याचे निमन्त्रण दिले.

त्याच्याजवळ आपली चिन्ता व्यक्त करत धनपती म्हणाला—"महात्मन्, माझी चिन्ता दूर होऊन उरलं-सुरलं आयुष्य सुखा-समाधानाने घालवता यावं यासाठी मी मी काय करावं?"

धनपतीचे दुःखी मन वशकरने बरोबर ओळखले. त्याने त्याला समजाऊन सांगितले की, मूल नसल्याचे दुःख आता उगाळत बसणे योग्य नव्हे!

"महात्मन्, परन्तु धन-दौलतीच्या बाबतीत लोकांची मनं किती लालची असतात हे तर आपण उत्तम प्रकारे जाणताच. माझे नातेवाईक तर गिधाडांसारखे माझ्या मरणाची आतुरतेने वाट पहात आहेत." धनपतीने व्याकुळतेने सांगितले.

यावर हसत-हसत वशकर म्हणाला—"बेटा, तू उगीचच काळजी करत आहेस बघ! इथून पुढे आपलं उरलं-सुरलं आयुष्य तू एकाद्या निर्जन प्रदेशात घालवावंस, म्हणजेच तुझ्या मनाला शान्ति लाभेल. तुझ्या जीवनाच्या अन्तिम काळात तुला

वासू देशपांडे

एक दिव्य पुरुषभेटेल. त्याच्या चेहऱ्यावर एक अपूर्व असे तेज तुला दिसेल. त्याच्या संगतीतच तुझा जीवन-प्रवास संपेल. तोच तुझ्या संपत्तीचा वारसदार होईल."

हे ऐकून महात्म्याच्या पायांवर डोके ठेवून धनपतीने आपली भक्ति-भावना प्रकट केली.

आता धनपतीने आपला सर्व जमीन-जुमला व इस्टेट नीलमपुरच्या न्यायाधी-शाच्या हवाली करत म्हटले–"माझ्या इस्टेटीच्या जो खरा वारस होईल, त्याच्या हाती मी आपल्या संपत्तीचं वारसपत्र पाठवीन. तोपर्यंत आपण माझ्या संपत्तीचं रक्षण करा."

धनपती गाव सोडून जवळ असलेल्या एका दाट जंगलात रहायला गेला. तेथेच नदीकिनारी त्याने एक झोपडी बनवून घेतली. तेथील वातावरण मोठे प्रसन्न होते. चोहीकडे हिरवळच हिरवळ होती! तऱ्हेतऱ्हेचे पक्षी इकडे-तिकडे उडताना दिसत. नदीच्या प्रवाहातहीं एक प्रकारचे संगीत ऐकू येई. झोपडीच्या आसपास अनेक फळांचे वृक्षही असत. नेहमीच कोणत्या ना कोणत्या फळांचा बहर असे. तो त्या दिव्य पुरुषांचीही प्रतीक्षा करत असे मनोमन.

धनपतीच्या झोपडीच्या आसपास काही भिल्लांची वस्ती होती. ते मोठे अबोध व भोळे-भाबडे लोक होते. धनपतीला ते लोक फळे, कंद, मध वगैरे जंगली मेवा आणून



देत; आणि त्याला आपल्या अडचणी सांगून त्याचा सल्ला विचारीत. प्रथम प्रथम त्यांचे म्हणणे ऐकून धनपती त्यांना सल्ला देई; परंतु नंतर त्याला ते आवडेना. ज्या शान्तिसाठी तो आपलं शहर सोडून या जंगलात आला होता, ती शान्तिही या भिल्लांमुळे आपल्याला सोडून जात आहे, असे त्याला वाटू लागले.

एके दिवशी भिल्लांचा प्रमुख जटाल याला बोलवून धनपति म्हणाला–"मी इथे एका दिव्य पुरुषाच्या शोधात आलो आहे आणि आपल्या जीवनाचा शेवटचा काल मी शान्तीत घालवू इच्छितो. त्यामुळे मला असं वाटतं की यापुढे तुम्ही लोकांनी माझ्या-कडे येणे जाणे बन्द करावे."

धनपतीचे बोलणे ऐकून जटाल म्हणाला–"स्वामीजी, आपलं सर्व म्हणणं आम्ही जरूर मान्य करू. इथून पुढे तुमच्या मनात असेल तेच घडेल. पण माझी एक विनन्ति आहे, आपण इथे एकटेच राहू नका. माझा सर्वात धाकटा मुलगा विपुल हा हुशार आहे अन् खूप समजूतदार आहे. त्याला मी आपल्या सेवेसाठी आपणाकडे पाठवीन."

जटालची ही विनन्ति धनपतीने मान्य केली, आणि त्याच संध्याकाळी जटालने विपुलला धनपतीकडे आणून सोडले. विपुल खरोखरच खूप हुशार अन् चटपटीत मुलगा होता. सकाळी उठल्यापासून रात्री झोपे-पर्यंत धनपतीची सर्व कामे तो अगदी



निष्ठेने करी. धनपतीलाही फार संतोष वाटे यामुळे.

इकडे धनपती रोज त्या दिव्य पुरुषाचीही वाट पहात राही. पण तो आला नाही की तो दु:खी होई. विपुल त्याला विचारी–"स्वामीजी, आपण असे उदास का?" यावर धनपती म्हणे–"मी एका दिव्य पुरुषाच्या येण्याची वाट पहात आहे."

विपुलला कळेना, कि दिव्य पुरुष असतो तरी कसा? म्हणून त्याने त्याबद्दल धनपतीला एकदा विचारले.

"दिव्य म्हणजे–दिव्य तेजाने युक्त असा, अन् चमकती रेशमी वस्त्रें धारण करून अचानक खाली उतरेल असा!" धनपती उत्तरला.

हे एकून असा दिव्य पुरुष आपल्यालाही पहायला मिळावा या इच्छेने विपुलही आता रोज वाट पाहू लागला.

असेच दिवस जात राहिले, धनपतीची प्रकृति दिवसेंदिवस ढासळत जाऊ लागली. मृत्यु जवळ आला असे वाटू लागले त्याला!

एके दिवशी काही बोलावे, म्हणून त्याने विपुलला जवळ बोलावले. पण त्यावेळी धनपतीला विपुलच्या चेहऱ्यावर एक अद्भुत असे तेज दिसले!

क्षणभर चमकलाच धनपति! पण त्याला आता आपली चूक समजून आली. वशकरने सांगितलेला दिव्य पुरुष म्हणजे हा भोळा-भाबडा, अबोध पोरगा विपुलच की! पण ही गोष्ट एकदा ओळखल्यावर मात्र धनपतीने मुळीच वेळ घालवला नाही.

जटालला बोलवून आपली सारी कहाणी धनपतीने त्याला सांगितली. नन्तर आपले वारसपत्र विपुलच्या नावे करून, ते जटालच्या हाती देऊन, न्यायाधीशाकडून आपली सारी इस्टेट कशी ताब्यात घ्यायची हे सर्व त्याला समजावून सांगितले. अशा प्रकारे आपली इच्छा पूर्ण झाल्यावर धनपतीला एक अपूर्व शान्ति अनुभवास आली. त्याच शान्तीच्या आनन्दात, विपुलकडून सेवा करून घेत घेत धनपतीने आपले डोळे मिटले!





# नितूची इस्त्री

नितू रोज इस्त्री केलेले कपडेच वापरत असे. तिचे कपडे कधी थोडेही चुरगळलेले दिसायचे नाहीत तिच्या मित्रमैत्रिणींना! ते सर्वजण धोबी जशी कशी इस्त्री करील, तसेच कपडे वापरत. पण दुसऱ्याच दिवशी त्यांचे कपडे पार चुरगळून गेलेले असायचे. त्यामुळे रोजच छान, बिन सुरकुतलेले कपडे वापरणाऱ्या नितूबद्दल त्यांच्या मनात एक प्रकारची ईर्ष्या असे. नितु रोज स्वत:च आपल्या कपड्यांना इस्त्री करी. पेटलेले कोळसे एका तांब्यात ठेवून, तो एकाद्या जाडशा कपड्याने घट्ट धरून, ती आपल्या कपड्यांच्या व्यवस्थित घड्या करून ठेवी. अशा तऱ्हेने नितूच्या कपड्यांच्या इस्त्रीचे काम रोज चाले. त्यांच्या घरचा धोबीही तिचे काम पाहून तिची स्तुति करत असे.

परन्तु नितुच्या आईने तिचे कधीच कौतुक केले नाही. उलट ती म्हणे–"नितुचं कामात मुळीच लक्ष नसतं, पहावं तेव्हा नुसती खेळत–बागडत असते. मला कामात काहीच मदत करत नाही. होय, पण स्वत:च्या कपड्यांना इस्त्री मात्र करते. पण दुसऱ्या कुणाचा काय फायदा त्यात? आपलं तेवढं बघते. दुसऱ्याच्या कपड्यांना चुकूनही कधी इस्त्री करून देत नाही!"

तिचे असले बोलणे ऐकून नितूची आजी एकदा आपल्या नातीला म्हणाली–"नितू, अग आईलाही कधी मदत करावी की कामात!" यावर चिडून नितू उत्तरली–"अग आजी, तुला काय माहीत आईच्या बाबतीत? कित्ती काम केलं तरी तिला आणखी काम हवं असतं माझ्याकडून!"

वसंत धोपाडे



यावर नितूच्या आजीला हसूच आले. ती म्हणाली–"हं कळलं कळलं! तुझी आईबद्दल तक्रार आहे, म्हणून तू तिला मदत करत नाहीस. पण मग दुसऱ्या कुणालाही कसली मदत करत नाहीस हे कसं?"

"अग आजी, तुला काही कळत नाही म्हणून असं बोलतेस तू. तुला आठवतं, बाबा माझ्याबद्दल काय बोलतात ते? ते म्हणतात–नितू अजून लहान आहे; अन् नाजुकही आहे ती! आत्तापासून तिला कामाला नका लावत जाऊ कोणी! म्हणून मी त्यांनाही काही मदत करत नाही. दादा नि छोटी कोणी ही माझ्यासाठी काही करीत नाहीत. मग मी त्यांची कामं का करावीत?"

"अच्छा, म्हणजे तुला कुणाचंच काम करायचं नाहीये; एवढंच ना?" आजीने विचारले.

"नाही नाही! असं नाही काही! मला सगळ्यांची कामं करायला आवडेल, पण प्रत्येकाबद्दल काही न काही तक्रार आहे माझी. तुझ्या कपड्यांना इस्त्री करावीशी वाटते मला; पण तू कुठे करू देतेस? तुझं सोवळं-ओवळंच फार असतं, त्यामुळे तुझी काहीच सेवा करू शकत नाही मी, काय करू, तूच सांग बरं?" डोळे मिचकावत नितू म्हणाली.

"नितू, तू आहेस आपल्या आजोबांसारखी बुद्धिमान! बोलण्यात थोडीच हरणार आहेस?" असे म्हणत तिला मांडीवर बसवत आजी नितूचा पापा घेऊ लागली.

इतक्यात तिची आई तिथे येऊन म्हणाली–"नितू आपला धोबी भोळू आज गावात नाहीये. मला जमीनदारांकडे साखरपुड्याला जायचं आहे. माझी रेशमी साडी जरा चुरगळली आहे. थोडी इस्त्री दे ना करून."

"मी नाही करत जा." नितू बेपर्वाईने म्हणाली.

आता आईला रागच आला. ती नितूला रागावू लागली. पण आजी मध्ये पडली अन् सुनेला म्हणू लागली–"अग सुनबाई, पोरं काम करत नसली, तर त्यांना चुचकारून, प्रेमानं काम करून घ्यावं, असं रागावण्यानं पोरं आणखीच बिघडतात मग!"

"ठीक आहे सासूबाई, आता तुम्हीच या खट पोरीची बाजू घेताय ना? मग तिच्याकडून माझ्या साडीला इस्त्री करवून घेऊन दाखवा बरं?" चिडून नितूची आई बोलली.

"हां हां, दाखवीनच! माझं नक्कीच ऐकेल माझी नात!" आजीनेही ग्वाही दिली.

यावर काहीच न बोलता नितूची आई तिथून निघून गेली.

आजी नातीला म्हणाली–"नितू, आईच्या साडीला इस्त्री करून दिलीस ना, तर ती तुला रेशमी परकर-पोलकं शिवून देईल बघ!"

आजीचे बोलणे ऐकून नितूला आश्चर्य वाटले. तरीही ती म्हणाली–"छे, आई मुळीच कबूल व्हायची नाही." तिच्या या शंका घेण्याला हसून आजीने तिला आपल्या जवळ बोलावले आणि एक उपाय सांगितला. आता आजी आणि नात विचारात पडल्या, की आपली कल्पना अमलात कशी आणायची?

इतक्यात शेजारच्या राणीची आई नितूच्या आईकडे आली आणि तिला म्हणाली–"चल आपण एखाद्या साड्यांच्य



दुकानात जाऊ या. एक रेशमी साडी घ्यायचीय मला. साखरपुड्याला जाण्यासाठी चांगलीशी साडी नाही माझ्याकडे."

नितूच्या आईने आश्चर्याने तिच्याकडे पहात विचारले–"अग काय म्हणतेस तू? गेल्या महिन्यातच तर एक चांगली भारी रेशमी साडी घेतली होतीस की तू!"

यावर उदास चेहरा करीत राणीची आई म्हणाली–"माझी मुलगी बरेच दिवस रेशमी परकरपोलकं मागत होती अन् मी चालढकल करत राहिले होते. गेल्या महिन्यात घेतलेली ती साडी इस्त्री करता करता जाळून ठेवली बघ तिने!"

आश्चर्याने नितूची आई म्हणाली–"म्हणजे काय, मुद्दाम जाळली तिने? असं करून काय फायदा तिचा?"

"प्रथम मलाही काही कळलं नाही. पण मग त्या साडीचं परकर-पोलकं शिवलं मी तिला, तेव्हा आपल्या मैत्रिणीला ती म्हणत होती की यासाठीच तिने मुद्दाम साडी जाळून ठेवली होती." राणीच्या आईने माहिती पुरवली.

यावर नितूची आई आश्चर्यचकित झाली! ती म्हणाली–"ठीक आहे, दुपारी जाऊ आपण साड्यांच्या दुकानात."

राणीची आई निघून गेल्यावर नितू आईजवळ आली अन् म्हणू लागली–"आण तुझी साडी इकडे, मी इस्त्री करून देते."

यावर आई रागावून नितूला म्हणाली–"ओहो! मला इतकी भोळी समजू नकोस, की तुझ्या मनातलं मला काही कळतंच नाही! इस्त्री करताना माझी साडी जाळून ठेवलीस तरीही मी काही तुला त्या साडीचं परकर-पोलकं शिवून देणार नाही, सांगून ठेवतेय!"

हे ऐकून नितू दचकलीच! पण तिला किंवा तिच्या आजीला काही केल्या कळेना, की आपलं हे गुपित नितूच्या आईला कळलंच कसं! राणीची आई अन् नितूची आई यांच्यात झालेला संवाद त्यांना कुठं ठाऊक होता?





# श्रीजगन्नाथाचा इतिहास

काही तासांच्या घोड-दौडीनंतर विद्यापति जंगलातून बाहेर पडला. एका विशाल मैदानात पोचला. झाडे-झुडपे नि हिरवेगार गवत यांनी ते मैदान खूप सुंदर दिसत होतें. आपण जे काम करण्यासाठी निघालो त्यात यश मिळाल्यामुळे विद्यापति फार खुश होता. एका झऱ्याजवळ तो घोड्यावरून खाली उतरला नि एका दगडावर बसला. ललिताने दिलेले काही खाद्य-पदार्थ खाल्ले. थोडा वेळ विश्रांति घेऊन लगेच तो राजधानीकडे निघाला.

संध्याकाळ होईपर्यंत तो राजधानीत पोचला नि राजवाड्याकडे जायला निघाला. राजाच्या एका सेवकाने दुरूनच विद्यापतीला पाहिलं, आणि त्याच्या आगमनाची वार्ता राजाला दिली. राजाला फार आनंद झाला आणि विद्यापति भेटताच राजाने त्याला विचारले–"तुझ्या परत येण्याची आम्ही कित्येक दिवस वाट पहात आहोत. यशस्वी होऊन आलास की नाही आपल्या कामात?"

"ज्या दिव्य मूर्तीच्या शोधार्थ मी गेलो होतो ती मी घेऊन आलो आहे असं मला वाटतं. तरी पण......" आणखी काही सांगण्याचा विद्यापति प्रयत्न करीत होता, पण राजाने त्याला संधीच दिली नाही बोलायला!

"शंका नि संदेह यांना मनात थारा देऊ नकोस. मोठमोठी कामं करण्यासाठी जीवनात अनेक संकटांना सामोरं जावं लागतं. हे महान् नि पवित्र काम करताना

३. मूर्तीची प्रतिष्ठापना



तुला कोण-कोणत्या अडचणी आल्या सांग बरं! अडचणींचं निवारण करण्यासाठी मी संपूर्ण साह्य करीन तुला." राजाने आश्वासन दिले.

"माझी अडचण तर माझी स्वतःची आहे. दुसऱ्या कोणाला ती दूर करता येणार नाही. ज्या दिव्य मूर्तीच्या शोधात मी गेलो होतो, ती मी चोरून आणली या गोष्टीचं मला फार फार दुःख आहे." विद्यापतीने आपली व्यथा सांगितली.

असला विचार करणं ताबडतोब सोडून दे, विद्यापति. आपण जे काम करीत आहोत, ते एक महान् पवित्र कार्य आहे. हे पवित्र काम करीत असताना जर कुणाचं काही नुकसान झालं तर ते स्वाभाविक आहे. म्हणून तुला दुःख करण्याचं काही कारण नाही. हं, एक गोष्ट तू मला सांग. मी स्वप्नात असं पाहिलं की उद्या सकाळ पर्यंत समुद्रातून एक ओंडका वहात येईल. हा एक दैवी संदेशच आहे. हा ओंडका तासून, त्याच्यावर नक्षीकाम करून एक परमेश्वराची मूर्ति आपण बनवू या. तू जी मूर्ति घेऊन आला आहेस, तिच्यात भगवान् विष्णुचा अंश आहे. आहे न? या मूर्तीला आपण ओंडक्यांतून बनविलेल्या मूर्तीत सुरक्षित ठेवू या.

दुसऱ्या दिवशी सूर्योदयापूर्वी एक तास राजा सपरिवार विद्यापति सह समुद्र किनारी पोचला. सूर्योदय होऊ लागला, तसा आनंदातिशयाने राजा उद्गारला—"तो पहा ओंडका! तुम्ही सर्व जण पहात आहात ना? पहा, लाटांवर तरंगत येत आहे तो!"

लगेच दहा नावा त्या दिशेने निघाल्या. नावेत बसलेले लोक त्या ओंडक्याला किनाऱ्याकडे ढकलू लागले. पण तो ओंडका जरा ही हलेना. लोकांनी त्याला ढकलण्याचा खूप प्रयत्न केला, पण तो एक इंच भर सुद्धा हालला नाही.

आता राजा मनात उदास झाला. विद्यापति नि तिथे उपस्थित असलेल्या राजसेवकांपैकी कोणाला ही काही सुचेना की ही समस्या कशी सोडवावी? राजाने मनांतल्या मनात निश्चय केला—जोपर्यंत हा





ओंडका समुद्र-किनाऱ्यापर्यंत येत नाही तोवर इथून परत फिरायचं नाही.

संध्याकाळ झाली. रात्र झाली. महाराणी गुंडिचादेवी सोन्याच्या पालखीत बसून सागर-तीरी आली आणि राजाला भेटून तिने विचारलं—"स्वामी, सकाळ होईपर्यंत आपण असे इथेच राहणार कां?"

"देवी, मी काय करावं हेच माझ्या लक्षात येत नाही!" असं म्हणून राजाने क्षण भर डोळे मिटून घेतले. थोडा विचार केला. समुद्राकडे पहात राजाने आदेश दिला—"पुरे, आता काम थांबवा!" मग राजाने विद्यापतीला आपल्या जवळ बोलवलं नि म्हणाला—"आज पर्यंत जो महापुरुष या मूर्तीची पूजा करीत आला त्याच्याकडे मला घेऊन चल."

विद्यापति पुढे झाला. राजा सपरिवार त्याच्या मागे चालू लागला. भीलनायक विश्वावसूला भेटण्यासाठी सर्व जण निघाले.

भिल्लांच्या गावात सर्वत्र निराशामय शांततेचे साम्राज्य पसरलेले होते. रोजच्या प्रमाणे विश्वावसू भल्या पहाटे उठून गुहेत गेला. ज्या परमेश्वराच्या मूर्तीची पूजा करायची ती तेथे नसल्याचे त्याच्या लक्षात आले. मूर्ति विद्यापतीने चोरून नेली असा ताबडतोब त्याने तर्क केला.

थोड्याच वेळात तो घरी परत आला आणि 'मुली, हे काय केलं तुझ्या नवऱ्याने?' असं ललिताला विचारीत असतानाच तो कोलमडला. ललिता रडत वडिलांना घेऊन आत गेली. त्यांच्या चेहऱ्यावर पाणी शिंपडलं. थोड्या वेळात विश्वावसु शुद्धीवर आला. डोळे उघडून त्याने चारी बाजूंना पाहिलं. आणि पुन्हा डोळे मिटले. अपार दुःखाची छटा त्याच्या चेहऱ्या वर स्पष्ट दिसत होती.

दुसऱ्या दिवशी विश्वावसु पुन्हा गुहेत जाऊन खिन्न अंतःकरणाने तेथे बसून राहिला. नातेवाईक त्याला सांत्वना देत राहिले. दुपारच्या वेळी एक भिल्ल युवक धावत पळत लेण्यापाशी आला आणि त्याने बातमी दिली—"डोंगरावरून काही लोक आपल्या गावाकडे येत आहेत. त्यात आपले महाराजा पण आहेत!"



हे ऐकून सर्वांनाच आश्चर्य वाटलं!

थोडया वेळात आणखी एक भिल्ल युवक पळत आला नि त्याने खबर दिली– "आपल्या गांवाकडे जे लोक येत आहेत. त्यात विद्यापति पण आहे!"

"वा रे वा, आमची दिव्य मूर्ति चोरून घेऊन गेला. एवढयाने समाधान नाही झालं का? आता आमचं सर्वस्व लुटायला आलांय काय?" एक वयस्कर माणूस म्हणाला.

एका वृद्ध माणसाने तर्क केला–"नाही नाही, असं नसेल! महाराजा स्वत: आले आहेत, तेव्हां जरूर काही तरी खास गोष्ट असली पाहिजे. आपल्या नेत्याशी बोलण्यासाठींच महाराज आले असले पाहिजेत."

विश्वावसु लेण्यातून बाहेर आला. राजा येत असल्याचं त्याने दुरूनच पाहिलं. विश्वावसु दोन्ही हात जोडून दगडासारखा उभा राहिला. राजा सरळ विश्वावसूच्या जवळ आला आणि आपल्या बाहुपाशात त्याला घेऊन म्हणाला–"मित्रा, तुझा जावई चोर नाही, चोर तर मी आहे. क्षमा कर मला!"

हे ऐकून सर्वांनाच आश्चर्य वाटलं, ते राजाकडे पाहू लागले.

विश्वावसूने डोळे पुसले नि राजाला एका शिलाखंडावर बसण्याची विनंती केली. राजाने शिळेवर बसून एकदा बारकाईने विश्वावसूकडे पाहिले. आणि म्हणाला–"विश्वावसु, मी जे सांगतो ते नीट शेवटपर्यंत ऐक. परमेश्वराच्या प्रेरणेने मी स्वत: जगन्नाथपुरीच्या समुद्र-किनाऱ्या-वर एक नवीन मंदिर बनवलं आहे. या मंदिरात परमेश्वराच्या ज्या मूर्तीची प्रतिष्ठापना करायची तिच्या शोधार्थ मी काही पंडितांना पाठविलं. म्हणून विद्यापतीने मूर्तीची चोरी केली."

नंतर राजाने विश्वावसूला विनंती केली–"तुझ्या वंशातील लोक पिढयान् पिढया या मूर्तीची पूजा करीत आले! येथून पुढे ही अनेक भक्तांनी या मूर्तीची पूजा करावी अशी परमेश्वरी योजना दिसते. एका दैवदत्त लाकडी ओंडक्यातून बनवलेल्या मूर्तीत तुझी ही दिव्य मूर्ति मी सुरक्षित ठेवू इच्छितो. यासाठी मला तुझी स्वीकृति पाहिजे. अनेक भक्तांना सेवा करता यावी म्हणून आपल्या वंशाची ही दिव्य मूर्ति पुरीच्या मंदिरात प्रतिष्ठापित करण्यास तू आनंदाने स्वीकृति द्यावीस अशी मी तुला प्रार्थना करतो."

विश्वावसूने मूकाटयाने अनुमति दिली. मग राजाने समुद्रात तसू भर न हालणाऱ्या ओंडक्याची गोष्ट सांगून म्हटलं–"तू या दिव्य मूर्तीचा प्रिय भक्त आहेस. म्हणून तुझ्या हस्तेच या मूर्तीची प्रतिष्ठापना व्हावी अशी परमेश्वराची इच्छा आहे. माझी पण अशी इच्छा आहे की तू आत्ता माझ्या बरोबर चलावंस नि त्या ओंडक्याला स्पर्श करून आमच्या कार्यात मदत करावीस. हे दैवी कार्य पूर्ण करण्याच्या कामी तुझे सहकार्य मिळेल असा मला विश्वास आहे."

विश्वावसु अमळ मौन राहिला आणि मग म्हणाला–"महाराज, आपली इच्छा मी आज्ञेसमान मानतो. मी आपल्या बरोबर यायला तयार आहे."

हे ऐकून राजाचा उत्साह वाढला. आपल्या डोक्यावरचं ओझं अमळ हलकं



झाल्यासारखं त्याला वाटलं. आनंदातिशयाने त्याने पुन्हा एकदा विश्वावसूला आलिंगन दिलं. मग ललिताकडे पाहून राजा म्हणाला– "बेटा, तुझ्या पतीने जे काही केले त्याबद्दल वाईट वाटून घेऊ नकोस. एक महान् कार्य सिद्ध करण्यासाठी त्याने तुला न सांगता मूर्तीची चोरी केली. मला चांगलं माहीत आहे की त्याने जे काही केलं त्याबद्दल त्याला अत्यंत पश्चात्ताप झालेला आहे."

त्याच वेळी ललिता नि विद्यापतीने एकमेकांकडे पाहिलं. विद्यापति म्हणाला– "परमेश्वराचं कार्य करीत असता मी तुझ्यापासून एक गोष्ट लपवली. मला क्षमा कर. मी लवकरच परत येईन नि



तुला राजधानीला घेऊन जाईन. दिलेला शब्द मी परत घेणार नाही. थोडा धीर धर!'

हे शब्द ऐकून ललिताच्या डोळ्यात अश्रू भरून आले. कसं तरी तिनं आपलं दुःख आवरलं.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी राजा सपरिवार विश्वावसू सह समुद्र-किनारी पोचला. विश्वावसु नावेत बसला नि समुद्रात थोडं अंतर जाऊन त्याने भक्तिभावे लाकडाच्या ओंडक्याला स्पर्श केला. लगेच तो ओंडका आपला आपण तरंगत किनाऱ्या जवळ आला. हे पाहून तेथील उपस्थित सर्व लोकांना फार आनंद झाला. राजाच्या तर आनंदाला पारावार राहिला नाही. राज-सेवकांनी तो ओंडका राजवाड्यात आणला. पुढील दिवशी सकाळी राजाने मूर्तिकार व दरबारी शिल्पकांना बोलवून विचारलं– "या ओंडक्यांतून कोणती दैवी मूर्ति बनविणं शुभदायक होईल?"

तेव्हा नम्रतापूर्वक मूर्तिकार राजाला म्हणाले–"प्रभु! दगडांतून देवी-देवतांच्या मूर्ति घडविणं आम्ही जाणतो. पण या लाकडांतून परमेश्वराची मूर्ति तयार करणं आम्हाला शक्य नाही. या कामाचा आम्हाला अनुभव नाही."

त्याच वेळी एक म्हातारा माणूस तेथे आला. त्याने राजाला निवेदन केलं– "राजन्, आपण बनविलेल्या या मंदिरात बलभद्र व सुभद्रा यांच्या सह श्रीकृष्णाच्या रूपात परमेश्वराने विराजमान व्हावे असा दैवी संकल्प आहे. या मंदिराची हीच विशेषता राहील. आपण अनुमति दिली तर मी हे पवित्र कार्य स्वीकारून मूर्ति बनवून देईन. पण माझी आपणास एक प्रार्थना आहे. मी हे सर्व काम एकान्तात करीन. माझी हत्यारे नि हा ओंडका घेऊन मी जेथे काम करीन, तेथे कोणी ही येऊ शकणार नाही. दारे बंद करून एकांतात बसून मी हे काम करीन. काम पूर्ण झाल्यावर मी दरवाजे उघडीन. दरम्यानच्या काळात कोणी माझ्या जवळ येता कामा नये. कोणी मला बोलवायचं ही नाही. मला संपूर्ण एकांत पाहिजे."

राजाने आश्चर्याने विचारले–"मग आपल्या खाण्यापिण्याची व्यवस्था काय करायची ?"

"आपण ही काळजी करणे नलगे, राजन् ! काम संपपर्यंत भूक-तहान वगैरे काही नाही !" वृद्ध म्हणाला.

वृद्धाचं म्हणणं राजाने मान्य केलं. राजवाड्यातील एका विशाल कक्षात वृद्धाने आपले काम सुरू केले, दरवाजे बंद केले गेले; आतून येणाऱ्या आवाजावरून समजत होतं की आत काम चालू आहे. महाराणी गुंडिचादेवी बाहेरून दाराला कान लावून काम चालू असल्याचे ऐकत होती. छिन्नी व हातोडी यांचा आवाज बाहेर स्पष्ट ऐकू येई. याप्रमाणे रोज आवाज ऐकू येत असे.

एक दिवशी खोलीतून आवाज येईनासा झाला. दुसऱ्या दिवशी पण आवाज आला नाही. वृद्ध तहान-भूक यांची पर्वा न करता काम करीत होता, काय अवस्था असेल त्याची असा विचार करून गुंडिचादेवीला फार दुःख झालं म्हणून राणीने तावडतोब दरवाजे उघडले, आत वाकून पाहिलं.

वृद्ध लाकडातून ध्यानपूर्वक मूर्ति बनवीत होता. राणीला पाहताच वृद्ध राजवाड्यातून बाहेर पडला नि अदृश्य झाला. अशा रीतीने देवी-देवतांच्या मूर्ति अपुऱ्याच राहून गेल्या. सर्वांना असं वाटलं की देवतांचा शिल्पकार विश्वकर्मा स्वतःच या वृद्धाच्या रूपात आला होता. राणीला आपल्या चुकीबद्दल फार पश्चात्ताप झाला. राजाने विचार केला–जे व्हायचं ते झालं ! विद्यापतीने आणलेली मूर्ति श्रीकृष्णाची मूर्ति म्हणून प्रतिष्ठापित केली गेली. तिच्याच बरोबर बलभद्र व सुभद्रा यांच्या मूर्ती ही स्थापण्यात आल्या. विद्यापतीचे वंशज या मंदिराचे पुजारी म्हणून काम करतील अशी राजाने घोषणा केली. या दिवसापासून श्री जगन्नाथाचे मंदिर आपल्या देशांतील प्रसिद्ध विष्णु-मंदिरां पैकी एक म्हणून गणले जाऊ लागले. (समाप्त)





# बुद्धिमान

फार प्राचीन काळची गोष्ट आहे. स्पेन देशात एक उमदा तरूण रहात असे. त्याचं नाव पेड्रोशॉन. तो खरंच अकलेचा पुतळा होता. त्या देशातील काही साहसी खेळाडू चांगल्या तगड्या बैलांशी झुंज देऊन लोकांचे मनोरंजन करीत असत. काही तरूण मंडळी या घष्टपुष्ट बैलांना प्रथम भाल्यांनी घायाळ करीत. अशा रीतीने भडकावलेले हे बैल रागाने शिंग खुपसण्यासाठी खेळाडूं वर धाऊन येत. ऐन वेळेला बुद्धिमान खेळाडू उंच उडी मारून एकाद्या झाडाची फांदी पकडून आपला प्राण वाचवीत असे. अशा वेळी तो माकडासारखाच दिसे, म्हणून लोक त्याला 'बुद्धिमान माकड' या नावाने पुकारत असत.

पेड्रोला निरनिराळ्या देशात भटकन्ती करून तिथल्या अजब गोष्टी पाहण्याची भारी हौस ! पण त्याला अशी संधि मिळत नसे. अचानकपणे एका खलाशाशी त्याची गट्टी जमली. मग याच खलाशाच्या मदतीने पेड्रो समुद्री सफरीसाठी निघाला आणि काही दिवसात चीन देशात पोचला.

त्या काळी चीन देशावर एका महाराणीचं राज्य होतं. तिच्या लांब-सडक काळ्याभोर केश-कलापांत एक दिवशी चांदीच्या तारेसारखा एक पांढरा केस दिसू लागला.

महाराणीच्या सख्या गमतीने म्हणाल्या– "महाराणीजी, काल रात्री आपल्याला परमेश्वराने एक चांदीची तार बहाल केली आहे."

लगेच महाराणीने आरशात पाहिलं. खरंचच तो पिकलेला केस चांदीच्या तारे-सारखा चमकत होता. अमळ विचार

स्पेनची एक लोककथा



करून महाराणीने तावडतोब ज्योतिषांना बोलवणे धाडले.

एकदम एका तरूण ज्योतिषाच्या मनात एक विचार आला. तो नम्रतापूर्वक महाराणीला म्हणाला–"महाराणीजी, मला एक गोष्ट सुचली आहे. पण ती आपणास सांगताना मला फार दुःख होत आहे!"

"वाईट वाटून घेऊ नकोस. अगोदर सांग तर काय ते!" महाराणी म्हणाली.

जरा घाबरत ज्योतिषी म्हणाला–"आपल्या केसात ज्या दुष्ट आत्म्याने प्रवेश केलेला आहे, त्यामुळे आपल्या दातांत भयंकर वेदना सुरू होतील!" हे सांगत असताना तो युवक ज्योतिषी खरोखरच रडू लागला.

त्याला रडताना पाहून महाराणीचे डोळे ही पाणावले. महाराणीने लगेच आपल्या गळ्यातील मोत्यांची माळ काढून तरूण ज्योतिषाला दिली.

सर्व ज्योतिषी तेथून निघून गेले. महाराणीवर येऊ घातलेल्या संकटाची वार्ता ऐकून राजपरिवारातील जवळच्या व दूरच्या सर्व नातेवाईकांना अत्यंत दुःख झालं.

याच वेळी पेड्रो राजधानीत पोचला. तो जेव्हां राजमहालाच्या जवळ आला, तेव्हा लोकांच्या रडण्याचा आक्रोश त्याने ऐकला. महाराणीवर आलेल्या आपत्तीची वार्ता जाणून सर्व नोकर-चाकर ओक्सा-बोक्शी रडत होते.

पेड्रोशॉन आपल्या विचार-तन्द्रीत राज-मार्गावरून चालला होता. अचानक हा आक्रोश ऐकून तो घाबरला. त्याच्या लक्षात आलं की मागून एक बैल धावत येत आहे व तो त्याला आपल्या शिंगांनी मारणार. त्या बैलापासून आपला बचाव करण्यासाठी पेड्रो राजमहालाच्या एका मोठ्या खिडकीवर टुणकन उडी मारून चढला. तिथे एक शिपाई पहारा करीत होता. त्याला वाटलं पेड्रो कोणी चोर-उचल्या असावा, त्याने त्याला पकडलं नि दिवाणाच्या पुढे हजर केलं. वृद्ध दिवाणाला काही विदेशी भाषा थोडच्या-फार येत होत्या. म्हणून पेड्रोशी त्याला काही बोलता आलं. मोडक्या-तोडक्या का होईना, पण पेड्रोच्या भाषेत दिवाण बोलू लागला.

दिवाणाने पेड्रोला विचारले–"कुठल्या देशाहून आलास तू? नाव काय तुझं?"

पेड्रो थोडा घाबरला. सगळ्या प्रश्नांचं एकच उत्तर त्याने दिले-"बुद्धिमान माकड!"

बुद्धिमान शब्दावरून दिवाणाच्या लक्षात आलं की हा तरूण हुशार आहे. म्हणून त्याने पेड्रोला विचारलं–"तू हुशार आहेस ना? आमच्या महाराणीवर जे संकट आलं आहे, त्यापासून तिला मुक्त करशील?"

पेड्रोने आश्चर्याने विचारले–"महाराणी-वर संकट आलंय! कोणतं बरं?" दिवाणाने त्याला सर्व समजून सांगितलं. पेड्रो मोठ्या उत्साहाने म्हणाला–"हात्तिच्या! यात काय एवढं मोठंसं? मी आपल्याला विश्वासपूर्वक सांगतो की असल्या संकटाचं निवारण मी चुटकी सरशी करू शकतो."

हे ऐकून दिवाण एकदम खुश झाला.

मग दिवाण पेड्रोला महाराणीकडे घेऊन गेला. त्याने सांगितलं–"महाराणीजी, हा जवान जगातील फार प्रसिद्ध बुद्धिमान आहे. आपल्या भाग्याने हा इथं आला आहे."

याचेळी पेड्रोने महाराणी पुढे साक्षात् लोटांगण घातलं. महाराणी त्याला





म्हणाली–" जगप्रसिद्ध बुद्धिमान माणसा, आता तू ऊठ ना!"

महाराणी जे म्हणाली ते काही पेड्रोला समजलं नाही. तशाच अवस्थेत पडून राहून पेड्रोने दिवाणाला विचारलं– "दिवाणजी, महाराणी साहेब काय बरं म्हणताहेत?"

दिवाणाने पेड्रोला उत्तर दिलं– "महाराणी म्हणताहेत, उठू नकोस. असाच पडून रहा. डोकं वर करशील तर ते कापून टाकलं जाईल!"

महाराणीने दिवाणाला विचारलं– "दिवाणजी, हा बुद्धिमान परदेशी काय सांगत आहे?"

"महाराणीजी, हा म्हणतो आहे- आपणावर आलेलं संकट हा एका क्षणात पळवून लावील." दिवाणाने सांगितले.

महाराणी म्हणाली–"असं असेल तर आता उशीर का करता? त्याला सांगा की त्याने आपला उपाय ताबडतोब सुरू करावा."

दिवाणाने पेड्रोला तसं सांगितलं. पेड्रो मोठ्या उत्साहाने लगेच उठला. नम्रतापूर्वक राणीच्या जवळ गेला आणि मऊशार काळ्याभोर केसातून तो पांढरा केस आपल्या हातात पकडला. नाजुकपणे त्याने तो केस उपटला आणि जाहिर केलं की आता महाराणी वर आलेलं संकट टळलं आहे. पांढरा केस उपटताना पेड्रोने आपल्या भाषेतील काही मंत्रवजा शब्द उच्चारले. म्हणून सर्वांना वाटलं की महाराणी वरचं संकट अवश्य टळलं आता. दिवाणाने महाराणीला जेव्हा ही वार्ता सांगितली, तेव्हा सर्वांचे चेहरे खुलले.

महाराणीला तर फारच आनंद झाला. ती दिवाणाला म्हणाली–"दिवाणजी, हा तरूण खरोखरीच मोठा बुद्धिमान दिसतो आहे. अशा बुद्धिशाली माणसाला आपण सोडून देणं बरं नव्हे. आजच या बुद्धिमान तरुणाला तुमच्या जागी दिवाण म्हणून मी नियुक्त करू इच्छिते. आजपासून आपण कार्यमुक्त झाला आहात. आपल्या राज्याच्या रिवाजानुसार आपणास फाशी देण्याची सुरेख व्यवस्था झाली पाहिजे, त्याची अविलंब व्यवस्था करा आता. आपल्या आत्म्याला शांति मिळावी यासाठी दहा हजार पुजाऱ्यांनी पूजा-पाठ केला पाहिजे. ताबडतोब सर्व व्यवस्था करा आता.

हे सर्व ऐकून दिवाणजीच्या सर्व अंगाला दरदरून घाम सुटला. शेवटी झालं काय हे पेड्रोच्या लक्षात येईना, म्हणून त्याने दिवाणजीना विचारलं–"दिवाणजी, काय बरं घडलं? मला सांगाल?"

दिवाणाने पेड्रोला सर्व समजाऊन सांगितलं. त्यांनी हे ही सांगितलं की या देशाच्या प्रथेनुसार नवीन दिवाण आला की जुन्याला फाशी देण्यात येते.

हे ऐकून पेड्रोने अमळ विचार केला नि म्हणाला–"दिवाणजी, आपण उगाच घाबरत आहात. महाराणीला असं सांगा की त्यांनी आपणास उपदिवाण बनवावे, तरच मी दिवाण व्हायला तयार आहे. अन्यथा नाही."

पेड्रोची सूचना ऐकून दिवाणाच्या जिवात जीव आला, आणि त्याने पेड्रोचं म्हणणं महाराणीला सांगितलं.

"ठीक आहे! हा महान बुद्धिमान माणूस म्हणत असेल तर आपण आपली प्रथा मोडून टाकू या. दिवाणाला फाशी देण्याची आमच्या राजपरिवाराची सुप्रसिद्ध प्रथा आजपासून बंद केल्याची घोषणा आम्ही करीत आहोत!" महाराणीने जाहिर केलं.

"महाराणीजी, आपले कसे आभार मानावेत हेच समजत नाही!" म्हणत दिवाणाने महाराणी पुढे साष्टांग नमस्कार घातला.

अशा रीतीने पेड्रोशॉन चीनचा दिवाण बनला. त्याने एका सुंदर चीनी मुलीशी लग्न ही केले. आणि अनेक वर्षे बुद्धिमान दिवाण बनून ऐष-आरामात आपले सर्व आयुष्य घालविले.



# धन्द्यातली मख्खी

**मो**तीराम नावाचा एक व्यापारी होता. आपल्या तुपाच्या व्यापारात त्याने चांगले घबाड कमावले होते. त्याला दोन मुलगे होते. मरणापूर्वी आपल्या दोन्ही मुलांना जवळ बोलावून मोतीराम आपल्या धन्द्याबद्दल त्यांना सांगू लागला–"पहा मुलांनो, कोणत्याही व्यापारात एकाद्याने फसवा-फसवी किंवा अप्रामाणिकपणा केला तर त्याला धन्द्यात कधीही बरकत येणार नाही. तुम्ही कधीही कोणाशी लबाडी करू नका किंवा कोणाचा विश्वासघातही करू नका. हे सांभाळलंत की धन्द्यातले बारकावे तुम्हाला आपोआप कळू लागतील हळूहळू."

थोड्याच दिवसात मोतीरामने 'राम' म्हटला. आता त्याचा मोठा मुलगा मोटू आणि धाकटा लहानू तुपाचा व्यापार करू लागले. लहानूचा धन्दा छानच चाले. पण थोरल्याची स्थिति अगदी उलट होती. त्याची गिन्हाइकं दिवसेंदिवस कमी कमी होऊ लागली.

एके दिवशी मोटू आला लहानूकडे; अन् त्याने विचारले–"लहानू, अरे आपण दोघंही अगदी एकाच प्रकारचं तूप विकतो की नाही? मग तुझ्याच दुकानात गिन्हाइकांची खूप गर्दी होते अन् माझी गिन्हाइकं मात्र घटत चालली आहेत, असं का बरं होतं?"

यावर हळूच हसत लहानू म्हणाला–"दादा, याचं खास असं काहीच कारण नाही. जरा त्या पिपांकडे नजर टाक बरं!" असे म्हणून हंडपाजवळच्या तुपाच्या पिपांकडे त्याने बोट दाखवले. त्या पिपांवर तुपाच्या भावाची लेबलं चिकटवलेली होती–'तीस रुपये.'

"अरे, हे रे काय लहानू? एकोणतीस रुपयांचं तूप तू तीस रुपयांनी का विकतो आहेस? ही तर लबाडी झाली ना?" थोरल्याने दचकून विचारले.

अरे दादा, तुला वाटतंय की ही लबाडी आहे; पण लोक तर समजतात की मी मोठा विश्वासू व्यापारी आहे. एक रुपया भाव वाढवल्यामुळे लोकांना वाटत आहे की माझ्याकडचं तूप जास्त चांगलं असलं पाहिजे. इतकंच नव्हे तर हे लोक तर माझ्या प्रमाणिकपणाची स्तुतिही करत असतात." लहानूने आपल्या धन्द्यातली मख्खी थोरल्याला सांगून टाकली.





# नवा अमलदार

**त्या** काळी कर्नाटकावर चामुण्डराय राज्य करीत असे. त्याचा एक गुंडप्पा नावाचा राज-पुरोहित होता. राज-परिवारातील पूजा, व्रते यांसारखी धार्मिक कार्ये आपल्या देखरेखीखाली गुंडप्पा फार व्यवस्थितपणे पार पाडी. राजाचं त्याच्यावर खास प्रेम होतं.

एक दिवशी राजा गुंडप्पाला म्हणाला–"गुंडप्पा, आज पर्यंत तू आमचे सर्व धार्मिक विधि योग्यतापूर्वक संपन्न करीत आलास. मी तुझ्या कामावर खुश आहे. तुझ्या मनात काही विशेष इच्छा असली तर सांग मला. मी तुझी इच्छा-पूर्ति करीन."

यावर गुंडप्पा म्हणाला–"महाराज, तसा तर मी सुखी आहे. पण फार दिवस मनात एक इच्छा आहे की एकदा जिल्ह्याचा अंमलदार बनून लोकांवर सत्ता गाजवावी. आपणास काही अडचण नसेल तर एवढी माझी इच्छा पूर्ण करावी आपण!"

मंदस्मित करीत राजाने आश्वासन दिले–"ठीक आहे, करीन एकदा तुला अंमलदार!"

त्या काळात देवगिरि जिल्ह्यावर अंमलदाराची नेमणूक करायची होती, राजाने त्या जागी गुंडप्पाची योजना केली.

गुंडप्पा चांगला शिकला-सवरलेला होता, ज्ञानी पण होता. म्हणून राजाला वाटलं की तो आपली जबाबदारी योग्यतापूर्वक पार पाडील. तरी पण गुंडप्पाला शासन संबंधी कामांचा फारसा अनुभव नसल्यामुळे राजाला त्याला काही महत्त्वाच्या सूचना द्याव्याशा वाटल्या. म्हणून राजाने त्याला खालील सूचना दिल्या.

अंमलदाराने नेहमी इतरांपासून आपलं तोंड काळं केलं पाहिजे. (म्हणजे लोकांपासून

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट



दूर राहिलं पाहिजे. कोणाशी दोस्ती नको, कोणाशी घनिष्ट संबंध नको.)

अंमलदाराने नेहमी इतरांचे कान पकडायला पाहिजे. (म्हणजे बारीक-सारीक चुकांबद्दल ही सेवकांना माफी करू नये, किरकोळ शिक्षा देऊन त्यांना सचेत केले पाहिजे.)

अंमलदाराच्या हाती सर्वांच्या शेंड्या असल्या पाहिजेत. (म्हणजे अंमलदाराने सर्वांना आपल्या ताब्यात ठेवले पाहिजे. सर्वांचे दोष जाणले पाहिजेत, अशा साठी की योग्य वेळी त्यांना फैलावर घेता येईल.)

राजाने थोडक्यात ज्या सूचना दिल्या त्या लक्षपूर्वक ऐकून गुंडप्पाने राजाला आश्वासन दिले—"समजलं महाराज, आपण सांगितलं तसंच करीन अगदी!"

मग नियुक्ति-पत्र घेऊन नवा अंमलदार गुंडप्पा मोठ्या आनंदाने घरी गेला. गुंडप्पा गेल्यावर राजाने देवगिरीकडे खबर पाठवली की जिल्ह्यासाठी एका नवीन अंमलदाराची नियुक्ति केलेली आहे आणि उद्याच नवा अंमलदार कार्य-सूत्रे आपल्या हाती घेईल.

देवगिरीच्या राज-सेवकांना आनंद झाला. नव्या अंमलदाराचे स्वागत करण्यासाठी त्यांनी सर्व व्यवस्था केली. नगर सीमेवर नवीन अंमलदाराच्या स्वागतासाठी ते आले नि वाट पाहू लागले.

नवीन अंमलदार झालेला गुंडप्पा सकाळीच निघाला होता. आपलं धोतर, अंगपुसणे वगैरे कपडयांचं गाठोडं त्याने डोक्यावर घेतलं होतं. तो पायीच निघाल्यामुळे आरामात देवगिरीला पोचायला त्याला चांगलाच उशीर झालेला होता.

स्वागत सत्कारासाठी नगरा बाहेर सकाळ पासून येऊन थांबलेले राज-सेवक कडक उन्हात बिचारे त्रस्त झाले. पण नवीन अंमलदाराचा तर पत्ताच नव्हता.

दुपारच्या वेळी जेव्हा त्यांनी गुंडप्पाला पाहिलं तेव्हां त्यांना वाटलं की नवीन अंमलदाराबाबत काही बातमी हा आपणास देऊ शकेल, कारण तो राजधानीच्या मार्गाने आलेला होता.

एका अधिकाऱ्याने गुंडप्पाजवळ जाऊन विचारलं—"पंडितजी, आम्ही नव्या अंमलदाराची वाट पहात आहोत. तुम्हाला त्यांच्याबद्दल काही माहीत असलं तर सांगाल?"

गुंडप्पाने डोक्यावरचं गाठोडं खाली ठेवलं, कडोसरीला हात घातला नि आरामात चंचीतून आपलं नियुक्ति-पत्र बाहेर काढलं. त्या अधिकाऱ्याच्या हाती आपलं नेमणूक-पत्र दिलं.

असल्या माणसाला राजाने अंमलदार कसं बनवलं याचं सर्वांनाच आश्चर्य वाटलं. जेवण झाल्यावर गुंडप्पाने सर्व अधिकाऱ्यांची चौकशी केली नि त्यांना कामावर जायला सांगितलं.

सर्व अधिकारी आपापल्या कचेरीत निघून गेले. नव्या अंमलदार गुंडप्पाने राजाने दिलेल्या सर्व सूचना स्मरणात ठेवल्या होत्या. लगेच त्यांची अंमल-बजावणी करायची होती त्याला. राजाच्या सूचनांचा नीट अर्थ समजून घेण्याचा त्याने प्रयत्न केला नाही.

त्याला वाटलं, तर राजाच्या सूचनेनुसार आपलं तोंड काळं केलं पाहिजे. पण ते कसं करावं हे त्याच्या लक्षात येईना. त्याने एक



उपाय केला, काजळ मागवलं नि ते फासून आपलं तोंड काळं करून घेतलं! आणि अशा अवतारात तो कचेरीत गेला. सर्व राज-सेवक हे रूप बघून अमळ घाबरले. थोडी गडबड झाली. निरुपायास्तव गप्प बसले. शेवटी हे सगळे चाळे करणारा कोणी सामान्य माणूस नव्हता, जिल्ह्याचा अंमलदार होता तो!

राजाची दुसरी सूचना होती—दुसऱ्यांचे कान पकडावेत. नवीन अंमलदार गुंडप्पाने एका सेवकाला आपल्याकडे बोलवलं. अंमलदाराने कशासाठी बोलवलं हे त्या सेवकाला माहित नव्हतं. तो मुकाटयाने गुंडप्पा पाशी गेला. गुंडप्पाने त्याला आणखी

जवळ बोलवलं. सेवकाला वाटलं की नवीन अंमलदार त्याला काही रहस्य सांगू इच्छितो, म्हणून तो आणखी जवळ गेला.

यावर नवीन अंमलदाराने त्याचा कान जोरात पकडला. बिचारा सेवक वेदनांमुळे ओरडू लागला, या सेवकाने काही चूक केली, म्हणून नवीन अंमलदार त्याला शिक्षा देत आहे असं लोकांना वाटलं.

आता राजाची आणखी एक सूचना शिल्लक होती. दुसऱ्यांच्या शेंड्या आपल्या हाती ठेवल्या पाहिजेत. अंमलदार गुंडप्पाच्या मनात या बाबतीत अनेक विचार येऊ लागले.

अंमलदार बसूनच राहिला आपल्या खुर्चीवर! त्यामुळे अन्य सेवक ही आपले स्थान सोडू शकले नाहीत. संध्याकाळ झाली, रात्र पण झाली, तरी गुंडप्पा आपल्या जागेवरून हालला नाही. म्हणून बिचारे कर्मचारी ही उठले नाहीत. त्यांना झोप येऊ लागली. प्रयत्न करूनं ही त्यांना झोप आवरता आली नाही.

अर्धी रात्र संपली. सर्व सेवक आपापल्या जागी झोपी गेले. राजाच्या तिसऱ्या सूचनेची अंमलबजावणी गुंडप्पाच्या मनात होती. तो हळूच उठला. हातात एक कात्री घेतली नि एकेक सेवकाजवळ जाऊन त्यांच्या शेंड्या कापून टाकल्या. अशा रीतीने सर्वांच्या शेंड्या आपल्या हाती आल्यावर नव्या अंमलदाराला आराम मिळाला.

आता गुंडप्पाला असं वाटलं की राजाच्या सूचनांनुसार आपल्या अंमलदारीच्या पाहिल्याच दिवशी आपण जे कार्य केलं त्याचा अहवाल राजाला दिला तर राजा खूश होईल. म्हणून दुसऱ्या दिवशी सकाळीच गुंडप्पा राजधानीकडे जायला निघाला.

गुंडप्पा कडून सर्व हकीगत ऐकून राजाला मोठं आश्चर्य वाटलं! त्याच वेळी देवगिरीचा एक अधिकारी राजाकडे आला नि नवीन अंमलदाराची सर्व करतूत सांगितली. आता आपली चूक राजाच्या लक्षात आली आणि त्याने पुन्हा गुंडप्पाला राज-पुरोहित पदी नेमले.





शीतल वायुमंडळाच्या मागे असलेली थंड व कोरडी हवा अधिक गरम हवेच्या संपर्कात येते, तेव्हा खूपसे ढग बनतात. या ढगात असलेल्या कमी दाबाच्या हवेमुळे ढग घन होतात. व त्यांच्यात मोठे-मोठ्या बोगद्यांसारखी पोकळी निर्माण होते. ते जेव्हां जमिनीला स्पर्श करतात तेव्हा चक्राकार गतीने तुफानी वारा वाहू लागतो. धुळीने भरलेले हे चक्रीवादळ १३२० फुटांइतक्याही रुंदीचे बनून ताशी ३०० मैल वेगाने वाहू लागते. अमेरिकेच्या पश्चिम प्रान्तात दर वर्षी वसंत ऋतूत अशी १५० तरी वादळे होतात. १९६५ साली येथे जे चक्रीवादळ झाले त्यात २०० लोक प्राणास मुकले होते. रशिया व आफ्रिकेतले काही प्रान्तही या विनाशातून वाचू शकले नाहीत.






अमेरिकेतील यूटॉ येथील नॅशनल पार्कमधे असणारी दगडी कमान ही जगातील सर्वात मोठी अशी नैसर्गिक दगडी कमान होय. तिची लांबी २९१ फूट आहे! याच पार्कमधे आणखीही काही अशा स्वयंभू कमानी आहेत. या सर्व कमानी म्हणजे १५ कोटी वर्षांपूर्वी बनलेला निसर्गाचा चमत्कारच म्हटला पाहिजे! वाळूच्या दगडातील भेगांमधे जेव्हा पावसाचे पाणी शिरते, तेव्हा या भेगा रुंदावतात. पुढे हवा आणि बर्फ यामुळे या भेगा हळूहळू वाढून जावात. आणि त्यामुळे त्या दगडात भोके पडतात. आणि अशा नैसर्गिक कमानी निर्माण होतात. काळाबरोबर या कमानी झिजत आहेत. तेव्हा स्वाभाविकच एक ना एक दिवस या कमानी तुटून जातील हे नक्की.

# नेपाळ मध्ये लोकशाही

हिमालय पर्वताच्या दक्षिण बाजूस लागून नेपाळ देश पसरलेला आहे. आपल्या देशाच्या उत्तरेकडील सीमेवर असलेल्या नेपाळ राज्याच्या पश्चिमेला सतलज नदी वाहते. याच्या पूर्वेच्या सरहद्दी वर सिक्किम आहे. सुमारे दीड कोटी लोकसंख्या असलेल्या या नेपाळची राजधानी आहे खाटमांडू.

नेपाळ मध्ये हिन्दू व बौद्ध धर्मीयांची संख्याच अधिक आहे. नेपाळचा शेजारी आणखी एक देश आहे चीन, पण नेपाळचे भारताशी अधिक निकटचे संबध आहेत: हे संबंध अलीकडच्या काळांतील नव्हेत, तर पुरातन काळापासून चालत आलेले आहेत. सम्राट अशोक व समुद्रगुप्ताच्या काळात ही नेपाळ यांच्या राज्याचा एक भाग होता.

सन १८४६ ते सन १९५१ पर्यंत नेपाळ वर राजे राज्य करीत नसत. वंश-परंपरेने आलेले सरदारच 'राणा' नावाने नेपाळ वर राज्य करीत.

सन १९५१ मध्ये या राणा लोकांच्या विरुद्ध एक जनता-आंदोलन इथे सुरू झालं. राणांच्या हातातली राज्य-कारभारची सूत्रे राजांच्या हाती आली. तरी पण लोकांनी लोकशाही करता लढा चालू ठेवला. जनता कधी निवडणुकीच्या आधारे आपला मंत्री नियुक्त करी, पण तो फार काळ टिकत नसे; कारण शेवटी राजाचा निर्णयच अंतिम असायचा!

सन १९६१ मध्ये राजा महेन्द्रने पार्टी-रहित 'राष्ट्रीय पंचायत' पद्धति अंमलात आणली. पण लोकमताला वाचा फोडायला ही पद्धत ही तितकी उपयुक्त ठरली नाही. सामान्य जनतेच्या अडचणी ती दूर करू शकली नाही. म्हणून नेपाळच्या जनतेने सार्वभौम राजा नि अनुपयुक्त 'पार्टीरहित राष्ट्रीय पंचायत' यांच्या विरुद्ध चळवळ सुरू केली. जनतेने सर्वसाधारण निवडणूक नि पार्टी-पद्धति यांची मागणी केली.

सन १९७२ मध्ये राजा महेन्द्रचे देहावसान झाल्यानंतर त्याचा मुलगा वीरेन्द्र राजा बनला. काळाची पावले ओळखून आपल्या अधिकार-पदावर राहून राजा वीरेन्द्रने अधिक समजूतदारपणा दाखवला आणि लोकांच्या इच्छेनुसार लोकशाही स्वीकारण्याचा निर्णय घेतला. हा निर्णय




मोठा प्रशंसनीय ठरला. यामुळे राजा वीरेन्द्र लवकरच ब्रिटनच्या राणीसारखा नामधारी शासक होणार होता, पण त्याने याची पर्वा न करता लोकांच्या आनंदात आपला आनन्द मानला.

आता नेपाळी प्रजा खुश झाली. बऱ्याच दिवसांची इच्छा आता पूर्ण झाली आहे.

नेपाळचे लोक आपल्या नवीन अधिकारांचा उपयोग करून आपल्या नेत्याची निवड आता करू शकतात नि लोकहाशीचे फायदे मिळवू शकतात. होय, त्यांचे पुढारी त्यांना कोणत्या दिशेने घेऊन जातील, यावर नेपाळी जनतेचे भविष्य अवलंबून राहील.



# सत्कार कोणाचा?

लखिमपुरमधे धर्मवीर नावाचा न्यायाधीश होता. तो मोठा बुद्धिमान असून न्यायशास्त्राचे त्याचे अध्ययनही गाढे होते. राज्यशासनाकडूनच त्याची न्यायाधीश म्हणून नेमणूक झालेली होती. गावातले सर्व लोक जाणून होते की गावातली भांडणे निपटणे म्हणजे धर्मवीरच्या हाताचा मळ होता! तेथील राजाच्या कानी ही वार्ता पोचली की न्यायदानाच्या बाबतीत धर्मवीर हा अजोड न्यायाधीश आहे.

राजाला वाटले की आपण धर्मवीरचा सत्कार करणे उचित होईल. नन्तर सत्कारसमारंभाची व्यवस्था होऊन तसे धर्मवीरलाही कळवले गेले. धर्मवीरला असल्या सत्काराची मुळीच आवड नव्हती. पण तो राजाचा स्वत:चा निर्णय असल्याने, न्यायाधीश-महाराज मुकाट्याने राजधानीला जायला निघाले.

वाटेत धर्मवीरची रामध्यानशी भेट झाली. रामध्यान ही लखीमपूरचाच होता आणि धर्मवीरच्या चांगला माहितीचाही होता. तसा तर तो एक सामान्य असा शेतकरी होता, अन् हरीश नावाच्या एका मोठ्या शेतकऱ्याच्या कचाट्यात सापडलेला होता. या हरीशने खोटे कागदपत्र दाखवून त्याला सांगितले होते–"हे बघ, तुझ्या बापाने माझ्या वडिलांकडून मोठी रक्कम कर्जाऊ घेतलेली होती, अन् ती परत न करताच तो मरून गेला." आणि त्या कर्जाच्या वसुलीसाठी त्याने रामध्यानची जमीन हडपली होती. रामध्यानने याबाबत धर्मवीरकडे तक्रार केली होती, आणि धर्मवीरने हरीशजवळचा दस्तावेज खोटा असल्याचा निर्वाळा देऊन रामध्यानचे शेत त्याला परत देण्याबाबत आज्ञा दिलेली होती.



धर्मवीरने रामध्यानला विचारले–"रामध्यान, आता कसं काय चाललंय तुझं?" यावर रामध्यान उत्तरला–"हंऽऽ! त्या दयाळु सत्यपालच्या कृपेने ठीकच आहे मी सध्या!"

"म्हणजे? सत्यपालने तुला काही विशेष अशी मदत केलेली दिसतेय!" असे म्हणत धर्मवीरने रामध्यानकडे प्रश्नात्मक मुद्रेने पाहिले.

"हां सरकार! आज मी अन् माझं कुटुम्ब भुकेने मेलं नाहीये ही सत्यपालचीच तर कृपा! माझं सगळं शेत जाऊन मी जेव्हा अगदीच कंगाल बनलो, तेव्हा सत्यपालाने आपल्या शेतीपैकी दोन एकराचा तुकडा मला दिला. त्या आधारानेच तर आज मी उभा आहे आणि माझं बरं चाललं आहे." रामध्यानने धर्मवीरला माहिती पुरवली.

हे ऐकून धर्मवीर चाटच पडला! त्याला समजेना की आपण न्याय दिल्यावरही रामध्यानला त्याची जमीन परत का मिळू नये? "अरे रामध्यान, मी तर तुझ्या बाजूने न्याय दिला होता ना? हरीशने तुझी जमीन परत का नाही दिली बरं तुला?"

यावर कसनुसे हसून रामध्यान म्हणाला–"सरकार आपण न्याय तर दिलात, पण उपयोग काय? त्याची अंमलबजावणी कोण करणार?" इतके बोलून तो आपल्या रस्त्याने चालू लागला.

आता धर्मवीर विचार करू लागला आणि रामध्यानच्या सत्यकथनातला तिखटपणा लक्षात आला त्याच्या!

राजाकडून धर्मवीरचा होणारा सत्कार समारंभ पहायला लखिमपूरचे खूपसे लोक राजधानीला आले होते; त्यातच जमीनदार सत्यपालही होता आणि न्यायाधीशाने त्याला त्या सभामंडपात पाहिलेही होते. राजाने त्या भरसभेत धर्मवीरच्या सत्काराची घोषणा करून त्याला व्यासपीठावर आपल्याजवळ बोलावले.

परंतु धर्मवीरने आपल्या जागेवरच उभे राहून राजाला सांगितले–"महाराज, मी या सत्काराला लायक असा माणूस नव्हे; म्हणून मी तो स्वीकारू इच्छित नाही. आपण आज माझा सत्कार अशासाठी करू इच्छित आहात की, मी न्यायदान अगदी बरोबर करतो; पण याही पेक्षा अधिक मौलिक जनसेवा कोणी करत असेल तर ती व्यक्ति म्हणजे जमीनदार सत्यपाल! ते आत्ता या सभेत हजरही आहेत. माझी इच्छा आहे की माझ्याऐवजी आत्ता त्यांचाच सत्कार केला जावा. खरोखरच ही त्यांची योग्यता आहे."

धर्मवीरचे हे अकस्मात बोलणे ऐकून सर्व जण आणि खुद्द सत्यपालही चकित झाले! राजाही आश्चर्याने धर्मवीरकडे पाहू लागला.

धर्मवीर म्हणाला–"महाराज, मी जे म्हणतो आहे ते शंभर टक्के बरोबर आहे." नंतर रामध्यान बरोबर वाटेत झालेला आपला संवाद त्याने राजाला कथन केला. आणि तो बोलू लागला–"महाराज न्यायाधीश म्हणून मी न्यायदान करतो हे खरेच; परंतु काही भ्रष्ट आणि लाचखोर राजसेवक यांच्यामुळे मी दिलेल्या निर्णयांची अंमलबजावणी होत नाही. अशा परिस्थितीत गांजलेल्या लोकांना सत्यपाल मदतीचा हात पुढे करतात. म्हणूनच माझी अशी इच्छा आहे की माझ्याऐवजी आत्ता सत्यपाल यांचाच सत्कार केला जावा."

हे सर्व बोलणे ऐकून राजा म्हणाला–"धर्मवीर, मला ही गोष्ट मान्य आहे की सत्यपालही सत्कार करण्यास योग्य आहेत. पण त्याबरोबरच न्यायदानात प्रसिद्ध असलेले आपणही तितकेच सत्कारास योग्य आहात. तेव्हा आत्ता मी तुम्हा दोघांचाही सत्कार करू इच्छितो."

नन्तर राजाने धर्मवीर व सत्यपाल या दोघांचाही मोठ्या डामडौलाने सत्कार केला आणि यानन्तर लाचखोर व भ्रष्टाचारी लोकांना बरोबर वेचून त्यांना चांगलीच शिक्षा दिली.





# तीन गुलाम

खूप जुनी गोष्ट आहे. त्यावेळी बगदाद मध्ये एक खूप मोठा व्यापारी रहात असे. त्याच्याजवळ तीन गुलाम कायम रहात असत. त्यापैकी एक गुलाम रात्रभर जागून व्यापाऱ्याचे पाय दाबत बसत असे. दुसरा गुलाम वीस फूट खोलीच्या विहीरीतून पाणी काढून त्याच्या महालात ते भरून ठेवण्याचे काम करी. आणि तिसरा गुलाम व्यापाऱ्याकडे आवश्यक असणारे सर्व सामान बाजारातून खरेदी करून ते आपल्या पाठीवर वाहून आणून त्याच्या महालात पोचवत असे.

तसे हे तीन्ही गुलाम त्याचे हे काम बिगार म्हणूनच करत असत. परन्तु व्यापाऱ्याने त्यांना कधीही कसली दया दाखवली नाही. ते बिचारे रात्रं-दिवस व्यापाऱ्याची चाकरी करत अन् बदल्यात त्यांना फक्त दोन वेळचे जेवणच काय ते मिळे!

व्यापारी विवाहित होता, पण खूप वर्षेपर्यंत त्याला कोणी मूलबाळ झाले नाही. बऱ्याच काळाने त्याला एक मुलगा झाला. अन् बाप बनल्यामुळे व्यापारी फार आनन्दित झाला! आपल्या आयुष्यातला हा पहिला आनन्दाचा क्षण मिळाल्यामुळे त्याने आपले मित्र-मंडळ व नातेवाईक लोकांना खूप मोठी मेजवानी दिली, गरीबांना भोजन-कपडे वगैरे देऊन खूष केले; शहरातील एका चौकात एक धर्मशाळाही त्याने बांधली. अशा रीतीने हसून-खेळून काही दिवस घालवल्यावर एक दिवस त्याच्या मनात एक विचार डोकावला!

व्यापाऱ्याने आपल्याकडे काम करणाऱ्या आपल्या तीन्ही गुलामांना बोलावून घेतले आणि मोठ्या प्रेमाने तो त्यांना म्हणाला—"तुम्ही तिघं माझ्याकडे खूप दिवस काम करत आहात, माझ्या घरी मुलगा जन्मला. या आनन्दाप्रीत्यर्थ तुम्हा तिघांचंही कल्याण करावं असं माझ्या मनात आहे. आज तुम्हापैकी जो खूप काम करून मला प्रसन्न करील, त्याला मी गुलामीतून मुक्त करीन."

राजश्री पोहेकर

त्या दिवशी तिसऱ्या गुलामाने महालासाठी आवश्यक अशा खूपशा जिनसा बाजारात खरेदी केल्या आणि त्या आपल्या पाठीवर लादून आणून आणून टाकत राहिला.

भिश्ती काम करणारा तो दुसरा गुलाम रात्रंदिवस पाणी आणतच राहिला. अशा तऱ्हेने जरूरीपेक्षा जास्त सामान आणून आणून त्याने त्या दिवशीं खूपच मेहनत केली. अखेर जास्त मेहनतीमुळे तो बेशुद्ध होऊन पडला!

तिसरा गुलाम मात्र दिवस भर आळसत राहिला. तो मालकाचा पाय दाबायला गेलाच नाहीं. शेवटी व्यापाऱ्याने तिघांबाबत चौकशी केली. दोन गुलाम बेशुद्ध होऊन पडल्याचे त्याला कळलें. व्यापाऱ्याने आपल्या नोकरांकडून त्यांना आपल्या समोर आणवले.

बेशुद्ध पडलेल्या त्या दुसऱ्या आणि तिसऱ्या गुलामांना नोकरांनी व्यापाऱ्याच्या समोर आणून टाकले. व्यापारी नोकरांना म्हणाला—"यांना शुद्धीवर आणा."

नोकरांनी दोघांच्या तोंडावर पाणी मारून त्यांना शुद्धीवर आणले. ते शुद्धीवर आलेले पाहून व्यापाऱ्याला आनन्द झाला. दिवसभर खूप मेहनत करून त्यांनी मालकांवर आपली भक्ति व श्रद्धा दाखवली होती.



त्यांना मालक म्हणाला—"तुम्ही दोघांनी माझ्या बोलण्यावर पूर्ण विश्वास ठेवला, माझ्यावरची तुमची भक्ति पाहून मी खूष झालो आहे. आत्ता, या क्षणापासून मी तुम्हाला मुक्त करत आहे. तुम्ही आता स्वतन्त्र आहात. यापुढे आपल्या इच्छेप्रमाणे आपले आयुष्य तुम्ही व्यतीत करा."

दोन्ही गुलामांनी व्यापाऱ्याचे मनापासून आभार मानले. नंतर पुन्हा एकदा पहिल्या गुलामाकडे पहात व्यापारी रागाने म्हणाला—

"अरे नालायका, मूर्खा, एक उत्तम संधी गमावलीस तू! इतका उद्धट आणि कृतघ्न कसा बनलास तू? आळशीपणा करायला आजचाच दिवस सापडला तुला? स्वतन्त्र होण्याची इच्छाच नाही का तुझी?"

मालकाचे हे ओरडणे ऐकून गुलामाचे डोळे भरून आले. दुःखी आवाजात तो म्हणाला—"मालक, मी जोवर जिवन्त असेन, तोपर्यंत आपलीच सेवा करत राहीन. आपल्याला सोडून जायचं नाही मला कुठेही! गुलामीतून मुक्त होण्याची संधी आपण दिली होती, पण आपल्याला सोडून जायची इच्छाच नाही माझी! म्हणून मुद्दामच मी आज आपली सेवा करायला आलो नाही. मी कायम आपला गुलामच बनून राहीन इथे!"

आता कुठे व्यापाऱ्याला खरी गोष्ट कळून चुकली! आणि त्याच्या मनात या गुलामाबद्दल दया आणि प्रेम उफाळून आले! त्याचा कंठ भरून आला. तो गद्गद् आवाजात म्हणाला—"अरे वेड्या, तू गुलामीतून मुक्त झालास तर त्याचा अर्थ असा नव्हे, की तू मला सोडूनच जायला हवे! काही असो, आतापर्यंत खूप प्रामाणिकपणे तू माझी सेवा केली आहेस, अन् अजूनही तुझं माझ्यावर प्रेम आहे. तेव्हा मी आज तुला मुक्त करीत आहे. आजपासून तू स्वतन्त्र आहेस. हां, पण तुला मला सोडून जायचं नाही ना? आजपासून मी माझा नोकर म्हणून तुझी नेमणूक करीत आहे. आता तरी खूष आहेस तू?"

यावर अतीव आनन्दाने तो गुलाम मालकाच्या पायांवर पडला. व्यापाऱ्याने त्याला मोठ्या प्रेमाने आपल्या मिठीत घेत म्हटले—"भविष्यात तुझे दिवस हसत-खेळत आनन्दात जातील. एकाद्या चांगल्या मुलीशी मी तुझं लग्न लावून देईन."

खरोखरच त्या गुलामाला आता चांगले दिवस आले. व्यापाऱ्याने त्याला चांगलीशी नोकरी दिली व त्याचे लग्न करून दिले. आता तो आनन्दाने आपले दिवस घालवू लागला.





# डाकू युवराज

## [१०]

[पूर्वकथा : वीरसिंहाचे सैन्य अमृतपुरीवर हल्ला करण्यासाठी निघाले; परन्तु सुधारा नदीला अचानक पूर येऊन त्यात ते वाहून गेले. सैन्यबळ वाढवण्यासाठी आणि शस्त्रे विकत घेण्यासाठी पुरेसा पैसा खजिन्यात नव्हता. यासाठी वीरसिंहाने प्रजेकडून विशेष कर वसूल करायचे काम कपालकंठावर सोपवले. या करामुळे जनतेत प्रतिकाराची भावना जागृत झाली.]

वसंतऋतुच्या आगमनामुळे जंगलात एक आगळेच सौंदर्य पसरले! हिरव्या-हिरव्या झाडांवर रंगी-बेरंगी फुले उमलली. कोकिळेच्या कूजनाने सारे जंगल दुमदुमले!

शान्तिपुरच्या युवराजाने जंगलात पाऊल ठेवले आणि तेव्हापासून वसन्त-शोभेत आणखीनच भर पडली. युवराज आता सहा वर्षांचा झाला होता. जयानन्द मुनींनी त्याचे 'सन्दीप' असे नामकरण केले होते. जंगलातल्या पशुपक्ष्यांना आपल्या इशाऱ्यावर चालवण्याची जी शक्ति या मुनीत होती, तिच्या सहाय्याने तो आपली सारी कामे करून घेई. परन्तु बऱ्याच जणांना ही गोष्ट माहीतच नव्हती. हळूहळू आपली ही शक्ति संदीपमधेही संक्रमित करायला सुरुवात केली मुनीने. त्याच शक्तीच्या साह्याने तो त्या वन्य पशुपक्ष्यांशी खेळू लागला—जसा काही मानव शिशूंशीच तो



खेळत आहे. त्याच्या मित्रांमधे मोठ्या मोठ्या सुळ्यांचा एक हत्ती होता. त्याचे नाव करीन्द्र! जंगलातल्या सर्व हत्तींचा तो प्रमुख होता. हा करीन्द्र रोज युवराजाजवळ येई. त्याच्या पाठीवर स्वार व्हायचे मनात आले की आपले हात वर उचलून संदीप त्याला खूण करी. मग करीन्द्र त्याला आपल्या सोंडेने अलगद उचलून आपल्या पाठीवर बसवी. तो घसरू नये म्हणून सावधगिरी बाळगत एक वानर त्याच्या मागे त्याला धरून बसे. मल्ली नावाचा एक पोपट रस्ता निर्धोक असल्याची सूचना देत या झाडावरून त्या झाडावर असा पुढे पुढे जात राही.

युवराज जंगलात आल्यापासून मुनीच्या आज्ञेने भल्लूक नावाचे एक अस्वल त्याचे रक्षण करायची जबाबदारी निभावत होते. ते जंगलातले गोड-गोड कंद उकरून आणून संदीपला खायला देई. कधी कधी जंगलाच्या सीमेवरून गोड ऊसही ते उपटून आणी. दोन वानरे एकमेकांशी चुरस करीत युवराजासाठी कोठून कोठून शोधून आंबे, पेरू व केळी यांसारखी फळेही घेऊन येत.

खूपदा संदीप वाघाच्या पिल्लांशी लपंडाव खेळे आणि हिरवळीवरून आनन्दाने आरडत ओरडत धावत त्यांच्याशी कुस्तीही करी.

युवराज पाच-सहा वर्षांचा होता होता रोज सकाळी उठल्या उठल्या स्वतःच झऱ्यावर जाऊन स्नानही करू लागला. यानंतर तो मोठ्या भक्ति-भावाने गुरुच्या समोर जाऊन बसे. गुरु त्याला प्रार्थना, श्लोक आणि ध्यानाच्या निरनिराळ्या पद्धति शिकवत. त्यांच्याजवळ नंतर थोडा वेळ तो लिहिणेवाचणेही शिके. यानंतर गुरूंबरोबर तो जंगलात फिरायला जाई. अशा वेळी मुनी जयानन्द त्याला तेथील झाडेझुडुपे दाखवून त्यांची नावे, लक्षणे व विशेष गुण समजावून सांगत. ते म्हणत– "बाळा! या सुन्दर निसर्गाचे उपकार स्मरणं हे आपलं कर्तव्य आहे. मानव



जन्माच्या पूर्वीपासूनच हा निसर्ग इथे आहे. देवाचे अद्‌भुत चमत्कार पहाण्यासाठी आणखी कुठे जायची जरुरच नाही. निसर्गाकडे नीट एकदा निरखून पाहिले की पुरे! पहाण्याची शक्ति असलेल्या प्रत्येकाला पावलोपावली अद्‌भुतता पहायला मिळते, अनुभवता येते. प्रत्येक झुडूप, प्रत्येक क्षणी काही न काही चमत्कार आपल्याला दाखवत असते. हे पहा, हे चाफ्याचं झाड आहे आणि ही आहे चमेलीची वेल. दोन्ही एकाच जमिनीवर उगवली आहेत नं? अन् निसर्गाकडून मिळणारे पाणी, वायु आणि सूर्यप्रकाश यांचाच दोन्हीही उपयोग करतात, बरोबर ना? पण तरीही चाफ्याच्या फुलांच्या रंग, रूप, सुवास हे सर्व चमेलीच्या फुलाच्या रंग, रूप आणि गन्धापेक्षा वेगळंच आहे की नाही? नीट लक्ष दिलंस तर यात छपलेलं रहस्य तुला उलगडेल! याच जमिनीवर उगवलेलं एक झाड आंब्याची फळं देतं, तर दुसरं एकादं झाड फणस देतं! यापेक्षा चमत्कार तो आणखी कसला असणार रे!"

गुरूंचे असले बोलणे सन्दीप लक्षपूर्वक ऐकत राही आणि निसर्गाच्या सान्निध्यात अपूर्व असा आनन्द त्याला मिळे.

"बाळा सन्दीप, तू आणखी एक गोष्ट ओळखलीस? हे वृक्ष आपल्याला फळे देतात ना? त्याच्या बदल्यात ते आपल्या कडून कसलीही अपेक्षा नाही करत! तू झाडाचे आंबे, पेरू तोडलेस तर ती झाडं तुझ्याकडून काही मागतात का? काही मिळेल अशी अपेक्षा तरी करतात ती? नाही नं? दुसऱ्यांना देत राहण्यात, त्यांना खुष ठेवण्यातच त्यांना आनन्द वाटतो. अशा प्रकारे हे वृक्ष जसा आनन्द मिळवतात तसाच आनन्द मिळवण्याचा मानवांनीही प्रयत्न केला पहिजे. निसर्गात लपलेला हा महान् आणि अपूर्व असा गुण आपण मानवांनीही त्याच्यापासून शिकायला हवा, आत्मसात करायला हवा!" अशाच तऱ्हेने बोलून गुरुजी युवराज संदीपला निसर्गावर प्रेम करायचा आणि त्याच्यातले महान् गुण शिकायचा उपदेश करीत.

संध्याकाळच्या वेळी मुनि संदीपला बरोबर घेऊन डोंगरावर जात. आकाशात चमकणाऱ्या ताऱ्यांचा ते त्याला परिचय करून देत. त्या ताऱ्यांबरोबर जडलेल्या पुराण-कथाही ते त्याला सांगत.

अशा तऱ्हेने राजधानी पासून दूर निसर्गसान्निध्यात आणि प्रशान्त अशा वातावरणात मुनि जयानन्दच्या देखरेखीत युवराज संदीप दिसामासांनी वाढत होता.

गुरूंनी सांगितलेल्या गोष्टीतले राम, कृष्ण, ध्रुव अन् नचिकेता—या सर्वांना त्यांचे त्यांचे आईवडील होते. पण मग आपल्यालाच कोणी आई-बाप का नाहीत—असा प्रश्न एकदा संदीपच्या बालमनात उभा राहिला अन् पटकन त्याने मुनीला विचारले—"माझे आईबाप कोण आहेत गुरुदेव? कुठे आहेत ते?"

"बाळा, तुला माहीत आहे? एका मुलाला आई-बापांची कशासाठी जरूरी असते? भगवान आपलं प्रेम या आई-बापांच्या द्वारे मुलांना देत असतो, यासाठीच त्यांची आवश्यकता असते. पण तू तर इतर सर्व-सामान्य मुलांसारखा नाहीच आहेस, तू कोणीतरी महान् असा विशेष मुलगा आहेस, म्हणून कुठल्या माध्यमाशिवाय, म्हणजे आई-बापांशिवायच देवाचं प्रेम तुला सरळ त्याच्याकडूनच मिळतं." प्रेमाने संदीपचे मस्तक कुरवाळत मुनि म्हणाले.



यावर डोके हलवून हसत संदीप म्हणाला—"नाही गुरुदेव, मलाही देवाचं प्रेम एका माध्यमातूनच मिळतं—तुमच्या माध्यमातून! तुम्हीच माझे आईबाप आहात गुरुदेव!"

मुनि त्याला जवळ घेत गहिवरत म्हणाले—"तू तर मोठाच विवेकसंपन्न आहेस बघ! आपल्या भोवतालच्या प्रत्येक वस्तूत तुला भगवन्ताचेच दर्शन घडो-असा माझा तुला आशिर्वाद आहे."

* * *



इकडे वीरसिंह आपल्या सिंहासनावर बसलेला होता. त्याच्या गुप्त हेरांनी आणलेली बातमी ऐकून तो भयंकर संतापलेला होता. चिडून तो ओरडू लागला–"कपालकण्ठ, काय चाललं आहे हे सर्व? आज पुन्हा वाईट बातमी! आज आमच्याच सेवकां-कडून धान्याची पोती लुटली गेली! त्यांना लुटणारे हे दुष्ट आहेत तरी कोण? त्यांच्यात एवढी ताकद आणि हिम्मत आली कोठून?"

यावर काय उत्तर द्यावे हे कपालकंठला सुचेना. मौन स्वीकारून त्याने मान खाली घातली.

"या लुटारूंना काहीही करून पकडलंच पाहिजे. त्या सर्व कारस्थानी लोकांना मुळापासून उपटून काढलं पाहिजे. त्यांना जे कोणी मदत करत असतील त्यांनाही कठोरात कठोर शिक्षा द्यायला हवी." दात-ओठ खात वीरसिंह म्हणाला.

इतक्यात अचानक कुठूनसा एक बाण महालाच्या खिडकीवाटे आत आला आणि भिंतीवर आदळून खणकन् खाली जमिनीवर पडला! त्याच्या टोकावर एक कापडाचा तुकडा बांधलेला होता!

दचकून वीरसिंह एकदम सिंहासन सोडून उभा राहिला. त्याबरोबर सर्व दरबारीही आपली आसने सोडून उभे राहिले.

बाण उचलण्यासाठी कपालकंठने आपले पाऊल उचलताच वीरसिंह गरजला–"अरे मूर्खा! तिथेच उभा रहा!"

ते किंचाळणे ऐकून कपालकंठ तिथल्या तिथेच खिळून उभा राहिला. वीरसिंह इतका का चिडला आहे, हेच त्याला उमगेना!

"लवकर नीघ, तो बाण कोणी सोडला याचा तावडतोब पत्ता लाव. आपल्या कोणी शिपायाने त्याला पकडले असेल तर ठीकच; नसेल तर त्याचा पाठलाग करून पकडून आणा त्याला! जा, जा; लवकर नीघ!" वीरसिंहने त्याला आज्ञा केली.

कपालकंठ वेगाने महालाबाहेर निघाला. त्याच्या मागे आणखी काही अधिकारीही निघून गेले. "हं, आता पाहू या त्या बाणाने काय निरोप आणला आहे. आणा बरं उचलून तो!" वीरसिंह म्हणाला.

वीरसिंहाच्या मुख्य अंगरक्षक जाऊन बाण उचलून घेऊन आला. बाणाला बांधलेला कपडा सोडून त्यातून एक ताडपत्र काढून त्याने वीरसिंहच्या हाती दिले. तो वाचू लागला–"आम्ही तुझ्या लोकांना लुटत नाही आहोत. खरं म्हणजे तुम्ही लोक आपल्याच भोळ्या-भाबड्या, निष्पाप शेतकऱ्यांना लुटत आहात. याला म्हणतात चोराच्या उलटच्या.....! आपलं रक्त ओतून शेतकऱ्यांनी जे धान्य निर्माण केलं, ते तुम्ही लुटत आहात. तुम्ही मूर्ख माणसं त्या पैशांनी हत्यारं खरीदायच्या विचारात आहात. जनतेला भाकरी आणि कपडा हवा; हत्यारांची काही गरज नाही त्यांना! त्यामुळे तुम्ही जे धान्य लुटत आहात ते परत मिळवण्याच्या प्रयत्न आम जनता करत आहे!"

चिठ्ठी वाचून क्रोधाने वीरसिंहाचे डोळे विस्तवासारखे लाल झाले! थोडा वेळ 'सुई पडली तरी आवाज ऐकू येईल' अशी शान्तता पसरली तेथे!

बाण सोडणाराला त्याचे हातपाय बांधून कपालकंठ तावडतोब घेऊन येईल अशा अपेक्षेने वीरसिंह महालाच्या द्वाराकडे नजर लावून बसला. पण काही उपयोग झाला नाही. अधीरपणे वीरसिंह वेड्यासारखा येरझारा घालत म्हणाला–"आत्ताच तर



मी म्हणत होतो ना, की आपल्या लोकांना कोणी लुटत आहे! त्यानंतरच ही चिट्ठी आत आली ना? म्हणजे याचाच अर्थ असा, की आपल्यातच कोणीतरी शत्रूचा गुप्त हेर असला पाहिजे. त्यानेच शत्रूला ही खबर दिली; किंवा त्याने स्वतःच ही चिट्ठी लिहिली. इतकं सारं घडल्यावर आता गप्प रहाणं आपल्याला अशक्य आहे! कारण ही गोष्ट अत्यंत धोकादायक आहे! आत्ता, या क्षणी त्या दुष्टाला मारून टाका! नाही, नाही....थांबा....मारू नका त्याला! त्या दुष्टाकडून शत्रूचे गुप्त बेत माहीत करून घ्यायला हवेत; म्हणजेच सगळ्या बंडखोरांना दडपता येईल आपल्याला! मारून टाकू नका त्याला!...." वेड्यासारखा तो थयथयाट करतच राहिला.

इतक्यात कपालकंठ व त्याचे साथीदार दरबारात परत आले. वीरसिंहाने उत्साहाने विचारले—"कुठे आहे तो दुष्ट? तुम्ही लोकांनी मारून तर नाही ना टाकलं त्याला?"

"नाही महाराज, तो दुष्ट निसटला आपल्या तावडीतून! त्याने बाण सोडला तेव्हा आपल्या एका शिपायाने पाहिलं होतं आणि त्याला पकडायचा प्रयत्नही केला त्याने, पण तेवढ्यात तो घोड्यावर बसून पळून गेला." कपालकंठ म्हणाला.

"घोड्यावरून पळाला? मग आपले घोडे काय मेले होते सगळे? पाठलाग नाही केला त्याचा?" चिडून वीरसिंहने विचारले.

"तो शिपाई अश्वशाळेतून बाहेर पडण्यापूर्वीच शत्रु पळून गेला होता महाराज?" कपालकंठने माहिती दिली.

"त्या नालायक शिपायाला फाशी द्या तावडतोब! थांबा, थांबा! त्या घोड्यालाही मारून टाका त्याच्याबरोबरच!" वीरसिंह वेड्यासारखा ओरडत म्हणाला.

वीरसिंहाचा तो अवतार पाहून दरबारी दचकलेच. एकमेकांच्या तोंडाकडे नुसतेच पहात राहिले ते. (क्रमशः)



## राजाची परीक्षा

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा त्या झाडापाशी गेला, झाडावर लोंबणारे प्रेत खाली उतरवून आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाकडे निघाला. तेव्हा त्या प्रेतातला वेताळ राजाला म्हणाला—"अरे राजा, मध्यरात्रीच्या वेळी, या ओसाड अन् भयानक स्मशानात तू जे कष्ट करत आहेस, ते पाहून मला मोठं आश्चर्य वाटतंय. असं वाटतं की तू कुठल्या तरी विशेष अशा कामगिरीत यश मिळवण्यासाठीच हे सर्व सहन करीत आहेस. वडीलधारी माणसं म्हणत असतात की राजे-लोक फार चंचल स्वभावाचे असतात. मीही या गोष्टीशी सहमत आहे. त्यामुळे तू जे करत आहेस, त्यात सफल झाल्यावर तुला आनन्द वाटेल, यावर माझा मुळीसुद्धा विश्वास नाही. उदाहरण म्हणून मी तुला राजा चन्द्र-

## वेताळाच्या गोष्टी



देवची गोष्ट सांगतो. ऐकताना करमणूकही होईल तुझी. ऐक हं–

वेताळ गोष्ट सांगू लागला–

दक्षिणापुरी राज्याची धुरा राजा चन्द्र-देव संभाळत होता. त्याला मुलगा नव्हता. लक्ष्मीप्रिया नावाची एक मुलगीच काय ती होती त्याला. सुभाष आणि वीरबाहु नावाचे राजाचे दोन तरूण नातेवाईक ही राज-वाड्यातच रहात असत. दोघेही मोठे सुन्दर आणि बुद्धिमान होते. राजाशी ते फार अदबीने वागत.

एक दिवस राणी राजाला म्हणाली– "सुभाष आणि वीरबाहु यांच्यातील एकाची निवड करून आपण लक्ष्मीप्रियाचा त्याच्याशी विवाह करून देऊ. आता उशीर करणं ठीक नव्हे."

"दोघांपैकी तुला कोण अधिक पसन्त आहे?" राजाने विचारले.

"तसे तर दोघेही चांगले आणि योग्य आहेत. पण माझ्या मनात वीरबाहूच जास्त भरला आहे, कारण तो सुभाषहूनही अधिक सुन्दर दिसतो न!" राणीने आपला अभिप्राय व्यक्त केला.

यावर हसून राजा म्हणाला–"पहा बुवा! मला तर सुभाषच जास्त बरा वाटतो. पण तरीही केवळ बाहेरच्या रंग-रूपावर आकर्षित होऊन आपला जावई ठरवणं उचित होणार नाही. एकाद्याच्या स्वभावातच काही खोट असेल, तर बाहेरून तो किती सुन्दर दिसत असला तरी काय फायदा? उलट ज्याची चालचलणूक चांगली असेल तो कुरूप असला तरी, लोक त्याला चांगला मान देतात."

"तरीही मला आपला वीरबाहूच पसन्त आहे. तो सुन्दर, अन् शिवाय गुणीही आहे. मला विचाराल तर तोच आपल्या मुली-साठी जास्त योग्य आहे." राणी निश्चयाने म्हणाली.

"ठीक आहे. आपण एकादी परीक्षा ठेवून पारख करू या. मला आपलं अजूनही वाटतंय् की सुभाषच अधिक



बुद्धिमान आणि योग्य आहे." राजा म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सुभाष अन् वीरबाहु या दोघांनाही बोलावून घेऊन राजा म्हणाला– "आपल्या देशाच्या सीमेवरील धान्यकूट प्रान्ताबद्दल तुम्हाला माहिती असेलच. त्या प्रान्ताच्या गावांकडून आपली करवसुली अजून मिळालेली नाही. मला संशय आहे की तिथले आपले अधिकारी गाफिल आणि बेजबाबदार आहेत." नंतर तो वीरबाहुला उद्देशून म्हणाला–"हे बघ वीरबाहु! धान्यकूटच्या उत्तर भागातल्या गावांची कर-वसुली मी तुझ्यावर सोपवत आहे. सुभाषने दक्षिण भागातल्या गावातली कर-वसुली करावी."

सुभाष अन् वीरबाहु तेथून जायला निघाले, तेव्हा त्यांना थांबवून राजा म्हणाला – "पहा मुलांनो, धान्यकूटमधे आपला जो महाल आहे, तेथेच तुम्ही दोघांनी रहायचे. येताना दोघं निरनिराळे येऊ नका; बरोबरच या. हां! पण मी तुमच्याबरोबर कोणी अंगरक्षक किंवा शिपाई वगैरे देणार नाही. का, ते माहीत आहे? मला हे पडताळून पाहायचंय की तुम्ही आत्मरक्षण अन् त्याबरोबरच राजखजिन्याचं रक्षणही करायला योग्य आहात किंवा नाही. कोणाची मदत वगैरे



न घेता, तुम्हाला स्वतःलाच हे काम पार पाडायचंय. दोघांपैकी एकाला सेनाध्यक्ष म्हणून नेमायची इच्छा आहे माझी."

धान्यकूटमधले राजकर्मचारी कर वसूल करतच होते, नेमके त्याच वेळी वीरबाहु आणि सुभाष तेथे जाऊन पोचले. शेतकरी आणि व्यापाऱ्यांकडून अधिकाऱ्यांनी जी रक्कम वसूल केली होती, ती सगळी त्यांनी या दोघांच्या हाती सुपूर्त केली. अशा रीतीने कर-वसुलीची सर्व रक्कम फारच सुलभतेने त्यांच्या हाती आली. केवळ दोन आठवड्यातच दोघांचे काम पूर्ण झाले.

आता दोघांनीही दुसऱ्याच दिवशी राज-धानीला परत निघायचे ठरवले. परन्तु त्याच



रात्री वीरबाहुच्या खोलीचा दरवाजा कोणी-तरी खटखटावला. नंतर एक बुरखाधारी आत शिरला अन् सुरीचा धाक दाखवून कर्ज-वसुलीच्या रकमेची थैली त्याने हस्तगत केली; खोलीच्या बाहेर येऊन त्याने बाहेरून कडी घातली आणि तेथून आपली वाट धरली.

खोलीच्या आतून वीरबाहुच्या आरडाओरडाचा आवाज ऐकून महालाच्या पहारेकऱ्यांनी येऊन दरवाजा उघडला. सुभाषही तेथे येऊन पोचला. वीरबाहु जेव्हा थोड्या वेळाने पूर्ण शुद्धीत आला, तेव्हा त्याने झाल्या घटनेची सर्व वार्ता सांगितली.

ते ऐकून पहारेकरी दचकलेच! ते म्हणाले–"अशा तऱ्हेने इथे चोरी घडल्याचा हा पहिलाच प्रसंग आहे. राजकर्मचाऱ्यालाही लुटणारा जो कोणी असेल तो मोठाच हुशार असला पाहिजे. आम्ही तर नेहमीप्रमाणेच अगदी जागरूकपणे पहारा देत होतो."

सुभाष आणि वीरबाहु दुसऱ्याच दिवशी राजधानीकडे परत निघाले. तेथे पोचताच सुभाषने आपल्या भागाच्या कर वसुलीची रक्कम राजाला नेऊन दिली. पण बिचारा वीरबाहु मात्र भरल्या डोळ्यांनी राजापुढे मुकाट उभा होता!

राजाने त्याला सान्त्वना देत म्हटले–"उगाच काळजी नको करूस वीरबाहु! तुझ्या जागी मी असतो तरी असंच केलं असतं! चोर राजमहालातही घुसतील अशी कोणाला कल्पना येणार?"

सुभाष मात्र खूष होता, कारण त्याने आपले काम सफलतापूर्वक केलेले होते! राजाही आपल्यावर खूष होईल याची खात्री होती त्याला!

त्याच दिवशी थोड्या वेळाने कृपाल राजाकडे आला आणि पैशांची थैली राजापुढे ठेवत तो म्हणाला–"महाराज, हे वीरबाहुच्या हातून हरवलेलं धन!"

राजाने आश्चर्याने विचारले–"हा काय प्रकार आहे कृपाल? तू वीरबाहुला का लुटलंस?"

"ते काम माझं नाही महाराज! आपण काही तशी आज्ञा नव्हती दिली मला! पण अंधारातून चोर जेव्हा पळू लागला, तेव्हां त्याच्या हातून थैली मात्र हिसकली मी!" कृपाल म्हणाला.

"असं होतं, तर चोराला का नाही पकडलंस तू?" राजाने विचारले.

"मुद्दामच मी तसं केलं नाही महाराज! मनात आणलं असतं तर नक्कीच पकडू शकलो असतो मी त्याला! इतकंच काय, पण मी त्याला मारूनही टाकू शकलो असतो. पण मी त्या बुरखाधारी व्यक्तीला ओळखलं होतं, म्हणून मी केवळ थैली तेवढीच काढून घेतली. नन्तर तो अतिथिशाळेकडे पळाला होता." कृपालने माहिती दिली.

"काय म्हणालास? राजमहालातल्या अतिथिशाळेतच होता तो चोर?" राजाने दचकून विचारले.

"होय महाराज, त्याची खोली वीरबाहुच्या खोलीशेजारीच होती." कृपाल म्हणाला.

क्षणभर गप्प राहून राजा पुन्हा म्हणाला–"तू त्या चोराला पकडलं असतंस ना कृपाल, तर छान असतं बघ! त्याने जो गुन्हा केला आहे, तो काही मामुली नव्हे."



"आणखी एक गोष्ट आहे महाराज, तो इथे नक्कीच येईल. आपल्याला वाटलं तर आपणच त्याला कैद कराल असा विचार केला मी! मी तर वेष बदललेला होता, त्यामुळे त्याने मला ओळखलेलं नाही. तो मला चोरच समजला असणार." कृपाल म्हणाला.

त्या रात्री राजा राणीला म्हणाला–"या राज्याचा वारस कोण होणार याचा निर्णय करून टाकला मी. आता तुझीही संमति मिळाली तर काम पुरं झालंच असं समजायला हवं."

"या परीक्षेत वीरबाहु हारलेला आहे तेव्हा सुभाषचीच जावई म्हणून निवड झालेली असणार; होय ना?" राणीने विचारले.



"एकदम चूक! मी तर कृपालची निवड केली आहे. तो आपली जबाबदारी फारच चांगली ओळखतो, आणि चांगला बुद्धिमान सुद्धा आहे तो! कोणतं काम त्याच्यावर सोपवलं तर तो ते समर्थपणे पुरं करू शकतो. आवश्यक तिथेच तो तोंड उघडतो, एक शब्दही वायफळ बोलत नाही तो! त्याच्यात लोभ नावालाही नाही, अन् तो अत्यन्त प्रामाणिक आहे. इतका गुणसंपन्न असा एकही तरुण मी पाहिला नाही आजपर्यंत!" राजा म्हणाला.

ते ऐकून राणी जरा वेळ गप्प राहिली. नंतर हसत हसत ती म्हणाली–"असं काही होईलसं मनातही आलं नाही हं माझ्या! तुमच्या निर्णयाशी पूर्णतः सहमत आहे मी! मला वाटतं की लक्ष्मीप्रियालाही आवडतो तो!"

नंतर लक्ष्मीप्रिया आणि कृपाल यांचा विवाह धूमधडाक्याने अन् थाटामाटात पार पडला.

इतकी गोष्ट सांगून झाल्यावर वेताळ राजा विक्रमादित्यला म्हणाला–"राजा, कृपालने जे काम केलं, ते कोणी सामान्य राजकर्मचारीही असता करू शकला की! मग त्याच्यातच एवढं काय विशेष होतं की राजाने त्याला आपला जावई म्हणून निवडलं? हां, इतकं खरं, की तो आपली जबाबदारी ओळखणारा आणि धैर्यवान् युवक आहे. पण तो प्रामाणिक आहे, लोभी नाही–असं आपण कसं म्हणू शकतो एकदम? कृपालच्या बाबतीतली राजाची वागणूक, त्याची चंचलताच प्रदर्शित करते की नाही? या शिवाय दुसरं काही कारण सुचतं तुला? माझ्या प्रश्नांची उत्तरं माहीत असूनही तू न दिलीस, तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होऊन पडतील."

विक्रमादित्य ताबडतोब उत्तरला–"सुभाषने वीरबाहुकडून पैशांची थैली अशा करता पळवली की–आपणच त्याच्याहून अधिक योग्य आहोत असं त्याला राजासमोर सिद्ध करायचं होतं. वीरबाहु असमर्थ आहे असं वाटलं असतं राजाला! त्यामुळे दोघेही सारखेच नालायक आहेत हेच सिद्ध झालं. कृपालने सर्वच घटना आपल्या डोळ्यांनी पाहिलेल्या आहेत. एका सामान्य चोरापासूनही आपला बचाव न करू शकण्याइतका वीरबाहु असमर्थ आहे. पण सुभाष तर चोरी करण्यासारखा गुन्हा करण्याइतका चरित्रहीन आणि धोकेबाज निघाला! उलट कृपाल हा धैर्यवान् आणि साहसी आहे. आपली जबाबदारी त्याने उत्तम रीतीने पार पाडली. सुभाषच्या चोरीबद्दल धान्यकूटमधे कोणाजवळही काहीही बोलला नाही. त्याने ही गोष्ट बाहेर फोडली असती तर राजपरिवारातला एक नातेवाईक चोर आहे अशी बदनामी झाली असती बाहेर! त्यामुळे ते रहस्य कृपालने केवळ राजासमोरच प्रकट केलं! त्याने असा विचार केला की सुभाषला काही शिक्षा मिळायचीच असेल तर ती खुद्द राजाकडून मिळणेच योग्य! हा राजपरिवाराचा मामला असल्याने आपण त्यात जितका अत्यन्त आवश्यक, तितकाच भाग घेणे उचित होईल! याचाच अर्थ असा की कोणीही आपले नियम, अधिकार व सीमा यांच्या बाहेर पाऊल टाकू नये; याचे उल्लंघन केल्यास त्याचे परिणामही भोगावे लागतात. कृपालने सुभाषकडून जेव्हा थैली हिसकली तेव्हा त्याने वेषांतर केलेले होते. त्याला कोणी ओळखूही शकत नव्हते. मनात असतं तर ती सारी रक्कम तो स्वतःच हडप करू शकला असता. पण तसं न करून त्याने आपला प्रामाणिकपणाच सिद्ध केला. या सर्व कारणांमुळे राजा कृपालवर खूष झाला. यात राजा चंचल असल्याचा प्रश्नच कुठे येतो? त्याला चंचल म्हणणे चूकच नव्हे का?"

इतके बोलून गप्प होताच विक्रमादित्याचा मौनभंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्या झाडाच्या फान्दीला लटकू लागला. (कल्पित)

[आधार–श्री मनोज दास यांची रचना]



# आत्मज्ञान

एक शेतकरी आपल्या शेताची राखण करीत होता. तेथूनच एक संन्यासी चालला होता. थोडा वेळ विश्रांति घेण्याच्या विचाराने दोघे ही एका झाडाखाली बसले.

संन्याशाने शेतकऱ्याला विचारले–"हे तुझंच शेत आहे न? पीक-पाणी कसं काय? यंदा पण वेळेवर पाऊस होणार का?"

नमस्कार करून शेतकरी संन्याशाला म्हणाला–"स्वामीजी, पीक कसं काय हे ते हाती आल्याशिवाय कसं सांगू? पाऊस वेळेवर येणार की नाही हे आताच कसं सांगता येईल बरे? बरं, पण आपण कुठं चालला आहात हे तर सांगाल?"

शेजारच्या डोंगराकडे बोट दाखवीत संन्यासी म्हणाला–"तिथं एक महान् सिद्ध पुरुष आहे. मी उपदेश घेण्यासाठी त्यांच्याकडे चाललो आहे." जरा उदासपणे संन्याशाने आणखी सांगितलं–"या पूर्वी ही मी तीन गुरूंची सेवा केली, पण मला कोणी आत्मज्ञान दिलं नाही. आता पहायचंय, या वेळी काय होतंय ते!"

यावर शेतकरी हंसून म्हणाला–"चाळीस वर्षं पीक नि पन्नास वर्षं पाऊस तर मी स्वतः पहात आलो आहे. तरी पण उद्या काय होईल हे जाणण्यासाठी या सर्व अनुभवाचा काडीचा उपयोग नाही. आणि आपण तर दुसऱ्यांच्या अनुभवावरून आत्मज्ञान मिळविण्याच्या प्रयत्नात आहात! कुणास ठाऊक आपली ही इच्छा पूर्ण होईल की नाही?"

शेतकऱ्याच्या या बोलण्यामुळे संन्याशाला ज्ञानोदय झाला. आत्मज्ञान प्राप्त करण्या-साठीं स्वतःच प्रयत्न केला पाहिजे, हे जाणून संन्यासी आल्या वाटेने परत फिरला.





# ज्ञानाचा खजिना

## तो कोण?

भारताचा पहिला स्वातंत्र्य-संग्राम! सैनिकांच्या बंडाचे ते दिवस होते! एका छोटया राज्याचा राजा फिरंग्यां विरुद्ध बंड करणाऱ्या शिपायांचा नेता बनला. एका बाजूला तो शत्रूशी लढत होता, तर दुसरीकडे ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्याने त्याच्या राज्याला वेढा दिलेला होता. बातमी लागताच तो आपल्या राज्याकडे जाण्याची तयारी करू लागला. पण त्याला रस्ता न देता इंग्रज सेना त्याच्याशी निकराने लढू लागली. तरी पण शत्रूच्या सैन्याशी धाडसाने लढत तो पुढे निघाला. इंग्रजांच्या बंदुकीच्या गोळ्या त्याच्या उजव्या हातात घुसल्या. प्राण वाचवायचा असेल तर उजवा हात कापून टाकला पाहिजे अशी त्याची अवस्था झाली.

शल्य-चिकित्सेसाठी वैद्यांना बोलविण्याची ही वेळ नव्हती. म्हणून गंगा नदीच्या किनाऱ्यावर उभे राहून, आपल्या डाव्या हाताने उजवा हात कापून टाकून तो म्हणाला–"गंगा माते, ही माझी भेट स्वीकार कर!"

हा धाडसी वीर एकादा तरूण असता, तर कदाचित् जिवंत ही राहू शकला असता! पण त्या वेळी या महाप्रतापी वीराचं वय होतं ७५ वर्षं! या घटनेच्या दुसऱ्याच दिवशी या लढवय्याचा देहान्त झाला. हा वीर कोण?

[पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. बहाई धर्म हा काय आहे?

२. आपल्या देशात बहाई मंदिर कोठे आहे?

३. 'उडणाऱ्या तबकडया' सर्वप्रथम कोणी पाहिल्या?

४. त्या त्याने केव्हां पाहिल्या?

५. त्यांना 'उडणाऱ्या तबकडया' असं का म्हणतात?

[पान ३६ पहा]

# कामरूप राज्य

आपल्या पुराणात ज्यांचा उल्लेख येतो अशा राज्यात कामरूप राज्य प्रसिद्ध आहे. त्याची राजधानी होती प्राग्ज्योतिषपुर. या राज्याचं नाव 'कामरूप' का पडलं? या भूमी वर जो जी इच्छा करील ती पूर्ण होते. म्हणून या राज्याला कामरूप हे नाव मिळालं असे काही विद्वान म्हणतात. दुसऱ्या काही विद्वानांनी या नावाशी एक पुराण-कथा जोडली आहे. ती अशी– श्रीशंकराच्या क्रोधाग्नीत काम (मदन) जळून भस्म झाला. यावर त्याची पत्नी रति हिने कठोर तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न केलं आणि मन्मथाला पुन्हा जिवंत केलं. कामदेवाने इथे आपलं रूप पुन्हा धारण केलं, म्हणून या भूमीचं नाव 'कामरूप' पडलं.

प्राग्ज्योतिषपुर या नावाचा अर्थ आहे पूर्व दिशेकडील ज्योती सारखे नगर!

आजचं असाम राज्यच कोणे एके काळचं पुराण-प्रसिद्ध कामरूप राज्य होय आणि गोहाटीचं प्राचीन नाव प्राग्ज्योतिषपुर! येथील जवळच्या डोंगरात कामरूप राज्यातील प्रसिद्ध देवता 'कामाक्षा' च मंदिर आहे.




पौराणिक कथेनुसार नरकासुर मिथिला सोडून कामरूप राज्यात आला होता. त्याचा मुलगा भगदत्त याने महाभारतांतील युद्धात कौरवांचा पक्ष घेतला आणि त्या युद्धातच त्याचा अंत झाला.

आता आपण इतिहास-काळात पाहू लागलो तर असे दिसते की चवथ्या इसवी शतकात समुद्रगुप्तचा सामंत राजा पुष्य-वर्मा येथे राज्य करीत होता.

तेराव्या शतकात उत्तरी ब्रह्मदेशातील 'शान' जातीच्या अहोम राजांनी येथे येऊन बराच भूभाग आपल्या अधिकारा खाली आणला. तेव्हां पासून याचं नाव आसाम पडलं असं म्हणतात.

सन १८२४ मध्यें हा प्रान्त इंग्रजांच्या ताब्यात आला.

अहोम राजांनी 'शान' जातीची नावे हळू हळू सोडून हिन्दू नावे स्वीकारली. धाडसी राजे म्हणून ते प्रसिद्ध झाले. या राजांनी मुस्लिम व पठाणी राजांच्या आक्रमणापासून आपल्या राज्याचे संरक्षण केले.

आजचे आसाम राज्य ७८,५२३ चौरस किलो मीटर क्षेत्रात पसरलेले आहे. गोहाटी जवळचे दिसपुर शहर ही राज्याची नवी राजधानी आहे.



### राक्षसी पालींसाठी खोद-काम

कोणे एके काळी या पृथ्वीवर राक्षसी पाली (डायनोसोर) रहात होत्या. यांच्या बाबत अधिक माहिती मिळविण्यासाठी वैज्ञानिक गेल्या एक शतक भर डेनवर पर्वताच्या आसमंतात खोदकाम करीत आहेत. या पर्वताच्या जन्मापूर्वी–म्हणजे १४ कोटी वर्षा पुर्वी इथे राक्षसी पाली होत्या. त्यांची पाषाणवत् झालेली हाडे येथे सापडत आहेत. यांच्या माह्याने या राक्षसी पाली बाबत आणखी काही माहिती मिळेल अशी शास्त्रज्ञांना आशा आहे.

### कमी होत चाललेले व्यसन

गेल्या वर्षी अमेरिकेतील धूम्रपानाचे व्यसन पाच टक्के कमी झालं. सन १९८९ मध्ये इथे एकूण ५३,२०० कोटी सिगरेटी जळून खाक झाल्याचे एका परीक्षण-समितीने आपल्या अहवालात नमूद केले आहे. नागरिकांचा सरासरी वार्षिक सिगरेटींचा उपयोग सात टक्क्यांनी कमी झाला आहे.



# साहित्य सोनियाचिया खाणी

१. 'कादंबरीकार' म्हणण्यास योग्य असा इंग्रजीचा पहिला कादंबरी-लेखक कोण ?

२. त्याने सर्वोत्कृष्ठ कोणती कादंबरी लिहिली आहे ?

३. ती कल्पित आहे की प्रत्यक्ष घटनांवर आधारलेली आहे ?

४. या कादंबरीचे प्रमुख पात्र कोणत्या व्यक्तीवर आधारलेले आहे ?

५. फ्रेंच व इंग्रजीत वाङमय-निर्मिति करून वयाच्या केवळ २१ व्या वर्षी निधन पावलेला भारतीय कादंबरीकार कोण ?

## उत्तरावली

### तो कोण ?

बिहारच्या जगदीशपुरचा राजा कुंवरसिंह.

### तुम्हाला माहीत आहे ?

१. इराणच्या बहाउल्ला (१८१७-९२) ने हा धर्म स्थापन केला. सर्व धर्म-समानता व शांतिप्रेम ही याची प्रमुख तत्त्वे आहेत.
२. नव्या दिल्लीत.
३. केनेन अर्नाल्ड नावाचा अमेरिकी शास्त्रज्ञ.
४. जून १९४७ मध्ये.
५. अर्नाल्डचं म्हणणं असं की पाण्याच्या पृष्ठ-भागावर फेकलेल्या तबकड्या जशा उडतात, तशा या त्याला उडताना दिसल्या; म्हणून.

### साहित्य

१. डॅनियल डीफो (१६६१-१७३१).
२. रॉबिनसन क्रूसो.
३. प्रत्यक्ष घटनांवर आधारित.
४. अलेक्झँडर सेलकिर्क नावाचा खलाशी
५. तोरु दत्त.



## श्री रामकृष्ण परमहंस

आपल्या देशात ज्या महापुरुषांनी जन्म घेतला, त्यांच्यापैकीच एक म्हणजे श्री रामकृष्ण परमहंस हे होत. त्यांच्या जीवनकाळात फारसे कोणी त्यांना ओळखतही नसे. परंतु नंतर त्यांचे प्रमुख शिष्य स्वामी विवेकानन्द आणि दुसऱ्या काही शिष्यांमुळे त्यांचे नाव सर्वतोपरि झाले आणि जनतेला त्यांची शिकवण समजली.

बंगालमध्ये एक छोटेसे गाव होते कमर्पुकुर. येथे क्षुदीराम नावाचा एक ब्राह्मण रहात असे. एकदा तो तीर्थक्षेत्र गया येथ दर्शनासाठी गेला असता त्याला एक अद्भुत असे स्वप्न पडले. त्या स्वप्नात भगवान महाविष्णूने दर्शन देऊन त्याला सांगितले की—मी तुझा पुत्र होऊन जन्माला येणार आहे.





क्षुदीरामची पत्नी चन्द्रादेवीला १७ फेब्रुवारी १८३६ रोजी तिसरे अपत्य म्हणून एक मुलगा झाला. पित्याने बाळाचे नाव ठेवले गदाधर. भगवान विष्णूंच्या अनेक नावांपैकीच हे एक नाव आहे. या बाळाची जन्मकुंडली पाहून ज्योतिष्यांनी म्हटले की एक महान् आत्मा या बाळाच्या रूपाने धरतीवर अवतरला आहे.



गदाधर जसजसा मोठा होत गेला, तसतसा तो अधिकाधिक लोकांचा लाडका बनत राहिला. गावच्या स्त्रिया त्याचे कौतुक करताना थकत नसत ! लहानपणापासूनच तो मोठा हुशार आणि चपळ होता. खेळणे-बागडणे अन् पोहणे त्याला खूप आवडे.

गदाधर सात वर्षांचा असताना एक दिवस हिरव्या-हिरव्या शेतातून एकटाच फिरत होता. त्याने सहजच आकाशाकडे पाहिले. काळ्या-निळ्या ढगांशी पाठशिवणी करत पांढऱ्या-सफेत पक्षांचा एक थवा उडत होता ! एकूण ते दृश्य मोठे लोभसवाणे होते. ते पाहून गदाधरला परमानन्द वाटला ! अन् आयुष्यात प्रथमच त्याला काही विचित्रशी अनुभूति झाली. ही काहीशी समाधि सारखी अवस्था होती !





तेथेच तो बेहोश होऊन पडला. त्याच्या मित्रांनी त्याला घरी पोचवले. शुद्धीवर आल्यावर तो हसत हसत चहूकडे पाहू लागला. अगदी सामान्य स्थितीत होता तो. पण त्या दिवसा-पासून या समाधी-अवस्थेचा अनुभव त्याला वेळोवेळी येऊ लागला.

कमर्पुकूर हे एक सुसंपन्न गाव होते. गावच्या रस्त्याने जाणाऱ्या यात्रेकरूं-साठी त्या गावच्या जमीनदाराने एक धर्मशाळा बांधलेली होती. या धर्मशाळेत साधु-महात्मे नेहमीच वास्तव्यास असत. गदाधर तेथे जाई अन् तासन्‌तास बसून त्यांचे बोलणे एकत बसे. ते ज्या कथा सांगत त्या तो मोठ्या आवडीने ऐके !





एके दिवशी काही संन्याशांनी गदाधराला बालसंन्याशाचा वेष चढवला, अंगाला विभूति फासली आणि त्याच वेषात त्याला घरी पाठवून दिले. दण्ड-कमण्डलू हाती घेऊन आलेल्या आपल्या पोराला पाहून आई थक्क झाली !

आठ वर्षांच्या लहान वयातच गदाधर आपल्या अत्यंत तीव्र बुद्धीची चुणूक दाखवू लागला. एके दिवशी जमीन-दाराच्या घरात बसलेल्या मोठ-मोठ्या पंडितांना एका समस्येचे उत्तर सापडेना. ते खूप डोकी खाजवत राहिले. त्यावेळी तेथेच असणाऱ्या बालक गदाधराने उत्तर मोठ्या सहजपणे सांगितले आणि सर्वांनाच आश्चर्याने तोंडात बोट घालायला लावले.





गावात एकदा कसलासा मोठा उत्सव साजरा केला जात होता. मित्रांच्या इच्छेवरून भगवान शिवाचा वेष धारण करून गदाधर मंचावर लोकांपुढे आला. पण तिथेच त्याची समाधि लागल्यामुळे कार्यक्रम मधेच स्थगित करावा लागला.

गदाधरचे वडील वारले आणि आपला मोठा भाऊ रामकुमार याच्याबरोबर तो कलकत्त्याला आला. शहरातल्या मोठ मोठ्या इमारती, येणारी-जाणारी वाहने आणि आपापल्या उद्योगात व्यस्त असणारी रस्त्यातून इकडे-तिकडे जाणारी इतकी खूप माणसे पाहून गदाधरला अचंबा वाटला.





रामकुमारने एक लहानशी संस्कृत पाठशाळा सुरू केली. गदाधरही तिथेच शिकू लागला. परन्तु काही दिवसातच तो मोठ्या भावाला म्हणाला—"मला हे धडे आवडत नाहीत मुळीच ! मला वाटतं की आपण खरं ज्ञान आणि सत्य या बाबतीत माहिती मिळवावी. मला खरं ज्ञान हवं !"

(क्रमश:)



# न्याय

गोवर्धनगिरी राज्यावर राजा नरेन्द्र भूपाल राज्य करत होता. तो मोठा दयाळू आणि बुद्धिमान होता. जनतेच्या सुखासाठी नेहमी काही न काही करत असे तो. जनतेच्या अडचणी स्वत:च समजून घेऊन त्या दूर करण्यासाठी तो आटोकाट प्रयत्न करी. रोज सकाळी एका ठरीव वेळात कोणीही येऊन आपल्या अडचणी किंवा तक्रारी राजापुढे प्रत्यक्ष मांडू शके. नंतर राजा त्या अडचणी सोडवायचा प्रयत्न करी. आपली बुद्धि व समज यांच्या मदतीने तो पटकन अडचणी सोडवून देई.

एके दिवशी सकाळी रूपानी नावाची एक स्त्री राजाकडे आपली तक्रार नोन्द-वायला आली. त्या वेळी राजा आपल्या मन्त्र्याशी काही खास विषयावर बोलत होता. राजाने तिला ताबडतोब विचारले—"काय झालं ताई?"

"महाराज, माझं नाव आहे रूपानी. माझे पति रामदेव हे रोज नावेतून नदी पार करून शहरात जातात आणि तिथे आपला व्यापार करून संध्याकाळी घरी परततात. पण मी असं ऐकलं की काल सकाळी नदी ओलांडत असताना ते पाण्यात पडून वाहून गेले." रूपानीने आपले म्हणणे मांडले.

आश्चर्याने राजाने विचारले—"ऐकलं? म्हणजे याचा अर्थ काय?"

"हां, हां महाराज! मी खरंच ऐकलं असं. आमच्या शेजारी राधेश्याम नावाचा एक व्यापारी रहातो. कधी कधी एकाच नावेतून ते नदी पार होतात, तर कधी निरनिराळ्या नावाही मुक्रर करतात ते. काल राधेश्याम एका निराळ्या नावेत बसला होता अन् त्याने दुरूनच माझे पति बसलेली नावही पाहिली; ते एकटेच होते

अंजली जकली

त्या नावेत! नावाडी जागरी याने माझ्या पतीच्या हातातली थैली खेचून घेतली अन् त्यांना नावेतून खाली पाण्यात ढकलून दिले! ही सर्व घटना राधेश्यामने दुरूनच पाहिली. ही बातमी ऐकताच मी न्यायासाठी आपणाकडे धावत आले!" डोळ्यात पाणी आणून रूपानीने आपली कथा सांगितली.

राजाने ताबडतोब आपल्या शिपायांना रूपानीच्या पतीचे शरीर नदीतून शोधून काढायला पाठवले; आणि आणखी एका शिपायाला पाठवून राधेश्यामला बोलावून घेतले.

राधेश्याम ताबडतोब हजर झाला. त्याने राजाला मुजरा करून म्हटले– "महाराज, माझं नाव राधेश्याम! दुरून मी आपल्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिलं– जागरीने रामदेवची थैली हिसकावून घेतली आणि त्याला नावेतून नदीत ढकलून दिलं! दुरूनही दोघांना ओळखण्यात मी चूक करणं अशक्य आहे!"

आता राजाने रूपानीला विचारले– "ठीक आहे, तू सांगू शकतेस, रामदेवच्या थैलीत काय काय होतं?"

रूपानी उत्तरली– "होय महाराज, थैलीत चाळीस नाणी आणि माझ्या दोन बांगड्याही होत्या. त्या गहाण ठेवून कर्ज घेण्यासाठीच माझे पति शहराकडे निघाले होते. ते सर्व हडपण्यासाठीच जागरीने त्यांच्यावर हल्ला केला असला पाहिजे."



इतक्यात काही शिपायांनी तेथे येऊन रामदेवचं प्रेत सापडलं असल्याची बातमी दिली. राजा आणि मंत्री प्रेत पहायला निघून गेले. जाता जाता राजाने एका शिपायाला सांगितले– "तू ताबडतोब जाऊन जागरीला दरबारात घेऊन ये." प्रेत पाहून राजा परत आला, तोपर्यंत जागरी तेथे पोचलेला होता.

राजा जागरीला म्हणाला– "तुझ्या बाबतीत तक्रार आहे, की तू रामदेव नावाच्या व्यापाऱ्याला काल आपल्या नावेतून नदीत ढकलून मारून टाकलेस!"

जागरीने झटकन उत्तर दिले– "महाराज, हे सर्व खोटं आहे! रामदेव नावेच्या कडेला बसून पेंगत होता अन् तो स्वतः आपला आपण नदीत पडला. हातातल्या थैलीसकट तो प्रवाहात वाहून गेला महाराज!"

"मग त्याला वाचवायचा प्रयत्न का नाही केलास तू?" राजाने विचारले.

"प्रयत्न? वा, वा! प्रयत्न केला तर! तो जेव्हा बुडू लागला, तेव्हा त्याच्या डोक्याचे ओले केस पकडून त्याला वर खेचायचा खूप प्रयत्न केला मी! पण, माझा नाइलाज झाला, वाचवू शकलो नाही मी त्याला! त्याचे ते ओले केस माझ्या हातातून निसटून गेले." जागरीने आपल्या बाजूने समर्थन करायचा प्रयत्न केला.

आता मात्र राजा फारच रागावला– "अरे नालायका, पैशाच्या लोभाने तू रामदेवला ढकलून दिलंस याचा पुरावा



त्या नावेत! नावाडी जागरी याने माझ्या पतीच्या हातातली थैली खेचून घेतली अन् त्यांना नावेतून खाली पाण्यात ढकलून दिले! ही सर्व घटना राधेश्यामने दुरूनच पाहिली. ही बातमी ऐकताच मी न्यायासाठी आपणाकडे धावत आले!" डोळ्यात पाणी आणून रूपानीने आपली कथा सांगितली.

राजाने ताबडतोब आपल्या शिपायांना रूपानीच्या पतीचे शरीर नदीतून शोधून काढायला पाठवले; आणि आणखी एका शिपायाला पाठवून राधेश्यामला बोलावून घेतले.

राधेश्याम ताबडतोब हजर झाला. त्याने राजाला मुजरा करून म्हटले– "महाराज, माझं नाव राधेश्याम! दुरून मी आपल्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिलं– जागरीने रामदेवची थैली हिसकावून घेतली आणि त्याला नावेतून नदीत ढकलून दिलं! दूरूनही दोघांना ओळखण्यात मी चूक करणं अशक्य आहे!"

आता राजाने रूपानीला विचारले– "ठीक आहे, तू सांगू शकतेस, रामदेवच्या थैलीत काय काय होतं?"

रूपानी उत्तरली–"होय महाराज, थैलीत चाळीस नाणी आणि माझ्या दोन बांगड्याही होत्या. त्या गहाण ठेवून कर्ज घेण्यासाठीच माझे पति शहराकडे निघाले होते. ते सर्व हडपण्यासाठीच जागरीने त्यांच्यावर हल्ला केला असला पाहिजे."





# वीर हनुमान

प्राचीन काळी सुपर्व पर्वतावर केसरी नावाचा एक वानर रहात असे. त्या पर्वतावर असे जवळ जवळ साठ हजार वानर रहात. केसरी हा त्यांचा नायक होता.

केसरी हा मोठा बलवान व भाग्यशालीही होता. तरीही तो ब्रह्मचारीच राहिला आणि कठोर तपस्या करून त्याने अनेक अद्भुत शक्ति प्राप्त करून घेतल्या.

त्याच काळात शंबसाधन नावाचा एक राक्षसही त्याच भागात रहात असे. तपस्या करून त्याने ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतले व तिन्ही लोकांना आपण जिंकू शकू असा वर प्राप्त करून घेतला. पण असा वर मिळाल्यापासून तो फार गर्विष्ठ बनला. मुनि, सिद्ध पुरुष व देव-देवता यांची छळणूक करण्यात त्याला आनन्द वाटू लागला.

त्यामुळे त्रासून सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले आणि 'शंबसाधनाचा त्रास सहन करण्याची ताकद आपल्यात नाही' अशी त्यांनी तक्रार केली, आणि त्यापासून मुक्ति मिळवण्याचा उपायही विचारला. ब्रह्मदेवाने त्या सर्वांना केसरीकडे पाठवले. ते सर्व देव आता शंबसाधनाच्या त्रासाबद्दल निवेदन करण्यासाठी केसरी-कडे गेले. आपले निवेदन संपल्यावर त्यांनी विनवले–"केसरी, आता या दुष्टापासून तूच आमचे रक्षण कर, आमचा त्राता तूच हो."



अगदी त्याच वेळी इकडे नारदमुनि शंबसाधनकडे गेले व त्यांनी त्याचे अभीष्ट-चिन्तन केले.

शंबसाधननेही नारदमुनींना नम्रतापूर्वक नमस्कार करून विचारले–" कोठून आगमन होत आहे आपलं मुनिवर? काही खास बातमी ?"

" इन्द्रादि देवता एक वानरा कडून तुला मारण्याचा डाव रचीत आहेत ही बातमी तुला देण्यासाठी मी आलो आहे !"

हे ऐकून तर शंबसाधनाच्या तळपायाची आग मस्तकाला पोचली. मोठ्याने हुंकारीत तो म्हणाला, " अरे, मी मोठ्या दयाळू-पणाने या देवांना प्राणदान दिलं होतं. आता ते माझ्याच जिवावर उठले आहेत काय ? मी पण पहातोच की एक सामान्य माकड मला कसं मारू शकतंय ते ! आत्ता-पर्यंत मरगळलेले देव मला मारायचं स्वप्न पहात आहेत काय ! त्यांनाही आता कळेल म्हणावं माझी ताकद काय आहे ती !"

प्रलयकाळच्या रुद्राप्रमाणे भयंकर भासणारा तो राक्षस हातात तळपती तलवार घऊन केसरी जवळ जाऊन पोचला. शंबसाधनने एक हुंकार भरला. तो आवाज ऐकताच केसरीच्या जवळ असणाऱ्या देवांची हृदये भीतीने धडधडू लागली ! ते सर्व आसपासच्या गुहातून आणि झाडांच्या मागे लपायचा प्रयत्न करू लागले.

"आता कुठे पळणार रे तुम्ही ? मी तर तुम्हा सर्वांना एकाच वारात धराशायी करून टाकतो पहा." असे म्हणत शंबसाधन देवांच्या मागे लागला. त्याबरोबर केसरी त्या सर्वांच्या पुढे होऊन या राक्षसासमोर पाय रोवून उभा राहिला. अन् तो म्हणाला– "अरे दुष्टा, माझ्या हातून मरण्यासाठीच आपण होऊन आला अहेस वघ तू ! चल ये, लढ पाहू माझ्याशी !"

"अरे हट ! एका माकडाशी काय लढायचंय् ! माझ्याशी लढायला तर खुद्द भगवान शिवशंकरही भितात. तू काय टिकणार माझ्यापुढे ? मी आत्ता तावडतोब



मारून टाकतो बघ तुला!" असे म्हणत शंबसाधनने तलवार उगारली.

इतक्यात केसरीने एक मोठा दगड उचलून तो जोरात राक्षसाच्या छातीवर भिरकावला. त्या दगडामुळे त्याच्या छातीचा चुराडा झाला. तेव्हा राक्षसाने लगेच केसरीच्या छातीवर गदेचा प्रहार केला. परन्तु उलटा त्यामुळे गदेचाच चुराडा झाला, केसरी जरा सुद्धा हलला नाही! आता शंबसाधनने केसरीवर भाला फेकला. केसरीने तो मोठ्या कुशलतेने पकडला आणि आपल्या गुडघ्यावर टेकून मोडून टाकला. केसरीला मारायला आता तलवार घेऊन राक्षस पुढे सरसावला. केसरीने तावडतोब आपल्या शेपटीचा फटकारा त्याच्या हातावर मारला, आणि तलवारच त्याच्या हातून गळून पडली!

खाली पडलेली तलवार उचलायला शंबसाधनचे मन तयार नव्हते. त्यामुळे आता तो मुष्टियुद्धाला तयार झाला. पण केसरीने आपल्या मुठींनी त्याला असे बुकलून काढले की शेवटी रक्त ओकून शंबसाधन मरून पडला. अशा तऱ्हेने देवांवरचे संकट टळले!

जाता जाता देवांनी केसरीला सुचवले– "असा तू आता किती दिवस ब्रह्मचारी रहाणार? आता विवाह कर आणि गृहस्थाश्रम स्वीकार." देव निघून गेल्यावर केसरी स्वतःसाठी योग्य अशी वधू शोधू लागला.

ब्रह्मदेवाने अहिल्या नावाची एक रूपवती स्त्री निर्माण केली आणि गौतम मुनींशी तिचा विवाह करून दिला होता. या दंपतीला एक मुलगी झाली. तिचे नाव होते अंजना.

पूर्व जन्मी अंजना ही एका विद्याधराची मुलगी होती. आणि ती एक अजोड अशी गायिका होती. त्यामुळे तिचे नाव 'सुकंठी' असे पडले. सुकंठी एके दिवशी आपल्या सख्यांसह हिमालयात विहार करीत असता, तेथील एका सरोवरात स्नान करून एका





झाडाखाली येऊन उभी राहिली. त्याच वेळी अग्निदेव त्या रस्त्याने जात होते. त्यांना पाहून सुकंठीला हसू आले. यावर क्रोधित होऊन 'पुढील जन्मी तू एका वानराला जन्म देशील' असा शाप त्यांनी तिला दिला.

नन्तर कुंजर नामक एका वानराने पुत्रप्राप्तीसाठी शिवाची तपस्या केली. प्रसन्न होऊन त्याला दर्शन देऊन भगवान शिव म्हणाले–"मुला, तुला मुलगा होणे अशक्य आहे, पण एक मुलगी मात्र तुला मिळेल. त्या सुयोग्य अशा मुलीला माझ्या अंशापासून एक पुत्र होईल. हा मुलगा खूपच प्रसिद्ध होईल आणि तुझ्या वंशाचा उद्धार करील."

आता आपल्याला कन्यारत्न केव्हा लाभेल याची कुंजर प्रतीक्षा करू लागला. काही दिवसातच गौतम मुनी अंजनाला घेऊन त्याच्याकडे आले व तिला त्याच्या हाती सोपवत म्हणाले–"कुंजर, तू या मुलीचे पालन कर." अशा रीतीने शिवाचा वर सुफळ झाला. कुंजर खूपच आनन्दित झाला. त्याने अंजनाला खूप लाडा कोडात वाढवले. इतके की ती आपल्या आई-वडिलांनाही विसरून गेली.

अंजना कुंजरलाच आता आपला पिता समजू लागली होती आणि कुंजरची पत्नी विंध्यावती हिला ती 'आई' म्हणून हाक मारू लागली. अंजना दिसामासी वाढू लागली व उपवर झाली. कुंजरच्या मनात आले की आता हिचा विवाह करायला हवा. याच बेतात केसरीने अंजनाच्या सौन्दर्याची आणि सुरेल आवाजाचीही कीर्ति ऐकली होती. तिला एकदा पाहून घ्यावे म्हणून तो निघाला. त्यावेळी अंजना वनविहार करत होती. या तरुणीची सुवर्णकान्ति पाहून केसरी चकित झाला. तिचे अद्भुत सौंदर्य पाहून तो तिच्यावर मोहित झाला. अंजना आपली पत्नी झाली तर आयुष्यात आपल्याला दुसऱ्या कशाचीही गरज भासणार नाही असे त्याच्या मनात आले.



अंजनानेही केसरीला पाहिले. तिलाही तो फार पसन्त पडला. पण तिने आपल्या मैत्रिणींना याबद्दल काहीच सांगितले नाही. वनविहार तिथेच थांबवून ती घरी परतली.

केसरीने दुसऱ्या दिवशी अंजना आपल्याला आवडल्याचे आपल्या प्रिय जनांना सांगितले. त्याने विचारले–"अंजनाशी माझा विवाह कसा काय घडून येईल बरं?"

त्याचे सगे-मित्र त्याला म्हणाले–"कुंजर हा आपला नातेवाईक बनायला अगदी योग्य आहे. तेव्हा आपण जाऊन मानाने त्याच्या मुलीला मागणी घालू आणि कन्यादान करून देण्याबद्दल त्याला विनन्ति करू. त्याने आपली मागणी स्वीकारली नाही, तर मात्र आपण आपल्या बळाचा वापर करू. नंतर काही वडीलधारी माणसे केसरीच्या बाजूने लग्नाची बोलणी करण्यासाठी कुंजरकडे गेली. त्यांनी कुंजरला केसरीची इच्छा विदित केली. केसरीसारखा सुयोग्य जावई आपल्याला लाभत आहे हे पाहून कुंजर फारच प्रसन्न झाला. त्याने तावडतोब हे स्थळ पसन्त असल्याचे सांगितले, आणि अंजना व केसरी यांचा विवाह विधिपूर्वक पार पडला.

पुढे बरेच दिवस अंजनाच्या भाग्यात अपत्यलाभ आला नाही. तिने व केसरीने अनेक पूजा केल्या, तीर्थस्नाने वगैरे केली; परन्तु कशाचाच काही उपयोग झाला नाही. शेवटी अंजनाने अपत्यासाठी वायुदेवाची आराधना करायचे ठरवले. केसरीनेही तिला यासाठी अनुमति दिली. तो अंजनाला म्हणाला–"ही तपस्या तू पुंजक-स्थळावर जाऊन कर." त्याच स्थानी भगवान वायुचे ध्यान करून तिने आपली तपस्या सुरू केली.

शेवटी वासुदेव प्रसन्न होऊन अंजनाला एक दिव्य फळ देऊन निघून गेले. ते फळ भक्षण केल्यावर अंजना गर्भवती झाली. आपली गर्भ-चिन्हे पाहून अंजना प्रथम चकित झाली आणि नंतर ती व्याकुळ होऊ लागली.



तेव्हा आकाशवाणी झाली की–"मुली, घाबरू नकोस. एकदा भगवान शिवशंकरांनी वायुदेवाला एक दिव्य असे फळ दिले होते. तेच फळ वायुने तुला दिले आहे. तू फळ खाल्ल्यामुळे तुझ्या गर्भात भगवान शिवच मूल म्हणून वाढत आहेत. अशा प्रकारे वायुदेवाने तुला गर्भवती बनवण्यात मदत केली, म्हणून तुझा पुत्र 'वायुपुत्र' म्हणवला जाईल आणि तिन्ही लोकात त्याला अपार कीर्ति मिळेल."

अशा प्रकारे त्या अशरीरी आकाशवाणी नंतर खुद्द वायु-भगवान अंजनासमोर प्रकट होऊन म्हणाला–"मुली, या अदृश्य, अशरीरी वाणीने तुला जे काही सांगितले, ते सर्व खरेच आहे. आता तू घरी जाऊन आपल्या पतीला ही वार्ता दे." आणि वायुदेव अदृश्य झाला.

अंजनाने घरी जाऊन केसरीला जेव्हा सर्व हकीगत सांगितली, तेव्हा केसरीचा आनन्द गगनात मावेनासा झाला.

अंजनाने एका सुंदर व सुदृढ अशा मुलाला जन्म दिला. जन्मसमयी देवांनी स्वर्गातून दुंदुभि वाजवल्या आणि आकाशातून पुष्पवृष्टि झाली. नवजात शिशुला पाहून केसरी आनन्दित झाला. त्याने उत्सव साजरा करायची तयारी सुरू केली. बाळाची भूक भागवण्यासाठी अंजनाने



काही फळे आणायचा विचार केला, आणि अंकुरांच्या मऊ शय्येवर त्याला निजवून फळे आणण्यासाठी ती बाहेर पडली. बाळ भुकेलं होतं, आईपाठोपाठ तेही पर्णशालेबाहेर आलं. त्याने पूर्वेकडे नजर टाकली, तर त्याला डोंगरामागून उगवणारा सूर्य दिसला.

सूर्यबिंब म्हणजे एकादं फळ समजून ते पकडण्यासाठी ते बाळ आकाशात उडालं! सूर्याकडे उडत जाणारा तो मुलगा पाहून यक्ष, राक्षस, नाग वगैरे सर्वजण आश्चर्य-चकित झाले! त्यांना असे वाटले की आता प्रलयच होणार असावा! त्यांना हा कोणी नवीन अवतार वाटला.

त्या मुलाला पाहून सर्व अनुयायी घाबरू लागले. तेव्हा सूर्य त्यांचे सान्त्वन करीत म्हणाला–"घाबरू नका. ईश्वरी तेजाच्या साह्याने लोकांचा उद्धार करण्यासाठी जन्मलेला आंजनेय आहे हा तो मोठा बलवान व पराक्रमी आहे. अजून खूप लहान आहे ना, त्यामुळे तो मला एक खायचे फळ समजून तो माझ्याकडे येत आहे. तुम्ही विनाकारण घाबरू नका."

आपल्याला फळ समजून येणाऱ्या आंजनेयाला पाहून सूर्याने प्रेमाने आपली उष्णता कमी केली. इतक्यात तो तेथे पोचलाच. सूर्याला पकडून त्याने आपल्या तोंडात टाकले. अन् तो गरम लागला म्हणून तोंडातून बाहेर टाकून दिला! सूर्याला आपल्या हाताने मारपीट करत तो आरडा ओरडा करू लागला.

तो अमावस्येचा दिवस होता. त्या दिवशी राहु सूर्याला गिळतो. सूर्याला गिळायला नेहमीप्रमाणे राहु तेथे आला. त्याला पाहून आंजनेय जोराने ओरडला. त्याचा तो आवाज एकून राहु घाबरून गेला. आणि तेथून स्वर्गात जाऊन तो थट इन्द्रसभेत पोचला.

त्यावेळी विद्याधर इन्द्राचा स्तुतिपाठ करत होते व नारद मुनि वीणावादन करत होते. अप्सरा नाचत होत्या व चिन्तामणी-पीठावर इन्द्र मोठ्या थाटामाटाने बसलेला होता. इन्द्राजवळ जाऊन राहु म्हणाला–"वा, वा! आपण इथे नाच-गाण्यात मग्न होऊन आरामात बसून राहिला आहात काय?"

यावर इन्द्र आश्चर्याने बोलला–"मग काय झालं? काय भानगड आहे?"

"आज पर्वाचा दिवस आहे. मी सूर्याला पकडायला गेलो होतो; पण आणखी एक राहु माझा शत्रु बनून तेथे आला आणि सूर्याला गिळू लागला. सूर्य व चन्द्र यांना गिळायला आणखी एक राहु असेल, तर माझा काय उपयोग?" राहुने इन्द्राला विचारले.

"आणखी एक राहु? कुठे आहे तो? चल दाखव बरं?" असे म्हणत वज्रायुध धारण करून इन्द्र ऐरावतावर जाऊन बसला व पुढे निघाला. (क्रमशः)





# सेवा-धर्म

एका गावात एक श्रीमन्त माणूस रहात असे. त्याच्याकडे काम करण्यासाठी नेहमी नवीन नवीन नोकर येत रहात असत. परन्तु आपल्या कामाद्वारे मालकाला प्रसन्न करण्यात ते नेहमी असफल होत. त्या श्रीमंत माणसाची वाटे, की आपल्याकडे कामाला येणाऱ्यांच्यात सेवा-तत्परता नसते, कामात त्यांना रुचि नसते. त्यामुळेच कोणत्याही नोकराला तो फार दिवस आपल्याकडे ठेवून घेऊ शकत नसे.

एकदा त्याच्याकडे काम मागायला दोन तरूण आले. त्यांची परीक्षा घ्यायचे मालकाने ठरवले. त्या दोघांच्या हाती एक एक टोपली देत तो म्हणाला–"मागल्या बाजूला फुलबागेत एक विहीर आहे, तिथे जा आणि पाणी काढून तुमच्या टोपल्यात भरून घेऊन या. संध्याकाळपर्यंत आपलं काम पुरं करू शकलात तर प्रत्येकाला एक एक रुपया मजुरी मिळेल. दोघेही आश्चर्याने एक-मेकांकडे पाहू लागले, अन् मुकाट्याने घराच्या मागील परसाकडे चालू लागले.

वाटेत मोठ्याने छोट्याला म्हटले–"मालक तर बावळटच दिसतोय. टोपल्यात कधी तरी पाणी टिकू शकेल काय?"

"तुला काय वाटतं, मालकाला ही गोष्ट कळत नसेल?" छोट्याने विचारले.

दोघेही विहिरीशी पोचले आणि पाणी काढून काढून टोपल्यात ओतू लागले. टोपलीत पाणी कसे बरे टिकणार? पाणी ओतल्या बरोबर ते गळून जाऊ लागले.

तरीही छोटा पाणी काढून काढून टोपल्यात ओततच राहिला. पण मोठ्याला मात्र हे काम निरर्थक वाटले. कितीही पाणी टोपल्यात टाका, ते आपले अशाच प्रकारे निघून जाणार, काही उपयोग नाही त्याचा! मग अशा नसत्या कामात आपला

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट

वेळ कशाला वाया घालवायचा? असा विचार करून बसून राहिला तो.

धाकटा मात्र संध्याकाळ पर्यंत विहिरीतून पाणी उपसून उपसून टोपल्यात टाकतच राहिला. शेवटी विहिरीतले पाणी संपून त्याबरोबर तळचा गाळही निघू लागला. सहजच त्याची नजर टोपल्याकडे वळली. काहीतरी चमकले टोपल्यातल्या गाळात! त्याने ती वस्तु उचलून पाहिली. तर काय? ती एक सोन्याची अंगठी होती! अंगठी घेऊन तो मालकाकडे निघाला.

मालकाने धाकटयाच्या हातून अंगठी घेत म्हटले–"यासाठीच तर मी तुम्हाला पाणी काढायचं काम दिलं होतं. ही घे तुझी मजुरी!" असे म्हणून धाकटयाच्या हातावर त्याने एक रुपया ठेवला. नन्तर थोरल्याला तो म्हणाला–"तू का बरं काम केलं नाहीस?"

लाजेने मान खाली घालत थोरला म्हणाला–"आपण तर टोपल्यात पाणी भरायचं काम दिलं. तासन् तास पाणी भरत राहिलं तरी टोपलं काही भरणार नाही हे माहीत होतं मला!"

थोरल्याचे उत्तर ऐकून मालकाला हसू आले–"आणि तू समजलास की मला वेड लागलंय; होय ना? पण तुला असंच का वाटलं, की टोपलं पाण्याने भरणं येवढाच माझा हेतु होता? माझ्या मनातला उद्देश मीच जाणू शकतो, तू नाही. बरोबर ना? मी जे काम सांगितलं ते करत रहाणं हे तुझं काम! अन् वेळ संपेपर्यंत काम करून मजुरी घेऊन जाणं हा तुझा धर्म! कामाच्या फळाबाबत विचार करणं माझं काम आहे, तुझं नव्हे! हे बघ तुझ्यात सेवा-धर्म मुळीच नाही. काम करण्यात तुझा समर्पण भाव नाही; म्हणून तू नोकरी देण्यालायक नाहीस." असे म्हणून धाकटयाला त्याने कामाला ठेऊन घेतले.

धाकटयाने आपल्या सेवा-वृत्तीने मालकाचे मन जिंकून त्याच्याकडून वाहवा मिळवली, पुढे बरीच वर्षेपर्यंत त्याने त्या श्रीमंत माणसाकडे काम केले.





# वल्लभचा आजार

वल्लभ नावाचा एक तरुण शेजारच्या गावी काही कामासाठी गेला होता. तेथून परत येत होता. जंगलातील पाऊलवाट होती, रस्ता चुकून भलतीकडेच कोठे तरी गेला. एका ठिकाणी झाडाखाली एक वयस्कर माणूस झोपलेला होता. त्याचं नाव शीतल. एक विषारी साप शीतलला चावण्यासाठी येत असलेला त्याने पाहिला. वल्लभने चपळाईने सापाची शेपूट पकडली नि दूरच्या झाडीत त्याला फेकून दिले.

एवढयात शीतल जागा झाला. त्याच्या लक्षात आलं की वल्लभने आपला प्राण वाचवला आहे. शीतल त्याला म्हणाला–"बाळ, अगदी वेळेवर तू माझं रक्षण केलंस. तुझे उपकार मी कधी विसरणार नाही. माझ्याजवळ एक जादूची पिशवी आहे, ती मी तुला देतो. तू भोजन मागितलंस की ही पिशवी तुला भोजन देईल."

वल्लभने आश्चर्याने शीतलला विचारले–"जादूची पिशवी? अन् ती तुमच्या जवळ कशी आली?"

"बेटा, मी चांगला श्रीमंत माणूस होतो. माझ्या आसपासची माणसं माझ्यावर नाही, माझ्या पैशांवर प्रेम करीत. गोड गोड बोलून त्यांनी माझा सर्व पैसा लुबाडला. मी मात्र भिकारी झालो. लोकांच्या या वागणुकीने मी त्रस्त झालो आणि निरुपायास्तव या जंगलात आलो. मध्यंतरी मला इथं एक महात्मा भेटला. त्याला माझी दया आली, आणि त्याने मला ही जादूची पिशवी दिली. फारा दिवसांनी आज तुझ्या सारखा एक माणूस भेटला. फार आनंद वाटला मला!" शीतलने आपली हकिगत सांगितली. आणि पुढे म्हणाला–

"आतापर्यंत ज्यांनी माझे अहित केले, त्यांना ही मी मदत देत आलो. बऱ्याच



दिवसांनी माझ्यावर उपकार करणारा तूच पहिला माणूस आहेस. म्हणून त्याच्या बदल्यात तुला मदत करणं माझं कर्तव्य नाहीं का? मला स्वत:ची चिन्ता नाही. माझे दिवस कसे न कसे जातीलच!" शीतलने सांगितले.

वल्लभ म्हणाला—"असं असेल तर, माझी एक गोष्ट आपण मान्य केली पाहिजे. मी पण एकटाच आहे. तुम्ही माझ्या बरोबर चला आणि माझ्या घरी रहा."

शीतलने हे म्हणणे मान्य केले. दोघे ही जंगलातून निघाले आणि रस्ता शोधून काढत वल्लभच्या गावी पोचले.

काही दिवस आनंदात गेले. जादूची पिशवी जवळ असल्यामुळे वल्लभला आता भोजनाची काही अडचण राहिली नव्हती. पण वल्लभला एवढ्यात संतोष नव्हता. पुष्कळ पैसा मिळवावा, एक शानदार घर बांधावं आणि नौकर-चाकर ठेवून आरामात दिवस घालवावेत असं त्याला वाटे. आपला विचार त्याने शीतलला सांगितला.

शीतलने वल्लभला सावध केले—"तुझा विचार छान आहे. कष्ट करून पैसा मिळवलास आणि मोठा माणूस झालास तर मला त्यात आनंदच आहे. एक गोष्ट मात्र लक्षात ठेव—मी दिलेल्या जादूच्या पिशवीचा दुरुपयोग करू नकोस."

श्रीमंत होण्याची आपली इच्छा वल्लभला दाबून टाकता आली नाही. जादूच्या पिशवीतून खाद्य पदार्थ निर्माण करून त्याने विकायला सुरुवात केली. या बिनभांडवली धंद्यात त्याला फायदाच फायदा दिसू लागला.

आता शीतलने गावात काही लोकांच्या घरी काम करायला सुरुवात केली. वल्लभने त्याला अनेक वेळा असं करायला मनाई केली. पण शीतलने तिकडे लक्ष दिले नाही. इतकंच नाही, पण तो जेथे काम करी तेथे कामाच्या मोबदल्यात पैसे घेत नसे.

गावातले लोक वल्लभला सांगू लागले—"बाबा, तू तर खूप पैसे मिळवून राहिला आहेस, मग तुझ्याहून वयाने मोठ्या शीतलला का अशी नोकरी का करू देतोस?"





म्हणून एक दिवशी तो शीतलला म्हणाला—"हे बघ, तुझ्यामुळे माझी बदनामी होत आहे. दुसऱ्यांच्या घरी जाऊन काम करणं तू आता सोडून दे."

हसत हसत शीतल म्हणाला—"वल्लभ, मी तुला जी जादूची पिशवी दिली आहे, ती माझ्या पुण्याची प्रतीक आहे! जो पर्यंत माझं पुण्य शिल्लक आहे तोपर्यंतच ही पिशवी काम करील. माझं पुण्य लवकर संपुष्टात येऊ नये म्हणून मी फळाची अपेक्षा न करता दुसऱ्या लोकांकडे काम करीत आहे."

शीतलच पुण्य अशा रीतीने आपल्या उपयोगी पडत आहे हे जेव्हां वल्लभला समजलं, तेव्हा तो गप्प बसला. वल्लभने पुष्कळ धन कमवलं. एक वर्षं भरात त्याने एक घर बांधलं. एका श्रीमंत परिवारातील मुलीशी त्याने लग्न ही केले.

पण एक दिवशी वल्लभ एकाएकी आजारी पडला. अनेक वैद्य आले नि त्यांनी वल्लभच्या आजाराचे निदान करण्याचा प्रयत्न केला. पण कोणाच्या काही लक्षात येईना.

वल्लभची बायको एका प्रसिद्ध योग्याकडे गेली. तिने आपल्या नवऱ्याच्या आजाराची कथा योगी महाराजांना सांगितली.

वल्लभकडे पाहून योगी म्हणाला—"तू परिश्रम न करता सुख मिळविण्याचा प्रयत्न केलास. श्रम न करता तू आपली संपत्ति वाढवीत आहेस. आता तू आजारीच राहिलास तरी बिघडलं कुठं? पैसे मिळविण्यासाठी धडधाकट तब्येतीची काय आवश्यकता आहे?"

"महाराज, आपण असं का बरं म्हणता? जर प्रकृति धड नसली तर या संपत्तीचा काय उपयोग आहे? या धन-दौलती पासून सुख मिळवण्यासाठी शरीर सुदृढ असणं आवश्यक नाही का?" वल्लभ दु:खी अंत:करणाने म्हणाला.

योगीराजांनी आजारचं निदान केलं—"श्रम करणारांनाच सुखाचा अनुभव घेण्याचा अधिकार असतो. तुझी गोष्ट मोठी विचित्र

आहे. तू दुसऱ्याचा श्रमांचा उपयोग करीत आहेस. याच तुझ्या पापाच्या पायी तुला हा आजार जडला आहे."

वल्लभने सांगितलं—"माझ्या जवळ एक जादूची पिशवी आहे. एका महापुरुषाने मोठ्या प्रेमाने मला ती दिलेली आहे. त्यानेच मला सांगितले की मी जर पिशवीचा अधिक उपयोग केला तर त्याचे पाप त्यालाच लागेल, मला नाही."

"अरे मूर्खा, तुझं पाप आपल्यावर घेणारा तो कोणी भला माणूस आहे निश्चित, पण तुझ्यामुळे त्याला खूप श्रम करावे लागत असतील. त्याचं तुझ्या वर खूप प्रेम असेल, तो तुझ्या वर रागावत नसेल; तरी पण तो जे परिश्रम करीत आहे, ते सर्व तुला गिळंकृत करण्यासाठी पाप होऊन एकत्र जमा होत आहेत. तू अजून ही आपल्या वर्तनात सुधारणा कर, त्या महापुरुषाची सेवा कर. पैशांच्या मागे न लागता जीवनातील खरा आनंद उपभोगायला शीक. असं केलंस तर तुझा आजार हळू हळू जात राहील!" योग्याने वल्लभला सर्व समजावून सांगितलं.

आता आपली चूक वल्लभच्या लक्षात आली. त्याने भक्तिभावाने योग्याला नमस्कार केला आणि त्याच्या उपदेशानुसार आपले वर्तन बदलण्याचा निश्चय करून तो घरी परतला.

पैसे मिळवण्यासाठी जादूच्या पिशवीचा उपयोग करणं त्याने सोडून दिलं. त्याने शारीरिक श्रम करायला सुरुवात केली. वल्लभने शीतलला आपल्या घरी बोलवलं आणि आपल्या वडिलांप्रमाणे तो त्याची सेवा करू लागला.

हळू हळू वल्लभची प्रकृति सुधारू लागली. त्याने बराच पैसा जमवला होता, त्यामुळे व्यापार करायला त्याला काही अडचण नव्हती. जसजशी त्याची तब्येत चांगली होऊ लागली तसतशी व्यापारात ही त्याची प्रगति होऊ लागली. आता वल्लभ सुखा-समाधानाने आपले जीवन जगू लागला.





# भाग्य-देवता

प्राचीन काळची गोष्ट आहे. चीन मधील एका गावात वांग नावाचा एक गरीब शेतकरी रहात असे. त्याला आपलं असं कोणी नव्हतं; न आई-वडील, न भाऊ-बहीण. तो अगदी एकटा होता. त्याच्या जवळ वारसा हक्काने चालत आलेली फक्त दीड एकर जमीन होती. तो आपल्या शेतात काम करी आणि काही न काही पीक काढी. आपला उदर-निर्वाह करून जे काही शिल्लक राही, ते तो काळजीपूर्वक जतन करी.

वांगच्या शेताला लागून एक छोटी जमीन होती, बरेच दिवस ती पडीक राहून गेली होती. ही जमीन खरेदी करून ती ही लागवडीस आणावी असा विचार वांगच्या मनात आला.

गावातल्या एका व्यापाऱ्याची ही जमीन होती. एक दिवशी वांग त्या व्यापाऱ्याकडे गेला नि पडीक जमीन खरेदी करण्याचा आपला विचार त्याने व्यापाऱ्याला सांगितला. त्याची ही इच्छा जाणून व्यापाऱ्याने जमिनीचा चांगलाच वाढता भाव वांगला सांगितला.

वांग जवळ इतकी रक्कम तर नव्हती. जेमतेम अर्धी रक्कम त्याच्याजवळ होती. व्यापाऱ्याने ही रक्कम स्वीकारली नि बाकीच्या रकमेचा कर्ज रोखा वांगकडून लिहून घेतला. जमीन आपल्याला मिळाली अशा आनन्दात वांग घरी आला.

असे काही दिवस गेले. एक दिवशी व्यापाऱ्याने विचार केला – वांग आपल्या जमीनीत कसं काम करीत आहे एकदा पहावं! त्याला दिसलं की वांग त्या पडीक जमिनीत नांगर चालवीत आहे. एकाएकी नांगराचा फाळ जमिनीत पुढे सरकेनासा झाला.

वसंत कऱ्हाडकर

वांगने नांगर थांबवला अन् फावड्याने तेथील माती बाजूला केली. व्यापारी तिथं होताच, तो ही खड्ड्यात काय आहे हे पाहू लागला. वांगला खड्ड्यात दोन कळशा सापडल्या. दोन्ही कळशा खूप जुन्या-पुराण्या होत्या, पण होत्या त्या सोन्याच्या! भाग्यदेवतेची कृपा असली तर ती सोन्याच्या कळशांच्या स्वरूपात एकाद्या-कडे जाते, असा त्या काळी चीनी लोकांचा समज असे. हे वांगला माहीत नव्हतं, पण व्यापारी हे चांगलं जाणून होता. व्यापाऱ्याने दावा केला की कळशा आपल्या मालकीच्या आहेत. वांगला हे मान्य नव्हतं. दोघे ही कोर्टात न्यायाधीशा-कडे गेले.

आपण पडीक जमीन व्यापाऱ्याकडून खरेदी केली नि नांगर चालवीत असताना या कळशा सापडल्या असं वांगने न्यायाधीशाला सांगि-तलं. पण व्यापारी म्हणाला—"न्यायाधीश महाराज, हा माणूस धोकेबाज आहे. ही पडीक जमीन माझी आहे. ती मी कोणाला विकलेली नाही. मला स्वत:लाच इथं शेती करायची होती, म्हणून जमीन नांगरण्याचं काम मी याला सांगितलं. कळशांच्या रूपात भाग्यदेवता माझ्या घरी चालून आलेली आहे. आता याला फार हाव सुटली आणि खोटं बोलतो आहे. या जमिनीवर याचा काही ही अधिकार नाही."

वांग काकुळतीला येऊन सांगू लागला—"हुजूर, जवळचा सगळा पैसा देऊन मी खरोखरीच ही जमीन खरेदी केलेली आहे."

"बरं तर मग याचा पुरावा काय आहे तुझ्या जवळ?" न्यायाधीशाने विचारले.

आता वांग काय करणार? व्यापाऱ्या बरोबर जसा सौदा झाला, तशी सर्व हकीगत त्याने न्यायाधीशाला कथन केली.

न्यायाधीशाच्या लक्षांत आलं की सोन्याच्या कळशा पाहताच व्यापाऱ्याचं मन बदललेलं आहे. तरी पण थोडा विचार करून न्यायाधीश म्हणाला—"भाग्यदेवतेची व्यापाऱ्यावर कृपा-दृष्टि आहे. म्हणून या कळशा व्यापाऱ्याच्या आहेत!" त्याने व्यापाऱ्याला कळशा देऊन टाकल्या.

मोठ्या आनंदाने व्यापारी घरी गेला.

मग वांग न्यायाधीशाला म्हणाला—"महाराज, कळशा नाही मिळाल्या तर नकोत मला. पण कमीत कमी माझी जमीन मला देववा. पै-पैसा जमवून एकत्र केलेली सर्व रक्कम देऊन मी ती खरेदी केलेली आहे."

न्यायाधीशाने वांगचं समाधान केलं—"काळजी करू नकोस. सगळं काही तुझ्या मनासारखं होईल!" वांग बिचारा घरी परत आला.

दुसऱ्या दिवशी सकाळी न्यायाधीश काही शिपायांसह व्यापाऱ्याच्या घरी गेला नि त्याला कैद केलं. गावात ही वार्ता हा हा म्हणता पसरली. कित्येक लोक व्यापाऱ्याच्या घरापुढे जमा झाले.





त्या सर्व लोकांना उद्देशून न्यायाधीश म्हणाला–"बंधूंनो, सोन्याच्या कळशा आपल्या शेतात मिळाल्या असं काल या व्यापाऱ्याने खोटं सांगितलं. आपल्या राजाच्या खजिन्यातून चोरलेल्या या कळशा आहेत. आता आता माझ्याकडे ही बातमी आलेली आहे. म्हणून मी व्यापाऱ्याला कैद केलं आहे. त्याला आता चांगली जबर शिक्षा होईल!" असं म्हणत न्यायाधीशाने व्यापाऱ्याकडे पाहिले.

हे सगळं ऐकून व्यापाऱ्याची पाचावर धारण बसली. भीतीने थर थर कापत तो न्यायाधीशाला सांगू लागला–"महाराज, मी काल खोटं बोललो. मी काही अपराध केलेला नाही. खरोखरीच मला कळशां-बद्दल काही माहीत नाही. माझी पडीक जमीन काही दिवसांपूर्वी मी वांगला विकली. चोरी मागे कदाचित् त्याचाच हात असेल. माझ्या जमिनीतून कळशा काढून हा माझ्यावर अपराधाचं खापर फोडत आहे. शिक्षा तर वांगला झाली पाहिजे!"

न्यायाधीशाने विचारले–"तू जमीन वांगला विकलीस याचा काय पुरावा आहे तुझ्यापाशी?"

वांगकडून लिहून घेतलेला कर्जरोखा लगेच व्यापाऱ्याने सादर केला. याच क्षणाची वाट पहाणाऱ्या न्यायाधीशाने तो कर्जरोखा वांगच्या हाती दिला नि कळशा ही मागवून वांगला देत म्हणाला–"लोक हो, हा व्यापारी धोकेबाज आहे! वांगच्या जमिनीत मिळालेल्या सोन्याच्या कळशा गिळंकृत करण्याचा याने घाट घातला. याच्या सांगण्यावर विश्वास ठेवण्याचं काल मी नुसतं नाटक केलं. या कळशा राजाच्या नाहीत, वांगच्या जमिनीत या सापडल्या म्हणून त्याच्याच आहेत या! खरोखरीच भाग्यदेवतेची याच्यावर कृपा आहे!"

वस्तुस्थिति जाणून वांगला खूपच आनंद झाला. न्यायाधीशाची हुशारी आणि न्याय-दानातील कुशलता पाहून सर्वांनी त्याची तोंड भरून प्रशंसा केली.



## निसर्गातील आश्चर्ये:



### प्रचंड गुंफा

सन १९५१ मध्ये फ्रान्सच्या पिरनीज पर्वतात 'पियरी सेंट मार्टीन' या गुंफेचा शोध लागला. ही जगातील अतिविशाल गुंफा आहे. प्रवेश द्वारा पासून आत खोलवर हिची लांबी ४,३६४ फुट आहे.



### एकमेका करू साहय!

आफ्रिकेतील गेंड्याच्या पाठी वर नेहमी 'आक्सपेकर' नावाचा एक पक्षी बसलेला दिसतो. गेंड्याच्या शरीरावरील लहान-सहान किडे हा वेचून खातो. याच्या मोबदल्यात, जर एकादं संकट आलं, तर हा जोर-जोरात ओरडून गेंड्याला सावध करतो.

### वीज

असं अनुमान केलं गेलं आहे की, जगात साधारणपणे, कोठे ना कोठे, प्रत्येक तासाला ३,६०,००० वेळा वीज चमकते.

# पाकिस्तानात काय चाललं आहे!

सन १९३३ मध्ये चौधरी रहमत अली यांनी 'पाकिस्तान' हा शब्द निर्माण केला. याचा अर्थ आहे–पवित्र भूमि!

मोहम्मद अली जिन्ना यांच्या नेतृत्वा-खाली 'मुस्लीम लीग'ने धर्माच्या आधारावर भारतीय उपखंडाचे दोन तुकडे करण्याबाबत हट्ट धरला. अनेक समजूतदार नेत्यांनी या गोष्टीला विरोध केला होता. स्वातंत्र्य, समता, लोकशाही इत्यादि महान् आदर्श दृष्टीपुढे ठेऊन मानव-जाति एकजुटीने प्रयत्न करीत होती, अशात धर्माच्या नावावर एकाद्या देशाची फाळणी करणे ही पुच्छ-प्रगतीच होती.

भारतात विभिन्न धर्म व संस्कृति एकत्र नांदत आहेत. इथे अनेक भाषा बोलल्या जातात. अनेक आचार-व्यवहार आढळतात. मधून मधून धार्मिक दंगे होत असतील. म्हणून देशाची फाळणी करणे हा काही यावरील तोडगा नव्हे. असल्या समस्या केवळ आपल्याच देशात आहेत असे नाही, अन्य देशात ही आहेत. समजूतदारपणे आपापसात चर्चा करून, योग्य कायदे-कानू बनवून या समस्या सोडविता येणे शक्य आहे. कोणती ही अडचण सोडविता येणारच नाही असं नाही–असं आपला इतिहास सांगतो.

आपल्या देशाच्या प्रमुख नेत्यांनी मुस्लीम लीगला समजून सांगण्याचा परोपरीने प्रयत्न केला की स्वतंत्र पाकिस्तानाचा हट्ट तिने सोडून द्यावा. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. तशी इंग्रजांची कूटनीति अशी होती की 'विभागणी करा आणि शासन चालू ठेवा.' म्हणून इंग्रजांनी अप्रत्यक्षपणे मुस्लीम लीगला भडकावले, आपला हट्ट चालू ठेवण्याचा सल्ला दिला.

शेवटी देशाची फाळणी झालीच. तरी पण मुस्लीम लीगला जे प्रांत पाहिजे होते ते सर्व काही मिळाले नाहीत. काश्मीर भारतातच राहिला. यानंतर पाकिस्तानचा एक भाग 'पूर्व पाकिस्तान' बंडखोर बनला आणि बंगला देश स्वतंत्र झाला.

पाकिस्तानशी तुलना केली तर भारतातच मुसलमान लोक अधिक आहेत. ते सर्व अन्य धर्मियांप्रमाणे भारताला आपली मातृभूमि मानतात. पण बंगला देश गमावल्यामुळे जो अपमान झाला, तो पाकिस्तान विसरू शकला नाही. काश्मीर मध्ये बहुसंख्य मुसलमान आहेत, म्हणून काश्मीर पाकिस्तानात आला पाहिजे असा वारंवार आरडा-ओरडा करून दंगे माज-

विण्याचे पाकिस्तानचे धोरण आहे. काश्मीर मधील काही तरुणांना गुप्त रीतीने सैनिकी प्रशिक्षण देऊन त्यांच्या मार्फत कुरापती घडविण्यात येत आहेत.

खरं म्हणजे पाकिस्तानांतील स्थानिक परिस्थिति दिवसेंदिवस बिघडत चालली आहे. भारतातून पाकिस्तानात गेलेले मुसलमान आणि पाकिस्तानी मुसलमान यांच्यात नित्य भांडणे, मारामाऱ्या व रक्तपात होत आहे. सरहद्द प्रांतातील पठाणांचा पाकिस्तानी राज्यकर्त्यांवर कधीच विश्वास बसला नाही, म्हणून ते स्वतंत्र होण्याची धमकी देत आहेत. देशातील अंतर्गत चिघळलेल्या परिस्थितीपासून लोकांचे लक्ष अन्यत्र वेधण्यासाठी पाकिस्तानी पुढारी अशा रीतीने काश्मीरसाठी भांडण उकरून काढीत आहेत. धर्माच्या नावावर जनतेला भडकावणे नि मारामाऱ्या व रक्तपात घडवून आणणे हे अत्यन्त निन्दनीय कार्य आहे. धर्माच्या नावावर सामान्य जनतेला धोक्यात आणता येते हे यावरून स्पष्ट होते.






मोहम्मद अली जिन्ना



# तांब्याचे कडे

सोतापुर गावात श्रीमुख नावाचा एक विद्वान गृहस्थ रहात असे. निस्वार्थ सेवाभावाने तो अनेक विद्यार्थ्यांना विद्यादान करत असे. स्वत:साठी तो कधीच कोणा-समोर हात पसरत नसे. त्यामुळे गावचे लोक पुष्कळदा त्याला बक्षीस-रूपाने काही देऊन त्याच्याबद्दल आपला आदर प्रकट करत. त्याच्या कुटुम्बासाठी आवश्यक अशा सर्वच वस्तु गाववाले त्याच्याकडे आपण होऊनच पोचवत असल्याने त्याचे दिवस सुखासमाधानाने व्यतीत होत असत.

परन्तु श्रीमुखचा मुलगा चतुर्मुख याला मात्र अभ्यासाची मुळीच आवड नव्हती; नेहमीच तो गावात इतरांच्या खोड्या काढत फिरत असे. गाववाले खरे तर त्याच्या खोड्यांमुळे त्रासून गेले होते, परन्तु त्यांच्या मनात श्रीमुखबद्दलचा आदर असल्यामुळे ते हा त्रास निमूटपणे सहन करीत. श्रीमुखला हे सर्व कळत असे, परन्तु त्याला सुधारायचे सर्व प्रयत्न करून तो हारला होता. आपल्या या एकुलत्या एका पोराच्या नशिबात काय आहे याची त्याला नेहमीच चिन्ता लागून राहिलेली असे.

एक दिवस श्रीमुखचा एक जुना विद्यार्थी महानन्द हा त्याला भेटण्यासाठी आला. महानन्दने श्रीमुखकडे सकल शास्त्रांचा अभ्यास केला होता आणि नन्तर कठीण तपस्या करून त्याने अनेक अद्भुत अशा सिद्धि प्राप्त करून घेतल्या होत्या. आता आपला गुरु श्रीमुख याला काही गुरुदक्षिणा देण्याच्या विचाराने तो त्याच्याकडे आला होता.

"तू चांगलं नाव मिळव. तीच माझी खरी गुरुदक्षिणा होईल." श्रीमुख महानन्दला म्हणाला. पण श्रीमुखने आपणाकडून काही घ्यावेच असा महानन्दचा आग्रह होता.



तेव्हा श्रीमुखने त्याच्याजवळ आपल्या मुलाचा–चतुर्मुखचा विषय काढला व गुरुदक्षिणा म्हणून मुलाला सुधारायचे काम त्याच्यावर सोपवले.

महानन्दने चतुर्मुखला बोलावून त्याच्याशी काही गप्पागोष्टी केल्या. एकूण अन्दाज घेऊन त्याला नीट मार्गावर आणायचे प्रयत्नही महानन्दने करून पाहिले. पण पालथ्या घड्यावर पाणी! चतुर्मुखमधे काहीच सुधारणा होईना! शेवटी आपल्या तपोबळाचा वापर करून महानन्दने एक तांब्याचे कडे निर्माण केले आणि ते चतुर्मुखच्या हातात घालून तो म्हणाला–"हे नेहमी आपल्या हातातच राहू दे. ते असले म्हणजे विद्वत्ता आणि सद्वर्तन या बाबतीत तुझ्याशी कोणीही बरोबरी करू शकणार नाही. या कड्यापासून केवळ तुझ्या एकट्याचाच फायदा होईल. रोज आंघोळ झाल्यावर लगेच ते हातात चढवत जा. यामुळे तुझे नक्कीच कल्याण होईल."

त्या दिवसापासून खरोखरीच चतुर्मुख आमूलाग्र बदलून गेला. प्रत्येकाशी तो मोठ्या लीनतेने बोलू लागला. त्याच्या बोलण्यात विलक्षण अशी विद्वत्ताही प्रतीत होऊ लागली! श्रीमुखने आपल्या चिरंजीवाच्या विद्वत्तेची परीक्षा करून त्याला म्हटले–"चतुर्मुख, तुझी विद्वत्ता इथे अशी कुजत रहाणे बरे नव्हे. तू राजधानीला जा आणि प्रसिद्ध अशा विद्वानांसमोर आपल्या विद्वत्तेचं प्रदर्शन कर. अशा प्रकारे तुझी विद्वत्ता सार्थकी लागेल."

पित्याच्या आज्ञेनुसार चतुर्मुख राजधानीला गेला, पण राजाचे दर्शन काही त्याला मिळाले नाही.

कोणीतरी त्याला सांगितले की विद्वत्ता दाखवून द्यायची असेल तर दरबारी पंडीत विद्याधर याला खूष करायला हवे. हे ऐकून चतुर्मुख विद्याधरकडे गेला. पण त्या दरबारी पंडिताने चिडून, मोठ्याने गर्जत चतुर्मुखला हाकलून लावले!



आता चतुर्मुख वैतागून गेला. त्याला वाटले की आपण परत आपल्या गावी निघून जावे. पण पुन्हा दुसरा विचार असाही आला की आपल्या पित्याची आज्ञा न पाळता तसेच निघून जाणेही योग्य नव्हे.

आणखी काही दिवस गेले आणि चतुर्मुख जवळचे पैसेही संपून गेले. तेव्हा अगतिक होऊन तो रहात असलेल्या खाणावळीच्या मालकाला म्हणाला–"महाराज, माझ्याजवळचा पैसा तर संपून गेला, पण अजूनही मला राजाचे दर्शनही झाले नाही. ते होई पर्यन्त आपण मला इथे राहू दिलेत, तर त्या बदल्यात मी रोज आपणाला गीतासार सांगत जाईन."

चतुर्मुखच्या एकूण चालचलणुकीवर तो मालक खूष होता, त्यामुळे त्याने हा प्रस्ताव मान्य केला. त्या दिवसापासून चतुर्मुख खाणावळ-मालकाला भगवद्गीतेतल्या श्लोकांचा अर्थ सांगू लागला. चतुर्मुखच्या गीतासाराच्या विवरणावर तो मालक फारच मोहून गेला.

एके दिवशी राजाने राजधानीतल्या सर्वच खाणावळमालकांना बोलावून घेऊन म्हटले–"तुम्ही सर्वजण राजधानीतल्या खाणावळी मोठ्या उत्तम तऱ्हेने चालवत आहात. तुम्ही हे सर्व कसे करू शकता? तुमच्या यशाचे गमक मला सांगाल?"



सर्व खाणावळवाले आपल्या मोठेपणाच्या गोष्टी अगदी अहमहमिकेने सांगू लागले. परंतु चतुर्मुख रहात असलेला खाणावळवाला मात्र म्हणाला–"एका खाणावळीचे असे जे सर्वसाधारण नियम असतात, तेच फक्त मी पाळत असतो. बाकी सर्व त्या देवाची कृपा! बस, त्यामुळेच तर सर्व ठीकठाक चाललंय्!"

राजा यावर आश्चर्याने म्हणाला–"अरे, देवाच्या कृपेच्या गोष्टी कशाला सांगतोस. तुझा स्वतःच्या शक्तीवर विश्वास नाही काय?"

"महाराज, आम्हाला जे करायला हवं ते मी करतोच. पण त्याचं फळ किंवा



त्यातला मोठेपणा हा काही माझा नव्हे. असं पहा, शेतकरी नांगरणी वगैरे करून चांगलं पीक काढू इच्छित असतो. पण पाऊस नीट झाला तरच तो हे करू शकतो ना? पाऊसच नाही पडला तर शेतकऱ्याच्या स्वतःच्या शक्तीचा काय उपयोग? पण पाऊस पडूनही केवळ मानवाच्या प्रयत्नावाचून काहीच होऊ शकत नाही. तेव्हा देवाची कृपा व मानवाची मेहनत या दोन्हीची नितान्त आवश्यकता असते." तो खाणावल-मालक उत्तरला.

यावर राजा तत्काल म्हणाला–"तू तर मोठा ज्ञानी दिसतो आहेस. उद्यांच्या दरबारात मी तुझा सत्कार करीन."

यावर खाणावळवाला चकित होऊन म्हणाला–"महाराज, या सत्काराला मी योग्य नाही. ज्याने मला हे ज्ञान दिलं तो पंडित बिचारा किती दिवसांपासून आपल्या दर्शनाची प्रतीक्षा करत आहे. त्याची इच्छा आपण पूर्ण करावी महाराज!"

दुसऱ्या दिवशी चतुर्मुखला बरोबर घेऊन येण्याची आज्ञा राजाने त्या खाणावळवाल्याला दिली. घरी गेल्यावर हे सर्व वर्तमान त्याने जेव्हा चतुर्मुखला सांगितले तेव्हा त्याने याबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त केली. दुसऱ्या दिवशी चतुर्मुख राजदरबारात हजर झाला. चतुर्मुखने तेथे जेव्हां पुराणांवर व्याख्यान दिले, तेव्हा दरबारातील सर्व पंडित ते आश्चर्याने ऐकत राहिले!

राजाने चतुर्मुखची प्रशंसा केली. तो म्हणाला–"आपण तर महान पंडित आहात! मला भेटण्यापूर्वी आपण जर पंडित विद्याधर यांना भेटला असतात तर आपल्याला इतके दिवस वाट पहावी लागली नसती."

तेव्हा चतुर्मुखने आपण एकदा विद्याधरची भेट घेतली असल्याबद्दलची वार्ता सांगितली आणि त्यानें चिडून आपल्याला कसे हाकलून दिले, ते ही सांगितले.

हे ऐकून राजाला वाईट वाटले. तो चतुर्मुखला म्हणाला–"महाराज, आपला असा अपमान झाला, याचे मला फार दुःख होत आहे. मी तर हा आपल्या दरबारचाच अपमान मानतो. आपण स्वतः आमचे दरबारी पंडित विद्याधर यांना काही शिक्षा द्याल, तेव्हाच माझ्या मनाला शान्ति लाभेल."

स्वीकारात्मक डोके हलवून चतुर्मुखने हातातले तांब्याचे कडे काढून राजाच्या हाती दिले. नंतर तो विद्याधरजवळ गेला आणि त्याने अनेक प्रकारे शिवीगाळ करून त्या दरबारी पंडिताची भर दरबारात खूप निन्दा केली. त्यावेळची चतुर्मुखची वागणूक एखाद्या अशिक्षित अडाणी माणसासारखी होती. ते पाहून राजालाही मोठे आश्चर्य वाटले. विद्याधर तर काहीच बोलू शकला नाही; तो बिचारा शरमेने मान खाली घालून अपशब्द ऐकत राहिला.

याानंतर चतुर्मुखने तांब्याचे कडे राजाकडून परत घेऊन हातात घातले. राजा त्याला म्हणाला–"महापंडितजी, मी आपल्याला एक लहानशी संधी काय दिली, अन् तुम्ही तर विद्याधरला घाणेरड्या शिव्या देऊन त्याची निन्दा केलीत. तुमची वागणूक तर या दरबारालाच अपमानजनक अशी झाली. तरीही मला असं वाटतंय की यात काही विशेष असा अर्थ दडलेला असावा. सांगा बरं काय प्रकार आहे, आम्हाला तरी कळू दे?"



चतुर्मुख मोठ्या अदबीने राजाला म्हणाला–"क्षमा असावी प्रभु, आपल्या वागणुकीची मला स्वतःलाच लाज वाटते आहे. माझा मोठेपणा, हा माझा स्वतःचा नव्हे. तो या तांब्याच्या कड्याचा मोठेपणा आहे." असे म्हणून त्याने आपली स्वतःची कहाणी राजाला कथन केली.

ती ऐकून राजाला आणखीच आश्चर्य वाटले. तो म्हणू लागला–"पंडितोत्तम! मग तुम्ही हे कडं धारण करूनच विद्याधरला शिक्षा द्यायला गेला असतात, तर किती बरं झालं असतं! तुम्ही तर कडं उतरवून माझ्या हाती देऊन विद्याधरची अयोग्य शब्दात निन्दा करायला सरसावलात!

आपणाला हे उचित वाटतं? एका सामान्य खाणावळवाल्याच्या मनात इतके उत्तम संस्कार उत्पन्न करणाऱ्या, आपल्या स्वतःच्या मनात इतका द्वेष कसा काय? मला तर आश्चर्यच वाटतंय याचं! विद्याधरला शिक्षा द्यायला मी सांगितलं तेव्हां तरी आपल्या मनात योग्य विचारच यायला हवे होते ना?"

यावर हळूच हसत चतुर्मुख म्हणाला– "प्रभु, विद्या-विद्वत्ता नसेल तर मी कसा असेन हे तर आपण पाहिलेतच प्रत्यक्ष! माझं पांडित्य मी स्वतः मिळवलेलं नसून ते तांब्याच्या कड्यामुळे साध्य झालं. या पांडित्या मुळेच माझ्यात सद्वर्तन आलं असं मी मानतो. पण विद्याधरने तर हे सिद्ध करून दाखवलं की पांडित्याबरोबर माणूस परिष्कृत होत नसतो! मी जेव्हा प्रथम त्याच्याकडे गेलो त्यावेळी त्याने आपले पांडित्य उचलून जसे काही अन्यत्र कुठे ठेवलं होतं, मी कडं काढून ठेवलं ना, तसं! अन् माझ्या पांडित्याची परीक्षा न करताच त्याने माझी उपेक्षा केली, अपमान केला माझा! त्या वेळी मी जे दुःख अनुभवलं, ते कसं असेल, हे मी त्याला हातातलं कडं उतरवून ठेवून प्रत्ययाला आणून दिलं! आपण म्हणता त्याप्रमाणे मी नेहमीच कडं धारण केलेलं असावं हे उचित व उत्तम! त्याचप्रमाणे प्रत्येक पंडितानेही नेहमीच आपल्या पांडित्याला योग्य अशी वागणूक ठेवावी. राग-द्वेष, अस्मिता-अहंकार यांच्या आहारी न जाता पंडिताने नेहमीच पांडित्याचा मान ठेवावा. हे सांगण्यासाठीच मी असं केलं. तसं पाहिलं तर विद्याधरच काय, पण कोणाबद्दलही माझ्या मनात राग किंवा द्वेष नाही.

चतुर्मुखचा उद्देश आता राजा, विद्याधर व अन्य दरबारी लोकांच्या लक्षात येऊन चुकला. यामुळे त्या सर्वांच्या मनातला चतुर्मुखबद्दलचा आदरभाव दुणावला. राजा तर इतका प्रभावित झाला की त्याने चतुर्मुखची तावडतोब आपला दरबारी पंडित म्हणून नेमणूक केली व त्याचा मोठा सत्कारही केला.




[११]

[पूर्वकथा: वीरसिंहाने पुन्हा सैन्य जमवायचे ठरवले. त्याने आपल्या नोकरांना आज्ञा दिली, की चन्द्रपुरीहून नवीन शस्त्रे खरेदी करण्यासाठी त्यांनी जनतेकडून धान्य गोळा करावे. जनतेने याबद्दल तीव्र असंतोष व्यक्त केला. वसन्तच्या नेतृत्वाखाली काही युवकांनी जनतेच्या संरक्षणासाठी प्राणपणाने प्रयत्न करायच्या शपथा घेतल्या. यानंतर–]

एके दुपारी जयानन्द मुनि विश्रान्तीसाठी एका झाडाखाली पहुडले असताना त्यांचा एक शिष्य गोविन्द तेथे येऊन म्हणाला–"गुरुजी, एक बुरखाधारी माणूस अलिकडे आपल्या आश्रमापाशी फिरत असलेला दिसतो. झऱ्याचं पाणी पिऊन, डोंगरातल्या गुहांकडे बारकाईने पहात बसलेला असताना काल संध्याकाळी तिसऱ्यांदा पाहिला मी त्याला!"

"होय, दुरून मी ही पाहिलं त्याला, मला वाटतंय की तो कोणी महान् माणूस असावा, अन् काही मोठं महत्वाचं काम अंगिकारूनच तो असा इकडे फिरत असावा. पुन्हा तू त्याला कधी पाहिलंस, तर लगेच मला येऊन सांग. त्याच्याशी बोलायचंय मला." जयानन्द मुनि म्हणाले.

असेच आणखी काही दिवस गेले. एका संध्याकाळी सन्दीप सिंहाच्या शावकांशी



मजेने खेळत होता. त्याला त्या शावकांशी कुस्ती करताना पाहून भल्लूकी मोठ्या खुशीने उड्या मारू लागली. तो बुरखाधारी एका खडकाआड उभा राहून हे दृश्य पहात उभा होता.

इतक्यात जयानन्द मुनींनी मागून त्याच्याजवळ येत म्हटले–"सुस्वागतम्!"

बुरखाधारी एकदम दचकून झर्रकन मागे वळला व मुनींना पाहून, स्वत:ला सावरत त्याने नमस्कार केला.

"काही तरी शोधत तू अलिकडे नेहमी या जंगलात फिरत असतोस. मला सांग, काय शोधतो आहेस तू? मी कदाचित् काही मदत करू शकेन तुला!" हसत मुनि म्हणाले.

"मला तर वाटत होतं की माझं इथलं अस्तित्व कोणालाच माहित नाही; आश्चर्यच आहे! आपणाला कसं कळलं?" बुरखाधारीने विचारले.

"तुझ्या बाबतीत वीरसिंहाच्या शिपायांना पत्ता लागेल, अशी मुळीच काळजी करू नकोस तू! कारण इथे आसपास कोणीही आलं तरी मला ताबडतोब कळतं." मुनि म्हणाले.

जरा वेळ नीट पाहून बुरखाधारी मुनींना म्हणाला–"आपणच जयानन्द मुनि ना? आपणाला माझा नमस्कार."

मुनि हसत राहिले. मुनींच्या पायांना हात लावून त्यांना वंदन करत बुरखाधारी म्हणाला–"महात्मन्, माझा मित्र-जयपुरीचा राजा शंकरवर्मा – याच्या तोंडून मी आपणाबद्दल बरेच काही ऐकलंय्! तरी पण, वीरसिंहाच्या गुप्त हेरांबद्दल आपणाला सूचना कोण देतं? मला तर इथे तशी काही खास व्यवस्था, किंवा नोकरचाकर असलेले नजरेस पडले नाहीत?"

"अरे पण बातमी देण्यासाठी कोणी माणसंच पाहिजेत, असं काही नाही!" आश्चर्याने पहात असलेल्या बुरखाधारीला मुनि म्हणाले.

"म्हणजे, अर्थात् आपणाला काही अतीन्द्रिय शक्ति अवगत आहेत; असंच



ना?" तो वीर अजून आश्चर्याने पहात म्हणाला.

"इतक्याशा क्षुल्लक गोष्टींसाठी अतीन्द्रिय शक्तींची काय जरूर बेटा? अशा शक्ति मिळवण्याऐवजी इथेच आपल्या आसपास असलेल्या प्राण्यांशी दोस्ती करणं अधिक सोपं नव्हे का?" मुनीने त्याला समजावत विचारले.

मुनींच्या या बोलण्याने तो बुरखाधारी फारच खूश झाला.

"महात्मन्, आत्ता मला कळलं की हा लहानसा मुलगा सिंह अन् अस्वलाशी कसा काय खेळतो आहे! पण महाराज, हा मुलगा कोण?" त्याने विचारले.

"तुझ्या प्रश्नाचं उत्तर देण्यापूर्वी तूच मुळात कोण आहेस, हे जाणून घेणं आवश्यक वाटतं मला!" मुनि म्हणाले.

थोडा वेळ बुरखाधारी गप्पच झाला आणि मग आपला बुरखा काढत तो म्हणाला–"महात्मन्, माझा विश्वास आहे आपणावर!"

त्याच्या चेहरा पाहून शान्तचित्त होत मुनि म्हणाले–"मला शंका आलीच होती! हा आपलाच पुत्र आहे महाराज! मी एकदाच पूर्वी पाहिलं होतं राजा तुला! अन् या युवराजाच्या चेहऱ्यामुळे ही तुला ओळखणं सोपं गेलं मला!"



राजा शान्तिदेव आश्चर्यचकित झाला! अन् त्याचे डोळे ही भरून आले एकदम!

"राजा, मला खात्री होती, की तू जिवन्त असशील, तर नक्कीच राणीला अन् राजपुत्राला शोधत तू केव्हातरी इकडे येशील. युवराजाला माझ्या हाती सोपवून राणीने प्राण सोडला! तू जिवन्त आहेस, इतके जरी माहीत झाले असते, तर सुखाने प्राण गेला असता तिचा! मी तिला शेवटी म्हटले की – भवितव्याचा भार देवावर टाक, अन् शान्तिपूर्वक डोळे मिटून घे. तसंच केलं बिचारीने!"

आपले उफाळणारे दुःख दाबायचा प्रयत्न करत राजाने विचारले–"पुढं काय झालं?"



एका मोठ्याशा उभ्या पत्थराकडे संकेत करत मुनि म्हणाले–"तिथे पुरलं आम्ही तिला!"

त्या पत्थरावर काही फुलं वाहिलेली दिसत होती.

"युवराज रोज आपल्या आईच्या या समाधीवर फुलं वहातो. त्याचा रोजचा परिपाठच आहे तो!" मुनि म्हणाले.

आता मात्र राजा आपले दु:ख दाबू शकला नाही. त्या समाधिशिलेजवळ जाऊन, तिला आपले मस्तक टेकवून तो गद्गदून रडू लागला. जयानन्द मुनींनी त्याचे योग्य शब्दात सान्त्वन केले.

थोड्या वेळाने संयत होत राजाने विचारले–"मुनिवर, मी आपल्या पुत्राला भेटावं काय?"

"हो! आनन्दाने भेट की! माझी काही हरकत नाही!" मुनि काहीसा विचार करत म्हणाले.

पण राजा जरा गप्प झाला, अन् विचार करत म्हणाला–"मला वाटतंय की आपल्या मनात काही अन्य विचार आहे. आपण जोवर अगदी मनापासून परवानगी देत नाही, तोवर मी भेटणार नाही त्याला!"

"खरंच राजा, सध्या राजकुमार निसर्गसान्निध्यात वाढत माझ्याजवळ सर्व विद्या शिकत आहे. तो अतिशय तीक्ष्ण बुद्धीचा आहे. त्याची ग्रहण-शक्ति अगदी सूक्ष्म आहे. तुला पाहिल्याबरोबर, तूच त्याचा पिता आहेस हे तो ओळखेल; परिणामत: त्याला सर्व सत्यपरिस्थिति कळून चुकेल. आपला इतका धर्मनिष्ठ पिता असा कृष्णकारस्थानाला बळी पडलेला पाहून त्याला अतिशय दु:ख होईल, अन् सूडाची भावनाही त्याच्या मनात तीव्र होऊन उठेल. या सर्वांमुळे सध्याच्या त्याच्या शान्त जीवनात आणि पर्यायाने विद्यार्जनातही बाधा येईल – माझ्या मनातली शंका हीच आहे!" मुनि म्हणाले.



"होय, तेही खरंच! आपले विचार अगदी पूर्णत: बरोबर आहेत." राजाने कबुली देत म्हटले.

"आज ना उद्या त्याला सर्व कळेल हे नक्कीच! अन् मगच तो आपल्या मनाने आपलं कर्तव्य पार पाडील. पण अजून ती वेळ आलेली नाही. मला वाटतं, आपल्याला अजून काही काळ वाट पहायला हवी." मुनि म्हणाले.

"होय महात्मन्! आपलं बोलणं पटलं मला. मुलाच्या प्रगती-आड येणारं प्रेम आत्ता दाखवणं योग्य नव्हे." राजा म्हणाला.

"का बरं?" मुनीने आश्चर्याने विचारले.

"कारण आज आपणाजवळ तो जे शिकत आहे, ते तर मी त्याला शिकवू शकणार नाही! आपल्याजवळ त्याला ज्या सोयी उपलब्ध आहेत, तितक्याही माझ्या आजच्या परिस्थितीत माझ्याजवळ मिळणार नाहीत. मी त्याच्या कल्याणासाठी काही वेळही देऊ शकणार नाही. अन् त्यापेक्षाही काही खास जबाबदारी मला पार पाडायची आहे. तो सर्व बोजा केवळ माझ्याच खांद्यावर आहे." राजाने म्हटले.

"अशी कोणती महत्वाची जबाबदारी आहे?" मुनींनी विचारले.

"सुमेध राज्याच्या सध्याच्या परिस्थिती-बद्दल आपणाला कितपत माहिती आहे, याची मला कल्पना नाही. मला, राणीला अन् शेवटी माझ्या पुत्राला ही मारून टाकायचा कट रचला वीरसिंहाने! मी जिवन्त आहे का मेलो, किंवा माझ्या बायको व मुलाचे काय झाले याबद्दल त्याला काहीच माहिती नाही. पण मी मात्र बरोबर त्याच्या मागावर राहिलो आहे. त्यामुळे त्याची मन:शान्ति नाहीशी झालेली आहे. अशान्ति आणि भय यामुळे तो आता फारच तामसी झालेला आहे. आपला क्रोध तो आता बिचाऱ्या अबोध अन् भोळ्याभाबड्या जनतेवर उतरवत आहे. त्यांना तो रोज नवनवीन तऱ्हेने छळत असतो. आसपासची राज्यं लुटायचं आमिष त्याने आपल्या पथक प्रमुखांना दाखवलं आहे. तो स्वत: तर माझ्या मामांच्या अमृतपुरी राज्यावर हल्ला करायला निघाला होता. सौभाग्य म्हणूनच त्या रात्री नदीला अचानक पूर आला अन् त्या पाण्यात वीरसिंहाचे सैन्य आणि बरीचशी शस्त्रंही वाहून गेली. आता पुन्हा नवं सैन्य अन् नवी हत्यारं जमवण्यासाठी तो जनतेचं धान्य लुटायला टपला आहे. मी मात्र त्याची प्रत्येक वाईट चाल रोखायला कंबर कसून उभा ठाकलो आहे." राजाने सांगितले.

यावर आनन्दाने डोके हलवत मुनि जयानन्द म्हणाले-"राजा, सुमेध राज्यात जे जे काही घडतं आहे ते सर्व मला विदित आहे. मी असंही ऐकलंय् की काही युवक पुढे होऊन वीरसिंहाला चांगलं पाणी पाजीत आहेत. त्या सर्वांची कत्तल करायच्या विचारात आहे वीरसिंह! तो इतका दुष्ट आहे, की संधि मिळाली तर त्या युवकांच्या भाईबंदांना अन् नाते-वाईकांनाही तो जिवंत सोडणार नाही! त्यामुळे त्या युवकांनी अतिशय सतर्क असायला हवं. आपलं काम अतिशय शिस्तीने अन् योग्य पद्धतीने करत लढायला हवं त्यांनी. मला असं वाटतं, की प्रथम एक मुदत देऊन वीरसिंहाला कळवायला की त्या मुदतीत त्याने स्वत:ला सुधारावे; तसे न झाल्यास युद्ध अनिवार्य होईल! पण हे युद्ध केवळ वीरसिंहाचे शिपाई अन् आपले युवक यांच्यातच लढले जावे. या यातायातीत गरीब रयतेच्या केसाला ही धक्का लागता कामा नये! तुझा काय विचार आहे राजा?"

"होय महात्मन्!" राजा म्हणाला.

"तर मग त्या युवकांना एकत्र करून सुमेध राज्याच्या सीमेवर राहून सर्व काम पद्धतशीर चालवण्याची जबाबदारी तुझीच आहे राजा!" मुनि म्हणाले.

"आपली आज्ञा मला शिरोधार्य आहे महात्मन्!" राजा म्हणाला. (क्रमश:)



# चुगल्या

भीमराज आणि रामराज यांची अनेक वर्षांची दोस्ती होती. एकाएकी ते एकमेकांचे शत्रु बनले, एकमेकांचा द्वेष करू लागले.

एकदा गावा बाहेरच्या शंकराच्या देवळाजवळ दोघे एकमेकांसमोर आले. तेव्हा भीमराज म्हणाला–"हे बघ राम, आपण मानव आहोत, चांगले बुद्धिमान प्राणी आहोत. थोडा मागचा पुढचा विचार करून सत्य जाणण्याची योग्यता आपल्या ठायी असली पाहिजे."

रामराजने विचारलं–"भीम, तुला काय म्हणायचंय, हे मला समजत नाही!"

"बरोबरच आहे, ते कसं समजेल? तुझ्या हित-शत्रूंनी काही ही सांगितलं तर ते तुझ्या लक्षात येतं ना?" भीमराजने विचारलं.

रामराज म्हणाला–"अरे, उगाच टोमणे का मारतोस? स्पष्ट सांग ना सगळं!"

"त्या राजेन्द्रने काही चुगल्या केल्या, नि त्या ऐकून तू माझ्याशी वैर आरंभलंस. तू असं ही म्हणालास की तुला माझा मृत्यु पहायचा आहे. एकाद्या चुगलखोराने काही ही सांगितलं तर ते खरं आहे असं समजणं योग्य आहे का? तूच जरा नीट विचार कर बरं." भीमराजने आपल्या मनातला विचार सांगितला.

यावर हंसत रामराजने विचारले–"मी तुझ्या विषयी असं म्हणालो हे तुला कोणी सांगितलं?"

"भूपेन्द्रने मला हे सगळं व्यवस्थित सांगितलं!" भीमराजने ग्वाही दिली.

"अस्सं! चुगल्या करणारांचं ऐकू नये असं तू मला सांगतो आहेस. आणि आपण जे काही केलं त्याला काय बरं म्हणायचं?" रामराजने विचारलं नि तो मोठ्याने हंसू लागला.

आता आपली चूक भीमराजच्या लक्षात आली. तो ही जोर-जोरात हंसू लागला.

—परिमला जकली



# स्वप्न सुंदरी

हट्टी विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ गेला, झाडाच्या फांदीला लटकणारं प्रेत त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमी प्रमाणे शांतपणे स्मशानाच्या वाटेने चालू लागला. अशा रीतीने तो चालत असताना प्रेतात वास करणारा वेताळ बोलू लागला–"राजा, मध्य-रात्रीच्या वेळी या भयानक जागी तू कशासाठी संचार करीत आहेस हे मला माहीत नाही. पण एकाद्या गुप्त खजिन्यासाठी वा कोण्या सौंदर्यवतीच्या शोधार्थ तुझी ही भटकंती चालू असेल, तर मी तुला सावध करू इच्छितो. भरपूर परिश्रम करून ही कधी कधी आपली इच्छा पूर्ण होऊ शकत नाही. काही लोकांच्या इच्छा पूर्ण होतात ही, पण आपला अविवेक नि मूर्खपणा यांमुळे ते त्याचा सदुपयोग करू शकत नाहीत. उदाहरणादाखल मी तुला एका राज-

## वेताळाच्या गोष्टी



कुमाराची गोष्ट सांगतो. नीट सावधपणे ऐक, थोडा श्रमपरिहार ही होईल तुझा." आणि मग वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्राचीन काळची गोष्ट आहे. मणिद्वीप राज्या वर राजा माणिकवर्मा राज्य करीत असे. त्याला सुधीर नावाचा फक्त एकच मुलगा होता. माणिकवर्माच्या उतार वयात त्याला हा मुलगा झाला होता. तो वीस वर्षांचा झाला, एवढ्यात राजा म्हातारा झाला. त्याचे लग्न करून राज्यकारभाराचा भार त्याच्यावर टाकावा असा राजाने विचार केला. अनेक राज-कुमारी बाबत विचार करून शेवटी राजाने रत्नगिरीची राजकुमारी रत्नप्रभा हिला आपली सून म्हणून पसंत केले. रत्नप्रभा सुंदर व शालीन मुलगी होती. ती अनेक कलांत प्रवीण होती. ती फार बोलत नसे, पण बोलेल ते मार्मिक बोलायची. राजाला ती एकदम आवडली. पण आपली आवड सुधीरवर लादणे राजाला पसंत नव्हते.

राजाने आपला हा विचार सुधीरला सांगितला. रत्नप्रभेचे रेखाचित्र त्याला दाखवून म्हणाला–"मी तुझ्यासाठी ही राजकुमारी रत्नप्रभा पसंत केली आहे. तुझी संमति असेल तर विवाहाच्या बाबतीत पुढे बोलणे करू. बेटा, मी आता म्हातारा झालो. राज्यकारभार मी आता सांभाळू शकणार नाही. आता हा भार तूच आपल्या शिरावर घेतला पाहिजे."

सुधीरने चित्र आपल्या हाती घेतले, लग्नाबाबत उद्या सांगीन असे राजाला आश्वासन देऊन तो आपल्या महालाकडे गेला.

त्या दिवशी सुधीरने झोपेत असताना स्वप्नात एक अद्भुत लावण्यवती सुंदरी पाहिली. तिच्या शरीराचा रंग सोनेरी होता. डोळे कमळाच्या पाकळ्यांसारखे होते. काळे भोर लांबसडक केस नि चाफ्याच्या कळीसारखं नाक असलेली ती सुंदरी सुधीरकडे बराच वेळ पहात राहिली, नि अदृश्य झाली.





सुधीर झोपेतून जागा झाला, नि मग त्याला झोप लागेना. त्याच्या मनात ती स्वप्न-सुंदरी बराच वेळ पर्यंत रेंगाळत राहिली. ती कुठे तरी जरूर असली पाहिजे आणि तिच्याशीच लग्न करायचं असा विचार त्याने पक्का केला. हा विचार करीत असताना राजाने पसंत केलेली रत्नप्रभा ही त्याच्या स्मरणात होती. रत्नप्रभेहून ही स्वप्न-सुंदरीच सुधीरला अधिक आकर्षक वाटली.

दुसऱ्या दिवशी सुधीरने आपल्या वडिलांना सांगितले–"पिताजी, काही दिवस मी एकटाच आपल्या देशात संचार करून प्रजेची सुख-दुःखे जाणून घेऊ इच्छितो. राज्यकारभार सांभाळण्यापूर्वी हा अनुभव घेणे मला आवश्यक वाटते. परत आल्यावर लग्नाबाबत विचार करीन. आपला काय सल्ला आहे?"

राजाने मुलाची इच्छा पूर्ण करायचा निर्णय घेतला नि सुधीरला अनुमति दिली. मग सामान्य नागरिकाच्या वेषात सुधीर घोड्यावर बसला नि त्या स्वप्न-सुंदरीच्या शोधार्थ निघाला.

तीन महिने अनेक ठिकाणी शोध करून ही त्याला ती सुंदरी कोठे आढळली नाही. धर्मशाळेत दूर दूरच्या प्रांतातून आलेले यात्रेकरू नि व्यापारी यांना ही त्याने विचारलं, पण कोठे ही तिचा पत्ता लागेना.

आणखी दोन महिने तो आपल्या स्वप्नातील राणीच्या शोधार्थ भटकत राहिला. शहरातून, खेड्यातून, घरोघरी त्याने तपास केला, पण त्याला आपली प्रेयसी सापडली नाही. आता राजकुमार सुधीर कंटाळून गेला, थकला बिचारा! सतत प्रवास आणि वेळी-अवेळी जेवण यामुळे राजकुमाराची तब्येत बिघडली. त्याचं संपूर्ण रूप बदलून गेलं. सुधीरने दोन-तीन दिवस पूर्ण विश्रांति घेतली. आणि जरा बरा झाल्यावर आपले भ्रमण पुढे सुरू केले.



एक दिवशी दुपारी सुधीर एका नदीच्या किनाऱ्यावर पोचला. घोडयाला चरायला सोडलं आणि एका झाडाखाली विश्रांती-साठी बसला. बराच दमला होता तो. नदीवरून येणारा वारा मोठा सुखद होता. सुधीरला तिथंच झोप लागली. तो जेव्हा जागा झाला तेव्हा संध्याकाळ झालेली होती.

त्याला घोडा कोठे दिसेना. घोडयाच्या शोधार्थ सुधीर नदीच्या किनाऱ्या किनाऱ्याने चालू लागला. एका ठिकाणी मासे पकडण्यासाठी गळ टाकून एक युवती बसलेली त्याला दिसली.

सुधीरने तिला विचारले—"या बाजूला एखादा घोडा जाताना दिसला का तुला?"

एकदम हा प्रश्न ऐकून दचकून त्या युवतीने मागे पाहिले. अन् काय आश्चर्य? राजकुमार सुधीरची हीच ती स्वप्नसुंदरी! तिला पाहून सुधीर खुश झाला.

उत्साहाच्या भरात सुधीर तिला म्हणाला—"शेवटी जिला मी शोधत होतो ती सापडली! मी स्वप्नात पाहिलेली सुंदरी तूच. तुला शोधत मी किती दिवस हा भटकतो आहे बघ. उन्हात तापलो, पावसात भिजलो, पण शेवटी तू एकदाची सापडलीस. चल माझ्या बरोबर. मला तुझ्याशी लग्न करायचंय!"

सुधीरचं हे बहकल्यासारखं बोलणं ऐकून ती युवती घाबरली नि जवळच्या आपल्या झोपडीकडे तिने धूम ठोकली. सुधीर ही तिच्या मागे पळू लागला.

सुधीर झोपडीपाशी पोचला, एवढ्यात आतून एक म्हातारा बाहेर आला. त्याने सुधीरला आपादमस्तक न्याहाळलं आणि कडवट आवाजात विचारलं—"तू कोण? कुठल्या गावाहून इथं आलास? तुझे आई-वडील कोण? तू माझ्या मुलीला म्हणालास की स्वप्नात तू तिला पाहिलंस नि तुला तिच्याशी लग्न करायचंय! हे काय सभ्य माणसासारखं बोलणं आहे होय? अगोदर तुझं नाव सांग, माझ्या प्रश्नांची नीट उत्तरं दे पाहूं!"

म्हाताऱ्याचे सगळे प्रश्न ऐकून सुधीर चाट पडला! जरा शुद्धीवर आल्यावर कापऱ्या आवाजात म्हणाला—"बाबा, तुमच्या सर्व प्रश्नांचं एकच उत्तर मी देऊं शकतो—मी एक मूर्ख माणूस आहे!" एवढं सांगून सुधीर राजधानीकडे परतला. राजधानीत येऊन त्याने रत्नप्रभेशी विवाह केला आणि अनेक वर्षे सुख-समाधानाने राज्य केले. जनतेची सेवा करून तो मोठा लोकप्रिय राजा झाला.

वेताळाने आपली गोष्ट पूर्ण केली आणि राजाला विचारले—"राजन्, सुधीरने अनेक हाल-अपेष्टा सहन केल्या, शेवटी तो आपल्या स्वप्न-सुंदरीला पाहू शकला. तरी पण म्हाताऱ्याला तो म्हणाला—'मी एक मूर्ख माणूस आहे.' हाती आलेली संधि त्याने सोडली! तो खरंच का मूर्ख होता? माहीत असून ही जर माझ्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीस तर तुझे मस्तक फाटून त्याचे शतशः तुकडे होतील."

यावर राजा विक्रम म्हणाला—"सुधीर मूर्ख नव्हता व बुद्धिहीन पण नव्हता. तो फार विवेकशील आणि बुद्धिमान होता असं ही म्हणता येणार नाही. स्वप्नांत पाहिलेल्या सुंदरीच्या शोधार्थ चारी दिशांना धावणं हा अविवेकच आहे. म्हाताऱ्याने विचारलेले प्रश्न ऐकून आपली चूक सुधीरच्या लक्षात आली. एका सामान्य माणसाने आपल्या मुलीशी लग्न करू इच्छिणाऱ्या तरुणाला इतके प्रश्न विचारले! मग आपण स्वतः राजकुमार असताना राणी बनणाऱ्या मुलीची योग्यता नीट पारखायला नको का? नुसतं सौंदर्य पाहून कुणाला राणी बनवणं मूर्खपणा आहे हे त्याच्या लक्षात आलं. म्हणून सुधीरनं आपल्या वडिलांना स्वप्न-सुंदरी बद्दल काही ही सांगितलं नाही. विवेकपूर्वक त्याने आपले कर्तव्य पार पाडले."

अशा रीतीने राजाचा मौन-भंग झाल्या-वर वेताळ प्रेता सह अदृश्य झाला आणि झाडावर चढून लटकू लागला.





# कंकणाची भेट

मलयावती नगरीत यात्रेकरूंसाठी एक मोठी धर्मशाळा होती. राजधानीत येणाऱ्या यात्रेकरूंनी धर्मशाळा नेहमी भरलेली असे.

या धर्मशाळेत दूरच्या एका गावाहून आलेला वीरबाहु नावाचा एक प्रवासी उतरला. त्याच्या सोन्याच्या बांगड्यांची तेथे चोरी झाली. वीरबाहु विचार करू लागला की आता काय करावं. आपल्या बांगड्या परत कशा मिळतील? शेवटी वीरबाहूने धर्मशाळेच्या मालकाकडे तक्रार केली.

मालकाने वीरबाहुची खोली एकदा नीट पाहिली आणि आवश्यक वस्तु तेथे आणणाऱ्या सेवक टोलारामला ताबडतोब बोलवलं आणि वीरबाहूच्या बांगड्यांबद्दल विचारलं.

आश्चर्य करीत टोलाराम म्हणाला– "मला बांगड्यांबद्दल काहीच माहीत नाही. खोली झाडण्यासाठी मी वीरबाहुच्या खोलीत जरूर गेलो होतो. पण मी आपलं काम केलं नि बाहेर आलो." टोलारामचे कपडे नि त्याची खोली यांची झडती घेतली, पण त्याचा काही उपयोग झालां नाही. निरुपायास्तव धर्मशाळेच्या मालकाने शिपायांना बोलवले आणि टोलारामला पकडायला सांगितलं. शिपाई टोलारामला घेऊन ठाण्यावर गेले. मग सुनावणी साठी टोलारामला राजा पुढे हजर केलं गेलं.

शिपायांकडून सगळं जाणून राजा थोडा वेळ गप्प बसला. या श्रीमंत माणसाच्या खोलीत टोलाराम शिवाय तर कोणी गेलं नव्हतं. म्हणून टोलारामच चोर असण्याची शक्यता आहे.

असा विचार करीत असताना राजाच्या मनात एक शंका आली. आपल्या कामासाठी राजधानीत आलेल्या श्रीमंत माणसाला टोलाराम विरुद्ध तक्रार करायची काय जरूर आहे? शहाणपणाने टोलाराम कडूनच सत्य काढून घेतलं पाहिजे.

श्यामा मुळे

मग राजाने टोलारामला विचारलं– "अरे, चमचम चमकणाऱ्या सोन्याच्या बांगड्या पाहिल्या आणि तुझ्या मनात लोभ उत्पन्न झाला, अन् मग तू चोरी केलीस! आपला गुन्हा कबूल केलास, तर माफ करून तुला सोडून देईन. नाहीतर चांगली कडक शिक्षा भोगावी लागेल."

टोलाराम जरा सुद्धा घाबरला नाही. पुन्हा शांतपणे त्याने सांगितलं–"महाराज, मला बांगड्यांबद्दल काही माहीत नाही."

आता राजाने आपला दरबारी विदूषक चारुहासकडे पाहिलं. चारुहासने आपल्या वाक्-चातुरीने टोलारामकडून वदवावं की चोरी त्यानेच केलेली आहे. राजाचा हा उद्देश चारुहासच्या लक्षात आला.

गंभीरपणे टोलारामच्या जवळ जात चारुहासने प्रश्न केला–"हा श्रीमंत माणूस धर्मशाळेत केव्हा बरं आला?"

"तीन दिवस झाले साहेब!" टोलाराम म्हणाला.

"त्याच्या बांगड्या कशा होत्या?" चारुहासने पुन्हा विचारले.

"बांगड्यां बाबत मला काही माहीत नाही." टोलाराम उत्तरला.



जरा विचार करून चारुहास म्हणाला– "वीरबाहुच्या खोलीत तुझ्या शिवाय अन्य कोणी नोकर तर जाणार नाही?"

"होय सरकार!" टोलाराम म्हणाला.

चारुहासने आणखी विचारले–"बरं आता असं सांग हा श्रीमंत माणूस सतत बांगड्या आपल्या हातात ठेवी, की कधी कधी काढून ठेवी?"

टोलारामने ताबडतोब सांगितलं–"माफ करा हुजूर, बांगड्या कशा होत्या हे मी पाहिलं सुद्धा नाही."

चारुहासने अनेक प्रकारे प्रश्न विचारले, पण त्याचा काही उपयोग झाला नाही. शेवटी तो राजाला म्हणाला–"प्रभु, हा

खरोखरीच गुन्हेगार नाही. जो चोरील, त्याच्या मनात कुठे तरी थोडी भीति असेलच की नाही? आणि त्या भयापोटी तो पकडला जाईल. टोलाराम मुळीच घाबरलेला दिसत नाही. म्हणून हा निरपराधी आहे."

विदूषकाच्या म्हणण्यावर स्मित हास्य करीत राजा म्हणाला–"हा फार चांगला अभिनेता असण्याची ही शक्यता आहे. आपला गुन्हा लपविण्यासाठी हा खूपच चांगला अभिनय करीत असेल!"

"होय प्रभु, मूठ भर मीठ तोंडात घालून गूळ खात असल्याचा अभिनय करणं ही काय साधी गोष्ट का आहे? याचा खूप मोठा सन्मान आपण करणं योग्य होईल. अशा महान् अभिनेत्याला आपल्या दरबारात स्थान द्यायला आपल्याला अभिमान वाटावा. एक छान सोन्याचं कडं बनवून ते आपल्या हस्ते याला दिलं जावं अशी माझी इच्छा आहे, महाराज!" विदूषकाने आपलं जाळं टाकलं.

आता टोलाराम हात जोडून राजाला म्हणाला–"प्रभु, मला क्षमा करा. त्या श्रीमंताच्या बांगड्या मीच चोरल्या. मी जर एकादा निर्णय घेतला, तर कोणी ही मला त्यापासून परावृत्त करूं शकत नाही. म्हणून आपण माझा अपराध माझ्या तोंडून वदवू शकला नाहीत."

जोरात टाळ्या वाजवीत चारुहास म्हणाला–"महाराज, आली न खरी गोष्ट आता बाहेर? हा नोकर एक नंबरचा धोकेबाज आहे. मधात बुडवलेल्या सुरी सारखा आहे हा! असल्या भयंकर नि धोकेबाज माणसाला समाजात स्वतंत्रपणे वावरू देणं समाजाला हानिकारक ठरेल. याला आमरण कारावासाची शिक्षा देणेच योग्य होईल.

चारुहासची बुद्धिमत्ता आणि चलाखी पाहून राजाला खूप आनंद झाला. टोलारामला जन्मभर कारावासाची शिक्षा ठोठावण्यात आली. चारुहासची सर्वांनी मुक्त कंठाने प्रशंसा केली.



चांदोबा पुरवणी–२१

# ज्ञानाचा खजिना

## तो कोण?

त्रिचनापल्लीचा राजा विजयरंग चोक्कलिंगम याची नगर-मंदिराजवळ राहणाऱ्या एका साधूवर विशेष अशी श्रध्दा व भक्ति होती. एकदा त्याच्या मनात आले की साधूला त्याच्या उपयोगाची अशी एकादी मौल्यवान वस्तु भेट द्यावी.

त्याच वेळी नगरातला एक व्यापारी आपल्या व्यापारानिमित्त काश्मीरला जायला निघाला होता. निघण्यापूर्वी तो राजाला भेटायला गेला असताना, राजाने त्याला काश्मीरहून एक उत्तमशी लोकरीची शाल आणायला सांगितली. व्यापाऱ्याने येताना सुरेख कलाकुसर केलेली एक शाल आणून राजाला दिली. राजाने लगेच त्या साधूला दरबारात बोलावून घेऊन सन्मानपूर्वक ती शाल त्याला अर्पण केली.

दुसऱ्याच दिवशी एका राजसेवकाने येऊन राजाला सांगितले–"महाराज, तो साधु तर बराच गर्विष्ठ दिसतोय की! आपण इतकी किमती शाल त्याला दिलीत अन् त्याने तर ती खुशाल एका भिकारणीला देऊन टाकली!"

यावर राजाने साधूला बोलावून शालीबद्दल विचारले. साधू म्हणाला–"मी तर ती एका दिव्य अशा मातेला अर्पण केली!"

साधूच्या या उत्तरावर राजा आश्चर्याने क्षणभर गप्पच झाला! पण त्याच वेळी राजाला हे ही कळून चुकले की, हा साधू तर प्रत्येक प्राण्यातच परमेश्वर पहात असतो! हा साधू कोण?

[पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. आपण रहातो ती पृथ्वी केव्हा बनली?
२. पृथ्वीवर प्राणी-जीवन केव्हा सुरू झाले?
३. 'विश्व' म्हणजे काय?
४. मंगल ग्रहावर पोचलेले अंतरिक्ष यान कोणते? ते तेथे केव्हा पोचले?
५. आपल्या लक्ष्यस्थानी पोचायला त्याला किती दिवस लागले?
६. त्याने एकूण किती कि. मि. प्रवास केला?

[पान ३६ पहा]

## भारत : तेव्हा आणि आता

# अंगराज्य-चंपानगर

अंग राज्याचे नाव घेतले, की महाभारतातल्या दानशूर कर्णाची आठवण होते. दुर्योधनाने कर्णाला अंग देशाचा राजा बनवले होते. तरीही कर्णाने आपल्या जीवनाचा अधिक काळ हस्तिनापुरातच व्यतीत केला, आणि अखेर कुरुक्षेत्रावरील युद्धात त्याला वीरगति प्राप्त झाली.

आजच्या बिहार राज्यातल्या, पूर्व भागातल्या प्रान्तालाच पूर्वी अंग देश म्हणत असत. ते एक सुसंपन्न राज्य होते. पुढे ते मगध राज्यात सामील केले गेले. अंग राज्याची राजधानी होती चंपानगर. ते एक मोठे सुन्दर नगर होते. राजगिरी पर्वताच्या पश्चिमेला चंपा व गंगा-नदीच्या संगमावर चंपानगर वसलेले होते.

इसवी सनाच्या दुसऱ्या शतकात भारतातून 'अन्नम्' (आजचे व्हिएतनाम) कडे जे हिन्दू लोक प्रवासी म्हणून गेले होते, त्यांनी या राज्याची स्थापना केली होती, आणि आपल्या नव्या राजधानीचे नाव ठेवले 'चंपा'! चंपा हे नाव तेव्हापासून प्रसिद्ध झाले.

अंगराज्य हे बिहार पासून वेगळे होते, तरीही जसजसा काळ लोटत राहिला तसतशा अंग देशाच्या खाणाखुणाही काळाच्या उदरात गडप झाल्या! आज बिहारमधील भागलपूरच्या जवळ असणारी चंपानगर व चंपापुर नावाची दोन गावे, जुन्या चंपानगरची आठवण करून देतात.

भागलपुरला जाणारे प्रवासी कोलगांग जवळील शिलामंदिर व बरारी गुंफा मोठ्या आवडीने पहातात. भागलपुर-जवळ आणखीही काही प्रेक्षणीय ठिकाणे आहेत; परन्तु एक काळ असा होता की तेथेच जवळ असणाऱ्या चंपानगर-बद्दल मात्र लोकांना काहीच माहिती नसे.

## चांदोबाच्या बातम्या

**अनुकरण करणे ही सुद्धा एक कलाच !**

आपणा सर्वांना माहीतच आहे, की सुप्रसिद्ध चित्रकारांच्या चित्रांना चांगलीच किंमत मिळते. त्यामुळे अशा प्रसिद्ध चित्रांची अनेक चित्रकार नक्कल करीत असतात. कधी कधी नकली चित्रेही हुबेहूब खऱ्या चित्रांसारखीच दिसतात.

शतकानुशतके बनवली गेलेली अशी नकली चित्रे एकत्र करून ती ब्रिटिश म्यूझियममध्या एका दालनात प्रदर्शनार्थ कायम मांडून ठेवण्याची व्यवस्था केली जात आहे. प्रसिद्ध चित्रकारांची हुबेहूब नक्कल करून ही चित्रे बनवली गेलेली असली तरी हे चित्रकारही कुशल कलाकारच नव्हते काय ?



# साहित्य सोनियाचिया खाणी

१. एका प्रसिद्ध इंग्रजी कादंबरीकाराच्या पुस्तकात भारतातल्या काही प्राचीन कथांनाही स्थान मिळाले होते. हा कादंबरीकार कोण?

२. त्याच्या सुप्रसिद्ध ग्रन्थाचे नाव काय?

३. भारतीय वाचकांना सुपरिचित, असा स्कॉटलंडचा कादंबरीकार कोण?

४. त्याने लिहिलेली प्रसिद्ध कादंबरी कोणती?

५. संपूर्ण विश्वातली अति-प्राचीन अशी भाषा कोणती?

## उत्तरावली

**तो कोण?**

तायुमानवर

**तुम्हाला माहीत आहे?**

१. ई. स. पू. जवळ जवळ ४६० कोटी वर्षांपूर्वी.
२. ई. स. पू. २०० कोटी वर्षांपूर्वी.
३. (अणुपासून ब्रह्माण्डापर्यंत) अतिसूक्ष्म अशा परमाणुपासून मोठ्यात मोठी नक्षत्र मंडलेही ज्यात सामावतात ते.
४. वायकिंग, १९७६ मध्ये.
५. एक वर्षाहूनही अधिक काळ.
६. २० कोटी कि. मी.

**साहित्य**

१. जॅफ्री चॉसर (१३४०-१४००)
२. दी कँटरबरी टेल्स.
३. सर वॉल्टर स्कॉट (१७७१-१८३२)
४. आइव्हानहो.
५. संस्कृत.

# श्री रामकृष्ण परमहंस

## (२)



दक्षिण कलकत्यातील जानबाजार मध्ये एक स्त्री रहात असे. तिचं नाव राणी रासमनी. ती श्रीमंत होती आणि भगवत्‌भक्त पण! एकदा विधवा राणी रासमनीच्या मनात इच्छा उत्पन्न झाली की काशी क्षेत्राचे दर्शन करावे.

एका मोठ्या नावेत बसून ती काशीला जायला निघाली. छोट्या छोट्या नावांतून तिचा सर्व परिवार ही निघाला. दिवस भर प्रवास केल्यावर ती संध्याकाळी दक्षिणेश्वरला पोचली.





त्या रात्री राणीला एक स्वप्न पडलं. जगन्मातेने स्वतः स्वप्नात येऊन तिला सांगितलं—"तू माझी भक्त आहेस. तुला काशीला जाऊन काय करायचंय? माझ्यासाठी इथंच एक मंदिर बनवलंस तर!" दुसऱ्या दिवशी राणीने आसपासचा सर्व प्रांत बारकाईने पाहिला आणि आपली काशी-यात्रा स्थगित केली.



राणीने तिथे एक मोठी जमीन खरेदी केली आणि मंदिर बांधण्याचं काम सुरू झालं. राणी काली मातेची भक्त होती, म्हणून या मंदिरात प्रमुख देवता काली मातेची मूर्ति प्रतिष्ठित करण्याचे ठरले.

एक दिवशी राणीचे काही सेवक गदाधरचा थोरला भाऊ रामकुमारकडे आले. त्यांनी रामकुमारला राणीची इच्छा निवेदन केली. दक्षिणेश्वरच्या नवीन मंदिरात कालीमातेच्या मूर्तीची स्थापना करणे व मंदिराचे पुजारी-पद स्वीकारणे यांबाबत राणीने रामकुमारला विनंती केली होती.





रामकुमारने ही प्रार्थना स्वीकार केली. आगम शास्त्रानुसार मंदिरात मूर्तीची प्रतिष्ठापना करण्यात आली. भारताच्या काना-कोपऱ्यातून श्रेष्ठ पंडित व ब्राह्मण या उत्सवासाठी उपस्थित होते.

मोठ्या भावा बरोबर गदाधर ही तेथे आला. त्याला हे स्थान फार आवडले. शांतपणे वाहणाऱ्या गंगा नदीच्या प्रवाहाने त्याला आणखीच उत्तेजित केले. गदाधर नदीच्या प्रशांत किनाऱ्यावर व आसपासच्या जंगलात तासन् तास ध्यान करीत बसे.





राणी रासमनीला मुलगा नव्हता. तिचा जावई मथुरानाथ सुशिक्षित आणि विवेकसंपन्न होता. त्याने जेव्हा गदाधरला पाहिलं तेव्हा त्याला वाटलं या मुलात काही महान् विशेषता आहे.

मथुरानाथने गदाधरला सुचवले की मंदिरातील पूजेच्या कामात त्याने थोरल्या भावाला मदत करावी. गदाधरने हे सहर्ष स्वीकृत केले. कधी कधी गदाधर विधिवत् पूजा करण्याचे विसरून जात असे, तासन् तास मूर्तीपुढे ध्यानस्थ बसून राही.





काही वर्षां नंतर रामकुमार आजारी पडला नि त्या आजारातच त्याचे देहावसान झाले. मग गदाधर काली मातेचा प्रधान पुजारी बनला. तरी पण आपल्या मनात येईल त्याप्रमाणे तो पूजेचे काम करी.

गदाधरची पूजा करण्याची पद्धत काही ब्राह्मणांना आवडली नाही नि त्यांनी याबाबत मथुरानाथकडे तक्रार केली. मंदिरातील मूर्तीत दिव्य शक्ति संचारित करण्याची योग्यता फक्त गदाधर मध्येच आहे हे मथुरानाथला माहीत होतं, म्हणून त्याने या तक्रारी-कडे लक्ष दिले नाही.





काही दिवस श्रद्धा-भक्तिपूर्वक काली-मातेची पूजा केल्यावर आता गदाधरच्या मनात कालीमातेचे प्रत्यक्ष दर्शन करण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. एक दिवशी त्याने अत्यंत एकाग्रतेने कालीमातेला प्रार्थना केली—"जगन्माते, आता जर तू दर्शन दिले नाहीस, तर मी आपले डोके कापून तुझ्या चरणी ठेवीन!" एकदम वीज चमकल्याप्रमाणे कालीमातेची मूर्ति प्रत्यक्ष दिसली.

(क्रमशः)



# दोन चोर

भवानीपुरवर राजा चित्रसेन राज्य करत होता. त्या काळात राज्यात रूपम नावाचा एक चोर होता. राजधानीतल्या अनेक घरी त्याने लुटालूट केली होती. पहारेकऱ्यांची नजर चुकवून राजधानीतल्या रस्त्यांवरून तो भटकत असे.

एकदा रूपमने एका अधिकाऱ्याच्या घराच्या भिंतीला भोक पाडले आणि तो आत घुसला. तेथे त्याला अनेक मौल्यवान वस्तु मिळाल्या. रूपम व त्याच्या साथीदारांना आपल्या घरात पाहून तो अधिकारी खूप घाबरला. आपला जीव वाचवण्यासाठी त्याने मुकाट्याने सर्व वस्तु रूपमच्या हवाली केल्या. रूपम मोठ्या खुशीने त्या वस्तु घेऊन निघून गेला.

यानन्तर बरोबर एका आठवड्याने रूपम एका व्यापाऱ्याच्या घरात घुसला. चाकू दाखवून त्याने त्या व्यापाऱ्याला घाबरवले; आणि घरात ज्या काही वस्तु मिळाल्या त्या सर्व एका गाठोड्यात बांधून घेऊन तो निघून गेला.

नन्तर त्याने एका शेतकऱ्याचे घर फोडले. तेथे त्याला काही किमती दागिने मिळाले. तेही एका थैलीत घालून रूपम पळून गेला.

आणखी काही दिवसांनी त्याने एका पुजाऱ्याच्या घरात प्रवेश केला. जे काही मिळाले त्या सर्वांचे एक गाठोडे आपल्या साथीदारांच्या हाती देऊन तो त्यांच्यासह नाहीसा झाला.

रूपमने चोरलेल्या सर्व वस्तु एकदा तपासून पाहिल्या, तेव्हा त्याला असे आढळून आले की राजाच्या अधिकाऱ्याच्या घरात आपल्याला जो माल मिळाला तोच इतरत्र मिळालेल्या वस्तूंहून अधिक मौल्यवान आहे.

मृणालिनी खाडिलकर



रूपमने आणखी एक आश्चर्यजनक गोष्ट ओळखली. ती म्हणजे—आपापल्या घरात झालेल्या चोरीबद्दल केवळ हा अधिकारी सोडून बाकी सर्वांनी राजाकडे तक्रार नोन्दवली होती. हाच एकटा असा गप्प का राहिला याचे रूपमला कोडे पडले.

दोन महिन्यांनी पुन्हा एकदा याच अधिकाऱ्याकडे रूपमने घरफोडी केली; अन् यावेळी तर त्याला पहिल्यापेक्षाही अधिक किमती माल मिळाला! नंतर त्याने क्रमाक्रमाने पुन्हा व्यापारी, शेतकरी व पुजारी यांच्या घरी चोरीसाठी प्रवेश केला. पण त्याला यापैकी कुठेच काही मौल्यवान वस्तु मिळाल्या नाहीत. ते तिथे तर बिचारे आपल्याकडे झालेल्या चोरीच्या धक्क्यातून अजून सावरलेही नव्हते!

याही वेळी पुन्हा तो अधिकारी सोडून बाकीच्यांनी आपल्याकडे पुन्हा चोरीचा प्रयत्न झाल्याबद्दल तक्रारी केल्या. याही वेळी त्या अधिकाऱ्याच्या चुप बसण्याबद्दल रूपमला आश्चर्य वाटले. त्याने ओळखले की इथे नक्कीच काहीतरी 'पाणी मुरतंय!'

एकदा एका धनवान माणसाचे घर लुटताना रूपम पकडला गेला. त्या मालकाने चोराची चौकशी केली, तेव्हा त्याला कळून चुकले की आपल्या नोकरांनी पकडलेला चोर हा कुप्रसिद्ध डाकू रूपम होय! मालक नोकरांना शाबासकी देत म्हणाला—"अरे, राजाचे शिपाई सुद्धा हर प्रयत्नाने ज्याला पकडू शकले नाहीत, अशा कुप्रसिद्ध चोराला तुम्ही पकडलं आहे. आता याला नीटपणे घेऊन जाऊन राजाच्या शिपायांच्या हाती सुपूर्त करून या. याच्या अपराधांबद्दल राजा स्वतःच चौकशी करून योग्य शिक्षा देईल.

नोकरांनी रूपमला राजाच्या शिपायांच्या ताब्यात दिले. शिपायांनी नन्तर त्याला राजासमोर हजर केल्यावर राजाने त्याला विचारले—"चोर कितीही हुशार झाला, तरी एक ना एक दिवस पकडला जातोच, ही गोष्ट तुझ्या बाबतीत सिद्ध झाली अखेर! आता बोल, चोरीचा सर्व माल आमच्या स्वाधीन करतोस, की आमची खास अशी शिक्षा भोगायला तयार आहेस?"

"महाराज, एकदा पकडलं गेल्यावर अडेलतट्टूपणा करण्यात काय अर्थ! मी जे जे काही चोरलं, ते सर्व तुमच्या हवाली करायला तयार आहे." रूपम म्हणाला.

चोरीच्या वस्तु लपवण्याच्या जागेचा पत्ता त्याने शिपायांना सांगताच ते जाऊन सर्व माल घेऊन आले. व्यापारी, शेतकरी व पुजारी यांना चोर पकडल्याची वार्ता कळताच ते राजाकडे आले व 'आपल्या वस्तु आपल्याला परत मिळाव्या' अशी त्यांनी विनन्ती केली.

राजाने रूपमला त्या सर्व वस्तु ज्याच्या ज्याच्या असतील त्याप्रमाणे निरनिराळ्या करायला सांगितले. रूपमने व्यापारी, शेतकरी व पुजारी यांच्या वस्तु वेगवेगळ्या करून ठेवल्या व अधिकाऱ्याच्या वस्तु एका बाजूला ठेवून म्हटले—"महाराज, या वस्तु मी राजमार्गावरच्या कोपऱ्यावरील विहिरी-जवळच्या तुमच्या एका अधिकाऱ्याच्या घरातून चोरलेल्या आहेत."

हे ऐकून राजाला आश्चर्य वाटले!

"इतक्या मौल्यवान वस्तु एखाद्या सामन्त राजाच्या घरी आढळू शकतील. पण एका साध्याशा अधिकाऱ्याच्या घरात



नाही मिळायच्या! तुझ्या बोलण्यावर कसा विश्वास ठेवावा, तेच मला कळेनासं झालंय; अन् त्याने तर चोरीबद्दल आमच्याकडे तक्रारही नोन्दवली नाही!"

यावर हसून रूपम म्हणाला–"महाराज, मलाही तसंच आश्चर्य वाटलं होतं की, फक्त यानेच चोरीची फिर्याद का केली नाही? नंतर माझ्या बरोबर लक्षात आलं की हा अधिकारी पहिल्या नंबरचा लाचखाऊ माणूस आहे. लोकांकडून लाच घेण्याच्या कामात तो इतका पुढे गेला आहे की तो माझ्यापेक्षाही अव्वल दर्जाचा चोर ठरावा! आपल्या जुलूम-जबरदस्तीचा पत्ता लागू नये, म्हणून त्याने आपल्याकडच्या चोरीची हकीकतही लपवून ठेवली!"

"माझ्या दरबारात लाचलुचपत?" राजा आश्चर्याने म्हणाला आणि त्याने शिपायांकरवी त्या अधिकाऱ्याला बोलावून घेतले.

कडक शब्दात धमकी देऊन राजाने अधिकाऱ्याकडून गुन्हा करून घेतला. ताबडतोब त्याला कैदेची शिक्षा सुनावली गेली. नंतर राजा रूपमला म्हणाला–"तुझ्यामुळे एका लाचखाऊ अधिकाऱ्याला शिक्षा मिळाली. आता या उदाहरणामुळे इतर असे अधिकारीही वठणीवर येतील. ठीक आहे; बोल, आता तुला काय शिक्षा द्यावी?"

यावर हात जोडून रूपम म्हणाला–"प्रभु, मी सर्वात कुप्रसिद्ध असा चोर पकडून दिला, याबद्दल खरं तर मला काही बक्षिस मिळायला हवं, अन् आपण शिक्षेचा विचार करीत आहात?"

त्याच्या या बोलण्यावर हसून राजा बोलला–"ओहो! तुला बक्षिस हवं ना? मग ऐक तर–आजपासून तू आणि तुझे साथीदार, या सर्वांनी चोरी करायचे सोडून देऊन काही चांगले करून जगायला लागावे. हां, पुन्हा जर तुम्ही चोऱ्या करीत आहात अशी खबर मिळाली तर मात्र सर्वांनाच सुळावर चढवीन." अशा तऱ्हेने तंबी देऊन राजाने रूपमला ताबडतोब मुक्त केले.





# वीर हनुमान

इन्द्राचा पाठिंबा पाहून राहू मोठ्या धैर्याने, ऐटीत आंजनेयाकडे आला. राहूला एकवार आंजनेयाने नीट न्याहाळून घेतले, अन् त्यालाही एक फळच समजून त्याने पकडायचा प्रयत्न केला. अशा तऱ्हेने उग्र रूपात आंजनेयला आपणाकडे येताना पाहून राहू घाबरला आणि तो इन्द्राकडे धावत सुटला! "हा पोरगा मला मारायला येत आहे, वाचवा मला!" असा तो आक्रोश करू लागला.

"घाबरू नकोस! मी पाहून घेतो त्याला." असे म्हणून ऐरावतावरून इन्द्र निघाला.

मोठ्याने आवाज करत आपणावर चालून येणारा तो हत्ती पाहून आंजनेयला वाटले 'ओहो! हे एक पांढरं फळ दिसतंय! छान आहे की! अगोदर हेच खाऊन आपली भूक भागवावी.' अन् तो एकदम पुढे सरसावला. त्याला पाहून ऐरावतही भ्यायला अन् जागीच थटून पळ काढायच्या बेतात आला.

चिडून इन्द्राने आंजनेयावर आपले वज्र फेकले. त्या प्रहाराने आंजनेयाची हनुवटी फाटली आणि तो उदयगिरीवर पडून बेशुद्ध झाला.

ते पाहून वायुदेवाला फार वाईट वाटले. रागावून त्याने आपली हालचाल–विचरण बंद केले. या अवधीत अंजना आपल्या झोपडीत परतली आणि अंथरुणावर आपले बाळ नाही असे पाहून स्फुन्दून स्फुन्दून रडू लागली.

२. सुग्रीवाचे मन्त्रीपद



तिचे सान्त्वन करीत केसरी म्हणाला—"रडू नकोस अशी. सूर्यालाच एक फळ समजून त्याने पकडायचा प्रयत्न केला. राहूकडून ही बातमी कळल्यावर इन्द्राने त्याला असं मारलं की त्याची हनुवटी फाटली आणि बेशुद्ध होऊन तो आता उदयगिरीवर पडला आहे. इन्द्रावर रागावून वायुदेवाने संचार करणं सोडून दिलंय. या सर्वातून तुझ्या बाळाचं काही भलंच होईल बघ. दुःख नको करत बसू."

हे ऐकून अंजना काहीशी आश्वस्त झाली.

रागावून वाराच थांबून गेल्यामुळे सर्व व्याकुळ झाले आणि ब्रह्मदेवाकडे जाऊन त्यांनी निवेदन केले की, इंद्राने आंजनेयाचा जबडा तोडल्यामुळे वायुदेवाने आपले भ्रमण बन्द करून टाकले; आणि आपल्याला या संकटातून वाचवण्याची त्यांनी ब्रह्मदेवाला विनन्ति केली.

ब्रह्मदेव तावडतोब हंसावर बसून वायुदेवाकडे गेले व म्हणाले—"पुत्रा! तू सर्व प्राण्यांचा प्राणदाता आणि सर्वव्यापी आहेस. तुझे असे रुसणे योग्य आहे का?"

काहीही न बोलता वायुदेवाने त्या बेहोश आंजनेयाला उचलून ब्रह्माच्या पायांवर ठेवले आणि त्याला प्रणाम केला. ब्रह्मदेवाने त्या बाळाला हस्तस्पर्श केला आणि त्याच्या शरीरात पुन्हा चेतना आली!

ते पाहून वायुचे दुःख दूर झाले आणि आनन्दाने तो संचारासाठी निघाला. सर्व देवांना ब्रह्मदेव म्हणाला—"हा बाळ सर्व लोकांना आनन्द प्रदान करणारा आहे, याला आपण वरदान देऊ."

त्यावेळी भूमातेने आंजनेयाला असा वर दिला की, त्याला सर्व वेद मुखोद्गत होतील. मरण व म्हातारपणापासून यमराजाने त्याला मुक्ति दिली. कुबेराने त्याला युद्धात नेहमी विजयी होण्याचा वर दिला. इन्द्राने त्याला हनुमान नाव देऊन असा वर दिला की त्याला वज्राचे ही भय रहाणार नाही; तर ब्रह्मदेवाने हनुमानाला दीर्घायुष्य प्रदान केले.



यानन्तर ब्रह्मदेव वायुला म्हणाला—"तुझ्या या पुत्राला अपूर्व कीर्ति मिळेल, हा कधीही हरणार नाही. हा पर्वतासारखा धैर्यशाली आणि वीर निपजेल, अणिमादि सिद्धि याला प्राप्त होतील. केवळ मनात विचार आला की सकल विश्व हा पाहू शकेल. हा विरागी व कामरूपी असून याचे ठायी असामान्य धैर्य, शौर्य व दयागुण वसतील. अनेक अद्‌भुत अशी कार्ये याच्या हातून पार पडतील. दिसेलच तुला हे सर्व त्या त्या वेळी." इतके सांगून ब्रह्मदेव निघून गेले.

सूर्याला खाण्याचा प्रयत्न करणाऱ्या हनुमानाबद्दल आश्चर्याने गोष्टी करत अन्य देवही आपापल्या स्थानी परतले.

वायुदेवाने हनुमानाला उचलून अंजनेच्या हाती सुपूर्त केले. पुत्र परत मिळालेला पाहून अंजनेच्या डोळ्यातून आनन्दाश्रु वाहू लागले. तेथे आसपास रहाणारे ऋषीमुनिही हनुमानाबद्दल ऐकून आश्चर्यचकित झाले. त्यांच्या मनात आले की—'सूर्याच्या किरणांचीही उष्णता माणसाला असह्य होते, तर प्रत्यक्ष सूर्यबिंबच धरायला हे बाळ धावले ही किती आश्चर्याची बाब आहे!'

आपल्या पुत्राला देवांकडून अनेक वर मिळाल्याचे जाणून केसरीलाही फार आनन्द वाटला.



आता हनुमान दिसामाशी वाढू लागला. चांगला ज्ञानी असूनही तो अनेक खोड्या करी. नुसतेच भटकणे व दुर्बळांना त्रास देणे बरे नव्हे असे सांगून त्याचे आईबाप त्याच्या मर्कटचेष्टांना आळा घालायचा प्रयत्न करीत. तरीही त्याचा खोडकरपणा चालूच राहिला.

लोककल्याणासाठी जन्मलेला हा हनुमान इतका त्रासदायक कसा झाला याचे ब्राह्मणांना मोठे आश्चर्य वाटे. पण काय करावे हे मात्र त्यांना सुचेना. त्याला कोणी शापही देऊ शकत नव्हता, कारण ब्रह्मदेवाच्या वरदानामुळे तो या सर्वांपलिकडे पोचलेला होता. पण इतक्या शक्तिसंपन्न



मुलाला अडवणारे, दडपणारे कोणी नसेल तर याचे परिणाम काय होतील, या विचारांनी ब्राह्मणांनी जाणकारपणाने लोककल्याणासाठी अशी इच्छा केली की हनुमानाला आपल्या अफाट शक्तीबद्दल पत्ताच लागू नये.

या प्रबळ इच्छाशक्तीच्या प्रभावाने हनुमान एकाएकी एकदम सात्विक बनला. आपल्या मुलात अचानक झालेल्या या बदलामुळे अंजना व केसरी यांनाही फार आनन्द वाटला.

अशा प्रकारे थोडे दिवस गेल्यावर एके दिवशी अंजना हनुमानाला म्हणाली– "बाळा, किष्किन्धेमधे वाली व सुग्रीव नावाचे दोन भाऊ रहातात. माझी आई अहल्या हिच्या पोटीच त्यांच्याही जन्म झाला आहे. तेव्हा ते दोघे तुझे मामा आहेत. तू आता किष्किन्धेला त्यांच्याकडे जा, आणि सुग्रीवाच्या आश्रयाला रहा. कधी काही कारणाने वाली आणि सुग्रीव यांच्यात वितुष्ट आले तरी तू मात्र वालीला मारायला जाऊ नकोस." असे अंजनेने त्याला समजावून सांगितले.

हनुमानाने आईला नमस्कार करून तिचा आशिर्वाद मिळवला व तो किष्किन्धेला पोचला. वाली व सुग्रीव यांचे त्याच्यावर फार प्रेम बसले. हनुमान आता सुग्रीवाचा मन्त्री बनून राहू लागला. एकदा त्याला वेदशास्त्र शिकायची इच्छा झाली.

एका सकाळी स्नान वगैरे उरकून सूर्योदयाच्या वेळी आकाशात झेप घेऊन हनुमान सरळ सूर्यदेवासमोर उभा ठाकला. आणि त्याने सूर्याला नमस्कार केला.

सूर्य त्याला पाहून प्रसन्न झाला आणि म्हणाला–"तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होवोत! बोल, कशासाठी आला आहेस माझ्याकडे?"

"मी आपणापाशी वेदशास्त्र शिकण्याच्या इच्छेने आलो आहे." हनुमान उत्तरला.

"असं? पण जर एवढ्यांचसाठी तू माझ्याकडे आला असशील तर पहा बाबा! माझ्याजवळून काही शिकणं मोठं



अवघड आहे. कारण मी तर मेरूपर्वताभोवती मोठ्या वेगाने फिरत रहात असतो." सूर्य म्हणाला.

यावर हनुमानाने विचारले–"मग महात्मन्, मी आपला एक पाय उदयगिरीवर व दुसरा अस्ताचलावर ठेवून आपणाजवळ विद्याग्रहण करू काय? की आपल्या पुढे पुढे चालत राहून ते करू?"

त्याच्या या बोलण्यावर खूश होऊन सूर्य म्हणाला–"मुला, तुझ्यासारखा मुलगा जगात कुठे सापडणार नाही. तू आपले दोन्ही पाय दोन पहाडांवर ठेवून उभा रहा. तुला असा उभा पाहून अन्य देवही खूश होतील."

"जशी आपली आज्ञा!" असे म्हणून हनुमानाने सूर्याला प्रदक्षिणा घातली आणि आपले शरीर इतके मोठे केले की तो नक्षत्रांच्याही वर गेला आणि त्याने सारे ब्रह्मांड व्यापून टाकले! त्याचा हा अवतार पाहून ब्रह्मदेवही चकित झाले! आणि सारे मुनि व देवता हनुमानाला पाहून त्याला नमस्कार करू लागले.

सूर्याचे आश्चर्य वर्णनातीत होते. तो हनुमानाला म्हणाला–"तू तर प्रत्यक्ष रुद्रावतार आहेस, तू माझी कीर्ति वाढवण्यासाठीच आला आहेस, नाहीतर तुला उपदेश देणारा मी कोण?"



हनुमान यावर नम्रतेने म्हणाला– "महात्मा, आपलं हे बोलणं उचित आहे का? आपण तर वेदांचे मूळपुरुष आहात, कृपा करून मला आपला शिष्य बनवा आणि मला तीनही वेद शिकवा." इतके बोलून हनुमानाने आपले पूर्वरूप धारण केले आणि तो सूर्याच्या रथापुढे उभा राहिला.

सूर्य एका घडीत नऊ लाख सत्तर हजार योजने इतके अंतर पार करतो. तेव्हा त्याच गतीने हनुमान सूर्याकडे तोंड करून मागे मागे उडत राहिला, आणि स्मृति-पुराण वगैरे सर्व शास्त्रे त्याने सूर्याकडून शिकून घेतली.



अध्ययन संपल्यावर हनुमानाने सूर्य-भगवानाला नमस्कार केला व तो किष्किन्धेला परत गेला. त्याने ही सर्व हकीकत सुग्रीवाला सांगितली. तेव्हापासून सुग्रीवाचे त्याच्यावरचे प्रेम अधिकच वाढले.

वाली व सुग्रीव आपसात प्रेमाने व गुण्यागोविन्दाने रहात असत. त्यांचे आपसा-तले प्रेम मोठे आदर्श होते. त्याचे पालन-पोषण करणारा पिता ऋक्षविरज याचे देहावसान झाल्यानंतर वाली राजा व सुग्रीव युवराज बनला.

वालीचा पराक्रम व शक्ति अजोड होती. युद्धात त्याला आतापर्यंत कोणीही जिंकू शकला नव्हता. अनेक राजांना हरवल्या-नन्तर रावण एकदा विजयगर्वाने फुगून वालीकडे आला व त्याने वालीला युद्धाचे आव्हान दिले. वालीने रावणाशी युद्ध केले व त्याला खूप पिटून अर्धमेला करून टाकले! यानन्तर मात्र रावण व वाली यांच्यात नेहमीच मित्रत्वाचा व्यवहार राहिला.

यानन्तर एकदा वालीला दुन्दुभी नावाच्या राक्षसाने युद्धाचे आव्हान दिले. या गर्विष्ठ दुन्दुभीने अगोदर हिमवानाला युद्धाचे आव्हान दिले होते, तेव्हा तो या राक्षसाला म्हणाला होता–"हे बघ, तुझ्याशी युद्ध करण्याची ताकद माझ्यात नाही. तुझ्याशी युद्ध करू शकेल असा एकटा एक वालीच काय तो आहे. तेव्हा तू त्यालाच आव्हान दे ना? तो नक्की लढेल बघ तुझ्याशी!"

यानंतर दुन्दुभी मधुवनात आला व ते वन उध्वस्त करीत त्याने वालीला युद्धा-साठी चेतवले. त्याचे आव्हान स्वीकारून वाली तेथे आला व युद्धात त्याला मारून टाकून त्याचे शरीर दूर भिरकावून दिले. दुन्दुभीचे मृत शरीर ऋष्यमूक पर्वतावर जाऊन पडले व त्याच्या रक्ताचे काही थेंब तेथे तप करीत असलेल्या मातंग मुनींच्या अंगावर उडाले. यामुळे रागाने मातंग मुनींनी वालीला शाप दिला की तो जर

कधी ऋष्यमूक पर्वतावर आला तर त्याचे मस्तक फुटून जाईल!

यानन्तर दुन्दुभी-पुत्र मायावी व वाली यांच्यात वितुष्ट आले. वालीने दुन्दुभीला मारले होते हे एक कारण होतेच; आणखी दुसरे म्हणजे एका स्त्रीवरूनही त्यांच्यात शत्रुत्व वाढले होते.

एका मध्यरात्री मायावी किष्किन्धेच्या नकरद्वारी आला व गर्जतच त्याने वालीला युद्धासाठी ललकारले. वाली झोपेतून जागा झाला. शत्रूचे हे उद्दाम वर्तन त्याला सहन झाले नाही व तो लगेच युद्धासाठी निघाला. सुग्रीव व वालीची पत्नी तारा या दोघांनीही त्याला त्यावेळीं न जाण्याविषयी विनवले, पण वालीने कोणाचेच ऐकले नाही.

आपण वालीला रोखू शकत नाही हे जाणून सुग्रीवही त्याच्या मागोमाग निघाला. दोन्ही भावांना एकाच वेळी समोर पाहून मायावी घाबरून पळून जाऊ लागला. तेव्हा वाली व सुग्रीव त्याला हाकलत त्याच्या मागे लागले. मायावी त्यांना असे बरेच दूर घेऊन गेला व एका डोंगराच्या गुहेत घुसला. गुहेच्या तोंडावर झाडे-झुडपे माजलेली होती.

"मी मायावीला मारून येतो, तोपर्यंत तू या गुहेच्या द्वाराशी थांब." असे सुग्रीवाला सांगून वालीही गुहेत शिरला.

बराच काळपर्यंत वाट पाहूनही वाली गुहेबाहेर आला नाही; तेव्हा सुग्रीवाला काळजी वाटू लागली की वाली आत मेला तर नसेल? इतक्यात रक्ताची एक धार वहात गुहेबाहेर आलेली त्याला दिसली आणि गुहेतून येणारा आवाज मात्र राक्षसासारखा वाटला.

तेव्हा नक्कीच आपला भाऊ मेला असे समजून मोठ्या दुःखाने त्या गुहेचे तोंड एका मोठ्या शिळेने बन्द करून सुग्रीवाने वालीसाठी पाण्याने तर्पण केले व जड हृदयाने तो किष्किन्धेला परतला. ही वार्ता जाणून सर्व वानरांना फार दुःख झाले. शेवटी त्यांनी सुग्रीवाला राज्याभिषेक केला.





## विनीला आणि वनदेवी

गांगावर गावात एक जोडपं रहात होतं–त्यांची नावं कमलापति नि वारिजा. त्यांना दोन मुलगे आणि एक मुलगी होती. मुलीचं नाव होतं विनीला. ती वयात आली होती, पण अजून तिला एक ही स्थळ सांगून आलं नव्हतं. कारण ती अंगानं स्थूल होती आणि फार भांडखोर होती. तिला भांडायला कारण लागायचं नाही. जरा तिच्या मनाविरुद्ध कुणी बोललं की लागलीच ती भांडायला! मग ती लहान-मोठं असं काही पहात नसे. तिच्या या स्वभावामुळे तिचे आई-वडील नि आसपासचे शेजारी ही तिच्याशी बोलायला घाबरत. तिची जाडी आणि भांडखोरपणा कमी झाला तरच तिचे लग्न होण्याची शक्यता आहे असे सर्वांना वाटे. पण हे तिला सांगायचं कोणी धाडस करीत नसे. अशी मुलुखा वेगळी होती विनीला! तिच्या स्थूल शरीरयष्टीकडे पाहून सर्वांनाच अमळ भीति वाटे.

दरम्यानच्या काळात एकदा विनीलाची काकी पाहुणी म्हणून तिच्या घरी आली. तिला जेव्हां सर्व हकिगत समजली तेव्हां तिने विनीलाला समजून सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण ते ही सर्व पालथ्या घड्यावर पाणी! विनीला कसली काकीला भीक घालतीय?

यावर विनीला तणतणत म्हणाली–"मला उपदेश देणारी तू कोण? माझ्या वडिलांनी खूप कमवलंय, मी आपल्या मर्जीने वाटेल ते खाईन! मला कोणी चिडवलं तर मी गप्प बसणारी नाही! चांगली वरात काढीन, समजलं? माझ्या लग्नाच्या उठाठेवी दुसऱ्या कोणी कशाला करायच्या? काकी, आपलं गाठोडं बांधून चालू लागा! पुन्हा माझ्या बाबतीत

चम्पा आफळे



काही बोलायचं असलं तर या घरी न आलेलंच बरं. म्हणजे पुन्हा असली वेळ नको यायला!"

अशाच प्रकारे आणखी दोन-तीन नाते-वाईकांनी विनीलाला उपदेश केला. विनीलाने त्यांना नुसती शिवीगाळच केली नाही, तर हात ही उगारला त्यांच्या वर! यावर सर्वांनी विनीलाच्या लग्नाचा विषय आपल्या डोक्यातून काढून टाकला. परमेश्वर जसं करील तसं होईल!

तिचे दोन्ही भाऊ आपल्या छोट्या बहिणीच्या लग्नाची प्रतीक्षा करून थकले. शेवटी कंटाळून त्यांनी आपापल्या पसंतीच्या मुलींशी लग्ने उरकून घेतली.

विनीलाचे आई-वडील म्हातारे झाले होते. आपल्या डोळ्यां देखत मुलीचं लग्न पाहण्याचं भाग्य लाभावं अशी त्यांची फार इच्छा होती. घरात भावजया आल्यानंतर सुद्धा विनीलाची संवय बदलली नाही. ती घरात एका कामाला हात लावत नसे. आणि वहिन्यांचे मात्र दोष दाखवण्याचा प्रयत्न करी. काही दिवस भावजयांनी हे सगळं सहन केलं, मग मात्र त्यांनी विनीलाला उलट सुनवायला सुरुवात केली.

घरात नणंदा-भावजयांची रोज भांडणं सुरू झाली. भांडण झालं की विनीला रूसून गावा बाहेरच्या तलावाच्या काठी असलेल्या विशाल वडापाशी जाई, पारंब्यांचा झोपाळा बांधून त्यावरं झोके घेत बसे. अंधार पडल्यावर विनीलाचे भाऊ शेतावरून घरी येत, बहिणीला शोधण्यासाठी वडाजवळ येत आणि तिच्या विनवण्या करून तिला घरी घेऊन जात.

एक दिवशी भावजयांशी भांडून विनीला घराबाहेर पडली नि वडाच्या झाडाकडे जायला निघाली. भूक लागली की विनीला कासावीस होई. ती घरातून काही पैसे घेई, रस्त्यातील एकाद्या दुकानातून भरपूर खाद्य-पदार्थ खरेदी करी नि वडाच्या झोपाळ्यावर झोके घेत राही. त्या दिवशी सुद्धा विनीलाने शेंगदाणे आणि गूळ खरेदी





केला नि आपल्या पदरात बांधून तलावाच्या काठी पोचली.

वडाच्या झोपाळ्यावर कुणी तरी दुसरी स्त्री झोके घेताना दिसली. हे विनीलाला मुळीच सहन झाले नाही. ती रागा-रागाने त्या स्त्रीजवळ गेली नि म्हणाली–"तू कोण? माझ्या झोपाळ्या वर बसायचं धाडस कसं केलंस तू? हा झोपाळा मी माझ्यासाठी तयार केला आहे. त्याच्या वर बसायला दुसऱ्या कोणाला काय अधिकार? चल उठत आहेस की......" विनीलाने तिचा हात पकडून जोराने तिला खेचलं.

डोळे मिटून झोके घेणारी ती स्त्री जोरात ओरडली नि अदृश्य झाली.

तिला अदृश्य होत असलेली पाहून विनीलाचा राग आणखीच वाढला. आरडा-ओरडा करीत विनीला तिला म्हणाली–"कोण आहेस तू? धैर्य असलं तर समोर ये माझ्या. तू भूत अस नाहीतर प्रेत, मी तुला भिणारी नाही. तांत्रिकाच्या मदती-शिवाय मी तुला या झाडाखाली गाडून टाकीन. तू कोणी देवी-देवता असलीस तरी मी गप्प बसणार नाही. तुला शोधून काढून चांगली अद्दल घडवीन."

ती स्त्री आता विनीला समोर येऊन उभी राहिली आणि म्हणाली–"मी जवळच्या जंगलातील वनदेवी आहे. इकडून जाताना तुझा झोपाळा पाहिला, नि झोके घेऊ लागले. तुला एवढा राग येईल असं मला वाटलं नव्हतं. आरडा-ओरडा करून माझ्या बद्दल गवगवा करू नकोस. नाही तर तो लाकूड-तोड्या येऊन मला वर मागू लागेल!"

आता विनीलाचा पारा उतरला. ती वनदेवीला म्हणाली–"ठीक आहे. मी तुझ्याबद्दल कोणाला काही सांगणार नाही. पण माझं लग्न लवकर होईल असा मला वर देशील?"

पुन्हा अदृश्य होता होता वनदेवी म्हणाली–"होय, तुझी इच्छा पूर्ण होईल!"

दुसऱ्या दिवशी सकाळी एक तरूण एक पेटी नि बिस्तरा घेऊन विनीलाच्या घरी



आला. विनीला त्या वेळी आरामात बसून नाश्ता खात बसली होती. तिच्याकडे पहात तरुणाने विचारले–"इथे एकादी खोली भाड्याने मिळेल का?"

एवढ्यात विनीलाचे भाऊ बाहेर आले. त्या तरुणाची विचारपूस केली. त्याचं नाव होतं पवन. शिक्षक बनून त्या गावात आला होता. तो अविवाहित होता. त्याचं असं कोणी नव्हतं. एकटाच होता बिचारा!

विनीलाच्या दोन्ही भावांनी आपापसात सल्ला-मसलत केली नि व्हरांड्यातील एका बाजूची खोली साफ-सूफ करून पवनला कमी भाड्याने दिली. पवनला खूपच आनंद झाला. त्याने आपलं सामान खोलीत ठेवलं.

पवन सकाळी उठून स्नान करून आपला स्वयंपाक करी. जेवण करून तो शाळेत गेला की एकदम रात्री खोली वर परत येई. कधी विनीला दिसली तर तिच्याकडे मोठ्या प्रेमाने पहात राही.

असे काही दिवस गेले. एक दिवशी पवन विनीलाच्या भावांना म्हणाला–"माझी विनीलाशी लग्न करायची इच्छा आहे! पण त्याच्या अगोदर विनीलाने बनवलेलं भोजन एकदा खाल्लं पाहिजे." कित्येक दिवस आपलं भोजन स्वतः तयार करून तो आता कंटाळला होता. हेच विनीलाच्या भावांना सांगून तो म्हणाला–"चांगला स्वयंपाक बनवणारी बायको मिळाली तर मी आपल्यांला भाग्यशाली समजेन!" विनीलाचे भाऊ खुश झाले. घरात सर्वांना ही वार्ता समजली. त्या दिवशी विनीलाला स्वयंपाक करायला सांगितलं गेलं. पवनची अशी अट होती की विनीलाला स्वयंपाकात अन्य कोणी ही मदत करायची नाही.

स्वयंपाक करता करता विनीला विचार करू लागली. वनदेवीच्या कृपेने आता आपले लग्न तर होणार. आताच जरा डोक्याने काम केलं पाहिजे. पवनला स्वयंपाक करायची सवय झाली होती. पण आपण केलेले पदार्थ जर पवनला आवडले तर मग तो कधी स्वयंपाक करणारच नाही. असं झालं तर जन्म भर तिला स्वयंपाक-घरातच खितपत पडावं लागेल. म्हणून तिने जाणून-बुजून सर्व खाद्य-पदार्थ बिघडून ठेवले!

पवन बरोबर सर्व जण जेवायला बसले. विनीलाने तयार केलेले पदार्थ कोणाच्या ही घशाखाली उतरू शकले नाहीत. हे हे पदार्थ खाणं म्हणजे एक शिक्षा असं सर्वांना वाटलं. पवनचा चेहरा तर पाहण्या-सारखा झाला. तो अर्धवट जेवण सोडून पानावरून उठला. सर्वांनी विनीलाला खूप फैलावर घेतलं. बिचाऱ्या विनीलाने मुकाट्याने सर्व काही ऐकून घेतलं.

दुसऱ्या दिवशी सकाळी सर्व जण उठले तेव्हा पवनने खोली सोडून दिलेली होती. खोलीत एक पत्र मिळाले. त्यात लिहिले होते–"विनीलाने तयार केलेले भोजन आपण खाऊ शकणार नाही. वनदेवीनेच काय खुद्द परमेश्वराने वरदान दिले तरी विनीलाशी लग्नाला कोणी तयार होईल असे मला वाटत नाही."

हे पत्र वाचून सर्वात अधिक दुःख झाले विनीलाला! वनदेवीने दिलेले वरदान असे व्यर्थ सिद्ध होईल असे तिला कधी वाटले नव्हते. त्या दिवसापासून घरात सर्व जण तिची उपेक्षा लागले. तलावाच्या आसपास विनीलाने अनेक वेळा वनदेवीचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. पण व्यर्थ! वनदेवी तिला कधी ही दिसली नाही.

या घटने नंतर मात्र विनीला मध्ये एकदम खूप बदल झाला. भावजयांच्या कामात ती मदत करू लागली. अशा रीतीने झडझडून काम करायला लागल्यावर विनीलाचा लठ्ठपणा आपोआप कमी होऊ लागला. आता विनीला अधिक आकर्षक दिसू लागली.

यानंतर थोड्याच दिवसात शेजारच्या गावच्या एका प्रतिष्ठित शेतकऱ्याने आपल्या मुलासाठी विनीलाला मागणी घातली. सर्वांनाच मोठं आश्चर्य वाटलं. विनीलाचं लग्न मोठ्या थाटामाटात साजरं झालं. शेवटी वनदेवीचं वरदान अशा रीतीने सफळ झालं.





# सुलतानाचे मांजर

मिसर शहरात महम्मद नावाचा व्यापारी रहात असे. एकदा तो सामान-सुमान व नोकरा-चाकरांसह व्यापारासाठी निघाला. अनेक शहरातून थांबत तो जवळच्या माल विकी आणि तेथें जो माल स्वस्त मिळेल तो घेऊन पुढील शहरात विकी. बऱ्याच महिन्यानंतर महम्मद एका मोठ्या शहरात पोचला.

या शहरात थोडी विश्रान्ती घ्यावी या विचाराने आपल्या साथीदारांसह तो एका मुसाफिरखान्यात उतरला.

त्यावेळी आणखी एक व्यापारी तेथे येऊन महम्मदला म्हणाला–"मित्रा, इथे येणारे सर्व व्यापारी इथल्या सुलतानाला उत्तमोत्तम नजराणे भेट म्हणून देतात. नजराणा घेतला कीं सुलतान त्या व्यापाऱ्याला बुद्धिबळ खेळायचे आमन्त्रण देतो." सुलतानाला भेटायची महम्मदची जराही इच्छा नव्हती. तरीही नाइलाज म्हणून आपल्याजवळच्या काही मौल्यवान वस्तु त्याने सुलतानाला नजर केल्या.

तो नजराणा घेऊन सुलतान खूष झाला आणि त्याने व्यापाऱ्याला त्याची हालहवाल विचारली, त्याच्या व्यापाराबद्दल त्याच्याशी गप्पागोष्टी केल्या अन् शेवटी सुलतान त्याला म्हणाला–"आज रात्री तू माझ्या कोठीवर ये, आपण बुद्धिबळ खेळू."

रात्री महम्मद कोठीवर गेला. सुलतानाने त्याला आपल्या समोर बसवले.

"हे पहा, खेळ सुरू करण्यापूर्वी खेळाचे नियम लक्षात घे. माझ्याजवळ एक हुशार मांजर आहे. ते रात्रभर आपल्या शेपटीवर सात पणत्या तोलू शकतं. आपण जोपर्यंत खेळत राहू, तोपर्यंत मांजराने शेपटीवर सात दिवे तोलून धरले, तर तुझी सारी संपत्ति माझ्या ताब्यात येईल आणि मी तुला तुरुंगात बंद करून ठेवीन. पण असं न होता जर मांजर हललं, अन् एक जरी दिवा खाली पडला तर मी आपली हार कबूल करीन. अशा स्थितीत माझा सर्व खजिना तुझा होईल अन् माझं काय करायचं, ते तू करू शकतोस." सुलतान म्हणाला.

महम्मद बिचारा काय बोलणार यावर? नाइलाजच झाला त्याचा! पळून जाऊ शकत नव्हता तो तिथून, अन् खेळायला नकारही देऊ शकत नव्हता! आपली इस्टेट व प्राणांचीही आशा सोडून वैतागाने महम्मद तसाच बसून राहिला.



सुलतानाचे मांजर तेथे आणले गेले; त्याच्या शेपटीवर सात पणत्या ठेवल्या गेल्या आणि वातीही पेटवल्या गेल्या. आता सुलतान व महम्मद यांचा खेळ सुरू झाला.

तीन रात्री व तीन दिसत तो डाव चालून राहिला. मांजराने बिलकुल हालचाल केली नाही. आता महम्मदची सहनशक्ती संपली व त्याने आपली हार कबूल केली. मुसाफिर खान्यातून आपला सर्व माल व पैसा-अडका मागवून त्याने तो सुल्तानाच्या हवाली केला. नंतर सुल्तानाने महम्मदला आपल्या तळघरात कैदेत ठेवले.

तिकडे महम्मदची बायको झरीना आपल्या नवऱ्याची वाट पहात होती, परन्तु महम्मद परतलाच नाही. काही काळानंतर महम्मदचा एक नोकर कसाबसा परत आला आणि रडत-रडत त्याने झरीनाला झाला प्रकार सांगितला. झरीनाने त्याचे बोलणे ऐकून घेतले. नंतर ती काहीशी विचारात पडली.

झरीनाने आपल्या नवऱ्याला सोडवून आणायची पक्की योजना बनवली. बरेचसे उंदीर पकडून तिने ते एका पेटीत बन्द करून ठेवले. थोडेसे सोने बरोबर घेऊन, पुरुष-वेष परिधान करून, नोकर-चाकरबरोबर घेऊन ती सुलतानाच्या शहरात पोचली.

तेथे ती एका मुसाफिरखान्यातच उतरली. सोन्याच्या थाळ्यांतून किमती नजराणे

ठेऊन ते नोकरांच्या हाती देऊन त्यांच्यासह ती सुलतानाकडे गेली. नोकरांना तिने सांगून ठेवले की ती जेव्हा सुलतानाशी बुद्धिबळं खेळेल, तेव्हा त्यांनी एक-एक उन्दीर पेटीतून काढून त्या खोलीत सोडावा.

सुलतान झरीनाला एक पुरुषच समजला आणि नजराणा घेऊन त्याने तिला खेळायचे निमन्त्रण दिले. खेळाचे नियमही सांगितले.

झरीना व सुलतान यांचा बुद्धिबळाचा डाव सुरू झाला. मांजराच्या शेपटीवर सात दिवे ठेवले गेले आणि ते अगदी दगडाच्या मूर्तीसारखे जसेच्या तसे तेथे बसून राहिले.

खेळ सुरू झाल्यावर थोड्या वेळाने झरीनाच्या नोकरांनी एक एक उन्दीर त्या खोलीत सोडून द्यायला सुरुवात केली. पहिला उन्दीर पाहून मांजर हालले नाही.

आणखी थोड्या वेळाने झरीनाच्या नोकराने दुसरा उन्दीर सोडला अन् पाठोपाठच आणखी तीन-चार उन्दीर एकदम सोडले. ते सर्व खोलीत आले अन् मांजराला पाहून घाबरले. नंतर त्यांनी इकडे पळायला व उड्या मारायला सुरुवात केली. इतके उन्दीर समोर दिसल्यावर मांजर गप्प कसे रहाणार? त्याने एकदम आपल्या जागेवरून उडी मारली अन् ते उंदरांच्या मागे धावलं! त्याच्या शेपटीवरचे सातही दिवे जमिनीवर पडले!

झरीनाचे नोकर तावडतोब आत घुसले व सुलतानाला मारू लागले. तो आरडाओरडा करू लागला, पण सुलतानाचे कोणीही नोकर त्याच्या मदतीला धावले नाहीत! कारण तो त्यांच्यावर जुलूम करत असे. नोकरांच्या मनात त्याच्याबद्दल अगदी तिटकारा असे.

आता झरीनाने सुलतानाला तळघरात डांबले आणि त्या तळघरातून आपल्या नवऱ्याला व इतर बन्द करून ठेवलेल्या व्यापाऱ्यांनाही सोडवले. नंतर सुलतानाची सर्व दौलत आणि आपल्या नवऱ्याला घेऊन झरीना आपल्या मुलुखात परत आली.





# दारात शिरणार नाही असा लाडू

एक दिवशी एक माणूस काकड्यांचं पोतं डोक्यावर घेऊन विकायला निघाला. आळशी नित्यानंदाने काकडीवाल्याला थांबवलं नि उगाच काहीच्या काही प्रश्न विचारून त्याला सतावायला सुरुवात केली. काकडीवाला संतापून म्हणाला—"मोठा आलाय खरेदी करणारा!"

नित्यानंदाला राग आला. तो काकडीवाल्याला म्हणाला—"तुझ्या पोतं भर काकड्या खाऊन टाकीन! समजलास काय?"

"तुझ्यासारखे चार खायला बसले तरी तरी पोतं भर काकड्या खाऊ शकणार नाहीत!" काकडीवाला जोरात म्हणाला.

नित्यानंद म्हणाला—"पैज लाव."

"या सगळ्या काकड्या तू एकट्याने खाल्ल्यास तर दारात शिरणार नाही असा लाडू मी तुला देईन." काकडीवाल्याने आव्हान दिले.

"असा लाडू तू मुळीच देऊं शकणार नाहीस!" नित्यानंदाने आव्हान परतवलं.

काकडीवाला म्हणाला—"तू या सगळ्या काकड्या तर खाऊन दाखव!"

"दारात न शिरणारा लाडू जर तू मला दिलास तर मी तुला शंभर रुपये देईन. पण जर तू देऊं शकला नाहीस तर तू मला शंभर रुपये द्यायचे!" नित्यानंद म्हणाला.

काकडीवाल्याने अट मान्य केली. डोक्यावरचं काकड्यांचं पोतं खाली उतरवलं. आळशी नित्यानन्दाने एक-एक काकडी हाती घेऊन तिचा टवका काढला, नि थुंकून टाकला. अशा रीतीने सर्व काकड्यांचे टवके काढून तो म्हणाला—"बघ, सगळ्या काकड्या खाऊन टाकल्या मी!"

काकडीवाला म्हणाला—"काय थट्टा चालवली आहेस?"

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट

"थट्टा! काय म्हणतोस काय? सगळ्या काकड्या मी खाल्लेल्या आहेत. कुणाला ही विचार, प्रत्येक जण असंच म्हणेल! जो तो म्हणेल या तर खाल्लेल्या काकड्या आहेत!" नित्यानंद म्हणाला.

तो पर्यंत काही लोक जमा झाले. सर्वांनी आळशाची बाजू घेतली. बिचारा काकडीवाला रिकामं पोतं घेऊन जायला निघाला तर नित्यानंद त्याला थांबवीत म्हणाला–"दारात न शिरणारा लाडू कुठे आहे? तो आण."

काकडीवाल्याचा चेहरा एकदम उतरला. त्याची बाजू घेऊन लोक म्हणाले–"तो बिचारा कोठून आणणार असला लाडू?"

"नाही, पैज हारली तर शंभर रुपये देण्याची बोली होती, ते सगळे मला मिळाले पाहिजेत!" नित्यानन्द म्हणाला. लोकांनी खूप समजाऊन सांगितलं, पण नित्यानन्द जिंकल्या तिथे!

काकडीवाल्याची पाचापर धारण बसली. शंभर रुपये कोठून आणून द्यायचे? एकदम त्याच्या मनात एक विचार चमकला. हलवायाच्या दुकानात जाऊन एक रुपयाला एक लाडू आणला नि तो नित्यानन्दला देऊ लागला.

नित्यानन्द म्हणाला–"दारात शिरणार नाही असा लाडू पाहिजे. हा पिटुकला नको."

काकडीवाल्याने सांगितलं–"दारात न शिरणारा लाडू तो हाच!" काकडीवाला जवळच्या घराच्या एका दारापाशी गेला. तिथे लाडू ठेवला नि म्हणाला–"हे लाडवा, शिर या दारातून आत शीर, शीर ना बेटा!"

लाडू जरा सुद्धा हालला नाही. काकडीवाला म्हणाला–"पहा, आहे की नाही दारात न शिरणारा हा माझा लाडू?"

"आहे बाबा!" म्हणत नित्यानन्द तेथून पळता पाय काढू लागला. काकडीवाला त्याला पकडत म्हणाला–"जातोस कुठे? पैजेचे शंभर रुपये अगोदर टाक, नि मग जा खुशाल!"

आळशी नित्यानन्दाने मुकाट्याने शंभर रुपये काढून दिले. त्याने कानाला खडा लावला, इथून पुढं पैज मारायची नाही.



## दगड बनलेले वृक्ष

अमेरिकेतील अरीझोना जंगलात असे कित्येक वृक्ष आहेत ज्यांचे दगड बनले आहेत. पण हे कसे झाले? वीस कोटी वर्षांपूर्वी जी प्रचंड वादळे झाली, त्यांच्या मुळे २०० फुट उंचीची झाडे उपटून आडवी झाली. नंतर त्यांच्यावर माती आणि वाळू यांचे थरा वर थर जमत गेले. कालांतराने हे वृक्ष प्रस्तरवत् झाले. सात कोटी वर्षां पूर्वी जेव्हां पृथ्वीचा आकार पुनः वाढला तेव्हा हे वृक्ष वर आले. पृथ्वीच्या पोटातील वालुकामय दगडांतून वाट काढीत ते पृथ्वीच्या पृष्ठभागावर आले.



## एरिबस पर्वत



अंटार्क्टिकाच्या अति दक्षिण टोकावर एक जिवंत ज्वालामुखी पर्वत आहे– त्याचं नाव एरिबस. याची उंची १२,४५० फुट आहे. त्याच्या शिखराच्या तोंडाचा व्यास २,६०० फुट आहे.

## लाजाळू



मिमोसा पुडिका म्हणजे लाजाळू नावाची एक अति कोमल वनस्पति आहे. तिला नुसता स्पर्श केला की तिची पाने आकुंचन पावतात. नंतर काही काळाने ती पुन्हा उमलतात.

# श्रीलंका : आजची परिस्थिति

"महावंश" नावाच्या ग्रंथावरून श्रीलंकेचा प्राचीन इतिहास आपणास समजतो. या ग्रंथानुसार पूर्व भारतातील विजयसिह् नावाचा एक युवराज एकदा आपल्या सातशे सहकाऱ्यांसह् नव्या प्रदेशाचा शोध करीत असता श्रीलंकेत पोचला. त्याने एका गिरिजन जातीच्या राजकुमारीशी मैत्री केली आणि तिच्या मदतीने तेथे एका नव्या राज्याची स्थापना केली. काही दिवसांनंतर त्याने त्या गिरिजन राजकुमारीला सोडून



दिले, आणि दक्षिण भारतातील मदुरेच्या पांड्य राजाच्या मुलीशी विवाह केला. विजयसिंहाच्या सातशे सहकाऱ्यांनी ही मदुरेच्या सातशे तमिळ मुलींशी लग्ने केली. आजचे सिंहल लोक हे त्या सर्वांचे वंशज आहेत. असं सांगतात की विजयसिंहाच्या नावावरूनच या बेटाला 'सिंहल' नाव मिळाले. रामायण-काळात सिंहल द्वीपाला 'लंका' असे संबोधले गेले.

श्रीलंकेत निरनिराळ्या धर्मांचे व जातींचे लोक रहात असल्यामुळे तेथील तमिळ लोकांची संकृति भिन्न झाली. पूर्वोत्तर भागातील जाफना मध्ये राहणाऱ्या तमिळ लोकांना योग्य वागणूक मिळत नाही, त्यांच्यावर अन्याय केला जातो असा बरेच दिवस अनेकांचा ग्रह होऊन राहिला. श्रीलंकेचे राज्यकर्ते सिंहल लोकांशी प्रेम व आदरपूर्वक वागत, पण तमिळ लोकांशी मात्र पक्षपातपूर्ण व्यवहार करीत. यामुळे तमिळ लोकांची दु:खे दिवसें दिवस वाढू लागली. याचा परिणाम असा झाला की ते बंड करून उठले. अनेक तमिळ उग्रवादी गट निर्माण झाले. या विद्रोही गटांनी 'स्वतंत्र तमिळ देशा'ची मागणी केली आणि ते सशस्त्र युद्धाला तयार झाले. तरी पण जाफना विभक्त करणं जगांतील अनेक देशांना युक्त वाटले नाही. अशात भारताने या प्रकरणी हस्तक्षेप केला नि तमिळ बहुसंख्य प्रदेशाला स्थानिक स्वायत्तता मिळवून दिली. यामुळे तमिळ लोक खुश झाले. भारताच्या शांति-सेनेच्या देखरेखी खाली निवडणुका झाल्या आणि नवे सरकार अस्तित्वात आले.

पण गोष्ट इथे संपली नाही. एल्.टी.टी.ई. (तमिळ देशाचे स्वातंत्र्य-सिंह) नावाच्या एका उग्र गटाने निवडणुकीला विरोध केला, तिचा बहिष्कार केला. हा एक समर्थ गट आहे, नि जाफनाचे सर्व राज्यतंत्र आपल्या ताब्यात यावे अशी त्याची इच्छा आहे. या बाबतीत जे गट विरोध करतील, त्यांना निर्दयपणे नेस्तनाबूत करण्याचे तंत्र एल्.टी.टी.ई. ने अवलंबिले आहे. शेवटी विरोधी गटाचे काही प्रमुख जे आपले प्राण वाचविण्यासाठी भारतात छपून राहिले होते, त्यांची ही निर्दयपणे बंदुकीच्या गोळ्या घालून कत्तल करण्यात आली.

सर्व तमिळ लोकांचं हित व्हावं अशी भारताची इच्छा आहे, म्हणून तेथील तमिळ लोकांचं नेतृत्व करण्यासाठी सशस्त्र युद्ध करायला निघालेल्या कोणत्याही उग्र गटाची बाजू घेणं भारताला शक्य नाही, नि ते इष्ट ही नाही.

श्रीलंकेचे सरकार नि एल्.टी.टी.ई. यांच्या मागणी मुळे तर भारताची शांति-सुरक्षा सेना श्रीलंकेतून परत मायदेशी आली. पण त्यानंतर ही दोघातील लढाई चालूच आहे. परिणामत: सामान्य जनतेला अनेक संकटे भोगावी लागत आहेत.



# भोळ्याची चतुराई

कांचनपुरी गावात एक व्यापारी रहात असे, त्याचं नाव होतं विशाल. अमर त्याचा एकुलता एक मुलगा होता. अमर मध्ये काही हुशारी नाही, अगदी भोळा नि भेकड मुलगा आहे असे लोक म्हणत.

एक दिवस विशाल रागावून मुलाला म्हणाला—"अरे अमर, तू कसा रे असा, निर्बुद्ध! मामाचे रूप तर तुझ्यात आले, पण त्याची हुशारी नि व्यवहारकुशलता तुझ्यात मुळिच आली नाही. पुढे तुझे कसे काय होणार काही समजत नाही."

अमर आपल्या वडिलांच्या उद्गारांबाबत विचार करू लागला. आपला मामा जगपतीच्या हुशारी संबंधी त्याने अनेक वेळी ऐकलं होतं. म्हणून आपल्या मामा विषयी अधिक जाणण्याची त्याची सहज इच्छा होती. केव्हा तरी एकदा मामाच्या गावी जाण्याची संधि मिळावी असा विचार सतत त्याच्या मनात घोळूं लागला. आणि जे पाहिजे ते नेमके घडले!

वडील अमरला म्हणाले—"तुझ्या मामाच्या गावापासून चार फर्लांग अंतरावर इंदिरापुर नावाचं गाव आहे. तुला माहीतच आहे कि तिथं मिर्ची आणि चिंच स्वस्त मिळते. मामाकडे जाऊन त्याला विचार की अजून पर्यंत माल का पाठविला नाही. हं, आणि असं ही सांग की दोन पोती मिर्ची जास्त पाठवा. भाव वाढला असेल तर माहीत नाही. थोडे पैसे पण बरोबर घेऊन जा. नीट चौकशी करून अधिक पैसे पाहिजे असले तर मामांच्या हाती दे." एवढं सांगून वडिलांनी अमरच्या हाती काही रक्कम दिली.

अमर लगेच निघाला. मामाच्या गावी पोचता पोचता अंधार झाला. घरात दिव्याच्या प्रकाशात उषा पुस्तक वाचीत

वसंत मांडके



बसलेली दिसली. अमरला पाहताच तिने पुस्तक खाली ठेवलं आणि अमरच्या घरांतील लोकांची वास्त-पुस्त केली.

तिच्या प्रश्नांची उत्तरं देत देत अमरने घराचं नीट निरीक्षण केलं, आणि विचारलं– "घरात कोणी नाही वाटतं? सगळे बाहेर गेले आहेत का? आणि तुला एकटीला घरात भीति नाही वाटत?"

"होय अमर, सगळे एका लग्नाला गेले आहेत. लवकरच परत येतील. आणि आपल्या घरात रे कसली भीति?" उषाने उत्तर दिलं.

अमरने अंघोळ केली. उषाने जेवणाचं ताट तयार केलं. अमर जेवायला बसला. एवढ्यात एक म्हातारी दार ढकलून आत आली. तिला पाहताच उषा हसत मोठ्या आदराने तिच्या जवळ गेली. म्हातारीने विचारले–"उषा, आई आली का ग? एव्हाना यायला पाहिजे होतं तिला."

"आजी बाई, आई अजून नाही आली. येईलच थोड्या वेळात. पण आजीबाई, तुम्हाला काय पाहिजे?" उषाने प्रेमपूर्वक विचारले.

म्हातारीने क्षण भर अमरकडे पाहिले, थोडी लाजली. ती उषाला म्हणाली– "ललिता नि तिची मुलं गावाकडून आली आहेत. घरात साखर मुळीच शिल्लक नाही. मुलांनी चहा मागितला तर फजिती होईल माझी!"

"बस, एवढंच ना? मी देते साखर. एवढी कशाला काळजी करताय?" असं म्हणून उषा स्वयंपाक-घरात गेली.

फाटक्या पदराने आपले हात झाकत म्हातारी तिथंच बसली. थोड्याच वेळात उषाने एक छोटा डबा भर साखर आणून म्हातारीच्या हाती दिली नि म्हणाली– "घ्या आजीबाई, ही घ्या साखर!"

मोठ्या आनंदाने डबा हातात घेत म्हातारीने उषाला आशीर्वाद दिला नि निघून गेली.



अमर हे सर्व काही पहात होता. म्हातारी गेल्यावर त्याने उषाला विचारलं–"मामा फार हुशार आहेत म्हणे. मामांची हुशारी नि चतुराई तुझ्यात उतरलेली दिसते आहे. म्हातारी तर मोठी गरीब दिसली. तू एवढी साखर तिला दिलीस. परत येणार का? दारिद्र्य मोठं कठीण असतं!"

अमरच्या या प्रश्नाचं उत्तर उषा देणार एवढ्यात कोणी तरी दरवाजावर थाप दिली. आता एक उंची साडी नेसलेली आणि दागिने घातलेली लठ्ठ बाई आत आली. तिने एकदा अमरला नखशिखान्त पाहिलं नि विचारलं–"ही स्वारी कोण?" आणि ती जवळच्या खुर्ची वर बसली.

उषाचे उत्तर ऐकण्यापूर्वीच त्या बाईने पुन्हा विचारले–"अग, आई अजून लग्नाहून आली नाही?"

"अजून नाही आली. पण तुम्ही काही खास कामानिमित्त आलेल्या दिसताय!" उषाने थोडक्यात उत्तर दिलं.

"उद्या सकाळी तुझ्या मामांचे खास दोस्त येणार आहेत. लाडू नि जिलबी बनवायची आहे, पण घरातली साखर संपली आहे. दुकानातून आणायला विसरलेच मुळि. दोन शेर साखर दिलीस, तर उद्याचं काम होऊन जाईल. करशील एवढं काम?" लठ्ठ बाईने विचारले.



जागच्या जागी बसून उषाने उत्तर दिलं–"आत्या बाई, घरातली साखर अजिबात संपली आहे. आई म्हणाली–आता उद्या आणू."

लठ्ठ बाई बिचारी निराश झाली. जाता जाता म्हणाली "ठीक आहे, पहाते दुसरी-कडे कुठे मिळती आहे का?"

ती बाई गेल्यावर उषाने हसत हसत अमरला विचारले–"पाहिलंस न? योगायोगाने तुझ्या प्रश्नाचं उत्तर मिळालं ना?"

उषाचा रोख अमरच्या लक्षात आला नाही. त्याने विचारलं–"काय? काय म्हणत आहेस तू उषा?"



“तुझ्या प्रश्नाचं उत्तर मी मग देईन. अगोदर तू माझ्या प्रश्नाचं उत्तर दे. त्या म्हातारीला मी साखर दिली हे तुला योग्य वाटलं नाही. आता मी या बाईला साखर उसनी दिली नाही, हे तुला योग्य वाटलं की नाही?'' तसंच हसत उषाने विचारले.

अमरने आपला विचार सांगितला– “या बाईला तू साखर देणार नाहीस असं मला वाटलं नव्हतं. त्या म्हातारीशी या बाईची काय बरोबरी? म्हातारी तर एकदम गरीब होती. ही बाई चांगली श्रीमंत दिसली. दुकानातून साखर आणायला विसरली असेल, म्हणून तुझ्याकडे उसनवारी करायला आली. तिला साखर न देणं मला अगदी अनुचित वाटलं. माझी खात्री आहे, म्हातारीला दिलेली साखर मुळीच परत येणार नाही.

यावर उषा मोठ्याने हसत म्हणाली– “लोक म्हणतात की तू अगदी भोळा आहेस, व्यवहार-चातुर्य तुझ्यात अजिबात नाही. लोक असं का म्हणतात हे आता मला समजलं.''

उषाचं हे म्हणणं ऐकून अमरचा चेहरा पडला. लाजेने त्याने मान खाली घातली. मग तो उषाला म्हणाला–“बरं, पण माझ्या विचारात काय चूक आहे ते तर सांगशील?''

मंदस्मित करीत उषा म्हणाली–“तर मग ऐक खरं काय आहे ते! म्हातारी गरीब आहे हे कबुल. पण नेहमी उसनवारी करायला येत नाही. फार जरूर असली तरच येते. उसनी घेतलेली वस्तु परत करीपर्यंत तिला झोप नाही येत! अशा लोकांना उसनं देणं ही दीन-दुःखी लोकांची सेवा होय. आतां त्या श्रीमंत बाईची गोष्ट ऐक. ती श्रीमंत आहे हे खरं, पण नेहमी उसनवारी करायची वाईट सवय आहे तिला. शिवाय उसनवारी करून ती सर्व विसरून जाते. आपण विचारलं तर भांडायला उठते. अशा लोकांना उसनं काही देणं म्हणजे आपल्यावर संकट ओढवून घेणं आहे.''



हे सगळं ऐकून मान हलवीत अमर म्हणाला–“ओह, अशी गोष्ट आहे तर एकूण? या दोघींची तुला बरीच माहिती आहे असं दिसतंय. मी पडलो एकदम नवा, हे सगळं मला कसं बरं माहीत असणार?''

उषा म्हणाली– “असं नको म्हणूस, इथंच तर आपल्या बुद्धीची चमक दाखवायची असते. समज, उद्या तू मामाच्या दुकानावर बसलास, तर निरनिराळ्या प्रकारचे ग्राहक येणारच. ज्यांच्या विषयी तुला काही माहीत नाही, ते तुला उधार मागणार. मग तू काय करशील बरं? त्यांचं बोलणं, त्यांचं वागणं, यावरून अंदाज करता आला पाहिजे की कोणाला उधार देणं योग्य नि कोणाला न देणं योग्य! याला म्हणतात दुनियादारी! हे समजलं नाही तर व्यापाऱ्याचं दिवाळं निघेल. व्यापाऱ्यांनाच नाही तर गृहस्थांना ही एवढी हुशारी नि सावधगिरी बाळगलीच पाहिजे.''

उषाचं बोलणं अमरला चांगलंच पटलं. त्याने उषाला विचारलं–“उषा, तुला ते प्रसिद्ध सुभाषित माहीत आहे – सख्यं सप्तपदीनाम्?''

“होय, ऐकलंय कुठ तरी!'' संभाषणाचा रोख बदलत आहे असे जाणून आश्चर्याने उषा म्हणाली.



अमरने विचारलं–“आता पर्यंत आपण सात पावलं तर टाकली. आता आपली दोस्ती जमली पाहिजे!''

हे ऐकून उषाला आणखी आश्चर्य वाटलं नि तिने स्वीकृतिदर्शक मान हलवली.

अमर म्हणाला–“तर मग एका गोष्टीचा विचार कर. मी व्यवहारकुशल नाही हे तर तुला समजलंच. मग आता दोस्तीच्या नात्याने तू काय केले पाहिजे? माझी पत्नी होऊन जा, माझं जीवन नि माझं दुकान छान संभाळ, हेच योग्य नाही का होणार?''

अमरचं बोलणं ऐकून उषा अमळ लाजली. हसत म्हणाली–“कोण म्हणतं तू व्यवहारकुशल नाहीस? बोलता बोलता

कसं छान तू मला बांधून टाकलंस? अगोदर आपल्या मामाशी तर बोलशील?"

थोडयाच वेळात अमरचे मामा, मामी नि होऊ घातलेले मेहुणे आले. आपण कशासाठी आलो आहोत हे अमरने मामांना सांगितले. मामा अमरला म्हणाले–"या वेळी शेतकऱ्यांकडून माल मिळायला थोडा उशीर झाला. भाव होता तोच आहे. तू आपल्या वडिलांना सगळं नीट सांग."

अमर प्रेमळ नजरेने मामांकडे पहात म्हणाला–"मामा, मी जर एखादी अमूल्य वस्तु तुम्हाला मागितली, तर द्याल मला तुम्ही ती?"

मामांनी आश्चर्याने अमरला विचारले–"माझ्या जवळची अमूल्य वस्तु? ती कोणती बरं?"

"ते मी नंतर सांगेन मामा! तुम्हीं द्याल की नाही हे तर सांगा ना प्रथम?" अमरने आपल्या प्रश्नाची पुनरावृत्ति केली.

मामा जगपति हंसत म्हणाले–"अरे, तू तर माझा लाडका भाचा आहेस. माझ्या मुलीचा हात मागितलास तरी मी नाही म्हणणार नाही समजलं? पण तुला पाहिजे तरी काय?"

विश्वास वाटून अमर म्हणाला–"बस, तुमच्या मुलीचा हातच पाहिजे मला! उषाला आमच्या घरांतली सून बनवाल मामा?"

हे ऐकून जगपतीला मोठंच आश्चर्य वाटलं. मग जोरात हसत म्हणाला–"वाहवा भाचेजी! मला वाटायचं की तू अगदी भोळा आहेस. तू असा वात्रट असशील याची मला जराही कल्पना नव्हती!"

घरी परत आल्यावर अमरच्या तोंडून सर्व गोष्टी ऐकून आई-वडीलांना आनंद झाला. अमरचे वडील हसत आपल्या बायकोला म्हणाले–"वडीलधारी माणसं म्हणतात की भोळ्या माणसाची हुशारी त्याच्या आपल्या पत्नीच्या निवडीत दिसून येते. आपल्या चिरंजीवांची हुशारी अशाच प्रकारची दिसत आहे."






[१२]

[जयानन्द मुनींच्या देखरेखीखाली वाढून शिक्षण घेत असलेल्या आपल्या मुलाला राजा शान्तिदेवने पाहिले. वीरसिंहचे वाढणारे अत्याचार थांबवण्यासाठी वसन्तच्या नेतृत्वाखाली सुमेधमधील युवक झगडत होते. या नवजवानांनी लढत रहावे व त्यासाठी राजाने त्यांना मदत करावी असा सल्ला जयानन्द मुनींनी राजा शान्तिदेवला दिला. यानंतर–]

जवळपासची राज्ये आपल्या अंमलाखाली आणून तेथील धनदौलत लुटण्याचे वीरसिंहचे स्वप्न, केवळ स्वप्न राहून गेले. वीरसिंहच्या सैनिकांनी आम-जनतेकडून धान्य लुटू नये म्हणून सुमेध राज्यातले युवक त्यांना ठिकठिकाणी अडवू लागले.

या विद्रोही तरुणांना पकडण्यासाठी वीरसिंह व सेनापती कपालकंठ यांनी केलेले सर्व प्रयत्न फसले. हे बंडखोर जवान जंगलात जागा बदलत रहात असल्यामुळे त्यांना पकडणे राजसेवकांना अशक्य झाले. तशीच वेळी आली की हे सारे तरुण एका सुंदरशा दरीत एकत्र येत असत. चारही बाजूंनी डोंगर, लहान-लहान झरे व घनदाट वृक्षांनी झाकून गेल्यामुळे त्यांचे हे स्थान कोणाच्या लक्षातही येत नसे.

आठवडयातून एकदा ते सारे जवान येथे एकत्र होत. वीरसिंहाचे जे शिपाई



आश्चर्य अमृतपुरीत रहात असत, त्यांना ही या दिवशी इथे बोलावले जात असे व युद्धाचे शिक्षण दिले जात असे.

बाकीचे दिवस हे सारे बंडखोर युवक निरनिराळे वेष घेऊन सर्वत्र संचार करीत रहात. त्यांचे भटकणे जास्त करून राजधानी शान्तिपुर व आसपासच्या भागात चाले. वीरसिंहाचे शिपाई कुणाला लुटायचे वगैरे कारस्थान करत आहेत अशी कुणकुण लागताच ते वसन्तला बातमी पोचवत. मग वसन्त आपल्या साथीदारांच्या लहान-लहान टोळ्या बनवून वीरसिंहाच्या शिपायांवर चारी बाजूंनी हल्ला चढवून कारस्थान उधळून लावी.

अशा प्रकारे आता आठ वर्षे निघून गेली. सुमेध राज्याचे जन-जीवन संकटग्रस्तच होते आणि परिस्थिती दिवसेंदिवस बिघडतच चालली होती!

एक दिवशी दुपारी वसन्त लांब दाढी लावून व हातात दण्ड कमण्डलू घेऊन साधुवेषात मुख्य सैनिक-तळासमोरच्या एका घराच्या ओटयावर बसला होता. भर दिवसा शिबिरासमोर निडरपणे साधुवेषात बसलेल्या वसन्तबद्दल कोणाच्या मनात कसली शंकाही आली नाही. तेथे पहाऱ्यावरच्या एका पथक-प्रमुखाने त्याला पाहिले अन् खराच साधू समजून त्याच्याजवळ जाऊन प्रमुखाने विचारले-"साधूमहाराज, आपल्याला हस्तसामुद्रिकही माहीत आहे काय?"

"हां बेटा." गंभीरपणे वसन्त उत्तरला.

पथकप्रमुखाचा चेहरा ते ऐकून खुषीने फुलून गेला.

"महात्मा, कृपा करून आपण माझ्या घरी चला ना! माझा हात पाहून माझं भविष्यही वर्तवा महाराज!" मोठ्या नम्रतेने प्रमुख म्हणाला.

वसन्तला वाटले की, चला! त्याच्या घरी गेलो तर काही नवीन गोष्टीही जाणून घेता येतील! म्हणून उठून उभे रहात तो म्हणाला-"बरं बेटा, तुझ्या मनासारखं होऊ दे! अभीष्ट सिद्धिरस्तु!"





पण, अशा तऱ्हेने उभे रहाताना वसन्तच्या नकली जटाजूटा वर लोंबणाऱ्या एका लोखंडी सळईत अडकल्या अन् तो टोप डोक्यावरून निघून वरच्या वर लोंबत राहिला! ते दृष्य पाहून दलनायकाला शंका आली अन् रागावून ओरडत तो म्हणाला-"अरे, तू तर नकली साधु दिसतोस! कोण आहेस रे तू?"

आता त्याच्याशी हुज्जत घालण्यात काही अर्थ नाही हे जाणून स्वतःला वाचवण्यासाठी वसन्त तेथून पळत सुटला!

"अरे पकडा, पकडा! शत्रूचा गुप्त हेर आहे तो! पकडा......!" असे ओरडत तो दलनायकही वसन्तच्या मागे धावू लागला! त्यामागे आणखी दोन सैनिकही पळू लागले! अशा प्रकारे थोडा वेळ तेथे खळबळ उडाली, पण अजून ते वसन्तला पकडण्यात यशस्वी झाले नव्हते, इतक्यात समोरूनच एका घोडेस्वाराला येताना दलनायकाने पाहिले.

"अरे पकड, पकड! याला पकडलंस तर चांगलं बक्षिस मिळेल बघ!" पथकप्रमुख घोडेस्वाराला आमिष दाखवत म्हणाला.

दलनायक त्या घोडेस्वाराला आपलाच कोणी राजसेवक समजत होता. पण तो तर पूर्वी एकदा वसन्तची सुटका करणारा बुरखाधारीच होता!

तो वसन्तला म्हणाला-"पळ लवकर नदी पार करून पलीकडल्या किनाऱ्यावर थांब. मी या सर्वांना इथेच थांबवतो." आणि त्याने आपला घोडा पुढे घातला. सरळ येऊन तो त्या दलपतीसमोर उभा ठाकला! "थांब, पुढे सरकू नकोस." असे म्हणत तो बुरखाधारी मोठ्या चपळाईने दलपतीला चाबूक मारू लागला.

चाबकाच्या एकाच फटक्यात तो पथकप्रमुख धराशायी झाला. त्याच्या मागे असलेले सैनिक आपल्या प्रमुखाला तेथून उचलायच्या उद्योगाला लागले.

याच वेळी तो बुरखाधारीही मागे वळून आपला घोडा वेगाने दौडवू लागला.



नन्दिनी नदीच्या किनारी पोचून घोड्याने आपल्या स्वाराला नदीपारही केले.

तेवढ्या वेळात वसन्तनेही पोहून नदी ओलांडली होती. बुरखाधारीने घोड्यावरून उतरून वसन्तला हात देऊन उठवले. तो बिचारा अगदी धापा टाकत होता. पण वसन्तला उठवताना त्या शूर वीराचा बुरखा जरासा बाजूला झाला आणि वसन्तला त्याचा चेहरा अगदी स्पष्ट दिसून आला. आश्चर्याने तो म्हणाला–"महाराज! आपण?" अन् त्याने एकदम त्यांच्या पायावर लोळणच घेतली. वसन्त म्हणू लागला–"महाराज, आपण अनेकदा माझे प्राण वाचवले आहेत; अन् आता तर आपलं दर्शन घडून मी धन्य झालो!" वसन्तच्या डोळ्यातून आनन्दाश्रु झरू लागले.

वसन्तला प्रेमाने उठवत राजा म्हणाला–"वसन्त, तुझं धैर्य, साहस आणि काम करण्याची पद्धत कौतुकास्पद आहे. जनतेच्या सेवेचं तुझं प्रेम अजब आहे! पण एक गोष्ट मात्र नीट लक्षात ठेव; मी जिवन्त आहे याबद्दल मात्र कुणाशीही वाच्यता करू नकोस."

"असं का बरं महाराज?" वसन्तने आश्चर्याने विचारले.

"मी जिवन्त असल्याचं सामान्य जनतेला कळलं तर त्यांच्यात अशान्ति पसरेल अन् मला पकडण्यासाठी वीरसिंह त्यांचा आणखीनच छळवाद मांडेल." राजाने वसन्तला समजावून सांगितले.

"महाराज, मला असं वाटतं की, कमीत कमी देशासाठी लढणाऱ्या आम्हा साथी-दारांना तरी कळावं की आपण आमच्यात आहात. ही बातमी कळली की त्यांना आनन्द तर होईलच, पण आपला न्याय-प्रिय राजा अजून जिवन्त आहे या भावनेने त्यांना लढायला दुप्पट बळ येईल! आपल्यासाठी लढायला आम्हाला अधिकच उत्साह वाटेल. आपण एकदा फक्त एकदाच आम्हा साथीदारांच्या समोर यावे. आपणच आमचं नेतृत्व करावं अशीही शक्यता





निर्माण होईल कदाचित! आम्ही तरी असे किती दिवस वीरसिंहाच्या सैनिकांशी लपंडाव खेळत रहाणार? त्या दुष्टाला लवकरच सिंहासनावरून खाली ओढायला हवे!" वसन्त तावातावाने बोलत राहिला.

जरासा विचार करून राजा शान्तिदेव म्हणाला–"होय, तुझं म्हणणं बरोबर आहे वसन्त! आता तुम्हा जवानांना एकत्र करून आणि अमृतपुरीतल्या सैनिकांनाही बरोबर घेऊन वीरसिंहाच्या दुष्ट शासनाचा अन्त करण्याची वेळ येऊन ठेपलीच आहे!"

हे ऐकून वसन्तचा चेहरा आनन्दाने फुलून आला. अपूर्व अशा आनन्दाने, त्याने राजाला पुन्हा एकदा नमस्कार केला.

* * *

पौर्णिमेची रात्र होती. वसन्तचे जवळ-जवळ शंभरपर्यंत असणारे ते सर्व साथीदार दरीतल्या आपल्या गुप्त अड्ड्यावर एकत्र आले होते. सर्वजण राजा शान्तिदेवचीच वाट पहात होते. अचानक एका शिळेमागून हाक आली–"वसन्त!" वसन्तने आवाज पटकन ओळखला अन् राजाला भेटायला तो त्या दिशेकडे वळला; शान्तिदेवला पहाताच वसन्तने प्रणाम केला.

"वसन्त, लवकर पळा इथून! आपल्यावर चारी बाजूंनी संकट येऊ पहात आहे. एकाच वेळी दरीची दोन्ही तोंडं बन्द करून तुम्हा सर्वांना मारून टाकायचा बेत रचलाय त्यांनी! सैन्य घेऊन स्वतः कपालकण्ठ येत आहे! प्रथम ते पश्चिमेच्या तोंडावर पोचतील. पण पूर्वेच्या तोंडाशी पोचायला त्यांना अजून वेळ लागेल. मी स्वतः पश्चिम टोकावर उभा राहतो. तेवढ्या अवधीचा फायदा घेऊन तुम्ही सर्व पूर्व द्वारातून बाहेर पडा अन् आपले प्राण या कोंडीतून वाचवा. बाहेर पडलात की निरनिराळ्या सुरक्षित स्थानी लपून बसा. पळा, पळा लवकर!" राजा शान्तिदेवने गंभीरतेने इशारा दिला.

वसन्तच्या ताबडतोब लक्षात आले की ही वेळ आत्ता आपल्याला प्रतिकूल आहे!



जरासा उशीर झाला तर सर्वच प्राण-संकटात सापडतील! म्हणून त्याने वळून आपल्या साथीदारांना म्हटले–"दोस्तांनो! आणीबाणीची वेळ आलेली आहे. तुम्ही सर्वजण, आत्ताच्या आत्ता पूर्व द्वारातून बाहेर पडून आपले प्राण वाचवा. अन् सुरक्षित ठिकाण पाहून लपून रहा. आवरा, धावा लवकर!"

आपल्या नेत्याची ही आज्ञा ऐकून सर्व तरुण मोठ्या चपळाईने पूर्वद्वाराकडे पळत सुटले! पण स्वतः वसन्त मात्र राजा जवळचा उभा राहिला.

"तू पण निघून जा वसन्त!" राजाने ओरडून म्हटले.

"महाराज, माझा जीव गेला तरी बेहत्तर! मी या परिस्थितीत आपल्याला इथे एकटा टाकून मुळीच जाणार नाही." वसन्त दृढ स्वरात उत्तरला.

इतक्यात दरीच्या पश्चिम द्वारावर सैनिकांच्या हालचालीची चाहूल ऐकू आली. म्यानातून तलवार बाहेर खेचून घेऊन राजा स्वतः द्वाराशी उभा राहिला. द्वाराचा मार्ग अरुंद असल्याने वसन्तला राजाच्या मागेच उभे रहावे लागले.

"चला, पुढे व्हा; दरीत घुसून पुढे जात रहा. त्या सगळ्या बंडखोरांना भाजीपाल्या सारखं कापून काढा. एकालाही जिवन्त सोडू नका, व्हा पुढे!" कपालकण्ठने गरजून आपल्या सैन्याला आज्ञा दिली. स्वतः तो मात्र सर्वांच्या मागेच उभा होता.

दरीत शिरण्यासाठी एक सैनिक पुढे सरसावला, पण राजाने त्याला जोरात लाथ मारून खाली पाडले. पडता पडता तो मोठ्याने ओरडला.

राजाने उठवल्यावरून वसन्त ओरडून बोलला–"आत येऊ नका कोणी; नाहीतर प्राणास मुकाल!"

"वसन्त! ही तर तुझ्या जीवनाची शेवटचीच रात्र आहे. रात्रच का, शेवटचा क्षणच समज...!" असे ओरडत कपालकण्ठ पुढे झाला. त्याला वाटले होते की द्वारावर असणारा शत्रु हत्यारबन्द नसावा, म्हणूनच तर पहिल्या सैनिकाला त्याने नुसती लाथच मारली! त्यामुळे कपालकण्ठला वाटले की आता वसन्तला पकडणे किंवा मारून टाकणे अगदीच सोपे! असं झालं की मग वीरसिंहही एकदम खूश होऊन जाईल!

"कपालकण्ठ! आपला जीव वाचव. तुला मारायचा आमचा मुळीच उद्देश नाही! तू आलास तसा परत जा." वसन्तने त्याला सावध करायचा प्रयत्न केला.

तरीही कपालकण्ठ थांबला नाही. उलट, द्वाराकडे नेम धरून त्याने एक भाला फेकला. हवा चिरत तो भाला येऊन द्वाराशी उभ्या असलेल्या राजा शान्तिदेवच्या छातीत घुसला! अन् तो तेथेच कोलमडून पडला! कपालकण्ठला वाटले की वसन्तच कोलमडला असावा, अन् तो मोठ्या उत्साहाने पुढे सरसावला.

"अरे दुष्टा, दुरात्म्या! काय केलंस हे तू?" असे ओरडत वसन्तने चिडून तलवार खेचली अन् एका वारातच त्याने कपाल-कण्ठचे मस्तक धडावेगळे केले! ते मस्तक घरंगळत जाऊन त्याच्याच सैनिकांसमोर जाऊन थांबले.

तावडतोब त्यांच्या सैन्यात हाहाःकार उडाला! शिपाई ओरडू लागले–"सेनापती मेला, आपला सेनापती ठार झाला!..." आणि कसल्याशा अज्ञात भयाने अन् दहशतीने ते सारे सैरावैरा पळू लागले.



पूर्व द्वाराकडून येणारे वीरसिंहचे सैनिक कसलाही अडथळा न येताच दरीत शिरले. पण त्यांना कुठेच एकही शत्रु न आढळल्याने तेही चुपचाप परत फिरले.

या अवधीत राजाला आपल्या खांद्यावर उचलून घेऊन वसन्त जवळच्या एका गुहेत शिरला व राजाला त्याने जमिनीवर झोपवले, त्याला प्यायला पाणीही दिले. वीरसिंहचे सर्व सैन्य परत गेल्याचे कळताच त्याने राजाला शेक मिळावा, म्हणून काही

वाळलेली लाकडे आणून ती जवळच पेटवून ठेवली.

वसन्तच्या मांडीवर डोके ठेऊन पडल्या पडल्या शान्तिदेव त्याला म्हणाला–"वसन्त; आता मृत्यु मला बोलवत आहे. मी आता जात आहे. पण तुम्ही लढाई चालूच ठेवा. इतके दिवस मी जंगलात छपून दिवस काढले, पण वीरसिंह बदलेल अशी काही चिन्हं दिसत नाहीत. आपल्या भोळ्या-भाबड्या प्रजेला तो त्रासच देत राहील. त्याच्या त्रासातून जनतेला मुक्ति मिळायला हवी. यासाठीच, मला वाटतंय की शेवटच्या श्वासापर्यंत तुम्ही ही लढाई चालूच ठेवा. हीच माझी तुम्हाला शेवटची आज्ञा!"

वसन्तने राजाच्या छातीवर पट्टी बांधून ठेवली होती, तरीही जखमेतून रक्त वहात होते. राजाचा आवाजही क्षीण झाला होता.

"महाराज, आपण सोडून गेलात, तर आम्ही लढायचे कोणासाठी? वीरसिंहाला आम्ही सिंहासनावरून खाली ओढले, तरी त्या रिक्त स्थानी बसावायचे तरी कोणाला? राजा कोणाला करायचे? आपल्या अगोदरच महाराणी अन् युवराजांचे निधन झालं ना?" वसन्तने दुःखाने विचारले.

राजा शान्तिदेव उत्तरला–"नाही वसन्त! ही गोष्ट खरी नाही. राणी स्वर्गाला गेली खरी, पण युवराजाच्या सुरक्षिततेची व्यवस्था करूनच गेली. सध्या युवराज एका मुनींच्या आश्रयाने वाढत आहे. वेळ आली की तुम्हीच त्याला आधार द्यायला हवा. जनतेच्या कल्याणासाठी लढाई चालू ठेवायला हवी."

"काय म्हणालात महाराज आपण? युवराजे खरोखरीच जिवन्त आहेत? किती आनन्दाची बातमी ही! आता युवराजांना गादीवर बसवण्यासाठी आम्ही लढाई नक्कीच चालू ठेवू! प्रभु, युवराज कुठे आहेत सध्या?" वसन्तने उत्साहाने विचारले.

राजा शान्तिदेवने सर्व वार्ता वसन्तला सविस्तर सांगितली आणि रात्रीच्या त्या अंतिम समयी आपले डोळे कायमचे मिटून घेतले.

(क्रमशः)



# रूपमचा आरसा

दृढनिश्चयी विक्रम पुन्हा झाडापाशी गेला. झाडावरून प्रेत खाली उतरवून आपल्या खांद्यावर टाकलं आणि नेहमीप्रमाणे स्मशानात येरझाऱ्या घालू लागला. त्यावेळी प्रेतात बसलेला वेताळ राजाशी बोलू लागला–"राजा, जवळ असलेली संपत्ति नि लाभलेली प्रतिष्ठा एवढ्यावर तुला संतोष नाही असं मला वाटतं. काही विशेष कार्यसिद्धीसाठी रात्री अशा अवेळी तू ढोर मेहनत करून या भयानक जागी हिंडत आहेस. मी पैज लावून सांगतो की तुला आणखी धन नि प्रतिष्ठा मिळाली तरी तुझं समाधान होणार नाही. माझं हे म्हणणं सिद्ध करण्यासाठी मी तुला एक गोष्ट सांगतो. नीट लक्षपूर्वक ऐक." असं सांगून वेताळाने आपली गोष्ट सुरू केली.

धौलपुर मध्ये दयाराम नावाचा एक माणूस रहात असे. तो आपल्या आतिथ्य-



शीलतेसाठी प्रसिद्ध होता. म्हणून लोक त्याला सत्कारवाला दयाराम म्हणत. रूपम् दयारामचा भाऊबंद होता. त्याची ही दयाराम प्रमाणे आपले नाव व्हावे अशी इच्छा होती. म्हणून तो ही आपल्याकडे येणारांचे आतिथ्य करू लागला. यामुळे त्याचा खर्च तर वाढत चालला, प्रसिद्धि मात्र अधिक वाढली नाही.

एक दिवशी रूपम्‌कडे एक साधु आला. रूपम्‌ने त्याला पोटभर जेऊ घातले. आणि मग त्याला आपल्या मनातील व्यथा सांगितली.

रूपम्‌ची कहाणी ऐकून साधु हंसला नि म्हणाला–"हे बघ रूपम्, प्रसिद्धिबाबत तू चिंता करू नकोस. तुला जमेल तेवढी तू लोकांना मदत अवश्य कर. जे गरजू आहेत त्यांना अधिक मदत कर. यामुळे तुला समाधान वाटेल."

रूपम्‌ला साधूचं हे बोलणं आवडलं नाही. तो साधूला म्हणाला–"महाराज, आपल्या सारखे साधु निष्काम कार्य करू शकतात, माझ्या सारख्या सामान्य माणसाला ते शक्य नाही. प्रत्येक माणसाला असं वाटत की आपल्या जवळपासच्या लोकात आपलं नाव व्हावं, लोकांनी आपली प्रशंसा करावी नि आपल्याला प्रसिद्धि मिळावी. जर प्रसिद्धि मिळणार नसेल, तर काम करण्यात मला उत्साह वाटत नाही. आपण असं काही करा कि अतिथि-सत्कार करण्याची माझी इच्छा दबली जाणार नाही. एवढेच माझे आपणांकडे मागणे आहे."

साधूने रूपम्‌ला एक आरसा देऊन सांगितलं–"तुझ्या घरात ज्या खोलीत पाहुणे येतात, तिथे भिंतीवर हा आरसा टांगून ठेव. यात कुरूप चेहरा सुद्धा सुंदर दिसेल! कोणाला ही आरशात आपला चेहरा अधिक सुंदर पाहून आनंदच वाटेल. यामुळे सर्वत्र तुझे नाव होईल." एवढं सांगून साधु निघून गेला.

त्या दिवसापासून रूपम्‌कडे येणाऱ्या पाहुण्यांची संख्या वाढत गेली. जो येई तो आरशात आपले सुंदर रूप पाहून खुश होई. नंतर लोक रूपम्‌च्या घरातील आरशाबाबत इकडे-तिकडे चर्चा करीत. थोड्याच दिवसात लोक त्याला 'आरसेवाला रूपम' म्हणू लागले.

धौलपुरच्या जमीनदाराला रूपम्‌च्या आरशाबाबत समजलं. आपला आरसा घेऊन त्याच्याकडे येण्याचे जमीनदाराने त्याला निमंत्रण दिले. रूपम् लगेच आरसा घेऊन जमीनदाराकडे आला.

जमीनदाराने आरशात आपला चेहरा पाहिला नि म्हणाला–"मला तर आपला चेहरा कुरूपच दिसतो आहे. का बरं असं होतंय?"

जमीनदाराच्या सर्व नोकरांनी ही आरशात आपले चेहरे पाहिले. कोणालाही आरशात आपला चेहरा सुंदर दिसला नाही.

"खोटा प्रचार करून प्रसिद्धि मिळवू इच्छितोस?" रागाने जमीनदार म्हणाला आणि आरसा त्याने जमीनीवर जोरात आपटला. पण आश्चर्याची गोष्ट अशी की आरसा फुटला नाही. निराश होऊन रूपम् आरसा घेऊन घरी गेला.

हे सर्व समजल्यावर रूपमची मित्र-मंडळी त्याच्या घरी आली आणि आरशात आपले चेहरे पाहू लागली. त्यांना तर आरशात आपले चेहरे सुंदरच दिसले. आता एक रहस्य प्रकाशात आलं. रूपम्‌च्या घरातच आरशात आपले चेहरे सुंदर





दिसतात, अन्यत्र कोठे आरशात चेहरे कुरूप दिसतात.

आरशाची ही विशेषता जमीनदाराला ही कळली. तो स्वत: रूपम्‌च्या घरी आला आणि त्याने आरशात आपला चेहरा पाहिला. आपला सुंदर चेहरा पाहून त्याला आनंद झाला. त्याने एका उत्तम चित्रकाराला बोलवले आणि आरशात दिसणाऱ्या आपल्या प्रतिबिंबावरून आपले चित्र बनवून घेतले. चित्र फार सुरेख बनले. जमीनदार खुश झाला नि त्याने रूपम्‌ला काही धन दिले.

या आरशाची एक विशेषता आहे. प्रत्येक माणसाच्या चेहऱ्यात काही सौंदर्य असतं, काही कुरूपता असते. फक्त रूपम्‌च्या परी चेहऱ्यातलं सौंदर्य दिसतं, इतर ठिकाणी फक्त कुरूपताच तेवढी दिसते.

जमीनदाराने आरशातील प्रतिबिंबावरून आपले जे चित्र बनविले ते पाहून इतरांनी ही अशीच आपली चित्रे बनवून घेतली. अशा रीतीने रूपम्‌च्या घरी येणाऱ्या लोकांची संख्या दिवसें दिवस वाढू लागली. दूर दूरच्या गावातील लोक रूपम्‌च्या घरी येऊन आरशात आपले चेहरे पाहून खुश होऊ लागले.

आता आपल्या घरी येणारांचे आतिथ्य करणं रूपम्‌ला जमेना, कारण येणारांची गर्दी बेसुमार वाढू लागली. म्हणून येणाऱ्यांच्या सत्काराची चिंता करणे रूपम्‌ने सोडून दिले. तरी पण आरशात आपले रूप पाहून लोक खुश होत नि संतुष्ट होऊन परत जात.

एकदा रूपम्‌ला वाटलं की लोक आपल्याबद्दल काय म्हणतात ते स्वत:च्या कानांनी ऐकावं. म्हणून घराची जबाबदारी आपल्या बायकोवर सोपवून तो राजधानी-कडे जायला निघाला.

राजधानीत एकाने रूपम्‌ला विचारले–"बरं, तर आपण धौलपुरहून आलात? आरसेवाला रूपम् कसा काय आहे? आपणास तो माहीतच असेल?"

रूपम्‌ला आनंद झाला. तरी पण आपणच रूपम् आहोत हे त्याने सांगितले नाही. तो म्हणाला–"धौलपुरचं नाव येताच सर्वांना रूपम आठवतो. मला तो माहीत नाही हे कसं शक्य आहे बरं?"

आरसेवाल्या रूपम्‌बद्दल अधिक जाणण्याच्या इच्छेने त्या माणसाने रूपम्‌ला आपल्या घरी बोलवले. त्या घरात रूपम्‌ने दयारामचे चित्र पाहिले. आश्चर्याचे नाटक करीत रूपम्‌ने विचारले–"हे कोण? यांचं चित्र आपल्या घरी कसं आलं?"

तो माणूस म्हणाला–"आपणास हे माहीत नाहीत, आश्चर्य आहे! आपल्याच गावातील हे एक सत्पुरुष आहेत. आरसे-वाल्या रूपम्‌कडे जाणारांचे आतिथ्य हेच करतात. अतिथि-सत्कार शब्दाबरोबरच यांचं नाव डोळ्यांपुढे येते. यांच्या आतिथ्यशीलतेची कीर्ति राजापर्यंत गेली व राजाने यांचा सत्कार केला. राजाने इनाम म्हणून दिलेला पैसा ही हे आतिथ्यासाठी खर्च करतात. यांना लोक 'आतिथ्यमूर्ति दयाराम' म्हणतात. देश भर अनेक घरांतून यांची चित्रे आपणास दिसतील."

रूपम्‌ची निराशा झाली नि आपल्या गावी तो परत आला.

ज्या साधूने आरसा दिला होता, तो साधु वाटेत त्याला भेटला. साधूने विचारले–"का रे बाबा, उदास दिसतो



आहेस. झालं तरी काय? लोक तुला 'आरसेवाला रूपम्' म्हणून ओळखतात! तरी पण तू आपला असा दुर्मुखलेला का रे?"

"महाराज, माझी व्यथा मलाच माहीत! कृपा करून आपला हा आरसा परत घ्या." रूपम्‌ने प्रार्थना केली.

आणि रूपमने आरसा साधूला परत देऊन टाकला.

ही गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, आरसेवाल्या रूपम्‌चा व्यवहार तुला विचित्रच नाही वाटत का? देशभर रूपम् प्रसिद्ध झाला, तरी पण त्याच्या मनात ही अतृप्ति का बरे? हा जादूचा आरसा त्याने साधूला परत का दिला? माहीत असून ही माझ्या या शंकेचं उत्तर न दिलंस, तर लक्षात ठेव - डोकं धडापासून वेगळं होईल!"

यावर राजा विक्रमाने निवेदन केले– "आरसेवाला रूपम् राजधानीतल्या त्या माणसाकडे गेला आणि एक महत्त्वाची गोष्ट त्याच्या लक्षात आली. त्याच्या घरी गर्दी करणारे लोक त्याच्यासाठी नव्हे, आरशात आपले रूप पाहण्यासाठी येत. म्हणून आरसेवाल्या रूपमला जी कीर्ति मिळाली ती आरशाची होती, रूपमची नव्हे. आणि शिवाय तो आरसा रूपम्‌चा कोठे होता? कोणाला तरी दया येऊन दिलेली परकी वस्तु होती ती! आतिथ्यशील दयारामची गोष्ट तशी नव्हती. दयारामला जी कीर्ति व प्रतिष्ठा लाभली होती, ती त्याची स्वतःची होती. हा फरक लक्षात आल्यावर रूपम्‌ला समजलं की दयाराम सारखी प्रतिष्ठा त्याला कधी ही मिळण्याची शक्यता नाही. हे समजल्यावर रूपम्‌ने तो जादूचा आरसा साधूला परत करून टाकला."

अशा रीतीने राजाचा मौन-भंग झाला. मग वेताळ प्रेतासह अदृश्य झाला नि झाडावर चढून पूर्ववत् लटकू लागला.

(कल्पित)

[आधार : वसुंधरेची एक कथा]





# आंधळं सरकार

खूप जुनी गोष्ट आहे. करीम नावाच्या शहराच्या आसपास एक गरीब माणूस रहात असे. त्याचं नाव होतं शकुरा. एकदा कामाच्या शोधात तो राजधानीला गेला. नवाबाच्या दरबारात एकादं बारकंसं काम मिळवावं अन् महिना दोन रुपये पगार मिळवावा, इतकीच त्याची अपेक्षा होती. त्या काळी महिना दोन रुपये म्हणजे सुद्धा 'बरी मिळकत' असंच समजलं जाई.

पण खूप प्रयत्न करूनही शकुराला नोकरी मिळेना!

शेवटी त्याने एक धाडस केलं. एका सोनाराच्या मदतीने त्याने एक मोहोर बनवली. ती मोहोर खिशात ठेवून एक लहानसं टेबल समोर मांडून तो 'खास अदालती'च्या बाहेर बसून राहिला. अदालतीत अर्ज घेऊन येणारांना तो आपल्याजवळ बोलावून त्यांच्या अर्जावर तो आपली मोहोर उठवू लागला. एकेका अर्जावर असा शिक्का मारण्याबद्दल तो एकेक पैसा अर्जदाराकडून वसूल करी. हळू हळू ही एक पद्धतच बनून गेली. सर्व अधिकाऱ्यांनाही आता त्या शिक्क्याची सवय होऊन गेली.

पण शकुराने मात्र या अवधीत बऱ्यापैकी कमाई करून ठेवली. त्याच्या मनात ही भीती मात्र नेहमीच घर करून असे, की आपलं हे बंड फुटलं तर सर्व गोष्टी नवाबाच्या कानी जातील अन् कदाचित फाशीची शिक्षाही सुनावली जाईल आपल्याला! मग अचानक एकदा त्याला एक उपाय सुचला! आता त्याने शिक्का मारण्याबद्दल एका ऐवजी दोन पैसे वसूल करायला सुरुवात केली. एक पैसा तो स्वतःसाठी ठेवी, अन् दुसरा पैसा निराळा जमा करून ठेवी.

असं करता-करताही दहा वर्षं उलटली! एक दिवस काही कारणानं शकुरा अदालतीत जाऊ शकला नाही. त्या दिवशी आलेल्या कुठल्याच अर्जावर शकुराचा शिक्का मारला गेला नव्हता. "यावर शकुराचा शिक्का नाही, आम्ही हा अर्ज स्वीकारू शकत नाही." कचेरीतले कारकून म्हणू लागले. गोष्ट शेवटी अधिकाऱ्यांच्या कानी गेली; मग चौकशी सुरू झाली–"काय शिक्का आहे हा? कोण मारतं शिक्का सर्व अर्जांवर?"

आता जुने अर्ज मागवून तपासून पाहिलं, तर अशा प्रकारचा शिक्का मारलेला आढळला–'आंधळं सरकार-पितळी दरवाजा-शकुराची मोहोर'! अरे! ही तर सरकारी मोहोर नव्हेच! मग सर्व हकिकत नवाबा-पर्यंत पोचली. त्याने शकुराला पकडून आणायची आज्ञा दिली. झालं! शकुराला नवाबासमोर हजर केलं गेलं! असं केव्हा ना केव्हा होणारच–याची शकुराला कल्पना होतीच! म्हणून नवाबासमोर जाताना, तो दुसरा पैसावाली–जमा केलेल्या पैशांची–थैली बरोबर घेऊनच गेला होता.

शकुराला पाहिल्याबरोबर नवाबानें विचारलं–"कोण आहेस रे तू? हा शिक्का तूच मारतोस ना? असला अधिकार तुला कोणी दिला?"–वगैरे जे काही विचारायचं ते विचारून संपल्यावर काहीही न लपवता शकुराने आपली सर्व हकीकत स्पष्ट सांगून टाकली; आणि पुढे म्हणाला–"हुजूर, आपल्या वाट्याचे आजपर्यंत हे तीस हजार रुपये वसूल झालेत, हा घ्या आपला हिस्सा." आणि ती तीस हजारांची थैली त्याने नवाबापुढे ठेवली.

शकुराच्या बुद्धिमानीवर नवाब खूशच झाला! त्याने ती नोकरी शकुरासाठी पक्की करून टाकली! त्या मोहोरेवरून 'आंधळं सरकार' मधला 'आंधळं' हा शब्द काढून टाकून केवळ 'सरकार' हा शब्द शिल्लक ठेवला गेला.

अशा तऱ्हेने शकुराची ती मोहोर बराच काळ पर्यंत अमलात राहिली!





# ज्ञानाचा खजिना

## तो कोण?

खूप जुन्या काळी अथेन्स शहरात एक तत्त्वज्ञानी रहात असे. रोज कित्येक लोक आपापल्या अडचणी सोडवून घेण्यासाठी त्याच्याकडे येत. एकदा असाच एक तरुण त्याच्याकडे आला. "महाशय, मी एक महान वक्ता बनू इच्छितो. कित्येक प्रान्त हिंडून मी अनेक मोठ्या व्यक्तींच्या भेटी घेतलेल्या आहेत. त्या सर्वांनी माझ्या हुशारीची स्तुति केली आहे. आता भाषणकला शिकायची माझी इच्छा आहे." अशा तऱ्हेने स्वत:बद्दल पंधरा मिनिटे त्याने अनेक गोष्टी सांगितल्या आणि शेवटी आपल्या मनातले तो बोलला–"आपण मला भाषणकला शिकवलीत तर मी आपला फार आभारी होईन. त्याबद्दल आपण म्हणाल ती फी मी मोठ्या आनन्दाने भरीन."

"ठीक आहे. तुला दुप्पट फी द्यावी लागेल." तत्त्वज्ञानी म्हणाला.

"दुप्पट?" आश्चर्याने तरुणाने विचारले.

"होय! कारण तुला प्रथम मला मौन कसे रहावे हे शिकवावे लागेल. ही मौन-कला शिकवल्यानंतरच तुला भाषण-कलेची माहिती देता येईल." तत्त्वज्ञानी उत्तरला.

तुम्हाला माहीत आहे हा तत्त्वज्ञानी कोण? [पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. एका देशाचे राष्ट्रीय चिन्ह म्हणून मान्यता मिळालेला पौराणिक पक्षी कोणता? त्या देशाचे नाव काय?
२. सन १९४८ मध्ये एका प्रसिद्ध व्यक्तीला एका देशाचा अध्यक्ष बनायची विनन्ति करण्यात आली; पण तो माणूस त्या देशाचा रहिवासी नव्हता! हा माणूस कोण?
३. तो देश कोणता?
४. असे कसे घडले?
५. लंका (श्रीलंका) या शब्दाचा अर्थ काय?

[पान ३६ पहा]

# अयोध्या नगर

'अयोध्य' या शब्दाचा अर्थ आहे अजेय. असे म्हटले जात असे की ही नगरी शत्रु कधीच जिंकू शकणार नाही. शरयू नदीच्या काठावर असणारी ही अयोध्या नगरी महाराजा दशरथ आदि सूर्यवंशी राजांच्या कोसल देशाची राजधानी होती.

आपल्या देशाच्या सात पवित्र नगरींमधे अयोध्या ही एक गणली जाते. श्रीराम-चन्द्राची जन्मभूमि म्हणूच भारतीय लोक अयोध्येला पवित्र-भूमि असे मानतात. श्रीरामाचे जन्मस्थान, त्यांचे यज्ञ-स्थान, सीतेचे स्वयंपाक इत्यादि जागा आजही तेथे दाखवल्या जातात.

नंतर कोसल देशाची राजधानी साकेतला व त्यानंतर श्रावस्तीला हलविण्यात आली. चौथ्या व पाचव्या शतकात अयोध्या पुन्हा




गुप्त राजांची राजधानी बनली. नंतर मात्र अयोध्येचे शासकीय स्थान म्हणून महत्त्व उत्तरोत्तर कमीकमी होत गेले. तरीही सर्व भारतीयांच्या मनात मथुरेइतकेच अयोध्येबद्दलचे प्रेम व आदर आजही कायम आहे. अनेक पिढ्यांपासून अयोध्या आपणा भारतीयांना स्फूर्ति व उत्तेजन देत आली आहे.

एक जमाना असाही होता की अयोध्या, बौद्ध व जैन धर्मांचे केन्द्रस्थान बनून राहिली होती. चोवीस तीर्थंकरांपैकी तेवीस तर इक्ष्वाकु-वंशीच होते. त्यांच्यात आदिनाथ, अजितनाथ, अभिनन्दनाथ, अनन्तनाथ व सुमतिनाथ नामक पाच बोधकांचा जन्मच अयोध्येत झाला होता.

आजचे अयोध्या हे शहर उत्तर प्रदेशातले लखनऊ व गोरखपुर या रेल्वे-स्टेशनांमधील एक छोटेसे शहर होय.

श्रीरामचन्द्र व सीतादेवी यांचे मन्दिर तर इथे प्रसिद्ध आहेच; पण त्याशिवाय श्रीरामाचा पुत्र कुश याने बांधले असे समजले जाणारे नागेश्वरनाथाचे देऊळ आणि नबाब शुजाउल्ला याने हनुमान-गढमधे बनवलेले हनुमानाचे देऊळ ही खूप प्रसिद्ध आहे.

अयोध्येपासून २५ कि.मी. अन्तरावर नन्दीग्राम आहे. राम वनवासात असताना चौदा वर्षे अयोध्येचे शासन भरताने येथे राहूनच केले होते असे मानले जाते.

## चांदोबाच्या बातम्या

### सर्वात लहान वयाचा डॉक्टर

न्यूयॉर्कमधे शिकणारा बालमुरलीकृष्ण अम्बटी नावाचा भारतीय विद्यार्थी वैद्यशास्त्राचे अध्ययन पूर्ण करून जगातील वयाने सर्वात लहान डॉक्टर म्हणून मान्यता मिळवत आहे. आपण ही बातमी वाचेपर्यंत तो डॉक्टर झालाही असेल. यापूर्वी इटलीतील इस्राइली विद्यार्थी अठरा वर्षे वयाचा असतानाच डॉक्टर बनला होता.





### देवमाशाचे गाणे

देवमाशांबद्दल २६ वर्षे निरनिराळ्या दृष्टिकोनातून अध्ययन केले गेले, आणि त्याबद्दलच्या खूपशा नवनव्या गोष्टी प्रकाशात आणल्या गेल्या. सर्व देवमासे एकाच प्रकारचा आवाज करत नाहीत. काहींचा आवाज माणसांच्या मधुर गायनासारखा असतो. अशा तऱ्हेने आपल्या भावना देवमासे आपल्या गायनाद्वारे प्रकट करतात.

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. इटलीतील एक महान कवि मृत्यु पावला असे समजून लोक त्याला पुरून टाकायला निघाले; तेव्हा तो अचानक उठून बसला! यानन्तर तो ३० वर्षे जगला. हा कवि कोण होता?

२. शेक्सपियरचा मृत्यु ज्या दिवशी झाला, त्याच दिवशी आणखी एक महान लेखकही मृत्यु पावला होता. तो कोण?

३. धृतराष्ट्र व गांधारी याना एक मुलगीही होती काय?

४. वेदमन्त्रांची रचना करणारी प्रसिद्ध मुनि-पुत्री कोण?

५. 'शतक' म्हणजे काय?

## उत्तरावली

**तो कोण?**

सॉक्रेटीस

**सामान्य ज्ञान**

१. गरुडपक्षी, इण्डोनेशिया

२. आलबर्ट आइनस्टाईन

३. इस्राइल

४. यहुद्यांचे निराळे इस्राइल राज्य तेव्हाच बनले. व आइनस्टाईन यहुदी होता म्हणून.

५. चमकणारी भूमि

**साहित्य**

१. पेट्राकं (१३०४-१३७४)

२. 'डॉनक्विक्झोट' चा लेखक सर्वॅन्टेस.

३. होय. दुःशला.

४. गर्ग मुनींची कन्या गार्गी.

५. एकाच विषयावरील शंभर पद्यांचे पुस्तक.

## श्री रामकृष्ण परमहंस

## (३)

देवळात पूजा-अर्चा करता करता गदाधर इतका तल्लीन होऊन जाई की ते सर्व काही विसरून जाई. मूर्ति व आपण स्वतः यातला फरक ही तो विसरून जाई, आणि पूजेची फुले स्वतःच्याच मस्तकावर वाही.



अर्ध्या रात्री गदाधर एकाद्या झाडाखाली तासन् तास ध्यान लावून बसे. देवळातले इतर सेवक त्याचे हे विचित्र वागणे पाहून चकित होऊन जात.





मंदिराचा प्रमुख पुजारी गदाधर' याच्या चमत्कारिक वागणुकीबद्दलची बातमी या लोकांनी राणी रासमणीचा जावई मथुरानाथ याच्यापर्यंत पोचवली. यावर मथुरानाथने याबद्दची चौकशी करायचे कबूल केले.



एके दिवशी मथुरानाथ देवळांत गेला व त्याने आत डोकावून पाहिले. गदाधर त्यावेळी देवीला प्रसाद खाण्याचा आग्रह करीत होता ! त्याचा हा भक्तिभाव पाहून मथुरानाथ मोठ्या आनन्दाने परत फिरला.

तसेच, एके दिवशी राणी रासमणी देवळात दर्शनासाठी गेली व गदाधरचे भजन बराच वेळ ऐकत बसली. ऐकता ऐकता अचानक तिला न्याया-लयात चालणाऱ्या एका खटल्याची आठवण झाली. बरेच दिवस तो खटला भिजत घोंगडे होऊन पडला होता ! पण गदाधरने अचानक राणीला जोराने थप्पड मारली व म्हटले– "इथे बसूनही असल्या तुच्छ गोष्टींचा विचार काय करतेस ?"





गदाधरच्या या कर्तृत्वामुळे राणीचे सेवक त्याला मारायला सरसावले, पण राणीनेच त्यांना थांबवले. आपल्या मनातले विचार जाणून त्यांना सन्मार्गावर आणून सोडायचे सामर्थ्य या पुजाऱ्यात आहे, ही गोष्ट तिने ओळखली.

एका विशिष्ट अवस्थेत गदाधरला तऱ्हेतऱ्हेचे विचित्र अनुभव येऊ लागले. आपल्या शरीरातून बाहेर पडणाऱ्या भुताला भगवान शिवा-सारख्या तेजस्वी असणाऱ्या कोणा एका पुरुषाने मागून येऊन शूल मारला आणि दुसऱ्याच क्षणी ते भूत अदृश्य झाले–असा एक अनुभव त्याला आला. या अनुभूतिमुळे आपल्यात असणारे सर्व काही वाईट तेवढे धुवून गेले असे गदाधरला भासले.





गदाधरच्या आईच्या मनात 'मुलाचे लग्न व्हावे' असा विचार आला. तिचे नातेवाईक योग्य अशी मुलगी शोधू लागले. एके दिवशी अचानक गदाधरने सांगितले–"माझी बायको बनणारी मुलगी जयरामवाटीच्या रामचन्द्र मुखोपाध्याय यांच्या घरात वाढत आहे."

तसा गदाधर कधीही जयरामवाटीला गेला नव्हता. तरीही त्याच्या म्हणण्या-वर विश्वास ठेऊन नातेवाईक तेथे गेले, तेथे रहाणाऱ्या रामचन्द्र मुखोपाध्याय या व्यक्तीला भेटले आणि त्यांच्या मुलीशी गदाधरचे लग्न ठरवण्यात आले !





त्या मुलीचे नाव होते शारदामणि. तिच्याशी गदाधरचा विवाह लावून दिला गेला. विवाहाच्या सर्व कार्य-क्रमात त्याने मोठ्या उत्साहाने भाग घेतला. बालिका शारदामणि ही मोठी रूप-संपन्न मुलगी होती. तिचे निर्मळ असे डोळे सर्वांनाच फार आकर्षक वाटले.

विवाहानंतर मन्दिरात परत आल्यावर गदाधर पुन्हा आपल्या खोल आध्यात्मिक चिन्तनात रंगून गेला. भक्तिभावात तल्लीन होऊन अनुभव प्राप्त करण्यासाठी गदाधरने आदर्श भक्त हनुमान याचे ध्यान करायला सुरुवात केली.



एके दिवशी गदाधरला एक विचित्र अनुभूति झाली. त्याला असे दिसले की एक सुन्दर दैवी अशी स्त्री त्याच्याकडे चालत येत आहे! थोड्याच वेळात त्याने ओळखले की ती शक्ति म्हणजेच 'सीतामाई' होय! ती हळूहळू गदाधरजवळ आली आणि त्याच्यातच विलीन होऊन गेली. (क्रमशः)



# पुण्याची विक्री

एका गावात एक गरीब माणूस रहात असे. त्याचं नाव होतं शम्भु. त्याच्या बायकोचं नाव होतं केसरी. एकदा सतत दोन वर्ष दुष्काळ पडला. कुठं काम मिळायची सोय नव्हती. शम्भूला दोन वेळा खायला भाकर मिळायची पंचाईत झाली. केसरी शम्भूला म्हणाली—"कारभारी, तुम्ही शहरात जाऊन काही काम का नाही बघत? मी ऐकलंय—काम करणारा शहरात भुकेने मरत नाही!"

बायकोचा विचार शम्भूला पटला, त्याने केसरीचं म्हणणं मान्य केलं. शम्भूने काम करण्यासाठी शहरात जायचं ठरवलं. दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे उठून केसरीने चार भाकऱ्या तयार केल्या नि त्या नवऱ्याला बांधून दिल्या. आता शम्भू शहराकडे जायला निघाला. शहर बरंच दूर होतं. रस्ता एक दिवस भराचा होता, खडकाळ नि दमवणारा! म्हणून शेजारच्या शिवानन्दाने आपला मरतुकडा घोडा शम्भूला देत म्हटलं—"हे बघ, माझा घोडा एक महिन्या नंतर मला परत दिलास तरी माझी काही अडचण होणार नाही. घोड्यावर बसून गेलास तर शहरात अमळ लवकर पोचशील. घेऊन जा माझा घोडा."

शिवानन्दाच्या घोड्यावर बसून शम्भु शहराच्या वाटेला लागला. दुपारच्या वेळी एका नदीच्या किनाऱ्यावर पोचला. आता त्याला कडाडून भूक लागली होती. शम्भु घोड्यावरून खाली उतरला. चारी बाजूला हिरवंगार गवत पसरलेलं होतं, त्याने घोड्याला चरायला सोडलं. हात-पाय धुऊन नदीच्या किनाऱ्यावर बसला नि आपली भाकरीची पोटली उघडली. एवढ्यात एक मरतुकडं कुत्रं तिथे आलं.

विपिन रणनवरे



विचारं भुकेने व्याकुळलेलं होत. शम्भूला त्याची दया आली. एकेक तुकडा करीत एक भाकरी तर शम्भूने कुत्र्याला देऊन टाकली. पण एका भाकरीने त्याची भूक भागली नाही. आशाळभूतपणे कुत्रं शम्भूकडे पहात राहिलं.

दयाळू अंतःकरणाने शम्भूने राहिलेल्या तीन भाकरी ही कुत्र्याला खाऊ घातल्या. आता कुत्र्याची भूक शमली. शम्भूला स्वतःसाठी एक ही भाकरी शिल्लक राहिली नाही. मोठ्या संतोषाने शेपूट हलवीत कुत्रं तेथून निघून गेलं.

नदीचं पाणी पिऊन शम्भूने कशी-बशी आपली भूक शमवली, आणि घोड्यावर बसून त्याने शहराकडे प्रयाण केले. मावळतीला तो शहरात पोचला. त्या रात्री शम्भू एका धर्मशाळेत राहिला.

दुसऱ्या दिवशी सकाळी शम्भु कामाच्या शोधार्थ निघाला. दोन-चार गल्ली-बोळातून भटकला. अनेक ठिकाणी काम मिळविण्यासाठी त्याने प्रयत्न केला. पण दुर्दैवाने त्याला कोठे ही काम मिळाले नाही. पोटात क्षुधाग्नि जळत होता नि हातात फुटकी कवडी नव्हती. शम्भूची घोर निराशा झाली. आता काय करावं हे त्याच्या लक्षात येईना. एवढ्यात शम्भूने एका ठिकाणी गर्दी जमलेली पाहिली.

शम्भु तेथे गेला. काय घडलं आहे याबद्दल त्याने गर्दीतल्या एकाला विचारले. त्याला समजलं की कुबेरनाथ नावाचा एक शेट लोकांकडून पुण्य खरेदी करीत आहे. आपलं पुण्य विकायला आलेल्यांची ती गर्दी होती!

क्षण भर शम्भूला आश्चर्य वाटलं. मग आपल्यापाशी विकण्याजोगं कोणतं पुण्य आहे याबाबत तो विचार करू लागला. त्याला आठवलं की त्याच्या वडिलांनी एकदा गावात लोकांसाठी एक विहीर खोदली होती.

आता शम्भु शेटजींच्या कडे गेला. शेटजींनी शम्भूला एकदा नीट निरखून पाहिलं नि म्हणाले—"तू कोणतं पुण्य विकायला आणलं आहेस बरं?"

आपल्या वडिलांनी खोदलेल्या विहिरी बाबत शम्भूने शेटजींना सांगितले. कुबेरनाथ हसत म्हणाले—"हे तर तुझं पुण्य नाही, ते तुझ्या वडिलांचं आहे. तुझं स्वतःचं काही पुण्य विकायचं असेल तर बोल."

"शेटजी, माझं स्वतःचं असं पुण्य माझ्याकडे नाही. गरीबीने गांजलेला मी कसे तरी दिवस कंठतो आहे. पुण्य जोडायची माझी योग्यताच नाही." दुःखी अंतःकरणाने शम्भूने निवेदन केले.



शेटजी म्हणाले—"माझ्या पाशी कोणी आला की त्याचा पुण्य-संचय माझ्या लक्षात येतो. एक दिवशी भुकेने व्याकुळ झालेल्या कुत्र्याला चार भाकरी खाऊ घातल्या होत्यास ना? त्या पुण्यातलं काही पुण्य विकायला तयार असलास, तर एका भाकरीचं पुण्य मी खरेदी करू शकेन!"

शम्भु एका भाकरीच पुण्य विकायला तयार झाला. श्रीमंत कुबेरनाथांनी एक भाकरी मागवून घेतली. मग शेटजींच्या सांगण्यानुसार शम्भूने भाकरीवर हात ठेवला, अशा साठी की त्या भाकरीत एका भाकरीचं पुण्य यावं!

यानंतर शेटजींनी तराजूच्या एका पारड्यात ती भाकरी ठेवली. दुसऱ्या पारड्यात सोनं, चांदी, दागिने, हिरे इत्यादि घालू लागले. पाहता पाहता शेटजींचा सगळा खजिना संपून गेला. शेटजींनी आपल्या गळ्यांतील रत्नहार नि बोटांतल्या आंगठ्या ही पारड्यात टाकल्या. तरी पण भाकरीचं पारडंच जड! शेटजींनी आपल्या बायकोचे दागिने मागवले. आता वजनाचं काय संपलं, दोन्ही पारडी समान वजनाची झाली.

अशा रीतीने एका भाकरीचं पुण्य विकून मिळालेल्या खजिन्याचं गाठोडं आपल्या घोड्यावर लादून शम्भु आपल्या गावाकडे निघाला. वाटेत शम्भूचा घोडा एका दलदलीत फसला. हळू हळू तो दलदलीत

रडू लागला. बस, जास्त जास्त रडू लागला. तिकडून एक संन्यासी आला. शम्भूकडे पाहून तो म्हणाला–"का उगाच जिवावर उदार झाला आहेस? ही एक शापग्रस्त दलदल आहे. तुझ्यापाशी काही पुण्य असलं तर इथं सोडून दे. तरच या दलदलींतून बाहेर पडू शकतील! नाही तर आज तुझं मरण जवळ आलेलं दिसतंय! काय करायचं याचा तू आपला निर्णय घे. माझं कर्तव्य मी केलं."

आता शम्भूने जरा ही विलंब केला नाही. तो मोठ्याने ओरडला–"मी आपलं एका भाकरीचं पुण्य सोडून देत आहे."

शम्भू सह घोडा दलदलीतून थोडा वर आला. आता शम्भूने राहिलेल्या दोन भाकरींचं पुण्य ही सोडून दिलं. तरी पण घोडा गुडघ्यांपर्यंत दलदलीतच राहिला. शम्भूला समजेना आता काय करावं?

संन्यासाने शम्भूला विचारले–"आणखी काही पुण्य तुझ्याकडे शिल्लक नाही का?"

"आहे तर! हे सोनं-चांदीनी भरलेलं गाठोडं म्हणजे आणखी एका भाकरीचं पुण्य. हे ही सोडून देतो!" असं म्हणत शम्भूने ते गाठोडं ही दलदलीत टाकून दिलं.

दुसऱ्याच क्षणी संन्यासी नि दलदल दोघे ही अदृश्य झाले. आश्चर्याने शम्भू इकडे-तिकडे पाहू लागला. तोपर्यंत एक देवी तेथं अवतीर्ण झाली. म्हणाली–"मी धर्माची देवी आहे. स्वत: भुकेला राहून तू चारी भाकरी कुत्र्याला खाऊ घातल्यास! तुला धन-संपत्तीचा मोह नाही. इथून पुढे तू नेहमी संपन्न राहशील. दान-धर्म करीत धर्माचे पालन करीत रहा, यामुळे मला आनन्द होईल!" असे सांगून देवी अदृश्य झाली.

घोड्यावर आपला खजिना शम्भूला पूर्ववत दिसला. मोठ्या आनंदाने तो घरी परत आला. मिळालेल्या धनाचा उपयोग करून शम्भूने व्यापार सुरू केला. गरीब जनतेची सेवा करून शम्भूने चांगली कीर्ति संपादन केली.





# वीर हनुमान

वाली मृत झाला असे समजून सुग्रीवाने गुहेचे दार एका मोठ्याशा शिळेने बन्द केले आणि तो राजधानी किष्किन्धेला परतला. पण खरी गोष्ट अशी घडली होती, की मायावीने वालीला ठार करण्या-ऐवजी, वालीनेच मायावीला यमसदनास पाठवले होते! नंतर वाली सकुशल राजधानीला आला. वाली जिवन्त परत आल्याचे पाहून सुग्रीवाने खूप आनन्दाने आणि गौरवाने त्याला नमस्कार केला. पण वालीने त्याला आशिर्वाद तर नाहीच दिला; पण उलट त्याच्याकडे तो रागाने पाहू लागला. नंतर त्याने सर्वांसमक्ष सुग्रीवाची खूप निन्दा केली. सुग्रीवाने आपल्या डोक्यावरचा मुकुट उतरवून वालीच्या पायांवर ठेवला व त्याला साष्टांग प्रणिपात केला.

वाली का गुस्शात आहे हे सुग्रीवाने ओळखले, म्हणून त्याला शान्त करायच्या उद्देशाने तो गंभीरपणे म्हणाला–"दादा, शत्रूचा वध करून तुम्ही सकुशल परत आलात याचा मला फार आनन्द होतो आहे; याहून भाग्याची दुसरी कोणती गोष्ट असणार? आपण सांगितल्याप्रमाणे गुहेच्या दाराशी मी आपली खूप वेळ वाट पाहिली. पण जेव्हा गुहेच्या द्वारातून शेवटी रक्ताचा ओघळ बाहेर वहात आला, तेव्हा मला वाटले की रक्त आपलेच! मृत्युमुखी पडलात असे समजून मोठ्या दु:खाने मी गुहेचे द्वार शिळा बसवून बन्द केले आणि



इकडे निघून आलो. राजा बनायची माझी बिलकुल इच्छा नव्हती, पण सिंहासन रिकामे पडू द्यायचे नाही, असे सांगून मन्त्री व जनतेनेही खूप आग्रह धरला, तेव्हा नाइलाज म्हणूनच मला सिंहासन ग्रहण करावे लागले. मी मुकुट धारण केला म्हणून आपण गैरसमज करून घेऊ नका दादा!"

पण सुग्रीवाचे बोलणे समजून सुद्धा घेण्याच्या मन:स्थितीत नव्हता वाली. आपल्याच विचारांनी त्याला पार आंधळा करून टाकले होते. त्यामुळे सर्वांसमोर त्याने सुग्रीवाची निर्भत्सना आरंभली! तो म्हणाला.

"जन हो, मायावीला पळवून लावत मी व हा सुग्रीव त्याच्या मागे धावलो. मायावी एका पहाडी गुहेत शिरला. मी तर मायावीला मारून टाकूनच परतण्याची शपथ वाहिली होती; म्हणून त्या गुहेच्या द्वाराजवळ माझी वाट पहात उभं रहायला याला सांगून, मी मायावीपाठोपाठच गुहेत शिरलो, पण मायावी लवकर माझ्या पकडीत येईना. बराच वेळ लढल्यानंतरच मी त्याचा वध करण्यात सफल झालो. नंतर मी परत फिरलो, अन् पहातो तो काय! गुहेचं दार शिळा बसवून बन्द केलेलं! मी याला खूप ओरडून हाका मारल्या–'सुग्रीव, सुग्रीव! अरे कुठे आहेस तू?' पण हे महाशय तर तिथून पळून आले होते! स्वतः राजा बनायच स्वप्न पहात होता न? मी मग द्वारावरची शिळा लाथा बुक्क्यांनी मार मारून तोडून टाकली आणि कसा तरी गुहेतून बाहेर आलो!"

हा सर्व वृत्तान्त तेथे हजर असणाऱ्या सर्वांना ऐकवून झाल्यावर रागाने थरथरत त्याने सुग्रीवाला आपल्या राज्याबाहेर हाकलून दिले आणि त्याची पत्नी रुमा हिला स्वतःची पत्नी बनवून ठेवून घेतले. वालीच्या भयाने निरुपाय होऊन सुग्रीव ऋष्यमूक पर्वतावर जाऊन राहू लागला. सुग्रीवा-बरोबर हनुमान, जाम्बवन्त, मंद आणि



द्विविद नावाचे वानर त्याचे मन्त्री बनून त्याच्याचबरोबर त्या पर्वतावर राहू लागले.

अशा तऱ्हेने सुग्रीवाबरोबर रहात असतानाच हनुमानाची श्रीरामाशी ओळख झाली. एके दिवशी सुग्रीवाने दोन माणसांना त्या भागात फिरताना पाहिले. ते दोघे पम्पा सरोवराच्या जवळ असणाऱ्या वनात विचरण करीत होते. दोघेही धनुर्धारी असून दिसायला मोठे सुन्दर होते. त्यांना पाहून सुग्रीव मनोमन घाबरून गेला. वालीला एक शाप होता. त्या शापामुळे ऋष्यमूक पर्वतावर तो पाऊलही ठेवू शकत नव्हता. त्यामुळे सुग्रीवाला वाटले की आपल्याला मारण्यासाठी बहुधा वालीनेच या दोन माणसांना पाठवले आहे. आता आणखी कोठे जाऊन लपावे–या विचाराने सुग्रीव व्याकुळ झाला.

सुग्रीवाला भ्यायलेला पाहून हनुमानाने विचारले–"वाली स्वतः तर इथे येऊ शकत नाही ना? मग जणू काही वालीच कुठे दिसला असावा, इतके आपण भ्यायलेले कसे दिसता?"

"वाली येऊ शकत नाही, हे तर मलाही माहीत आहे. पण ती दोन माणसं बघ; त्याच्यांजवळ असलेले धनुष्य बाण आणि तलवारी वगैरे पहा. मला तर असं वाटतंय की मला मारून टाकण्यासाठी वालीनेच



त्यांना इकडे पाठवलं असावं! तेव्हा हनुमान, तू त्या मानवांच्या हालचालींवर बारकाईने पाळत ठेव; त्यांचं आपसातलं बोलणं ऐक. ते शत्रु आहेत की मित्र याची नीट परीक्षा कर; आणि मग ते असे हत्यारबन्द होऊन या जंगलात का फिरत आहेत याची त्यांच्याजवळ चौकशी कर." सुग्रीवाने हनुमानाला सूचना दिल्या.

सुग्रीवाच्या म्हणण्यानुसार हनुमान राम-लक्ष्मणाला भेटायला त्यांच्याकडे गेला. हनुमानाने एका ब्रह्मचारी माणसाचे रूप धारण केले व त्यांच्याजवळ जाऊन मोठ्या नम्रतेने तो म्हणाला–"महाशय, आपण दोघं तर कोणी राजर्षि, देवता किंवा कोणा



तपोधनांसारखेच दिसत आहात. आपण कोण आहात? या पम्पा सरोवराच्या काठी आपणाला का यावे लागले? आपणाला पाहूनच जंगली जनावरे भीत आहेत.."

राम-लक्ष्मणांनी यावर काहीच उत्तर दिले नाही. तेव्हा हनुमानच पुढे सांगू लागला—"सुग्रीव नावाचा एक धर्मात्मा वानर-राजा आहे. तो महान् बलशाली आहे. त्याच्या भावाने त्याला राज्याबाहेर घालवून दिल्यामुळे आजकाल तो कष्टाने आपली कालक्रमणा करीत आहे. मी त्याचा मन्त्री! माझं नाव आहे-हनुमान. सुग्रीवाच्या आज्ञेने ऋष्यमूक पर्वतावरून मी आपणाला भेटायला आलो आहे. मी कामरूपी असल्यामुळे ब्रह्मचारी वेषात आपणाकडे आलो आहे. मी इच्छागामीही आहे. सुग्रीव आपणाशी मैत्री करू इच्छितो."

हनुमानाचे हे सर्व बोलणे ऐकून रामाला फार आनन्द झाला. कारण यापूर्वी कबंधाने रामाला सांगितले होते की, रावणाच्या पंजातून सीतेला सोडवायचे असेल, तर तुला वानर-राजा सुग्रीव याच्याशी मैत्री जोडायला हवी.

रामलक्ष्मणाला म्हणाला—"लक्ष्मणा, आपण ज्याला शोधत आहोत, तोच आपण होऊन आपल्याकडे येऊ पहात आहे, हे आपले केवढे भाग्य! हा मोठा भला, निर्मळ अंतःकरणाचा व निष्कपटही वाटतो आहे. तू बोलतोस याच्याशी?"

तेव्हा लक्ष्मण हनुमानाला म्हणाला—"सुग्रीवाच्या सद्गुणांबद्दल आम्ही ऐकलं आहे. खरे म्हणजे तुम्हाला शोधायलाच आम्ही इकडे आलो आहोत. तुझ्या म्हणण्याप्रमाणे सुग्रीवाशी मैत्री करायला आम्ही तयार आहोत."

रामाचे सुग्रीवाशी काही जरूरीचे काम असावे; तेव्हा सुग्रीवाला त्याचे राज्य परत मिळवून द्यायला राम नक्कीच मदत करील-या विचाराने हनुमानाला आनन्द वाटला. मग हनुमानाने राम-लक्ष्मणांना विचारले—"महात्मन्, या भयानक दंडकारण्यात





आपणाला का यावे लागले, याचं कारण कळेल मला?"

तेव्हा रामाने लक्ष्मणाला आपली कहाणी सांगायची परवानगी दिली. लक्ष्मण सांगू लागला—

"हा महाराज दशरथ यांचा पुत्र राम. हा राजा बनण्यायोग्य झाला आहे. आपल्या पित्याने दिलेले वचन पाळण्यासाठी हा राज्य सोडून असा वनवासी झालेला आहे. मी त्याचा धाकटा भाऊ लक्ष्मण. आमच्या बरोबर याची पत्नी, म्हणजेच माझी वहिनी सीतामाईही वनवासाला आली होती. आम्ही दोघं आश्रमापासून दूर गेलो आहोत असे पाहून कोणा एका राक्षसाने याच्या पत्नीचे अपहरण केले. तो राक्षस कोण हे आम्हाला माहीत नाही. दुसऱ्या एका राक्षसाने आम्हाला सांगितले की सुग्रीवाकडून आम्हाला त्या राक्षसाचा पत्ता लागू शकेल. मी आता आमच्याबद्दल तुला सर्व सांगितलेच आहे. महान माणसालाही आश्रय देऊ शकणारा हा महापुरुष सुग्रीवाशी मैत्री करू इच्छित आहे. अन् मोठ्या भाग्याची गोष्ट अशी, की सुग्रीवाचीही नेमकी तीच इच्छा आहे."

यावर हनुमान म्हणाला—"खरे तर आमचा राजा सुग्रीव यानेच आपणाला शोधत यायला हवे होते. वालीने त्याचे राज्य आणि पत्नी—दोन्हीचे अपहरण केल्यामुळे तो फार दुःखी आहे. सीतामाईंना शोधायला तो आपल्याला अवश्य मदत करील." नंतर हनुमानाने दोघांना सुग्रीवाकडे येण्याचे आमन्त्रण दिले.

तेव्हा राम लक्ष्मणाला म्हणाला—"चल, आपण सुग्रीवाकडे जाऊ. त्याच्या मदतीने आपले काम होऊन जाईल."

हे ऐकल्याबरोबर हनुमानाने आपले खरे रूप धारण केले. राम-लक्ष्मणांना आपल्या खांद्यावर बसवून तो ऋष्यमूक पर्वताकडे निघाला. परन्तु सुग्रीव त्यावेळी ऋष्यमूकवर नव्हता! घाबरून तो मलय पर्वतावर जाऊन लपला होता!



मग मलय पर्वतावर लपलेल्या सुग्रीवाकडे जाऊन हनुमान म्हणाला—"राम-लक्ष्मण आपले अतिथि आहेत. इक्ष्वाकु वंशज राजा दशरथ याचे हे पुत्र. पित्याच्या आज्ञेने राम वनवासाला आले. आणि कोणी राक्षसाने त्यांच्या पत्नीला पळवून नेले. त्यामुळे तुमची मदत मागण्यासाठी तुम्हाला शोधत राम इथे आले आहेत. हे दोघे भाऊ राम-लक्ष्मण तुमच्याशीं मैत्री जोडू इच्छित आहेत. तेव्हा त्यांचे मित्र बनून तुम्ही पाहुणचार करावा."

हे सर्व ऐकून सुग्रीव फारच आनन्दला. सुन्दर असे मानवरूप धारण करून तो राम-लक्ष्मणांजवळ आला आणि म्हणाला—

"तुमच्या बाबत हनुमानाने मला सर्व काही सांगितले आहे. हे राजा राम, माझ्यासारख्या वानराशी तू मैत्री करावीस ही खरोखर भाग्याची गोष्ट आहे. माझा तर त्यात फायदाच फायदा आहे. माझ्याशी मैत्रीची इच्छा करत असशील तर आपला हात माझ्या हातात देऊन मित्र-धर्माचा आचार पूर्ण कर."

सुग्रीवाचा हात आपल्या हातात घेऊन रामाने त्याला आलिंगन दिले. मग हनुमानाने आरणीचे मन्थन करून अग्नि पैदा केला व त्याची पूजा केली. नंतर तो अग्नि त्याने राम व सुग्रीव यांच्या मधे ठेवला. त्या दोघांनी अग्निप्रदक्षिणा केली व त्याला साक्षी ठेवून त्या दोघांनी मित्रता स्थापन केली.

नन्तर राम सुग्रीवाला म्हणाला—"आता तू माझा मित्र बनला आहेस. यापुढे तुझे सुख हे माझे सुख व तुझे दुःख ते माझेही दुःख!"

सुग्रीवाने मृदु पाने असलेली एक साल वृक्षाची फान्दी तोडली व रामासह तो त्यावर बसला. लक्ष्मणासाठी हनुमानाने चन्दनाची एक फान्दी तोडली.

आपण व वाली यांच्यात शत्रुत्व कसे निर्माण झाले याची सविस्तर हकिकत नंतर सुग्रीवाने रामाला सांगितली. त्याने रामाला

विनवले–"मित्रा, वालीच्या भीतीने मी व्याकुळ होऊन गेलो आहे. या भीतीपासून माझं रक्षण कर."

वाली व सुग्रीव यांची गोष्ट ऐकून हसत हसत राम म्हणाला–"मैत्रीचं फळ म्हणजे उपकार! तुझ्या पत्नीचे अपहरण करणाऱ्या वालीचा मी वध करीन."

हे ऐकून सुग्रीवाला खूपच आनन्द झाला. तो म्हणाला–"हे रामा! मला वाटत आहे की तुझ्या कृपेने मला आपले राज्य व पत्नी परत मिळावी यासाठी तुला वालीचा वध करायलाच हवा. मी सीतादेवींना शोधून आणून तुमच्या हवाली करीन. त्या स्वर्गात असोत की पाताळात; मी त्यांना नक्कीच शोधून काढीन. हां, आता मला आठवतंय! मी सीतादेवींना पाह्यलंय! मला व माझ्या वानरवीरांना पाहून त्यांनी आमच्यासमोर आपल्या दागिन्यांचं गाठोडं टाकून दिलं होतं! ते दागिने मी संभाळून ठेवले आहेत. कदाचित ते दागिने ओळखाल तुम्ही. पहाच!"

सुग्रीवाने गुहेत जाऊन, एका कपडघात बांधलेले एक छोटेसे दागिन्यांचे गाठोडे रामापुढे ठेवले. कापड पाहून ती सीतेचीच ओढणी असल्याचे रामाने ओळखले.

यावर 'हे सीते!' ,असे म्हणत रामाला चक्करच आली. थोड्या वेळाने तो लक्ष्मणाला म्हणाला–"लक्ष्मणा, राक्षसाने जबरदस्तीने घेऊन जात असताना सीतेने दागिन्यांचं गाठोडं या हिरवळीवर टाकलं असावं. बघ त्यामुळे एकही दागिना कुठे जराही मोडलेला वगैरे नाही!"

लक्ष्मण म्हणाला–"दादा, केयूर आणि कुंडलं तर मी ओळखू नाही शकणार. पण सीतामाईंना मी रोज चरणस्पर्श करून नमस्कार करत असे, त्यामुळे त्यांच्या पायांतले हे पैंजण मात्र मीं बरोबर ओळखले."

दीन स्वरात रामाने सुग्रीवाला विचारले–"मग तर तू नक्कीच पाहिलं असणार की सीतेला घेऊन तो राक्षस कुठल्या दिशेला गेला?"





# अदृश्य करणी

कोण्या गावी एक दुष्ट जमीनदार रहात असे. भिकाऱ्यांना तो कधी आपल्या घराच्या आसपासही फटकू देत नसे.

एकदा त्या भागात मोठा दुष्काळ पडला. एका वेळेचे पोटभर जेवणही लोकांना मिळण्याची मारमार झाली! लोकांना माहीत होते, की जमीनदाराजवळ भरपूर धान्य आहे. त्याच्याजवळ जाऊन लोकांनी खूप विनवण्या केल्या; पण त्याच्या पत्थराच्या काळजाला मुळीसुद्धा पाझर फुटला नाही!

अशातच एका नौजवानाने पुढे होऊन वायदा केला की या जमीनदाराकडून धान्य मी मिळवूनच दाखवीन. तो जमीनदाराच्या बागेजवळ जाऊन एका मोठ्या झाडाखाली उभा राहिला आणि अगदी लक्षपूर्वक त्या झाडाच्या दाट पानांकडे पहात राहिला.

त्या युवकाला जमीनदाराने पाहिले आणि त्याच्या मनात त्या तरुणाबद्दल शंका आली. जोराने ओरडून त्याने विचारले–"कोण आहे रे तिथे? माझ्या बागेत काय करत आहेस?"

जमीनदार आता घरातून बाहेर आला आणि त्याने तरुणाला विचारले–"बहिरा आहेस काय? मी विचारतोय तुझं इथं काय काम आहे? उभा काय राहिलायस शुंभासारखा?"

"काही नाही. इथे एक घरटं शोधतोय मी. काल एका अग्निपक्षाला याच झाडावर बसताना पाहिलं होतं मी. या झाडावर जर त्याचं घरटं असेल, तर त्यात नक्कीच ती जादूची मुळी असणार! ते पहा घरटं!" आश्चर्याने एका बाजूला बोट दाखवत तरुण म्हणाला.

"जादूची मुळी? ती कशी असते बुवा? मला तर काहीच माहीत नाही!" जमीनदार म्हणाला.

चीनमधील लोककथा









यावर तरूण माहिती सांगू लागला– "ती एक अपूर्व अशी मुळी असते. हजारो वर्षांनी एकदाच या वनस्पतीला फूल येतं अन् मग हजार वर्षांनंतर त्या फुलाचं फळ होतं. त्याच्या लहानशा देठातही अद्‌भुत अशी शक्ती असते."

"पहिली अद्‌भुत शक्ती म्हणजे–ते देठ आपल्या डोक्यावरच्या केसात ठेवले, की आपण अदृश्य होतो! आपल्याला कोणीसुद्धा पाहू शकत नाही! मग काय, आपल्याला मनात येईल ते करता येतं! अन् दुसरी–"

तो तरूण आणखी काही बोलणार, इतक्यात त्याला रागावत जमीनदार म्हणाला–"ए, चालू लाग पाहू इथून. पहिल्यांदा चालता हो! तुला मी जायला सांगतोय न? हा माझा बगीचा आहे, तेव्हा ती अदृश्य-करणाची मुळीही माझीच आहे!"

"ओह! असं आहे होय? मी ती शोधून काढली, तशीच ती नष्ट करण्याचं तन्त्रही जाणतो मी." असे म्हणत तो तरूण झाडावर चढू लागला.

तेव्हा जमीनदार घाईने म्हणाला–"अरे थांब, माझं ऐक जरा; मीं तुला पन्नास अशर्फ्या देतो. तू निघून जा इथून!"

"आं? इतकी अद्‌भुत मुळी मी इतक्या स्वस्तात का म्हणून विकू?" युवकाने विचारले.

आता जमीनदार घासाघीस करू लागला. युवक म्हणाला–"मला पैशांची जरूरच नाही. धान्याची पन्नास पोती मला दिलीत, तर मी ती मुळी आपणासाठी तिथेच सोडून द्यायला तयार आहे."

नाइलाजाने जमीनदाराने ते कबूल केले. पन्नास पोती धान्य घेऊन तो नौजवान तेथून निघून गेला, आणि गावच्या गरिबांना त्याने ते धान्य वाटून टाकले.

जमीनदाराने आपल्या नोकरांना बोलावून ते घरटे काढवून घेतले, ते घेऊन तो आपल्या बायकोजवळ गेला आणि मोठ्या खुशीने त्याने विचारले–"माहीत आहे आज काय झालं?"

बायको म्हणाली–"मला कसं माहित असणार बरं? कुणाचं डोकं वगैरे तासून आलात की काय?"

"तुला कसं कळणार? ही एक जादूची मुळी हस्तगत केली आहे मी! हिच्या मदतीने खूप पैसा कमवीन बघ मी!" जमीनदार खुशीत येऊन बोलू लागला.

घरट्याकडे आश्चर्याने पहात बायकोने विचारले–"ही काय जादूची मुळी आहे?" तिला तर त्या घरट्यात गवत-पाला अन् सुक्या काटक्यांशिवाय काहीच दिसले नाही.

"यातच आहे ती जादूची मुळी. आता ती आपण शोधून काढायची इतकंच!" जमीनदार म्हणाला.

एक एक सुकी काडी आपल्या डोक्यावर ठेवत तो बायकोला विचारू लागला– "मी दिसतोय तुला?" अन् त्याची बायको म्हणत गेली–"हो, हो! अगदी चांगले












दिसताय." जमीनदार पुन्हा आपला प्रश्न घोकत राहिला अन् एक एक काडी डोक्यावर ठेवतच राहिला.

आता त्या प्रश्नांनी बायको कंटाळून गेली अन् त्रासून म्हणाली—"काही नाही दिसत, जा बघू आता." खरं तर तिच्या बोलण्याचा अर्थ होता की जादू किंवा अद्भुत वगैरे काही दिसत नाहीय. पण त्या मूर्ख जमीनदाराला वाटले की आत्ता आपण डोक्यावर ठेवलेली काडीच जादूची मुळी होय, अन् त्यामुळेच आपण आत्ता अदृश्य झालोय! मग ती काडी आपल्या केसात लपवून स्वत:ला-अदृश्य झालो असे समजत तो शहराकडे निघाला.

एका ठिकाणी त्याला गरम-गरम कचोऱ्यांचा वास आला. त्याने तिथल्या दोन कचोऱ्या उचलून खाऊन टाकल्या आणि पैसे न देताच पुढे निघाला. दुकानदार समजला की, जमीनदार आहे, देईल आज ना उद्या पैसे. म्हणून तो काहीच बोलला नाही.

"मी अदृश्य झालोय! दिसलो नाही म्हणून तर कचोरीवाल्याने पैसे नाही मागितले!" या विचाराने जमीनदार खूश झाला. आता त्याचे धैर्य दुप्पट वाढले!

आणखी एक दुकानदार आपले दुकान बंद करायच्या विचारात होता. त्या दिवशीच्या विक्रीचे पैसे समोर ठेवून ते मोजायचे काम तो करत होता. पैशांचा तो ढीग पाहिल्यावर जमीनदाराच्या मनात लोभ उत्पन्न झाला! डोळ्यांसमोर त्याला पैसे दिसत होते, स्वत:ला तो अदृश्य समजत होता. म्हणून पुढे होऊन त्याने दोन्ही हातांनी ते पैसे उचलायचा प्रयत्न केला.

पण दुकारदाराने त्याचा हात घट्ट पकडला व तो ओरडू लागला—"चोर, चोर! पकडा, पकडा!" आसपासचे दुकानदारही तेथे आले अन् त्यांनी जमीनदाराला चांगले बदडून काढले! चांगला मार खाऊन कसातरी उठत-बसत जमीनदार आपल्या घरी येऊन पोचला!






शिवपुरी गावात एक नवीनच वैद्य रहायला आला. त्याचं नाव होतं नेत्रदर्शी. गावकऱ्यांना त्याने सांगितलं, की आपण बराच काळ हिमालयात राहून, तिथल्या सिद्धपुरुषांकडून एक निराळीच चिकित्सा-पद्धति शिकून घेतली आहे.

या पद्धतीत म्हणे रोग्याला कोणत्याही प्रकारे तपासून पहायची गरजच नसते, फक्त थोडा वेळ रोग्याच्या डोळ्यांकडे पहायचं—की लगेच म्हणे त्याच्या रोगाचा पत्ता लागतो! फारच थोड्या काळात त्याचं नाव आसपासच्या गावातूनही चांगलंच प्रसिद्ध होऊन गेलं! सर्वच जण नेत्रदर्शीला 'महान् वैद्य' म्हणून त्याच्यावर स्तुतिसुमनं उधळू लागले!

त्याच गावात सत्यधर्म नावाचा आणखी एक वैद्यही अगोदरपासून रहात होता. लहानपणीच त्याने आपले आजोबा व वडील यांच्यापासून, खूप मेहनतीने चिकित्सा-शास्त्रातले बारकावे शिकून घेतले होते. त्या गावात नेत्रदर्शी आला, अन् सत्यधर्मकडे येणाऱ्या लोकांची संख्या घटत राहिली.

रोग्याची नाडी व इतर अनेक परीक्षा करूनच, खर पाहता रोगनिदान करायची पद्धत असते. पण नुसते डोळे बघून रोगनिदान करणं कसं बरं शक्य असेल? या बाबतील सत्यधर्मने खूप विचार केला, काही पुस्तकंही धुंडाळली, पण कुठेच काही माहिती मिळाली नाही त्याला. मग गावातल्या दोन वडीलधाऱ्या माणसांनाही त्याने आपला संशय बोलून दाखवला.

ते दोघं याबद्दल नेत्रदर्शीशी बोलले, तेव्हा तो म्हणाला—"या गावच्या वैद्याला 'कूपमंडूक'च म्हणायला हवं! गाव सोडून कधी बाहेर गेला असेल तर ना! फक्त ताडपत्रांच्या काही पोथ्या वाचून



वैद्यक शास्त्राचा थोडासा अभ्यास केला असेल, अन् लागला स्वतःला मोठा वैद्यराज समजायला! धन्वंतरीच लागून गेला की नाही मोठा! मी काही असा-तसा वैद्य नाही म्हटलं. अगदी लहानपणीच मी हिमालयात गेलो, अन् खूप काळपर्यंत तिथल्या सिद्ध-पुरुषांची शागिर्दी केली. तेव्हा कुठे प्रसाद म्हणून मी ही नवीन चिकित्सा-पद्धत शिकू शकलो. आता हे नेत्र-वैद्यक माझ्याबरोबर संपून जाऊ नये म्हणून, वाटलं तर एकादा योग्य शिष्य शोधून त्याला हे सर्व शिकवून टाकीन मी."

असेच आणखी काही दिवस लोटले. एक वैद्य म्हणून नेत्रदर्शीची काय लायकी असेल याबद्दलची सत्यधर्मच्या मनातली शंका जास्तच वाढली होती. त्याच्या मनात आलं की नेत्रदर्शीच्या प्रामाणिकपणाची आणि त्याच्या वैद्यकशास्त्राच्या ज्ञानाची कसोटी पहाण्याचा काही उपाय शोधून काढायला हवा.

एके दिवशी रात्री सत्यधर्मने जरासं वेशांतर केलं. आणि एका म्हाताऱ्या माणसाला बरोबर घेऊन तो नेत्रदर्शीच्या घराकडे गेला. दार वाजवताच नेत्रदर्शीने दार उघडले.

सत्यधर्म त्याला म्हणाला—"हा म्हातारा माझा काका आहे. आतापर्यंत त्याची तब्येत चांगली ठणठणीत होती, स्वतःची सर्व कामे तो स्वतःच करीत असे. पण काय झालं एकाएकी कुणास ठाऊक! गेला आठवडा-भर हा काहीसुद्धा खातपीत नाही. जबरदस्तीने दूध पाजलं तर त्याला उलटी होतेय. काही हालचाल नाही, की बोलणं व हिंडणं-फिरणंही नाही! आपण याला चांगलं तपासून, औषधोपचार करून बरं केलंत तर मी चांगली भरपूर फी देईन."

सर्व काही ऐकून त्यावर मोठ्याने हसत नेत्रदर्शी म्हणाला—"अरे, मी तर माझ्याकडे येणाऱ्या रोग्याला त्याच्या आजाराबद्दल काही विचारतही नाही. म्हाताऱ्याबरोबर येऊन तू तर बरेच काही सांगितलंस त्याच्याबद्दल! माझी निदान-पद्धत आहे 'नेत्रचिकित्सा', अन् मी आहे नेत्रदर्शी चिकित्सक! हिमालयात राहून तिथल्या थंडीशी झगडून मी काही सिद्धपुरुषांकडून वैद्यकशास्त्र शिकून घेतलं. ठीक आहे, जास्त काही तू सांगायची गरज नाही रोग्याबद्दल. त्याला जरा या चटईवर निजव बघू!"

सत्यधर्मने म्हाताऱ्याला चटईवर निजवलं. नंतर नेत्रदर्शीने जरा वेळ म्हाताऱ्याच्या डोळ्यात पाहून म्हटले—"अरे तुझ्या काकाचा पचनकोष अगदीच जीर्ण झालाय, मेंदूच्या नसा फाटल्यायत. म्हणूनच काही खाल्लेलं त्याला पचेनासं झालंय! तो बोलत चालत नाही, तेही यामुळेच. मी सामान्य काष्टौषधं नव्हे, तर केवळ हिमालयातच मिळणाऱ्या वनस्पतींपासून बनवलेली औषधं देतो बघ; लवकरच तुझा हा काका बरा होईल अन् हिंडू-फिरू लागेल!"

अचानक तो म्हातारा ताडकन चटईवर उठून बसला अन् म्हणाला—"बघ, मी चांगला बोलतोय-चालतोय! काय रे, हीच का तुझी अद्भुत् नेत्र-चिकित्सा? अरे मी तर जन्मांधळा आहे. अन् माझ्या डोळ्यात पाहून आम्ही सांगितलेले खोटे रोग तू खरे धरून चालला आहेस. तुला तर हे सुद्धा कळलं नाही, की मी ढार आंधळा आहे! कसला रे वैद्य तू?"

हे ऐकून नेत्रदर्शी त-त प-प करू लागला! सत्यधर्म म्हणाला—"मी या गावचा वैद्य, बरं का! माझं नाव सत्यधर्म, आजपर्यंत तुझ्या औषधोपचाराने कुणाचा जीव गेला नाही हे तुझं भाग्य; किंवा त्यांचं पुण्य म्हण! माणसाला जगण्यासाठी अनेक मार्ग असतात. एकादा चांगला मार्ग निवडून प्रामाणिकपणे जगायचा प्रयत्न करावा माणसाने! पण इथून पुढे तरी असं लोकांच्या जिवाशी खेळू नका वैद्यमहाराज!"

नेत्रदर्शीने सत्यधर्माजवळ माफी मागितली अन् त्याच दिवशी तो गाव सोडून निघून गेला.





# अति विनय

सुशील देशाच्या राजाचे नाव होते सर्वोत्तम. एकदा त्याला असा संशय आला की शत्रूचे काही गुप्त हेर आपल्या लोकांच्यात मिसळून रहात आहेत. संशयाचे कारण असे होते, की अलिकडे त्याच्या अन्तःपुरातील अनेक रहस्ये शेजारचा राजा निद्राप्रिय याच्या कानी जातात हे त्याच्या लक्षात आले होते.

सर्वोत्तमने मनात ठरवून टाकले की स्वतःच आपल्या नोकरांच्यात लपून असलेल्या गुप्त हेरांचा छडा लावायचा. काही दिवस त्याने अंतःपुरातल्या नोकरांवर पाळतही ठेवली. पण तो गुप्त हेर शोधायच्या कामात सफळ झाला नाही.

दरबारी विदुषक चारुहास हा खरोखरीच मोठा बुद्धिमान माणूस होता. एके दिवशी राजाने त्याला बोलवून घेऊन सर्व हकीकत सांगितली व म्हटले–"चारुहास, कसेही करून अन्तःपुरात छपून असलेल्या कपटी, धोकेबाज अशा देशद्रोह्यांना आपण शोधून काढलंच पाहिजे."

हसत हसत चारुहासने राजाला आश्वासन दिले–"महाराज, हे काम म्हणजे तर माझ्या डाव्या हातचा मळ! खरोखरीच अंतःपुरात शत्रूचा कोणी गुप्त हेर असेल तर त्याला ताबडतोब शोधून देणं, माझ्याकडे लागलं!" आणि त्याने अन्तःपुरातल्या साऱ्या नोकरांनी राजापुढे हजर व्हावे असे फर्मान काढले.

ते सर्व नोकर ताबडतोब दरबारात राजापुढे हजर झाले.

चारुहास त्यांना उद्देशून म्हणाला–"एका देशाचं राज्य करणाऱ्या राजाला रोज कसकशा अडचणींना तोंड द्यावं लागतं याची तुम्हाला कल्पना असेल. तेव्हा आपल्या राजाला सुखाने कालक्रमण करता यावे, याची जबाबदारी आपणा सर्वांवरच आहे, की नाही? राजाला जोपर्यंत अशी खात्री वाटणार नाही, की आपल्या भोवतालचे सर्व जण विश्वासपात्र आहेत, राजभक्त आहेत, तोपर्यंत तो आपलं आयुष्य निश्चिन्तपणे व सुखासमाधानाने कसं बरं घालवू शकेल? तुम्ही तर सर्वच जण मोठे राजभक्त, विश्वासपात्र अन् इमानी आहात. तुमच्यासारखे चांगलं नोकर दिमतीला असणं हे राजाचं केवढं भाग्य! तेव्हा आता तुम्ही एकेकाने पुढे येऊन राजाला चरणस्पर्श करून प्रणाम करा आणि त्याला प्रदक्षिणा घाला. अशा प्रकारे तुम्ही आपली राजभक्ति व्यक्त करावी, अशी माझी इच्छा आहे."

त्यावेळी तेथे अन्तःपुरातले एकूण सहा नोकर हजर होते. त्यातले दोघे ताबडतोब पुढे झाले; त्यांनी राजाच्या पायावर डोके ठेवले, त्याला प्रदक्षिणा घातली आणि एका बाजूला मागे सरून उभे राहिले.

राजा सर्वोत्तम पुतळ्यासारखा स्तब्ध राहून हे सर्व पहात राहिला.

इतर नोकरांकडे पहात चारुहासने विचारले–"अरे, काय झालं? राजाला प्रदक्षिणा का नाही घालत तुम्ही लोक?"

पण ते नोकर बिचारे काहीच बोलेनात! माना खाली घालून ते मुकाटयाने तसेच उभे



राहिले. चारुहासने पुन्हा एकदा विचारल्यावरही ते तसेच उभे राहिले.

यावर चारुहास रागाने त्यांना म्हणाला–"राजाच्या पाया पडायला सांगितलं ना तुम्हाला? ऐकू नाही येत? आटपा लवकर. नाहीतर फासावर चढवीन एकेकाला!" या धमकीने मात्र ते पुढे सरकले अन् राजाच्या पाया पडायला तयार झाले. तेव्हा ताबडतोब त्यांना थांबवत तो विदुषक राजाला म्हणाला–"महाराज, प्रथम ज्या दोघा नोकरांनी आपल्या पाया पडून प्रदक्षिणा घातली, तेच देशद्रोही आहेत. शत्रुशी हात मिळवणी केलेले गुप्त हेर नक्की तेच आहेत याबद्दल शंका नाही. पकडा त्यांना!"

विजयकुमार अग्रवाल









चारुहासच्या या बोलण्यावर राजा चकित झाला. त्याने विचारले–"हे तू कसं शाबित करू शकशील, की तेच राजद्रोही आहेत ?"

यावर उत्तरादाखल चारुहास म्हणाला– "अगदी सरळ गोष्ट आहे महाराज ! जे कपटी व ढोंगी असतात त्यांना नेहमीच आपल्या खऱ्या रूपावर पडदा घालण्याची आवश्यकता वाटते. त्या प्रयत्नात हर क्षण आपली खोटी राजभक्ती प्रकट करायच्या प्रयत्नात असतात असे लोक ! बारीकशी संधीही सोडणार नाहीत ते !"

"मग बाकीच्या चार जणांची काय हकिकत ?" राजाने विचारले.

"तेच खरे राजभक्त आहेत. अशा लोकांना सर्वांसमोर आपली भक्ती दाखवायला आवडत नाही. इतकेच नव्हे, तर आपला आदर वा राजभक्ती प्रकट करण्याच्याही त्यांच्या काही सीमा ठरलेल्या असतात. मी या सर्वांना आपल्याला प्रदक्षिणा घालायला सांगितले होते. ज्यांचे व्यक्तिमत्व उच्च असते, अन् जे स्वाभिमानी असतात ते असं कधीच करणार नाहीत. एक उक्ति पण आहे न, 'अतिविनयम्, धूर्तलक्षणम् !' आता आपणाला जास्त सांगायची काय आवश्यकता ?" विदुषकाने आपले समर्थन दिले.

राजाच्या लक्षात आले, की विदुषकाच्या बोलण्यात तथ्य आहे. त्याने लगेच आपल्या गुप्तहेर-खात्याच्या प्रमुखाला बोलावून आज्ञा दिली की या संशयित नोकरांची नीट चौकशी करून खरी गोष्ट काय आहे याचा पत्ता लावावा.

त्या प्रमुखाने या दोन्ही नोकरांना एका बाजूच्या खोलीत नेले व त्यांना आपल्या पद्धतीने विचारून खरी गोष्ट बाहेर काढली. तेच खरोखरी शेजारच्या राजा निद्राप्रियचे गुप्त हेर होते !

राजाने त्या दोन्ही गुप्त हेरांना हद्दपारीची शिक्षा दिली आणि तीक्ष्णबुद्धीच्या हुशार अशा चारुहासची खूप प्रशंसा करून त्याचा विशेष सत्कारही केला.









